ॐ

॥ कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥

# ॥ श्रीमद्भगवद्गीता ॥

## भाग पहिला — अध्याय पहिला.




संपादक

रामचंद्र स्वामीराव नाईक. बी. ए.

जगन्नाथ रघुनाथ अजगांवकर.

कल्याण रामचंद्र अंबेवाडी.




एवमष्टादशाध्यायी वाङ्मयी मूर्तिरैश्वरी ॥

— पद्मपुराण.

गीता जाणा हे वाङ्मयी । श्रीमूर्ति प्रभूची ॥

— ज्ञानेश्वरी.




वर्षप्रतिपदा, शाके १८५३ — २० मार्च १९३१.





किंमत ४ रुपये.

# निवेदन.

**लक्ष्मीनृसिंह वदवी मज सूत्रधार । माझें स्वतंत्रपण येथ नसेचि फार ॥**
**गीता अगाध जलराशि कसा तरावा । हा धोसरा हरि म्हणे तरि कां करावा ॥**

हरिपंडित–' गीतार्थप्रकाश ' अ. १ श्लो. ४.



गच्चालक भगवान् श्रीकृष्णकृपेनें आज आह्मी आमच्या सोळा भागांत प्रसिद्ध होणाऱ्या ' श्रीमद्भगवद्गीता ' या ग्रंथाचा पहिला भाग – अध्याय पहिला – वाचकांच्या हातीं देऊन आता एक वर्षाच्या संपूर्ण अवधीनंतर अज्ञ अर्भकाप्रमाणें पाऊल टाकावयास समर्थ झालों आहोंत असे धीटपणानें सांगत आहोंत. असें सांगतांना त्या अर्भकाला ज्याप्रमाणें पाऊल उचलून टाकतां आल्याचा आनंद होतो त्याप्रमाणें आह्मांलाहि आज आनंद होत आहे. या आमच्या आनंदांत वाचकांना भागीदार होण्याबद्दलची विनंति करून जनताजनार्दनासमोर आमच्या प्रयत्नाचें हे पहिले फळ अल्पोपहार नैवेद्य ह्मणून समर्पण करीत आहोंत

आह्मी ज्यावेळा कार्यास प्रारंभ केला त्यावेळीं मोठ्या विलक्षण अडचणी आमच्यासमोर उभ्या राहिल्या. ' सर्वारम्भास्तण्डुलाः प्रस्थमूलाः ' या न्यायानें प्रथमची अडचण कांचनाची. कार्य करण्याची हौस होती. पण हा कांहीं चुटकीचा मांडव घालावयाचा नव्हता. या कार्यास हात घालावयाचा ह्मणजे लाख सव्वालाख रुपयांची तरतूद करावी लागणार होती. पण परमेश्वरी संकेतच असा दिसूं लागला की, आह्मी कार्यास प्रारंभ करावा तों तो अनपेक्षितपणे वाचकांनीं व इतरांनीं सहानुभूति दाखवावी व अन्य कांहीं जणांनी आधीं झिडकारून नंतर प्रेमाचा मदतीचा हात पुढें करावा. प्रथम प्रथम आमचा धीर खचलाच. पण कांहीं सज्जनांनीं ओळखदेख नसतांही आपल्या संग्रहांतील हस्तलिखितें काढून दिलीं आणि ' तुह्मी कार्यप्रवृत्त व्हा; परमेश्वर सहाय्य करण्यास सदोदित जागता असतो ' ह्मणून धीर दिला; व जरी कार्याची कल्पना आमची होती तरी आत्मविश्वास नव्हता; तो आमच्या अंगीं आणून देऊन या सज्जनांनीं आह्मांला अमोल सहाय्य केलें; त्यामुळें आज आमच्या वाचकवृंदाची–इतक्या अवधीनंतर कां होईना–सेवा करण्याचें सामर्थ्य अंगीं आलें याबद्दल आह्मांला अतिशय समाधान होत आहे. अनेक अडचणीच्या आडदरींतून सुखाचा सोज्वळ निर्झर वाहतो हे निसर्गतत्व व्यवहारांतहि पूर्णांशानें खरें आहे.

ज्या सज्जनांनीं मदत केली ह्मणून वर उल्लेखिलें आहे त्यांत श्रीमंत सरदार चिंतामणराव खंडेराव उर्फ तात्यासाहेब मेहेंदळे, पुणें, यांचा प्रामुख्यानें नामनिर्देश केला पाहिजे. त्यांनीं आपल्या संग्रहांतील माधव नारायणदास या कवीची ' नारायणकीर्ति ' नांवाची पोथी ओळखदेख नसतां नुसत्या कार्याच्या रूपरेखेवर एकवार दृष्टिक्षेप करून आमच्या हवालीं करण्याचें सौजन्य दाखविले व त्यावेळीच असें सांगितलें कीं, ' मी तुमचा आहे; जी काय मदत आपणांस हवी असेल ती करावयास मी एका पायावर तयार आहे. ' तद्वतच श्री. नरसिंह चिंतामण केळकर, संचालक ' केसरी, ' पुणें,

यांनींहि सांगितलें व केसरींतून वेळोवेळीं प्रसिद्धीपत्रकें छापून आह्मांस सक्रिय सहाय्यहि केलें. समर्थ-भक्त श्री. शंकर श्रीकृष्ण देव, धुळें, व तंजावर सर्फोजी ग्रंथसंग्रहालयाचे चिटणीस रावसाहेब टी. सांबमूर्तिराव यांनी आपल्या संग्रहातील ग्रंथाच्या प्रती करून पाठविल्या. श्री. श्रीधर अवधूत देशपांडे, मोमिनाबाद, यांनीं केलेली मदत निराळ्या स्वरूपाची आहे. त्यांना आह्मी एक पत्र लिहून आमच्या कार्याची रूपरेखा कळविली तों त्यांनीं लगेच दासोपंतांचीं हस्तलिखितें स्वतःच्या खर्चानें आमच्याकडे रवाना केलीं व इतर रीतीनें मदत करण्याचें आश्वासनहि दिलें. यांची आमची यापूर्वी ओळख नव्हती व आजमितीसहि पत्री ओळखीशिवाय जास्त माहिती नाही. हुबळी येथील श्रीयुत उभयकर बंधु यांनीं रमावल्लभदास याची ' चमत्कारी ' टीका आमच्या ग्रंथात समाविष्ट करण्यास परवानगी दिली. तसेंच येथील वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध गृहस्थ गुरुवर्य श्री. भाऊसाहेब सोमण व त्यांचे बंधु श्री. बाबासाहेब सोमण या दोघांनां वेळोवेळीं विधायक सूचना करून आह्मांस धीर दिला व उत्साहित केलें. या सर्व मंडळींचे आह्मी अत्यंत ऋणी आहोंत. असो ! तात्पर्य एवढेंच कीं, कार्य करावयास मनुष्य आत्मविश्वासानें उभा राहिला ह्मणजे जनताजनार्दनाची मदत ही होतेच.

या ग्रंथांत आह्मी वीस टीका दिलेल्या आहेत. या टीकांचा काल श्रीज्ञानेश्वरापासून कविवर्य मोरोपंतापर्यंतचा आहे हे वाचकानीं कालानुक्रमाकडे ( परिशिष्ट ३ रें ) जरा नजर टाकल्यास चटकन समजण्यासारखें आहे. आज महाराष्ट्रात ज्ञानेश्वरीच्या दोन प्रती उपलब्ध आहेत. पहिली मुकुंदराजी प्रत असून दुसरी एकनाथी होय. मुकुंदराजी प्रत इतिहासाचार्य कै. वि. का. राजवाडे यांनीं सत्कार्योत्तेजक सभा, धुळें, या संस्थेमार्फत प्रसिद्ध केलेली आहे. ही ज्ञानेश्वरानीं लिहिलेली अस्सल प्रत असें ते ह्मणतात. पण ही आज महाराष्ट्रात लोकप्रिय झालेली नाहीं. याचीं कारणें कांहींहि असोत. त्या कारणांची मीमांसा न करता आह्मी एवढेंच सांगतों कीं, ती प्रत आह्मी दिलेली नाहीं. जी एकनाथी प्रत दिलेली आहे ती आज महाराष्ट्रात सर्वसंमत असून अनेकानीं तिचा अर्थ विशद करण्यासाठीं आपापल्या परीनें खटपट केलेली आहे. आह्मी ह. भ. प. श्रीनानामहाराज जोशी साखरे यांच्या प्रती-बरहुकूम ही ज्ञानेश्वरी दिलेली आहे.

निवृत्तीदेवाची जी टीका दिलेली आहे ती श्रीज्ञानेश्वरांचे ज्येष्ठ बंधु श्रीनिवृत्तिदास यांची नव्हे; तर अन्य कोणा निवृत्तिदेव नामक कर्त्याची आहे. सोपानदेवी व मुक्तेश्वरी या टीकांबद्दल आह्मांला संशय आहे. या टीकाचा उगम मूळ श्रीज्ञानेश्वराचे बंधु श्रीनिवृत्तिदास यांच्या टीकेपासूनच असावा असें दिसतें. एकनाथांनीं जशी ज्ञानेश्वरी शुद्ध केली त्याप्रमाणें मूळची निवृत्तिदेवी प्रथम सोपानदेवांनीं शुद्ध केली व नंतर ह्या सोपानदेवीवर मुक्तेश्वरांनीं आपला बुद्धिप्रधान हात फिरविला; असें ह्मणणारा एक पक्ष आज महाराष्ट्रांत प्रबळ होऊं पहात आहे. या पक्षाचे अध्वर्यु ठाणे येथील श्री. रा. म. आठवले हे होत. याचेजवळ ह्याच सोपानदेवीची अगर मुक्तेश्वरीची निवृत्तिदेवी ह्मणून लिहिलेली एक हस्तलिखित प्रत आहे व ती सतराव्या शतकांत कर्नाटकांत ' अर्कावती नदीच्या तीरावर बसून लिहिलेली आहे. या वादांत विशेष शिरण्याचें कारण नाहीं.

माधव-तंजावर प्रत-या नांवाखालीं जी टीका आलेली आहे ती माधव राघवदास यांची असावी अशी आमची शंका आहे. कारण १८ व्या अध्यायांतील शेवटच्या श्लोकावरील टीकेंत २०६ व्या ओंवींत — " माधविया युक्तीनें तीचा अर्थ । महाराष्ट्र भाषें परमार्थ । रामकृपेनें

कथिला यथार्थ । धणी तो समर्थ न्यून पूर्णाचा ॥ " – ते रामाचा उल्लेख करितात. पण याला दुसरा कोणताहि आधार मिळत नाहीं. असो.

या ग्रंथांतील तुकाराम पांडुरंगदास हे साधुवर्य तुकाराम नव्हेत. हे जातीनें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून नगर जिल्ह्यांत जामखेड पेठ्यांत खर्डे येथें रहात असत.याचें नांव तुका विप्र वोरवनकर अगर अंजनवतींकर असें आहे. हे आपणांस तुकाराम पांडुरंगदास असें ह्मणवीत. या पांडुरंगदास नांवावरून ही गीताटीका प्रसिद्ध साधुवर्य तुकाराम याच्या नांवावर मोडली जाऊं लागली. ह्याची मूळवृत्ति कुलकर्णीपणाची होती. मूळ आडनांव क्षीरसागर असें होतें. पांडुरंगाचे एकनिष्ठ भक्त होते ह्मणून आपणांस पांडुरंगदास असे ह्मणवीत असत. हे जन्मांध होते असें ह्मणतात. आपली परंपरा ज्ञानदेव–सच्चिदानंद बाबा ×××× तुकाराम अशी देतात. खर्डेनजीक वेलेश्वरीं त्यांची समाधि असून तेथें श्रावण मासीं यात्रा भरत असते. हे तुकाराम १८व्या शतकाच्या पूर्वार्धांत शाहू महाराजाच्या अमदानींत हयात होते. यांचा मूळग्रंथ श्री. तात्यासाहेब कुलकर्णी, क्षीरसागर, मुक्काम खर्डे, याजकडे आहे. ही सर्व माहिती आह्मांस श्री. अमृत बापूजी रसाळ, हेडमास्तर, राहुरी, जि. नगर, याजकडून मिळाली.

कविवर्य मोरोपंतांच्या दोन आर्याबद्ध टीका दिलेल्या आहेत. त्यापैकीं पहिली टीका १८७४ च्या सुमारास गीतार्थबोधिनी नामक ग्रंथात मोरोपंताची ह्मणून प्रसिद्ध झाली व त्यानंतर हीच टीका १९०२ मध्यें श्री. कृष्णराव अर्जुन केळुसकर यांनीं आपल्या ग्रंथात प्रसिद्ध केली. याच ग्रंथाची द्वितीयावृत्ति श्री. दामोदर सांवळाराम यदे यांनीं १९३० मध्यें प्रसिद्ध केलेली आहे. या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत श्री. केळुसकरानीं असें ह्मटलें आहे कीं, " ह्या आर्यमान्य ग्रंथावर महाराष्ट्रांतील सात्विक महाकवींनी केलेल्या भाषांतररूप टीका महाराष्ट्र–वाङ्मयाच्या भक्तास संग्राह्य वाटतील असें दिसल्यावरून त्याचा संग्रह प्रस्तुत पुस्तकांत केला आहे. वामनाची समश्लोकी, मोरोपंताची यमकविरहित आर्या, मुक्तेश्वराची ओवी, तुकारामाचा अभंग आणि उद्धवचिद्घनाची सवाई हीं प्रत्येक श्लोकाखालीं यथाक्रम दिलीं आहेत. " ' मोरोपंताची यमकविरहित आर्या दिलेली आहे ' असें ते ह्मणतात. पण ती खरोखर निर्यमक आहे कीं काय याकडे मात्र श्री. केळुसकरांनीं मुळींच लक्ष दिलें नाहीं. या वादांत शिरण्याची जरी आमची इच्छा नसली तरी पण हे सांगणें जरूर आहे कीं, श्री. केळुसकरांनीं प्रसिद्ध केलेली टीका मोरोपंतांचीच की अन्य कोणा कवीची हा वादग्रस्त प्रश्न आहे व तो आज येथे संपविणें अशक्य आहे. ह्मणून त्या वादांत न शिरतां आम्हीं असें सांगतों कीं, पहिली टीका संशयास्पद असली तरी ती वाचकांपुढे ठेविली आहे; व दुसरी संशयातीत असल्यानें तीहि दिलेली आहे. दुसरी टीका मोरोपंतांचीच असें वाटण्याचें कारण हें कीं, ती निर्यमक आहे व मोरोपंतांनीं वामनपंडितांच्या अनुष्टुप् वृत्तांतील टीकेच्या अनुरोधानें थोडासा फेरबदल करून ती आर्यावृत्तांत लिहिलेली आहे. आपल्या प्रस्तावनेंत मोरोपंत ह्मणतात;

" श्रीमद्वामनविरचित गीता टीकोत्तमा समश्लोकी ।
आर्या टीका तेचि छंद निराळें विचित्र हें लोकीं ॥ १७ ॥ "

आतां वामनाकडे पाहतां तीन वामन कवींच्या टीका येथें दिलेल्या आहेत. या तिघांपैकीं वामन –द्विजोत्तमाची पोथी धुळ्याचे समर्थभक्त श्री. देव याच्या संग्रहापैकीं कै. चांदोरकर यांच्या कपाटांत आढळली. या कवीचा काल व वास्तव्यठिकाण याचा कांहींच मागमूस लागत नाहीं. उरलेल्या दोन वामनांपैकीं यथार्थदीपिकार वामन हे वामनस्वामी होत. त्यांचा उल्लेख आमच्या ग्रंथात वामनपंडित

असा केलेला आहे; पण तो चुकीनें तसा झालेला आहे. प्रसिद्ध कविवर्य वामनपंडित हे आमच्या ग्रंथांत वामन–शांडिल्य या नांवानें उल्लेखिले गेले आहेत. वामन–शांडिल्य व त्यांचे आजोबा ' गीतार्थप्रकाश ' कर्ते हरिपंडित या दोघांनीं मिळून यमकबद्ध अशी बरीच काव्यरचना केली व ती आपले सद्गुरु जे यथार्थदीपिकाकार वामनस्वामी यांच्या नांवावर लिहिली असें आतां आढळून येत आहे. नामैक्यसादृश्यानें ज्ञानदेव, तुकाराम, नामदेव, श्रीधर, विठ्ठल या कवींच्या काव्योदधींत बराच गोंधळ माजून राहिलेला आहे. अस्तु ! या भागांत जीं नावें चुकून पडलीं आहेत तीं पुढील भागांत सुधारून घेण्यांत येतील.

मराठी भाषेला काव्याचें स्वरूप प्राप्त होऊन आज सरासरी आठ शतकें लोटलीं. एवढ्या अवधींत ओंवीबद्ध, श्लोकबद्ध, अभंगबद्ध असे पौराणिक व तत्वज्ञानाचे ग्रंथ सुलभपणें जनतेंत प्रसृत करावेत या उद्देशानें लहान मोठ्या सर्वच कवींनीं आपल्या लेखणीचा अहेर महाराष्ट्रशारदेस केला. बहुविध कवींनीं बहुविध प्रकारें तिची सेवा केली. या सेवा करणाऱ्यांमध्यें श्रीसमर्थासारखे व्यवहारी कवी होते; विठ्ठलाप्रमाणें कूट काव्यें करणारें होते; संतश्रेष्ठ तुकोबाप्रमाणें वारकरी होते; कोणी दिंडी-भजनाचा सोहळा वाढविला; कोणी मठ महंत उत्पन्न केले; कोणी नुसताच संप्रदाय चालविला. यांच्या कवितावधूला रामायण, महाभारत, भागवत, क्वचित् पुराणें, उपपुराणें व चुकून तत्वज्ञान यांचा उंबरघाट ओलांडून पलीकडे जाण्याची जरूरी भासली नाहीं. तिचे नानाविध अलंकार याच सृष्टींत दिसले; तिचे नानाविध विलास याच काव्योद्यानांत घडले. तेव्हां अशा प्रकारच्या काव्योदधीचें थोडक्यांत अवलोकन करूं गेलें असतां पंचम वेद महाभारतावर जेवढ्या कवींनीं परिश्रम केले आहेत तेवढे परिश्रम कोणत्याही ग्रंथावर इतक्या कविसमुदायानें केले नाहींत असें दिसून येतें. त्यांतल्यात्यांत महाभारताचें सारसर्वस्व जी गीता तिच्यावर १२ व्या शतकापासून तो तहत आजकालपर्यंत जेवढ्या कविसमुदायानें आपली लेखणी चालविली आहे तेवढा कविसमुदाय अन्य कोणत्याही ग्रंथावर भुललेला दिसत नाहीं. या गीतेवर परिश्रम करण्यांत सव्वालाखी दासोपंतापासून झोंपाळ्यावर बसून गाणाऱ्या अनंततनयापर्यंत सर्वांची सोय लागलेली आहे. या गीतेनें अंगाला राख फांसून अलक्ष म्हणून दारोदार फिरणाऱ्या वैराग्यापासून राणीवशापर्यंत सर्वांना सारखे मोहून टाकले आहे. इतक्या कवींना मोहून टाकणाऱ्या श्रीमद्भगवद्गीतेनें मराठी भाषेचा प्रदेशही कांहीं कमी व्यापिला नाहीं. पश्चिमेस अरबी समुद्रापासून तो पूर्वेस बंगालच्या उपसागरापर्यंत व सिंधुपासून खालीं सेतुरामेश्वरापर्यंतचा सर्व प्रदेश महाराष्ट्रशारदेनें गीतेच्या विलासाकरितां व्यापिला आहे. या प्रदेशांत तंजावर ते पंजाबांतील नामदेवाच्या वास्तव्यस्थानापर्यंत सर्व ठिकाणें येतात.

एवढें जरी खरें असलें तरी ज्ञानेश्वरीइतकी छाप कोणत्याच ग्रंथानें मराठी शारदेवर पाडली नाहीं. ज्ञानेश्वरीनें सर्वकाळां मान्यता मिळविलेली आहे. एवढेंच केवळ नव्हे तर अन्य कवींच्या टीकांमध्येंसुद्धा आपल्याला ज्ञानेश्वरीचेंच अनुकरण केलेलें आढळेल. याला प्रमाण म्हणून प्रस्तुत ग्रंथांतील रंगनाथ मोगरेकर यांची ' चित्सदानंदलहरी ' पुढें करितां येईल. रंगनाथ मोगरेकर वेदांतील सूत्रमयतेशी तन्मय होऊन ज्या ज्या वेळीं गीतेचा अर्थ लावितात त्या त्या वेळीं उपमा देतांना इतर कोणत्याहि उपमा न देतां अचुक ज्ञानेश्वरांचीच देतात; हें सूक्ष्मपणानें अध्ययन करणाऱ्यांच्या ध्यानांत चटकन येईल. ज्ञानेश्वरीनें १५ व्या शतकाच्या सुमारास जनतेवर आपली मोहिनी किती टाकली होती हें खालील दंतकथेवरून सहज ध्यानांत येईल.

" एकदां दासोपंत काशीयात्रेनिमित्त फिरत फिरत पैठणास आले. पैठण ह्मणजे संतांचें माहेरघर होय. पैठण क्षेत्र संतपरंपरेकरितां अतिशय श्रेष्ठ आहे. तेव्हां दासोपंतांची स्वारी पैठणक्षेत्रीं आली. सहजीं एकनाथस्वामींची गांठ पडल्यावेळीं संभाषणाच्या ओघांत एकनाथांनी ज्ञानेश्वरीची स्तुति केली. दोघेही विद्वान्; एकनाथ भक्तिमार्गी होते; दासोपंत केवळ भक्तिमार्गी नव्हते तर वेदवेदांतांतहि पारंगत होते. एकनाथांनीं सांगितलें कीं, ज्ञानेश्वरीसारखा उत्कृष्ट ग्रंथ नाहीं; तेव्हां दासोपंतांनीं ती ऐकण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्यावेळीं एकनाथ व दासोपंत दोघे मिळून एकनाथांच्या समाधि लावण्याच्या ठिकाणीं गेले. एकनाथस्वामींनीं 'अनन्याश्चिन्तयन्तो माम्' या श्लोकावर प्रवचन करण्यास प्रारंभ केला. सारखें प्रवचन सुरू होतें. एकादशीच्या दिवशीं दोनप्रहरीं हे प्रवचनास बसले होते. द्वादशीची पहांट होऊन सूर्याचीं कोंवळीं किरणें पोथीवर पडलीं तरी हें प्रवचन चालू होतें. तेव्हां दासोपंतांनीं विचारणा केली कीं, श्लोक संपला काय; लगेच एकनाथांनीं उत्तर केलें कीं, फक्त एक चरण संपला. तेव्हां दासोपंतांनीं लगेच मनांत खूणगांठ बांधली व गीतार्णवाच्या लेखनास प्रारंभ केला."

दासोपंत व एकनाथ हे समकालीन कीं काय हा प्रश्न येथें महत्वाचा नाहीं. आमच्या मतें हे दोन्ही कवी समकालीन नसावेत. पण तात्पर्य एवढेंच घ्यावयाचें कीं, एकनाथांनीं ज्ञानेश्वरी शुद्ध करून लोकांसमोर ठेविल्यानंतर ती लोकांना अतिशय आवडली. जनतेनें त्या ग्रंथाला वेदाइतकेंच महत्व दिलें; घरोघर पारायणें, प्रवचनें सुरू झालीं; ज्ञानेश्वरी पाहून इतर कवींना गीतेवर टीका लिहावयास स्फूर्ति झाली. ही मागची गोष्ट झाली. पण सद्यःकालचीसुद्धां मजा अशीच आहे. आधुनिक महाराष्ट्र कविपंचकांपैकीं कै. बालकवींनीं भावी कवींना संदेश देतांना असें लिहून ठेविलें आहे कीं, ज्या कोणाला कवी व्हावयाचें असेल त्यानें ज्ञानेश्वरीचें पारायण अवश्य ठेविलें पाहिजे. सध्यां तर तिनें कन्नडपंडितांनाहि मोहून टाकण्यास प्रारंभ केला आहे. ह्यावरून एवढेंच घ्यावयाचें कीं, ज्ञानेश्वरीनें तिच्या लेखनकालापासून तो तहत आजपर्यंत आपली श्रेष्ठता कायम ठेविली आहे. आपल्या धवल तेजानें सारखी प्रकाशते आहे. ह्मणून कालानुक्रमाप्रमाणे प्रथम व संतकाव्यातील उच्चतम ग्रंथ ह्मणून प्रथमस्थानीं तिची प्राणप्रतिष्ठा केली आहे.

कोणी असें ह्मणेल कीं, " विष्णुबुवा जोग, साखरे, कै. भिडे, केरळकोकिळ आठल्ये इत्यादिकांच्या ज्ञानेश्वरीच्या उत्तम, सटीक, सार्थ प्रती विकत मिळत असता तुह्मी येथें नुसती ज्ञानेश्वरी देण्याचें कांहींच कारण नव्हतें व ज्या कवींच्या गीतेवरील टीका आज एकदां प्रसिद्ध झाल्या आहेत त्या पुनः छापावयाच्या नव्हत्या. फक्त अप्रसिद्ध टीका छापल्या असत्या तर भागलें असतें." हें खरें आहे. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, आजपर्यंत ज्या गीताटीका छापल्या गेल्या त्यांच्या प्रती मिळतातच असें नाहीं. खात्रीनें मिळणाऱ्या टीका ह्मणजे ज्ञानेश्वरी व यथार्थदीपिका ह्या होत. पण सध्यां यथार्थदीपिकाहि मिळेनाशी झाली आहे. ज्ञानेश्वरी मात्र सर्वत्र मिळतें. दुसऱ्या कांहीं टीका प्रकाशित असूनहि मिळत नाहींत. श्री. दा. सां. यंदे यांनीं प्रसिद्ध केलेला—पांच कवींच्या टीका असलेला—ग्रंथ आजला मिळूं शकतो; पण तो ग्रंथ आमची योजना प्रसिद्ध झाल्यानंतर व साधारण आमचा ग्रंथ अर्धाअधिक छापून तयार झाल्यानंतर प्रसिद्ध झाला. या ग्रंथाची पहिली आवृत्ति १९०२ च्या सुमारास निघाली होती. पण ती आमच्या योजनेच्या वेळीं मिळण्यासारखी नव्हती. तसाच रंगनाथ मोगरेकरकृत 'चित्सदानंदलहरी' हा ग्रंथ १८९१ सालीं प्रकाशित झाला होता. पण तोहि मिळण्यासारखा नाहीं. रमावल्लभदासकृत 'चमत्कारी' टीका १९२५ सालीं प्रसिद्ध झाली. पण अद्याप तिची

माहिती सर्वांना नाहीं. याकरितां हे एकदां छापलेले टीकाग्रंथ आमच्या ग्रंथांत समाविष्ट केले आहेत. अप्रकाशित ग्रंथ प्रसिद्ध करावयाचें हें तर आमचें ध्येय असल्याकारणानें ते आह्मी या ग्रंथांत सामील केले तर कांहीं नवल नाहीं. आमची अशी महत्वाकांक्षा आहे कीं, वाचकांच्या सक्रिय सहानुभूतीनें आह्मी गीतार्णवासारखा प्रचंड ग्रंथ प्रसिद्ध करावा. कारण हा एकच ग्रंथ छापावयाचा असें ह्मटलें तर त्यालाच सरासरी चार वर्षांचा अवधी लागेल. ह्याशिवाय पुष्कळ जुन्या कवींच्या टीका प्रसिद्ध करण्यासारख्या आहेत. परंतु त्या आमच्या हातीं न पडल्याकारणानें आमचा नाइलाज आहे.

आधुनिक टीकाकारांना आम्ही येथें मुळींच वाव ठेविलेला नाहीं. याचें कारण एवढेंच कीं, सध्यांच्या काळीं ते आपले ग्रंथ प्रकाशित करण्याचे प्रयत्न स्वतः करूं शकतील. पण जुन्या कवींचें तसें नाहीं. त्याचे जे ग्रंथ आज खातेऱ्यांत पडले आहेत ते शोधणेंहि सध्यां दुर्घट होत चाललें आहे. तेव्हां महाराष्ट्रभर फिरून ज्या जुन्या कवींचे ग्रंथ सांपडतील ते प्रसिद्ध करावयाचें व त्यांचें महत्व जनतेस समजावून द्यावयाचें या उद्देशानें आम्ही हें कार्य हातीं घेतलें आहे; व हें कार्य सिद्धीला नेण्याकरितां आम्हांला केव्हांहि जनतेची सहानुभूति ही पाहिजेच.

श्रीमद्भगवद्गीतेवर श्रीशंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, इत्यादिकांच्या संस्कृत टीका आहेत. शिवाय बंगाली, हिंदी, तामीळ, कानडी वगैरे रूढ देशी भाषामध्यें पुष्कळ प्रसिद्ध व अप्रसिद्ध अशा टीका आहेत. इंग्रजी भाषेमध्यें कांहीं देशी व विदेशी पंडितांनीं भाषांतरें व अनुवाद केलेले आहेत. यावरून असें ह्मणावयास हरकत नाहीं कीं, आमच्या या गीतेंतील तत्त्वज्ञानानें अखिल जगावर आपली मोहिनी टाकलेली आहे. पौर्वात्य तत्वज्ञानाची श्रेष्ठता या निरनिराळ्या भाषांमध्यें केल्या जाणाऱ्या व झालेल्या भाषांतराच्या संख्येवरूनच ध्यानांत येईल. ख्रिस्ती धर्मपुस्तक जें बायबल त्याचें भाषांतर जगांतील सर्व भाषांमध्यें व्हावें या उद्देशानें संस्था स्थापन झालेल्या आहेत. त्यांच्याद्वारें हे भाषांतरकार्य एखाद्या यंत्राप्रमाणें कसें निरसपणें चाललेलें आहे हें निरनिराळ्या भाषेंत झालेल्या निरस व कटु भाषांतरावरून ध्यानांत येणारें आहे. पण गीतेची गोष्ट तशी नाहीं. या गीतेचें भाषांतर करणारा वर्ग ह्मणा अगर तिचा अनुवाद करणारा वर्ग ह्मणा आपण होऊनच पुढें येतो; सर्वांत उत्तम प्रकारचें आपलें भाषांतर व्हावें ह्मणून आपण झटतो; आणि गीतेंत काय काय सांगितलें आहे हें आपल्या समजुतीप्रमाणें विशद करून सर्व जगापुढे ठेवितो. या लोकांना कोणी ' हें कार्य तुह्मी करा ' असें सांगितलेलें नसतें. हा श्रीकृष्णाचा संदेश सर्व जगाला पोंचविण्याकरितां कोणतीहि ' बायबल लीग ' अगर ' ट्रॅक्ट सोसायटी ' प्रमाणें संस्था स्थापन करण्याची जरूरी पडली नाहीं. जो तो आपापल्या ऐपतीप्रमाणें तें कार्य आपखुषीनें करितो आहे. या मंडळींना कोणाचीही आर्थिक मदत नाहीं. असें असतानाहि हें कार्य प्रत्येक भाषेत–मग ती भाषा पौर्वात्य असो अगर पाश्चिमात्य असो–अविरतपणें चालूं आहे. यांमध्यें कै. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक, महात्मा गांधी यांच्यासारखे राजकीय पुढारीहि आहेत. हे आपलीं मतें याच ग्रंथाच्या आधारावर जनतेपुढें मांडीत आहेत. महात्माजींचा अगदीं अलीकडचा ग्रंथ ' अनासक्तियोग ' हेंच सांगतो. यावरून असें ह्मणावयास हरकत नाहीं कीं, पौर्वात्य तत्त्वज्ञान जरी समग्र विलयास जाऊन ' श्रीमद्भगवद्गीता ' हा एकच ग्रंथ जिवंत राहिला तरी तो जगांतील कोणत्याहि धर्माच्या अगर राष्ट्राच्या तत्वज्ञानाला हार जाणार नाहीं.

अशा या ग्रंथाकडे आमचे जुने संतकवी कोणत्या दृष्टीनें पाहात होते हें समजावयास त्या ग्रंथावरील सर्व टीका प्रसिद्ध झाल्या पाहिजेत. पण सांगावयास अत्यंत खेद होतो कीं, हे सारे टीका–ग्रंथ

आज उपलब्ध नाहींत. कित्येकांचा नुसता नामनिर्देशच केलेला आढळतो; तर कांहीं अपूर्ण अशा स्थितींत पहावयास सांपडतात; आणि कित्येक ग्रंथ जरी मिळाले तरी ते वाचतां येणें शक्य नाहीं. ही अडचण कांहीं अंशीं दूर व्हावी या हेतूनें आम्ही ह्या सर्व टीका सामुदायिकपणें छापण्याचें कार्य अंगिकारिलें आहे. या कार्यापासून दृश्य फायदे काय आहेत ते येणेंप्रमाणें;

१ जुन्या कवींच्या ग्रंथांचें प्रकाशन.
२ अप्रसिद्ध कवींच्या ग्रंथांचें संशोधन.
३ असे ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानें मराठी भाषेच्या ग्रंथभांडारांत पडणारी भर.

याशिवाय अनुषंगिक फायदे होतील ते येणेंप्रमाणें;

१ सर्व टीकाकारांचीं मतें सामुदायिकपणें समजण्याचें साधन.
२ एकीकडे सर्व टीका वाचावयास मिळणें.
३ एकदां प्रकाशित होऊन आजला न मिळणाऱ्या ग्रंथांचें पुनर्मुद्रण.
४ मराठी भाषेची वाढ कशी झाली हें समजावयाचें एक साधन.

'श्रीमद्भगवद्गीता' या ग्रंथाच्या मराठी वाचकांच्या सहाय्यावरच आम्ही या प्रकाशनास प्रारंभ केलेला आहे. तेव्हां जनता महाराष्ट्रिय संतकवींची सेवा करण्याचा हा प्रसंग वांया दवडणार नाहीं अशी आशा बाळगून

**सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः।**
**सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चित् दुःखमाप्नुयात् ॥**

अशी भगवान् श्रीकृष्णचरणीं प्रार्थना करून हा 'श्रीमद्भगवद्गीता' ग्रंथाचा पहिला भाग वाचकांच्या हातीं देऊन दुसऱ्या भागाच्या तयारीला आम्ही लागतों.

सर्वांचे नम्र,
रामचंद्र स्वामीराव नाईक.
जगन्नाथ रघुनाथ अजगांवकर.
कल्याण रामचंद्र अंबेवाडी.
संपादक.

बेळगांव.
वर्षप्रतिपदा, शके १८५३.

# उपकार-स्मरण.



१ श्री रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर, संचालक 'केसरी', पुणें.

२ श्रीमंत सरदार चिंतामणराव खंडेराव ऊर्फ तात्यासाहेब मेहेंदळे, पुणें.

३ श्रीसमर्थभक्त श्री. रा. रा. शंकर श्रीकृष्ण देव, संपादक 'रामदास-रामदासी,' धुळें.

४ श्री. संपादक मंडळ, 'महाराष्ट्र-शब्दकोश,' पुणें.

५ श्री. रा. रा. कृष्णाजी लक्ष्मण उर्फ भाऊसाहेब सोमण - 'किरात', बेळगांव.

६ श्री. रा. रा. सदाशिव लक्ष्मण उर्फ बाबासाहेब सोमण,
बी. ए., एल. एल. बी., बेळगाव.

७ श्री. रा. रा. नागेश वासुदेव गुणाजी, बी. ए., एल.-एल. बी.,
चीफ आफिसर-नगरपालिका, बेळगांव.

८ रावसाहेब टी. सांबमूर्तिराव, बी. ए., बी. एल; सेक्रेटरी,
महाराजा सर्फोजी सरस्वती महाल लायब्ररी कमिटी, तंजावर.

९ श्री. रा. रा. श्रीधर अवधूत देशपांडे, मोमिनाबाद, ( आंबे जोगाई ).

१० श्री. रा. रा. गोपाळ सुब्राव उभयकर, नारायणपूर—हुबळी.

११ ह. भ. प. श्री. रा. रा. रामचंद्र कृष्ण उर्फ अण्णा कामत,
श्रीदुर्गादत्तमंदीर, माशेल-गोवा.

१२ श्री. रा. रा. संपादक 'ज्ञानप्रकाश,' पुणें.

१३ श्री. रा. रा. नागनाथ विठ्ठल पाटक, नाथविश्रामधाम, बेलापूर. ( जि. अहमदनर. )

१४ श्री. रा. रा. लक्ष्मण खंडेराव कसरेकर, हेड मास्तर,
मुलांची शाळा, मोहाडी. ( जि. नाशिक. )



# ॥ गीताध्यानम् ॥



ॐ पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयम्। व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्येमहाभारतम् ॥
अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीमष्टादशाध्यायिनीम्। अम्ब त्वामनुसन्दधामि भगवद्गीते भवद्वेषिणीम् ॥ १ ॥

\+ पार्थ सखा ह्मणे बोधितसे भगवंत पहा महाभारतयुद्धीं।
जें परमामृत मुक्तिस दायक आदिनारायणवाक्य त्रिशुद्धीं ॥
व्यास पुराण कथी महाभारत त्यांत गिता जगदंब अनादी।
अध्यय हे अठरा अवलोकितां होइल मोक्षपरायण बुद्धी ॥ १ ॥

नमोऽस्तु ते व्यास विशालबुद्धे। फुल्लारविन्दायतपत्रनेत्र ॥
येन त्वया भारततैलपूर्णः। प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः ॥ २ ॥

त्यास नमूं मुनि व्यास विशालहि बुद्धि जयाप्रति पाराचि नाहीं।
पद्मप्रफुल्लितआतपलोचन तोचि प्रकाश वियोगदशाही ॥
भारततैलहि प्रज्वालित त्यांनहि दीपक ज्ञान दिशा दश पाही।
तोचि प्रकाश जगत्रय व्यापुनि अग्नि शशी रवि दीपत कांही ॥ २॥

प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये। ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥ ३ ॥

स्वर्ग सुरद्रुम घेऊनि ये हरि ते वनिं राहुनियां वनमाळी।
नाम जयाप्रति पारिजातही तोत्र नि वेत्र करीं त्रय काळी ॥
कृष्ण कृपाघन ज्ञानप्रकाशक योगवरिष्ठ जगा प्रतिपाळी।
अमृत हें भगवंतचि दोहत तो नमुं माधव दुर्घट काळीं ॥ ३ ॥

सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः। पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ ४ ॥

वेद वदे उपनीषद संस्मृति ते सुरभी सुदुधा श्रुतिभारें।
दोहक गोपति गोविंद गोकुळिं गोपकुळीं यदुनंदन बा रे ॥
वत्स बुभुक्षित पार्थचि प्राशित आणि उरे पसरे जग सारें।
तें परमामृत आदि गिता पहा अध्यय हे अठरा अविकारें ॥ ४ ॥

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम्। देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥ ५ ॥

---

\+ प्रत्येक संस्कृत श्लोकाखालीं मराठी सवाईवृत्तांतील दिलेला श्लोक उद्धवचिद्घन या कवीचा आहे.

जो वसुदेवसुत प्रभु देव समस्तहि ध्याति वसू वसुभेसी ।
घेउनिया सविदैत्यसमर्दन कंस अरी अणि चाणुरद्वेषी ॥
देवकिला परमानंद जाणुनि विश्वगुरू हरि विश्वविलासी ।
कृष्ण मुकुंद मुरारि रमाधव श्रीमधुसूदन वंदन त्यासी ॥ ५ ॥

भीष्मद्रोणतटाजयद्रथजला गान्धारनीलोत्पला । शल्यग्राहवती कृपेण वहनी कर्णेन वेलाकुला ॥
अश्वत्थामविकर्णघोरमकरा दुर्योधनावर्तिनी । सोत्तीर्णा खलु पांडवै रणनदी कैवर्तकः केशवः ॥ ६ ॥

भीष्म अणी गुरु द्रोण थडया जळ जैद्रथ कौरव सर्व कुमोदें ।
शल्य सुधीर कृप जळधारहि कर्णसवेळ कुळांत प्रमादे ॥
श्रीगुरुपुत्र अणीक विकर्णहि हे मगरे दुर्योधन भेदे ।
हे शफरी नदि दुस्तर पांडव तारक श्रीहरि युद्धविनोदें ॥ ६ ॥

पाराशर्यवचः सरोजममलं गीतार्थगन्धोत्कटम् । नानाख्यानककेसरं हरिकथासम्बोधनाबोधितम् ॥
लोके सज्जनषट्पदैरहरहः पेपीयमानं मुदा । भूयाद्भारतपंकजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे ॥ ७ ॥

व्यासगिरासरसांत निघे महाभारत हें कमळापरि मानी ।
गीता त्यां आंत गंध सुभाषित पर्व कथा बहु केसरपाणी ॥
सज्जन षट्पद आमोद सेविती बोधक वेधक ऐकिति कानीं ।
ते कलिकल्मष नासुनि पावति शांतिसुखाप्रति श्रेय निदानीं ॥ ७ ॥

मूकं करोति वाचालं पंगु लंघयते गिरिम् । यत्कृपा तमहं वन्दे परमानन्दमाधवम् ॥ ८ ॥

अंगिरसापरि वाचक होईल गर्भ मुका षट्शास्त्रहि वक्ता ।
पांगुळ धांवत मेरु चढे जशि सैर भिंतीवरि मुंगि पहाता ॥
पूर्ण कृपा तुझि होईल ज्यावर काय अशक्य तयासि पहाता ।
वंदन हे परमानंद माधव यादव रुक्मिणिच्या निजकांता ॥ ८ ॥

यं ब्रह्मावरुणेन्द्ररुद्रमरुतः स्तुन्वन्ति दिव्यैस्तवैः । वेदैः सांगपदक्रमोपनिषदैर्गायन्ति यं सामगाः ॥
ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यन्ति यं योगिनो । यस्यान्तं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः॥९॥

जो प्रपितामह वेदविधी वरुणेंद्रहि रुद्र मरुद्गण सारे ।
स्तोत्र मुखें करि दिव्यस्तुती गित गातहि सांगच साम तसा रे ॥
ध्यात ऋषी मुनि योगिहि पाहति नेणति कोणि सुरासुर वा रे ।
सोचि सचिद्घन उद्धव वंदित देव दयाघन पूर्णकृपा रे ॥ ९ ॥



ॐ



जगच्चालक भगवान् श्रीकृष्णचरणीं

भक्तिपुरस्सर समर्पण.



॥ कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥

# ॥ श्रीमद्भगवद्गीता ॥

## भाग पहिला—अध्याय पहिला.

[ पांडवांनीं कपटद्यूतांत राज्य हरवल्यानंतर बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगून कौरवांकडे आपला राज्याचा अर्धा हिस्सा मागितला. भीष्म द्रोणांसारख्यानीं कौरवाना सांगून पाहिलें. पांडवांनीं श्रीकृष्ण भगवानांना शिष्टाई करण्याची विनंति केली; पण या शिष्टाईचा कांहीं उपयोग झाला नाही. तेव्हां पांडवांनीं आपलें राज्य युद्ध करून परत मिळवावयाचें अशा निश्चयानें युद्धाची तयारी केली. पांडवांचें सात अक्षौहिणी व कौरवांचें अकरा अक्षौहिणी सैन्य रणभूमीवर तयार झालें. युद्धाचें आरंभीं हीं सैन्यें लढण्यास समोरासमोर राहिल्यावेळीं अर्जुनाला त्या सैन्यात कोण कोण आहेत हें पाहण्याची इच्छा होऊन त्यानें आपले सारथि श्रीकृष्ण भगवान याना आपला रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागीं नेऊन उभा करण्याची विनंति केली. त्याप्रमाणें श्रीकृष्णानीं रथ नेऊन उभा केला. तेव्हां तेथें अर्जुनाला आपले गुरु, वडील, सासरे, मामे, भाचे, मुलगे, पुतणे इत्यादि स्वजन लढण्यास उद्युक्त झालेले दिसले. तो अतिशय गडबडला. त्याच्या मनात मोह उत्पन्न होऊन त्याला विषाद वाटला. युद्धामध्यें स्वजनांचा होणारा वध, त्यापासून होणारा कुलक्षय, वर्णसंकर आणि पिंडोदकक्रियांची लुप्तता व त्यामुळें पितरांना घडणारा नरकवास इत्यादि कारणामुळें त्यानें युद्ध करण्याचें नाकारलें. त्यावेळीं श्रीकृष्ण भगवानांनीं त्याला उपदेश केला आणि त्या उपदेशाच्या योगानें अर्जुनाचा मोह व दुबळेपणा नष्ट होऊन त्यानें आपलें कर्तव्य—युद्ध—केलें. श्रीकृष्णांनीं हा जो उपदेश अर्जुनाला केला त्याचेंच नांव ‘ भगवद्गीता ’. ही महाभारतांत भीष्मपर्वाच्या २५ ते ४३ या अध्यायांत आलेली आहे.

युद्धांत स्वजनांना मारून आणि राज्य, भोग व ऐश्वर्य मिळवून आपणास काय करावयाचें आहे असा जो अर्जुनाच्या मनाला विषाद वाटला त्यावरून या अध्यायाला ‘ विषादयोग ’ असें नांव दिलेलें आहे. बहुतेक टीकाकार या अध्यायाला कांहीं महत्व देत नाहींत. गीता हें योगशास्त्र आहे आणि विषादयोग ही त्याची पहिली पायरी आहे हें पुष्कळ लोक विसरतात. गीताकाराने योग हा शब्द

अत्यंत व्यापक अर्थानें गीतेंत अनेक ठिकाणीं आणि प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं वापरलेला आहे. या योगांत – योगशास्त्रांत – इतर अनेक – ज्ञान, भक्ति, कर्मादि – योगांचा अंतर्भाव होतो हें गीतेचें काळजीपूर्वक व मार्मिकपणें अध्ययन करणाऱ्याच्या सहज लक्षांत येईल. प्रस्तुतप्रसंगीं ' स्वजनांना मी त्रैलोक्याच्या राज्याकरितांहि मारणार नाहीं, मग पृथ्वीच्या राज्याची गोष्ट सोडा ' ( श्लोक ३५ ) असा जो अर्जुनाला विषाद वाटला तो भाग अत्यंत महत्वाचा व मनन करण्याजोगा आहे. येथें अर्जुनाची भूमिका वीराची नसून शिष्याची आहे. ' मी शिष्य या नात्यानें तुह्मांला शरण येत आहे ' अशी कबूलीहि अर्जुन दुसऱ्या अध्यायांतील ७ व्या श्लोकांत देत आहे हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. तेव्हां कोणत्याही मुमुक्षुला, साधकाला अगर शिष्याला संसाराचा, सुखाचा आणि ऐश्वर्याचा वीट आल्याशिवाय किंवा गीतेच्या भाषेंत सांगावयाचें तर अर्जुनासारखा विषाद वाटल्याशिवाय तो योगशास्त्राचा अधिकारी होऊं शकत नाहीं. ह्मणून विषादयोग ही योगशास्त्राची पहिली पायरी आहे हें गीतेच्या प्रारंभीं पहिल्या अध्यायांत सुचविले आहे. ]

# मंगलाचरण.

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी )"

श्रीगणेशाय नमः ॥ ॐ नमो जी आद्या । वेदप्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥१॥ देवा तूंचि गणेशु । सकलार्थमतिप्रकाशु । ह्मणे निवृत्तिदासु । अवधारिजो जी ॥२॥ हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुवेष । तेथ वर्णवपु निर्दोष । मिरवत असे ॥३॥ स्मृति तेचि अवयव । देखा अंगीक भाव । तेथ लावण्याची ठेव । अर्थशोभा ॥४॥ अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें । पदपद्धती खेवणें । प्रमेय रत्नांचीं ॥५॥ पदबंध नागर । तेंचि रंगाथिलें अंबर । जेथ साहित्य वाणें सपूर । उजाळाचें ॥६॥ देखा काव्यनाटका । जें निर्धारिता सकौतुका । त्याचि रुणझुणती क्षुद्रघंटिका । अर्थध्वनि ॥ ७ ॥ नाना प्रमेयांची परी । निपुणपणें पाहतां कुसरी । दिसती उचित पदे माझारीं । रत्ने भलीं ॥८॥ तेथ व्यासादिकांच्या मतीं । तेचि मेखळा मिरवती । चोखाळपणें झळकती । पल्लवसडका ॥ ९ ॥ देखा षड्दर्शनें ह्मणिपती । तेचि भुजांची आकृती । ह्मणऊनि विसंवादें धरिती । आयुधें हातीं ॥ १० ॥ तरी तर्कु तोचि परशु । नीतिभेदु अंकुशु । वेदान्तु तो महारसु । मोदकु मिरवे ॥११॥ एके हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु । तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकाचा ॥१२॥ मग सहजें सत्कारवादु । तो पद्मकरु वरदु । धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु । अभयहस्तु ॥१३॥ देखा विवेकवंतु सुविमळु । तोचि शुंडादंडु सरळु । जेथ परमानंदु केवळु । महासुखाचा ॥ १४ ॥ तरी संवादू तोचि दशनु । जो समता शुभ्रवर्णु । देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु ॥ १५ ॥ मज अवगमलिया दोनी । मीमांसा श्रवणस्थानीं । बोधमदामृत मुनी । अली सेविती ॥ १६ ॥ प्रमेय

१ कोंदण. २ उत्तम. ३ बारीक. ४ शेला.

प्रवाल सुप्रभ । द्वैताद्वैत तेचि निकुंभ । सरिसेपणें एकवटत इभ-।-मस्तकावरी ॥ १७ ॥ उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंदें । तियें कुसुमें मुगुटीं सुगंधें । शोभतीं भाळीं ॥ १८ ॥ अकार चरणयुगुल । उकार उदर विशाल । मकार महामंडल । मस्तकाकारें ॥ १९ ॥ हे तीन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळलें । तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज ॥ २० ॥ आतां अभिनव वाग्विलासिनी । जे चातुर्यार्थकलाकामिनी । ते शारदा विश्वमोहिनी । नमिली मियां ॥ २१ ॥ मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपुरु । ह्मणऊनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ॥ २२ ॥ जैसें डोळयां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे । मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी ॥ २३ ॥ कां चिंतामणी आलियां हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं । तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेवो ह्मणे ॥ २४ ॥ ह्मणोनि जाणतेन गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होईजे । जैसें मूळसिंचनें सहजे । शाखापल्लव संतोषती ॥ २५ ॥ कां तीर्थे जियें त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनीं ॥ ना तरी अमृतरसास्वादनीं । रस सकळ ॥२६॥ तैसा पुढतपुढती तोचि । मियां अभिवंदिला श्रीगुरुचि । जो अभिलषित मनोरुचि । पुरविता तो ॥२७॥

## माधव नारायणदास—“ नारायणकीर्ति ”

श्रीगणेशाय नमः । जय जय सन्मय मंगलमूर्ती । जय जय सदानंदकृती । जय जय गणाधिपति । जयजय भव–विघ्न–नाशा ॥ १ ॥ जयजय सदेकसागरा । जयजय सद्बुद्धि । गाय रा । संधी कैंची मीपणें ॥ २ ॥ श्रीदैसिकराजाय नमः ॥ करोनि गुरुपादुकास्मरण । संतसभे बोले निरूपण । जी स्वामी ये गीतेंचे महिमान । मन वाचा अगोचर ॥ ३ ॥ हे न ह्मणावें शास्त्रपुराण । हे माळा मंत्रूचि अति गहन । मोक्षपदवी पावे पूर्ण । ये र उच्चारितां ॥ ४ ॥ येथें पांचसेचौऱ्यात्तरी । श्लोक बोलिला मुरारी । आणि अर्जुन । बोलिला श्लोक चौऱ्यासी ॥ ५ ॥ बत्तीस संजयाची श्लोकवचनें । नव श्लोक बोलिले दुर्योधनें । आणि धृतराष्ट्र तेणें । येक श्लोक बोलिला ॥ ६ ॥ एवं साता शताची गणना । तंत्र सर्वात्मना । परी ग्रंथीं घातला श्रीव्यासदेवें ॥ ७ ॥ प्रबोधकारणें

भारती ॥ ८ ॥ भष्यवनीं ऋषीलागी । उपया प्रसंगीं । सकळ ण फळ इचें अंगीं । अतो वच्मि हे ऋषेश्वरा ॥ ९ ॥ हे भारतामाजी मध्यवर्ती । अष्टादशपर्व होय शोभविति । जैसा मेरु मिरवे अचळस्थिती । मणिमाळिकेमाझारीं ॥ ॥ १० ॥ हे स्वानुभवचंद्राची अमृतकळा । अद्वैतामृत वर्षे प्रेमळा । भगवंत उक्ती ह्मणोनि सोज्वळा । भगवती नाम वाच्य इचे ॥ ११ ॥ हें अष्टादशपर्वाचें सार । ह्मणोनि अष्टादशाध्यायी साचार । योगेश्वराचें हृदयमंदिर । इचेनि सदा वसते पैं ॥ १२ ॥ जैसा तमाचा ग्रासक तरणी । तैशी हे भवद्वेषिणी। संसारवार्ता नाइकिजे स्वप्नीं । इचेनि श्रवणकीर्तनें ॥ १३ ॥ **तावद्गर्जन्ति शास्त्राणि सेतिहासानि वै पुनः । यावन्नोत्पद्यते गीता कृष्णवक्त्राद्विनिर्गता** ॥ सरितांची तंववरीच गर्जना । जों न पावती सिंधुस्थाना । तैसी तंववरी गर्जतीं शास्त्रें नाना । जंव गीता हे श्रवणा आली नाहीं ॥ १४ ॥ **मलनिर्मलनिपुंसां गंगास्नानं दिनेदिने । सकृद्गीतांभसिस्नानं संसारमलनाशनम्** ॥ प्रतिदिनीं करिता जलस्नान । होय बाह्य मलमोचन ॥ तैसें नव्हे गीतामलमोचन । भवजलनाशन क्षणमात्रे ॥ १५ ॥ **गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रविस्तरैः । या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद्विनिसृता** ॥ निद्रस्था श्रीनारायणाचे । श्वासोश्वास ते निगम साचे । अतएव महिमान तयाचें । अगाधत्वें विराजे ॥ १६ ॥ स्वयें पद्मनाभ जागृत असतां । मुखपद्मापासाव निघाली गीता । इचा महिमा तंव निर्धारितां । निर्धारवेना कवणासी ॥ १७ ॥ पद्मनाभमुखानिसृत । ह्मणुनी सकळ शास्त्रांवरी मिरवत । नाना सकळ शास्त्रांचें मत । गीतेमाजी आतुडे

॥ १८ ॥ ह्मणोनी सकळ-शास्त्रमयी गीता । ऐसे गर्जनेसी आले बोलतां । ह्मणोनि हेचि सेवावी जाणतां । अ र्थ ॥ १९॥ **सर्वधर्मविनिर्मुक्तो भुंजानो वा इतस्ततः ।** सर्व धर्मी बाहीर दवडिला । स्वतां भोजन करुं लागला । ऐसा भृत्य होत्साता शरण आला । जरी ये भगवद्गीतेतें ॥ २० ॥ तो पुरुष भगवद्गीताध्यायी । निरुपण पाहे कदाचितही । मोक्षाधिकार तयाच्या ठाईं । येथें नाहीं संशयो ॥ २१ ॥ ये भगवद्गीतेचें पठण । मूर्खासीहि करी सर्वज्ञ । हे सर्वदा बोलतुसे वचन । वाहोनि आण सद्गुरुची ॥ २२ ॥ गीतापुस्तक जे मंदिरीं । तेथें स्वयें नांदे हरी । भक्तिमुक्ती दोन्ही कामारी । होऊनि तेथ राबती ॥ २३ ॥ केवळ पुस्तकसंरक्षण । त्याचें येवढें महिमान । जो करी पठण-श्रवण । त्याचा महिमा कोण बोले ॥ २४ ॥ वेदाध्ययन आणि यज्ञयजनें । तपें व्रतें तीर्थाटणें । इतुक्यांचें फळ पावती तत्क्षणें । गीतेचें एका अक्षरें ॥ २५ ॥ इयेचा जनक कृष्णनाथ । जो जगदोद्धार अमूर्त मूर्त । जो यादवाधीश कृपावंत । स्मरो श्रीचरण तयाचे ॥ २६ ॥ **नीलोत्पलदलश्यामं पीतांबरधरं हरिम् । शंखचक्रगदापद्मं ध्यात्वा देवं जनार्दनम् ॥** ज्याची नीलपद्मासारखी श्यामता । जो ही पीतांबरधारी निरुता । शंखचक्रगदापद्मातें धरितां । तो जनार्दन ध्यातां मी होयें ॥ २७ ॥ **करकमलनिरासितात्ममुद्रा । परिलिखितोऽनंत बर्हिचूडः । इतर-करगृहीतयोत्ततोत्रो । मम हृदिसंनिधि मां तनोति शौरिः ॥** जो कृष्ण युद्धावसरीं । मिरवता जाला कुरुक्षेत्रीं । उपविष्ट अर्जुन रथावरी । मयूरपुच्छें श्रीमुगुटीं ॥ २८ ॥ अर्जुनासि निरुपणविचारें । ज्ञानमुद्रा दावी सव्यकरें । आणि सारथी ह्मणोनि वागदेरे । अश्वाचे असती वामहस्तीं ॥ २९ ॥ तुरंग-पदरज-धूसरता । तेणें कुटिल कुंतळीं शोभता । असो ऐसा शौरी तो नित्यता । असो सर्वदा मम हृदयीं ॥ ३० ॥ **विवेकः प्रणवो यस्य क्रीडावस्त्वखिलं जगत् । श्रुत्यज्ञं ज्ञानवपुषं तं वंदे देवकीसुतम ॥** ज्यासी वाच्यत्वें असे ओंकार । ज्याची क्रीडा हो जगदाकार । ज्याची आज्ञा श्रुतिसाचार । ज्याचें शरीर ज्ञान पैं ॥ ३१ ॥ तो महाराज देवकीसुत । जो परिपूर्ण गुणार्णव अद्भुत । निरंतर माझा प्रणिपात । असो त्याच्या श्रीचरणीं ॥ ३२ ॥ धन्य तो अर्जुन नरोत्तम । ज्याचा सारथी पुरुषोत्तम । असो आतां तो मेघःशाम । अर्जुनेसी अभिवंदूं ॥ ३३ ॥ **वन्दे कृष्णार्जुनौ देवौ नरनारायणावुभौ । धार्तराष्ट्रकुलोन्मत्त-गजारोहणवल्लभौ ॥** कौरवकुलमदगजारोहणीं । जे वल्लभ कृष्णार्जुन दोन्ही । त्या नरनारायणांच्या चरणीं । वंदन माझें साष्टांग ॥ ३४ ॥ **सारथ्यमर्जुनस्यादौ कुर्वन्गीतामृतं ददौ । लोकत्रयोपकाराय तस्मै कृष्णात्मने नमः ॥** जेणें अर्जुनसारथ्य आधीं केलें । मग गीतामृत तयांसी दिधलें । नाना गीतारहस्य प्रगटिलें । लोकत्रयोपकारार्थ ॥ ३५ ॥ त्या श्रीकृष्णजीचें चरणीं । सर्वात्मना सर्व प्रयत्नेकरुनी । वंदन माझें प्रतिक्षणीं । साष्टांगेसी असो असो ॥ ॥ ३६ ॥ **प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये । ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥** जो कल्पतरु शरणंगता । जो तोत्रवेत्र करीं धरितां । जो गीतामृत दोहन करिता । त्या ज्ञानमुद्रस्था नमस्कार ॥३७॥ **सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः । पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥** श्रीकृष्णें गोपालकत्व आपुलें । अर्जुनाप्रतीं यथार्थ केलें । जेणें वळिल्या विचारबळें । सर्वोपनिषदा या धेनु ॥ ॥ ३८ ॥ स्वानुभव गोटणी स्थिराऊन । गोपालनंदनें केलें दोहन । पार्थवत्साचें वदनीं संपूर्ण । सुदली गीतामृत-धारा ॥ ३९ ॥ तेथें पात्रेवीण जालें दोहन । पात्रता ते अर्जुनाची पूर्ण । एक पात्र असतां कवण । दुसरें पात्र अंगिकारी ॥ ४० ॥ उदार श्रीशारंगपाणी । तेथें तो संचिताची शिराणी । ह्मणोनि पार्थवत्साचें हृद्वदनीं । वोतिलें सकळ गीतामृत ॥ ४१ ॥ ऐसे गीतामृताचें दोहन । कर्ता जो श्रीनारायण । वंदिले तयाचे चरण । आतां निरोपण अवधारी ॥ ४२ ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी."

॥ श्रीगुरुमूर्तये नमः ॥ सच्चिदानंदरूपाय कृष्णायाकुण्ठमेधसे । नमो वेदांतवेद्याय गुरवे बुद्धिसाक्षिणे ॥१॥ योऽतः प्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्तां । संजीवयत्यखिलशक्तिधरः स्वधाम्ना ॥ अन्यांश्च हस्तचरणश्रवणत्वगादीन् । प्राणान्नमो भगवते पुरुषाय तुभ्यम् ॥२॥ कृष्णानंदाय शांताय शिष्याणां पतये नमः । चित्स्वरूपाय शुद्धाय गुरवे बुद्धिसाक्षिणे ॥ ३ ॥ कृष्णानंदं परमसुखदं वेदशीर्षैकगम्यम् । पारावारं परमकरुणं चित्सुखाख्यं परेशम् ॥ शुद्धं शांतं परमगहनं केवलं ज्ञप्तिरूपम् । द्वैतातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥ ४ ॥ श्रीगुरुं परमानंदं वंदे आनंदविग्रहम् । द्वंद्वातीतं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् ॥ ५ ॥ ॥ जयजय श्रीगुरो मंगलमूर्ते । जयजय श्रीगुरो अज्ञानदात्रे । जयजय श्रीगुरो जगद्धात्रे । जयजय आर्त्त आर्त्तबंधो ॥ ॥ ६ ॥ जयजय सद्गुरो कल्याणमूर्ति । जयजय सद्गुरो अचिंत्यानंतशक्ति । जयजय श्रीकृष्णानंदसरस्वती । नमो चिच्छक्ति अव्यक्तरूप ॥ ७ ॥ जयजय सद्गुरो सर्वमंगल । जयजय सद्गुरो शिष्यवत्सल । जयजय सद्गुरो दीनदयाळ । नित्यनिर्मळ बोधस्वरूप ॥ ८ ॥ जयजय भवभयविध्वंसना । जयजय सद्गुरो चिदानंदघना । जयजय सद्गुरो परमपावना । नित्यनिर्गुणा दयानिधे ॥ ९ ॥ जयजय सद्गुरो विज्ञानमूर्ति । जयजय सद्गुरो चित्कलाज्योति । जयजय सद्गुरो चैतन्याकृति । नमो व्यक्तिप्रकाशका ॥१०॥ जयजय सद्गुरो सकलस्वरूप । जयजय सद्गुरो सच्चिद्रूप । जयजय सद्गुरो स्वयें अरूप । प्रकाशदीप निरंजन ॥११॥ जयजय श्रीगुरो कृष्णानंद । जयजय श्रीगुरो अगाधबोध । जयजय सद्गुरो निरस्तभेद । नित्य अगाध चित्सुखाब्धे ॥१२॥ जयजय श्रीगुरो नित्यनिरंजन । जयजय सद्गुरो नित्यानंदघन । जयजय सद्गुरो विश्वभावन । मनमोहन आश्चर्यरूप ॥ १३ ॥ जयजय अज्ञानध्वांतैकनिरस्त । जयजय सद्गुरो ज्ञानभास्वत । जयजय सद्गुरो स्वस्वरूपबोधित । सदोदित आनंदरूप ॥ १४ ॥ जयजय सद्गुरो धिषणासाक्षी[1] । जयजय सद्गुरो सर्वकुक्षी । जयजय सद्गुरो निजभक्तपक्षी । अलक्ष्यलक्षी निजानंद ॥ १५ ॥ ऐसें हें दशश्लोकीं तुझें स्तवन । बोबडा बोलीं म्या केलें पूर्ण । तोषवावया तुजलागून । आर्ती करून प्रेमभरें ॥ १६ ॥ आणि तूंचि एक गणाधिपति । विघ्नहर्ता तूं श्रीवरदमूर्ति । शारदारूपें तूं चिच्छक्ति । प्रेरकू मन्मतीलागूनिया ॥ १७ ॥ एवं गणेशशारदारूपें तूंची । तुजवीण व्यक्ति न भासे दुजयाची । तूंचि सर्वत्र सर्वादि सर्वांची । नाहीं अन्याची वार्ता येथ ॥ १८ ॥ ह्मणोनि माझिये भजनीय देवता । तूंचि एकु जी श्रीगुरुनाथा । नेणे मी देवतांतराची वार्ता । माता पिता भ्राता तूंचि सर्व ॥ १९ ॥ तुझेनि एकें वदनेंचि करूनी । कृतकृत्यता होतसे सर्वस्वपणीं । ह्मणोनि प्रवर्तें मी तुझ्याचि वंदनीं । वेदवाणी तुझेचि गुण ॥ ॥ २० ॥ ग्रंथीं त्रिविध मंगलाचरण । जयाचें जाणा पां ऐसें लक्षण । एक तें नमस्कारात्मक पूर्ण । दुसरें जाण आशिर्वादात्मक ॥ २१ ॥ एक तें वस्तुनिर्देशात्मक कीजे । एवं त्रिविध मंगळाचरण जाणिजे । तें मी करीतसें जी तुज सहजें । श्रीगुरुराजे अवधारिजो ॥ २२ ॥ तरी तुझेनि वंदनें नमस्कारात्मक । जयजयकारें आशिर्वादात्मक । तुझे स्वरूपवर्णनें जें सम्यक । निर्देशात्मक तेंचि जाण ॥ २३ ॥ ऐसें त्रिविध करूनियां मंगलाचरण । पुनःपुन्हा घाली लोटांगण । तुजाचि मागें निजकृपादान । अनन्यशरण होऊनियां ॥ २४ ॥ ऐसें बोलोनि सद्गुरुचरणीं । मस्तक ठेविला अतिप्रेमेंकरूनी । जेणें संतोषोनि सद्गुरुजननी । पोटाळूनि हृदयीं धरी ॥ २५ ॥ शिरोवघ्राण करूनियां अतिस्नेहें । मस्तकीं वरदहस्त ठेवी परम मोहें । तेणे सुखें मी ब्रह्माण्डीं न माये । वंदीं पाये मागुतेनी ॥ २६ ॥ तेणें लोटले प्रेमाश्रु

[1] बुद्धि.

नयनीं । बाष्प दाटलें निजकंठस्थानीं । बोलतां शब्द न फुटे वदनीं । लक्षीं नयनीं सद्गुरुचरण ॥ २७ ॥ ह्मणे जी जी सद्गुरु दीनोद्धरणा । मायबापा जी कृपागहना । परियेसीं माझी विज्ञापना । भाषीं करूणा तुजप्रती ॥ २८ ॥ मी तरी अतिमूढ मंदमती । परी संकल्प करीं असाधारण चित्तीं । ते मज अपत्याची पुरवी आर्ती । डोहळा अति सद्गुरुराया ॥ २९ ॥ तरी यया गीतातत्वाचें व्याख्यान । स्वामी करवीं तूं मजकडून । मद्वाचेमाजी प्रवेशोन । करीं प्रेरणा निरूपणीं ॥ ३० ॥ माझे आर्ति डोहळे पुरवावया । समर्थ कोण तुज माउलीवांचूनियां । ह्मणोनि मी शरण तुझिया पायां । पुरवीं थोंया जननीये ॥ ३१ ॥ तुझी होतांचि कृपादृष्टि । तरि निर्माण होय सकळ सृष्टि । तेथ शद्वरचनेची काय गोष्टी । पावें पुष्टी ब्रह्मपणें ॥ ३२ ॥ ऐसी परिसोनियां प्रार्थना । प्रसन्न जाहला सद्गुरुराणा । न भी ह्मणोनि दे अभयवचना । ग्रंथरचना करवी प्रेमें ॥ ३३ ॥ ऐसा प्रसन्न होऊनि सद्गुरुनाथु । ग्रंथव्याख्यानीं आज्ञा देतु । ह्मणे प्रकट करीं तूं गीतार्थु । उपनिषदर्थु सर्वसार ॥३४॥ जेणें सज्जनांचें हृदय निवे । परमानंदें करूनि सर्वत्र द्रवे । अज्ञानासि ही ज्ञान फावे । तैसें करावें गीतार्थासी ॥ ३५ ॥ ऐसी आज्ञा होतांचि अवसरीं । तत्काळ वंदीं निजमस्तकावरी । मागुतें सहस्रांत नमन करीं । आनंद अंतरीं दुमदुमितु ॥ ३६ ॥ आतां संत श्रोते यांसि करूनि नमन । अति प्रेमें घालीं लोटांगण । आदिकवि जे महाविष्णुसमान । त्यांसि ही नमन करीं प्रेमें ॥ ३७ ॥ श्रीव्यास वाल्मीकि जे आदिकवि । तयांचे चरण मी हृदयीं आठवीं । त्यांच्या प्रसादें ग्रंथु हा उगवीं । महाराष्ट्र ओवी करूनियां ॥ ३८ ॥ तैसी कृपा करूनियां संतश्रोतीं । परिसिजे हा ग्रंथ एकाग्रमती । तेणें प्रसन्न होऊनि संतपंक्ती । आज्ञा देती ग्रंथनिर्माणीं ॥ ३९ ॥ तेही आज्ञा वंदूनियां शिरीं । ग्रंथाचें व्याख्यान आतां विस्तारीं । तुमचे कृपेनें नाहीं दुर्लभ परी । सर्वाही परी सुलभ असे ॥ ४० ॥ अहो तुमचे कृपेची संतति । स्वाराज्याची करितसे प्राप्ति । ब्रह्मानंदें हेलावे त्रिजगति । ब्रह्मसंवित्ति स्फुरे स्वयें ॥ ४१ ॥ अहो श्रीगीतेचें व्याख्यान करणें । हें अपाड सहस्रगुणें । क्षुल्लक हस्तीं झोंबे स्वर्गस्थाकारणें । तैसें करणें हेंही असे ॥ ४२ ॥ कां समुद्र बाहीं उतरावया । अशक्त अनुमानी पोहावया । किंवा उदधि मशक शोखावया । उद्यत जयापरी होय । ॥ ४३ ॥ कां भानुतेजेंसी सह समान । खद्योत स्वतेज प्रकटी आपण । किंवा टिवटिवी करी समुद्रशोषण । गीताव्याख्यान करीं मी तैसें ॥४४॥ तथापि मज एकुचि भरंवसा । जें कीं कर्णधारू सद्गुरू ऐसा । आणि संतकृपेचा सुवायु सहसा । हाचि भरंवसा धरूनि प्रवर्तें ॥ ४५ ॥ अहो सद्गुरूचिया कृपादृष्टी । निर्माण हो शके सकळ सृष्टी । स्वयें लाभे ब्रह्मपणाची पुष्टी । इतर गोष्टी तेथ काय ॥ ४६ ॥ ऐसया सद्गुरूचिया कृपाजलधेरें । आणि संतकृपेचेनि तुषारें । सुकता अंकुर मी विस्तारें । लवे फळभारें फुलींकरूनी ॥ ४७ ॥ तो मी गीता सप्रमेय फलीं विस्तारतां । प्रयास नाहींत पैं सर्वथा । ह्मणोनि तेथ प्रवर्ततां । नाहीं तत्वता क्लेश कांहीं ॥ ४८ ॥ अहो सद्गुरूचेनि प्रसन्नपणें । शिष्यासि काय होईल पां उणें । सूत संजयांसि बादरायणें । सर्वज्ञ करणें कृपामात्रें ॥ ४९ ॥ असो समर्थ जयासि अंगीकारी । तयासि अपूर्व अपूर्ण असे काय संसारीं । गुरूकृपा हनूमंत उडे सागरीं । तरिजे भवपूरीं सद्गुरूकृपा ॥ ५० ॥ असो किती हें येथें बोलावें । सर्वज्ञ तंव जाणताति स्वभावें । सद्गुरुकृपा सर्वेहि फावे । ब्रह्म स्वभावें आंगेंचि होय ॥ ५१ ॥ मजवरी सद्गुरूची कृपा थोर । आणि सद्गुरुचि बुद्धीचा प्रेरणार । स्फूर्ति प्रमेय कवित्वसार । सर्व निरंतर सद्गुरूची ॥ ५२ ॥ अंतरीं प्रवेशोन सद्गुरुमूर्ती । प्रसुप्तवाचेतें चेतविती । स्फूर्तिरूपाचि स्वयें करित असे मती । चळण हस्तीं

१ भाकतों. २ हट्ट.

उत्पादी ॥ ५३ ॥ एवं सर्वेंद्रियांतें प्रवर्तविता । प्रकाशहि करी सद्गुरुसविता । वदता वदविता श्रोता मंता । एकु वर्तता सद्गुरुरावो ॥ ५४ ॥ मी तरि साइखड्याचा[2] वक्ता । सर्व सूत्रधारा अधीन कर्तव्यता । एकें सूत्र चालिलिया ओष्ठ हालवितां । मज बोलतां प्रयास कोण ॥ ५५ ॥ ह्मणोनि गीतार्थी प्रवर्त्तलों । तोहि गुरूनेंचि अंतरीं प्रेरिलों । आतां तयाची इच्छा तैसें बोलों । आह्मीं तों मिळों कर्तेपणा ॥ ५६ ॥ खांबसूत्राचें बाहुलें जैसें । क्रीडतां अहंकारें काय फुगत असे । कीं कासे लागोनि जो उतरत असे । तो केवीं मानसें श्लाघेल ॥ ५७ ॥ तैसा सकळ सद्गुरुचि कर्ता । तेथ मज काइसी अहंता । असो तो सर्व-निर्माणकर्ता । करूं चित्ता माने तैसें ॥ ५८ ॥ अहो गीताशास्त्र हा महोदधि । जेथ मथितां न फावे महाकवींचिये बुद्धि । तयांसीही सांकडें पडतसे त्रिशुद्धि । तेथ माझी बुद्धि कोणीकडे ॥ ५९ ॥ तथापि सद्गुरूचेनि कृपाभरें । वाखाणीन मी श्रीगीताक्षरें । तें संतीं कृपा करूनि अत्यादरें । दृढविचारें परिसिजे ॥ ६० ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः । श्रीलक्ष्मीधराय नमः । श्रीरमावल्लभाय नमः । श्रीयादवेन्द्राय नमः । ॐ श्रीकृष्णसच्चिदानंदाय नमः । ॐ श्रीमद्विघ्नवल्लिविच्छेदनाय नमः । ॐ श्रीव्यासशुकपराशरनारदेभ्यो नमो नमः ॥

हेतवे जगतामेव संसारार्णवसेतवे । प्रभवे सर्वविद्यानां शंभवे गुरवे नमः ॥ १ ॥ जय श्रीकृष्णनाथाय लक्ष्मीधराय निर्मलम् । वेदसिद्धांतगुह्याय सर्वमूलाय ते नमः ॥ २ ॥ सारैकसारं वेदान्तसारं तत्सार-मेको गोपालवेषः । भक्तानुग्राही लीलावतारी श्रीकृष्णरूपो मम देवदेवः ॥ ३ ॥

श्रीकृष्णजय । प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये । ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥ १ ॥ सर्वो-पनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः । पार्थो वत्स सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ २ ॥

जयजय शरणागतपारिजात । शोभे तोत्रवेत्रें तव हात । पार्थसारथ्य तूं युद्धांत । करूनि घोडे वागविसी ॥ १ ॥ ज्ञानमुद्रा तुझी अगाध । समाधि न मोडे करितां युद्ध । अर्जुना लाविसी ती प्रसिद्ध । परब्रह्मा सांवळिया ॥ २ ॥ गीतामृतातें दोहिसी । श्रीकृष्णा तूं हृदयवासी । नमन तुझिया पायासी । असो माझें निरंतर ॥ ३ ॥ सर्व उपनिषदें ह्या गायी । दोहणार तूं शेषशायी । गोपालनंदन सुखदायी । काय वर्णू मी तूंतें ॥ ४ ॥ पार्थ वत्स शुद्धबुद्धि । पय भोक्ता तो त्रिशुद्धि । पय तें गीतामृत निरवधि । पाजिसी वो कृष्णमाये ॥ ५ ॥ पार्थवत्साचें करूनि मिष । कामधेनु तूं सर्व जगास । बोधामृतदानें वोळ-लीस । जगद्गुरु तूं साच कीं ॥ ६ ॥ पूर्णब्रह्मा श्रीगुरुसखया । लक्ष्मीधरा श्रीकृष्णराया । नमितां झाली मिथ्या माया । नाम दाटुगें त्रिलोकीं तव ॥ ७ ॥ तींहीं लोकींचे देव सकळ । स्वरूप तुझें नेणती अकळ । तेथें मीपणें मी बरळ[3] । केवीं जाणे तुजलागीं ॥ ८ ॥ तुजलागीं कृपा उपजली । ह्मणूनि प्रज्ञा दिधली भली । जैसी अंधासी दृष्टी दिधली । सूर्यें कृपा करूनियां ॥ ९ ॥ करूनियां अंतर्यामीं कृपा । श्रीगीतार्थ वदविसी भूपा । प्रथम राजगुह्य अमूपा । प्रेमें करूनि दाविलेंस ॥ १० ॥ दावूनि टीका चम-त्कारी । करविलीस तूं त्यावरी । ती संतां गोड वाटली भारी । उपरी विभूतिही बोलिलों ॥ ११ ॥ बोलिलों विश्वरूपही मग । ऐसें अठरा अध्यायावरी सुभग । उत्तरार्ध जाहलें तैं संत जिवलग । पूर्वार्ध करीं ह्मण-

१ विचारकर्ता. २ कळसूत्री बाहुल्याचा. ३ बाष्कळ.

ताति ॥ १२ ॥ ह्मणताती परी मी कोण करावया । देवा तुह्मा तूंच येथ गुह्य बोलावया । तुह्मा तूंच सार परिसावया । दुजें नाहीं नेमस्त ॥ १३ ॥ नेमस्त तुझ्याठायीं भावो । तोचि प्रथम मणरावो । सकळ जाणणें त्यापासावो । विस्तारलें भूमंडळीं ॥ १४ ॥ भूमंडळीं तुझी भक्ति । तेचि शारदा आली व्यक्ति । तुझें कृपेची अपार शक्ति । तेचि माझी कुलदेवता ॥ १५ ॥ देवता सर्व काल्पनिका । तूं कल्पनेतीत वराटिकों । तुज नमस्कारितां सकळिका । संतसज्जन भेटले अंतरीं ॥ १६ ॥ भेटले शिवादि देव । भेटले नारद व्यास स्वयमेव । भेटले शुक मुक्त वामदेव । ते मज अंतरीं वदताति ॥ १७ ॥ वदूनि ह्मणति बरा निर्धार । तुज पें आहे रे साचार । रायासि केल्या नमस्कार । प्रधानादिक त्याजपाशी ॥ १८ ॥ त्यापाशीं पृथक नमनासी । करितां दूषण यजमानासी । तेवीं देखिल्या आनंदघनासी । सकळ आहे तेथेंचि ॥१९॥ तेथें करूं जातां भक्तां नमस्कार । एक एकांत येती साचार । मग दोहींकडे उदार । श्रीकृष्णपूर्ण दिसतसे ॥ २० ॥ दिसत ऐसें संत ह्मणती । तंव श्रीकृष्ण आनंदती । आमुचा जो बोध तुजप्रती । तो प्रचीती येवो सर्वा ॥ २१ ॥ सर्वास तुझी 'चमत्कारी' गीता । तारील तत्काळ मनीं धरितां । सकळिकें नरनारी तत्त्वतां । संसारदुःखा नेणतील ॥ २२ ॥ नेणतील देहींचें देहपण । नेणतील विदेही आठवण । भोगितील शांति सुखसण । मन घालितां यामार्जी ॥ २३ ॥ ऐकूनि रमावल्लभदासु । ह्मणे जी जी मी तुमचा आज्ञाप्रसादलेशु । लाधलों आतां धृतराष्ट्रनरेशु । संजया ह्मणे तें ऐकावें ॥ २४ ॥

## दासोपंत–" गीतार्णव "

श्रीदत्तात्रेयाय नमः ॥ जयजयाजी योगिराया । पूर्णा परब्रह्मा अव्यया । परमात्मा तूं आत्मया । विश्वबीजा ॥ १ ॥ आनंदाचा तूं सागरु । ज्ञानविज्ञानदिवाकरु । न कळे तुझिया पारु । स्वरूपाचा ॥ २ ॥ अनादीची तूं आदी । सिद्धीची परम सिद्धी । समाधीची समाधी । सर्वकाल ॥ ३ ॥ देवदेवाजी देवेशा । पुरुषोत्तमा विश्वभासा । परमात्मया उदासा । गुणातीता ॥४॥ चैतन्यनाथा सच्चिन्मया । मायातीता अद्वया । आदिगुरु दत्तात्रेया । दीनोद्धरणा ॥ ५ ॥ विश्वबीज तूं सनातन । विश्वाकारें ब्रह्म निर्गुण । विश्वव्यापी परिपूर्ण । भावातीत ॥ ६ ॥ भावाभाव भासों आले । ते देखोनि जया आपुलें । नामरूप विसरलें । तेचि होती ॥ ७ ॥ तुह्मा करितां विचारु । वेदां शास्त्रां श्रमु थोरु । एकांतीं सांगे सद्गुरु । तें रूप तुझें ॥ ८ ॥ तुझिया प्रेम पायांचें । तेंचि तारूं संसारींचें । जया जोडे तयाचें । भाग्य परम ॥ ९ ॥ तुझिया प्रेमाचा विसरु । ऐसें भाग्य मी काये करूं । यया नाशवंताचा शेजारु । पुरे जाला ॥ १० ॥ न उपजे तुझी आठवण । तें सुखदुःखाचें कारण । अभक्ता दंडालागून । आड करिशी ॥ ११ ॥ विशिष्ट अथवा समान । तुजहूनि एक आन । गमे जेणें तें ज्ञान । नरकतुल्य ॥ ॥ १२ ॥ तुझें सगुण उपासिता । आगळी मानी निर्गुणता । तरि ऐशिया अभक्ता । दंड न पुरती ॥ ॥ १३ ॥ करितां तुझें पादपूजन । अभिलाषा धरी मन । तैं मीं आतां वदन । कैसें अवलोकूं ॥ १४ ॥ हिताहितविचारणा । तुह्मां भजनीं आपणा । पाहिजे ह्मणें तैं दंडना । योग्यु जालों ॥ १५ ॥ तुझिये जोडीवरी । जोडी पाहे तो दुसरी । तया भक्ता शेजारीं । भक्त न बैसवे ॥ १६ ॥ गुणांचा प्रताप आइकणें । तेणें प्रेम पावैन । श्रेय पाहोनि भजैन । तैं नव्हें मी दासु ॥ १७ ॥ जोडूनियां करचरण । देवेशीं बोलें वचन । ' अपराधी मी मजलागून । क्षमा कीजो ' ॥१८॥ तरि मी अपराधी मी अभक्तु । वंचकु

१ श्रेष्ठ.

स्वभावासक्तु । अज्ञानु अति अविरागी स्वतंत्रु । मर्यादे सुटला ॥ १९ ॥ अपराधी मी हें साचार । परि क्षमा करा ऐसें उत्तर । बोलतांचि पडलें अंतर । तुझा नव्हे ॥ २० ॥ मी मातें तुजहूनि । प्रियु जाण जालों ह्मणोनि । आतां प्रेम तें गेलें लाजोनि । पासाव मज ॥ २१ ॥ 'अपराधु क्षमा करणें' । हे तूंतें आज्ञा देणें । काये थोरपण येसणें ॥ माझां अंगीं ॥ २२ ॥ "अपराधु ऐसा जाणितला" । जेणें भक्तियोग तुझा खंडिला । तो मानूं मी आपला । मित्रु कीं वैरी ॥ २३ ॥ मग तयाचा जो मी कर्ता । तो मातें प्रियु होतां । भक्तु कैसा श्रीदत्ता । तुझा द्रोही ॥ २४ ॥ "अपराधु क्षमा करणें" । न बोलें हीं पापवचनें । आतां दंडुचि तो मजकारणें । प्रियु आहे ॥ २५ ॥ भक्तीचा जो उपस्थापकु । तो दंडुचि प्रियु मातें एकु ।परि अभक्तीचा पोषकु । येरु नेघें ॥ २६ ॥अपराधु जेणें केला । तो मी वैरी आपुला । तयाचें वदन मजला । दावूंचि नको ॥ २७ ॥ अपराधियाचा मातें संगू । तोचि नलगो देवा वियोगु । तयाचा जेणें योगु । तोचि कैसा ॥ २८ ॥ अपराधी मी दंडावा । माझां हातीं द्यावा । म्यां तो निःशेषु करावा । तुझेनि बळें ॥ २९ ॥ नाना मी तुझा अन्यायी । तैसें मनुजाला द्रोहीं । अज्ञा न कळे काहीं । हेंचि ह्मणोनि ॥ ३० ॥ "देवा मी नेणें तूंतें । तुझिया भक्तियोगातें । आतां रक्षीं मातें" । ऐसेंचि ह्मणों ॥ ३१ ॥ तरि मी तूंतें जाणों शकैन । तैं श्रेष्ठु भक्तु होईन । ऐसें कवणें सामर्थ्यें पावैन । स्वतंत्र जाण-पण ॥ ३२ ॥ तूंतें जाणें सर्वज्ञा । भक्तियोगु तुझी उपासना । ऐसे मानी तो गणां– । –माजी न शोभे ॥ ३३ ॥ नेणें ह्मणे तोचि श्रेष्ठु । नेणोंचि विधि उत्कृष्टु । जाणे मनें तो धीट्ठु । दंडावा कीं ॥ ३४ ॥ आतां नेणोसेचि असावे । ते क्षमा करीं ह्मणावें । तें तुजशीं सर्वज्ञपण स्थापावें । आह्मीं काये ॥ ३५ ॥ जो तूं जेसैणा जैसा । तो तूं तेसणों तैसा । इतरां कळशी ऐसा । भावोचि न घडे ॥ ३६ ॥ सर्वज्ञा तुझा जाणू । जो सर्वज्ञ सर्वज्ञु । तो भक्तु कवणु । कैसा आहे ॥ ३७ ॥ आणि सर्वज्ञज्ञानीं अभिमानु । धरी तो दासु अवलक्षणु । तुजहुनि असाधारणु । भाव जयाचा ॥ ३८ ॥ तैसा मी कां होईन । परी संगु तयाचा लाहीन । तरि प्राणलंर्य घेईन । प्रायश्चित्त ॥ ३९ ॥ तुजविषयीं जो अज्ञु । अज्ञानीं धरी अभिमानु । तोचि सेवकु निजगुणु । ऐसें आहे ॥ ४० ॥ तरि नेणें हें क्षमा करणें । ऐसें बोलतां बोलणें । श्रेष्ठ केलें जाणणें । ऐसें होईल ॥ ४१ ॥ मी जाणतों देवां तूंतें । हें माने येका अभक्तातें । ह्मणौनि ऐसिये मतीतें । आश्रयूंचि नये ॥ ४२ ॥ माझें तूं सकळ क्षेम । माझें भाग्य तूं परम । मातें अवधूता ब्रह्म । तूंचि साकार ॥ ४३ ॥ ऐशी करूं विनवणी । तैं श्रेष्ठ विचारूं तुजहूनि । जें येक थोर मानूनि । तें तूं ह्मणों ॥४४॥ "तुझेनि माझें क्षेम । तुझेनि तूं परब्रह्म । तुझें नव्हे तें परम । कांहींचि नव्हे ॥ ४५ ॥ तुझेनि मी कृतकृत्यु । तुझेनि मी समर्थु । तुझेनि मी विख्यातु । पुरत्रयीं" ॥ ४६ ॥ ऐसें बोलतां दातारा । अपराधी होईन खरा । येथ तुझिये थारा । नाहीं भक्ती ॥ ४७ ॥ तुझें करितां स्मरण । माझें कांहीं करूं मी अनुसंधान । तात्पर्य ठेवूं समान । कैशिया परी ॥ ४८ ॥ दास्य देईं प्रेम देईं । तुझी प्राप्ति मातें देईं । पुढतीं वियोगु नाहीं । ऐसें कीजो ॥ ४९ ॥ ऐसें करितां प्रार्थन । किती करूं स्वार्थचिंतन । जन्हीं मी तुजवांचून । आणिक न मागें ॥ ५० ॥ जेणें सुख जेणें हित । तेंचि मागणें उचित । येर नाशक समस्त । मागोनि काये ॥ ५१ ॥ सुरवरां जयाची शिराणी । साधिजे तपें योगें करूनि । तें मातें देईं ह्मणौनि । किती स्वार्थु चिंतूं ॥ ५२ ॥ 'देवा मी तुझा दूतु ।' ऐसा भाव जैं भजतु । तैं तेणेंचि अंगें स्वार्थु । नव्हे काये ॥ ५३ ॥ आतां जें जें मी बोलैन । तेणें

---

१ ज्याला. २ त्याला.

अभक्ताचि होईन । आतां मौनेंचि राहीन । ते भक्ति कायिशी ॥ ५४ ॥ काया वाचा मन तिन्ही । निरर्थकें जाळी मौनी । असो मौनमुद्रा हे करणी । भक्ताची नव्हे ॥ ५५ ॥ आतां भक्ताआंगीं भाव । तयाचा कैसा अभिप्राव । युक्ति स्वार्थु वाव । दोन्ही जेथें ॥ ५६ ॥ युक्ति संप्रदाव रचणें । स्वार्थे फल तेथ भजणें । ऐसें निज दासा न मने । परम शुद्धातें ॥ ५७ ॥ निश्चयो प्रीति नामस्मरण । त्रिविध निर्मळ भजन । जयाचें तो ह्मणौन । शुद्ध ह्मणितला ॥ ५८ ॥ आतां निश्चयो तोचि कैसा । सांगिजैल जैसा तैसा । जेणें पवित्र प्रकारु दासां । येईल कळों ॥ ५९ ॥ तुझा करितां आचारु । मोक्षु हो अथवा संसारु । तेथें नाहीं आदरु । माझिया मना ॥ ६० ॥ येणें मान्यता हो अमान्यता । अर्थु अनर्थु हो भलेवा । परंतु तुझा मार्गु तो सर्वथा । सांडणेंचि नाहीं ॥ ६१ ॥ तुजशीं समान कां थोर । ऐसें आइकतांचि उत्तर । यया देहावरि धार । ह्मणैन खड्गाची ॥६२॥ तुझी प्रशंसा आइकै न । जेणें भक्ती दृढु होईन । ऐसी वासना तीचा मन । विटाळु मानी ॥ ६३ ॥ तूं ईश्वरू अथवा नरू । परि सर्वथा न भजें इतरु । तुझा करूनि विचारु । कवणु धर्मु मातें ॥ ६४ ॥ चाऱ्ही जोडती पुरुषार्थ । अथवा जोडले समस्त । नाशतु सुखें परि चित्त । व्यग्र न करी ॥ ६५ ॥ मेघ वर्षतु शिळाधारीं । तया आड कांहीं न करीं । तुझां न टळे निर्धारीं । भक्तियोगाचां ॥ ६६ ॥ न धरी तरि न धरूं मेदिनी । सर्वांग पडो वन्ही । परि हे न संडी करणी । तुझया दासत्वाची ॥ ६७ ॥ स्त्रीपुत्रादि पदार्थ । आतांचि नाशो हें समस्त । रोकडें शरीर येथ । पडतां दिसो ॥ ६८ ॥ प्रलया ऐसा आघातु । वरि पडो मेरु प्रस्तुतु । सूर्या ऐसा दिप्तु । आंगीं जडो ॥ ६९ ॥ सागरीं बुडतांही न संडीं । व्याघ्रामुखीं पडो उडी । दंडु करितां कदंडीं । आंग देईन ॥ ७० ॥ महादुःखेंही न चळणें । ऐसा तो निश्चयो ह्मणणें । आतां भाग्यप्रधानें विघ्नें । तैं जैं पडती ॥ ७१ ॥ सार्वभौम हो निर्वैर । श्रीची संप्राप्ति अपार । परंतु तुजहूनि इतर । तें मी न भजें ॥ ७२ ॥ देवलोकींचा मी इंद्रु । जालें वरुणु सूर्यो चंद्रु । परंतु भक्तियोगु तोचि थोरु । सर्वदा भजें ॥ ७३ ॥ हित जोडो तात्विक । तेंही परि नेघें आणिक । मानिती सकल लोक । परि ते काये ॥ ७४ ॥ तुझां स्वरूपीं प्रवेशणें । तें जैं जोडैल अभजनें । तैं तेंही परि मनें । आश्रयीना ॥ ७५ ॥ भेटी ग्राशील भजना । तरि तेंचि तुझी मी मागेना । ऐक्य पावलयाही मना । निवडीन मी ॥ ७६ ॥ तुझिये भक्तीसाठीं । हिताहित न पाहे दृष्टी । नापेक्षीं तुझी भेटी । जरि भक्ति सुटे ॥ ७७ ॥ बरवेन अथवा वाइटें । निश्चयो भक्तीचा न तुटे । हाचि भाव बाह्य प्रगटे । ऐसें बोलतां ॥ ७८ ॥ अभिमानु दुणावे आंगीं । युक्ति स्वार्थ अंतरंगीं । तरी निश्चय भाव प्रसंगीं । बोलेना मी ॥ ७९ ॥ युक्तिस्वार्थेंवांचून । येसणिया निर्धारा कारण । काये तरि प्रेम गहन । येथें हेतु ॥ ८० ॥ निश्चयाची ऐशी रीति । आतां प्रीति कारण ये अर्थी । तेंचि बोलेन उक्ति । प्रेमामृतमयी ॥ ८१ ॥ प्रीति ह्मणजे आवडी । न सुटे रूपाची गोडी । जीवाची चाड थोडी । देवाहून ॥ ८२ ॥ प्राणाची करीन वोवाळणी । गुंतलें नुगवे मन चरणीं । अहंता ममता दोन्ही । आदरें सुटलिया ॥ ८३ ॥ सुटणें तें मरणासमान । प्रीतीचें ऐसें येकपण । अपुत्रका जैसें पुत्रधन । प्राप्त होये ॥ ८४ ॥ लोभिया जैसें धन । रोगिया अमृतपान । सुभक्ता प्रेम गहन । तैसें देवीं ॥ ८५ ॥ स्त्रीपुत्रांची आसक्ति । सांडिजे जयाचिये प्रीती । तो आपणु आपणाप्रति । प्रियु कैसा ॥ ८६ ॥ तोही आत्मा परि जया । जाणतां अप्रियु आत्मया । योगिराजा दत्तात्रेया । सप्रियातें ॥ ८७ ॥ प्रीतीचें हेंचि लक्षण । जें तेथूनि न सुटे वेगळें मन । तेणें योगें जीण मरण । भलयतें हो ॥ ८८ ॥ इंद्रियें सांडिती स्वार्था । प्रीतीचा सागरु वोसंडतां । येका आत्मया श्रीदत्ता । धरूनियां ॥ ८९ ॥ विचारापासाव सुटे मन । युक्तायुक्त न करी ज्ञान । मग तें देहीं संच-

रोन । कैसें करी ॥ ९० ॥ उच्चें घोषें प्रगर्जन । शरीरें करी नर्तन । तेणें आनंदें मन । बुडोनि जाय ॥ ९१ ॥ लोकेषणा गेली पळोनि । उगाचि प्रवर्ते गायनीं । युक्तायुक्त न मानूनि । स्तुति करी ॥९२॥ देवा तूं माझी जननी । जनकु त्राता निर्वाणीं । तुज येकावांचूनि । न स्मरें मी ॥ ९३ ॥ देवा तूं माझें प्राणधन । देवा तूं माझें जीवन । देवा तूं माझें ज्ञान । ज्ञेय तत्व ॥ ९४ ॥ देवा तूं माझा योगु । बहिरंगु अंतरंगु । तुजशीं मातें वियोगु । मरण होये ॥ ९५ ॥ देवा तूं माझा विसांवा । जिवाचिया अंतरजीवा । तुझा कोठें ठेवावा । आठव पहा ॥ ९६ ॥ हृदयीं घातला न संटे । विश्वाकारें तोचि उमटे । इंद्रियद्वारां प्रगटे । बाहेर बोधु ॥ ९७ ॥ नयन हे लोभलेपणें । निमिषोन्मेषांचें सांडणें । करूनि श्रीदत्तगुणें । तन्मय झालें ॥ ९८ ॥ प्रेमाचें स्वरूप होय । क्लेश तेही आनंदमय । भक्ता भक्तिविषयक कार्य । करीत असतां ॥ ९९ ॥ आनंदेंचि प्रनर्तन । आनंदेंचि प्रगर्जन । आनंदेंचि प्रवर्तन । सेवेचां ठायीं ॥ १०० ॥ छेदूनि अर्पितां शिरकमल । दुःख ऐसें न वटे केवळ । यया प्रेमानंदाचें बल । ऐसें आहे ॥ १ ॥ ब्रह्मानंदाची गोडी । भोगितांययाहूनि थोडी । अद्वैतबोधु तो आवडी । सुटे जयाचिया ॥ २ ॥ आनंदें विस्पंदे वदन । आनंदें द्रवती नयन । आनंदें स्पंदती प्राण । मन उल्लासे ॥ ३ ॥ निर्गुण ब्रह्मानंदु स्फुरे । तो अवघेनि भेद विसरे । मनबुद्धींद्रिय भरे । स्वरूपस्थिती ॥ ४ ॥ आतां हा प्रेमस्पंदु । सगुणु केवळ ब्रह्मानंदु । ययाचा होतां उद्बोधु । कैसें वाटे ॥ ५ ॥ गुणीं गुण होती तन्मय । रूपीं रूप अभेदमय । देवभक्तपण हें ज्ञेय । वेगळें न निवडे ॥ ६ ॥ येथ नलगे कांहीं विसरणें । गुणींचि आनंदु भोगणें । निर्गुण ब्रह्मानंदु येणें । पुरे होय ॥ ७ ॥ निरोधु तयाचें साधन । हा होय निरोधेंचिविण । कीं उगेचि करणगण । येथ नियमती ॥ ८ ॥ शमदमाचा तेथ वारा । तो येथ नाहीं अवधारा । बाह्यांतरीं वृत्तिविकारा । प्रेमाचि ग्राशी ॥ ९ ॥ तेथें विसरोनि स्फुरावें । येथ आठवेंचि विरावें । देखे आइके तें करावें । आनंदमय ॥ ११० ॥ तृणतुल्य स्वर्गु जेणें । निर्गुणानंदाचें पुरे पारणें । मोक्षातें आणी उणें । हें सगुण प्रेम ॥ ११ ॥ शास्त्राचा नलगे विचारु । नलगे सांख्ययोगआचारु । काय आतां करावे गुरु । तद्विषयिक जे ॥ १२ ॥ आसन मुद्रा आणि ध्यान । नलगे अवरोधु साधन । असतीच सकल गुण । ईश्वरीं मिळती ॥ १३ ॥ असो हा प्रेमस्पंदु । साकारु ब्रह्मानंदु । ययाचा हृदयीं वेधु । जाला असतां ॥ १४ ॥ दुजे कांहीं प्रिय न वाटे । थोरही थोरपणें सुटे । सगुण निर्गुण आटे । हेंचि होये ॥ १५ ॥ ऐसा निश्चयो निर्धारु । ऐसा प्रेमाचा विचारु । आतां ययाचा बाह्यात्कारु । साधन कैसें ॥ १६ ॥ प्रेमवंते निश्चयवंतें । काय करणें निरुतें । कां जेणेंकरूनि पुरुषार्ते । होये निश्चयो प्रेम ॥ १७ ॥ तरि तें अखंड नामस्मरण । कैसें तयाचें लक्षण । तेंचि येक वचन । बोलिजैल ॥ १८ ॥ बुद्धी ह्मणजे ज्ञान । निश्चयो तो तेणेंकरून । श्रीदत्ते येकेवीण । येर न मने ॥ १९ ॥ मनाचें हेंचि करणें । प्रेमयुक्त रूपीं रमणें । तियाचि प्रवृत्ति जिणें । इंद्रियद्वारां ॥ १२० ॥ बुद्धी रूप निश्चित । मन सुप्रेमें तद्रत । तयाचि निष्ठा स्वस्थ । असणें अभिमानाचें ॥ २१ ॥ निश्चयो प्रीति दोन्ही । आभिमानें धरिलीं कवळूनि । तोचि बोधु नामस्मरणीं । बाहेर करावा ॥ २२ ॥ क्षीरसागराचे तरंग । क्षीरचि तयांचें आंग । पाणियाचे लहरिया वेग । पाणी जैसे ॥ २३ ॥ तैसा निश्चयो प्रेम हा समरसु । अभिमानें दाटला उल्लासु । तेथ अधिकाधिकु तोषु । पूरु चाले ॥ २४ ॥ तेथिंचे तरंगाभास । तोचि होती नामघोष । लहरिया वेग विशेष । उल्लासावेश ते ॥ २५ ॥ निश्चयें प्रेमेकरून । जालें जें नामस्मरण । तयाचें अपूर्व लक्षण । तेंचि कैसें ॥ २६ ॥ नामाचा करितां घोषु । आठवे रूप तो विशेषु । तंव रूपीं निश्चय वासु । पूर्वींचि असे ॥ २७ ॥ आठवाचि सरिसें मन । प्रेमयुक्त रूपीं

निमग्न । सभाग्याचें नामस्मरण । ऐसें आहे ॥ २८ ॥ निश्चयें प्रीती नामघोषु । तेणें अंतरींचा आत्मोल्लासु । बाहेरि पडे आवेशु । ब्रह्मानंदाचा ॥ २९ ॥ मन ज्ञान अभिमानु । या तिहींचा विषमु गुणु । तो समु होये सगुणु । परमात्मा जेथें ॥ १३० ॥ निश्चयो आथी अंतरीं । प्रेमहीनु स्मरण करी। तया प्रेम नामेंचि शरीरीं । उपजे असंवर ॥ ३१ ॥ प्रेमवंता निश्चयहीना । निश्चयो उपजवी जाणा । नामस्मरण आंगवणा । दोन्ही करी ॥ ३२ ॥ नित्य करितां नामस्मरण । रूपाचें न पडे विस्मरण । पडलया नामेंचि स्मरण । नित्य होये ॥ ३३ ॥ नित्य रूपाचेनि स्मरणें । तेंचि आश्रयिजैल अभिमानें । मग तो अभिमानुचि निश्चयाकारणें । कारण होईल ॥ ३४ ॥ स्मरणीं निष्ठ अभिमानभाव । रूपाची उठी जाणीव । तेचि नित्यता अपूर्व । निश्चय करी ॥ ३५ ॥ अभिमानयुक्त रमतां ज्ञान । निश्चय होती उत्पन्न । तेथेंचि रमवितां मन । प्रेमही उठे ॥ ३६ ॥ ययालागीं नामस्मरण । तें यया रूपाची आठवण । निश्चयो प्रेम गहन । आठवणद्वारा ॥ ३७ ॥ नाहीं तो निश्चयो करी । प्रेम उपजवी शरीरीं । नामघोषु ययापरी । श्रेष्ठु सर्वां ॥ ३८ ॥ मन ज्ञान अभिमानु । येकवटूनि तिहींचा गुणु । स्मरण करी तो सर्वज्ञु । पावे निश्चयो प्रेम ॥ ३९ ॥ विवेकांशु ज्ञानाचा । प्रेमांशु मनाचा । योगु करूनि दोहींचा । अभिमानु तो ॥ १४० ॥ प्रीती निश्चयें नाम स्मरे । तेणें रूप अंतरीं स्थारे । प्रेम निश्चयो अंकुरे । क्रमेंक्रमें ॥ ४१ ॥ उगेंचि तऱ्ही स्मरण । करावें मूर्खें साधन । सगुण सुख सनातन । तया स्फुरे ॥ ४२ ॥ ऐसें हें शुद्ध भजन । सहज होय जैं उत्पन्न । तैं तें कांहीं येक प्रमाण । दासत्वमार्गें ॥ ४३ ॥ श्रेष्ठ जाणोनि यया भजिजे । नाहीं तो भाव आणिजे । तैं येथेंही दोषु वाजे । सर्वथा कीं ॥ ४४ ॥ सहज प्रेम सहज स्मरण । सहज निश्चयो पावे ज्ञान । तरि स्वार्थहीनाचें भजन । हें येक होये ॥ ४५ ॥ आतां हें मातें न संभवे । तरि म्यां काय जी करावें । अगम्य तुझे नेणवे । भक्तांचें महिमान ॥ ४६ ॥ तरि आतां मी प्रेमहीनु । निश्चयभावविहिनु । नित्य नामस्मरणगुणु । नलगेचि हा ॥ ४७ ॥ यया वेगळें कांहीं । बोलिजे तें शुद्ध नाहीं । मौनही खोटें कहीं । जें न मिळे संप्रदाया ॥ ४८ ॥ आतां मी येक करीन । सांडूनि युक्तायुक्तपण । आलें वचन बोलैन । भावाथिला ॥ ४९ ॥ हृदयीं द्रष्टा सर्वज्ञु । माझिया भावाचा जाणु । बोलोनि नव्हें व्युत्पन्नु । बाळमतीचा ॥ १५० ॥ भक्तिभावाचें बोलणें । असेचि आरुषवाणें । हें जाणता सर्वज्ञु जाणें । आत्मा दत्तु ॥ ५१ ॥ जयजयाजी अमरेंद्रा । जयजया स्वबोधचंद्रा । जयजया अनिवारा । संसारदहना ॥ ५२ ॥ तुझिया नामाची आठवण । तें भवरोगिया अमृतपान । सत्यें स्वरूपें अविनाशपण । प्रकटें रोकडेची ॥ ५३ ॥ आत्मया पुरपती रामा । निजदासहृदयविश्रामा । तुझिया गुणांची सीमा । ते कवण जाणे ॥ ५४ ॥ सत्यानंदमया अनंता । दत्ता अवधूता अच्युता । विश्वोदया विश्वभरिता । विश्वसाक्षी ॥ ५५ ॥ विश्वंभरा तुझें सार । नाममाहात्म्य अपार । जेणें विसांवले सुरवर । आत्मविश्रामा ॥ ५६ ॥ देवा तूं सुखाचें कारण । ज्ञानबीज सनातन । सत्यस्वरूप निर्गुण । गुणा आलें ॥ ५७ ॥ मुक्तिहस्ता मुक्तिपादा । अवधूता परमानंदा । गुरुमूर्ति अगाधा । गगनोपमा ॥ ५८ ॥ गायन तुझिया गुणांचें । साधन तें भोगामोक्षांचें । परंतु विहित कार्य आमुचें । स्वाभाविक ॥ ५९ ॥ लक्षितां गुणबुद्धिपारु । न पविजे नामरूपनिर्धारु । आत्मा तूं गुणीं अगोचरु । प्रकाशसीचिना ॥ १६० ॥ असंगपणाचेनि अंगें । गगनाचिया आंगा नलगे । भावाभाव हे अवघे । मावेंचि लोटती ॥ ६१ ॥ सेवनें थिरे भेदु । जयाचा ऐसा बोधु । संबंधावरि संबंधु । संपादेचिना ॥ ६२ ॥ तुझी माया हे उल्लंघितां । अवधारीं तव प्रिया भक्तां । सोपान येरां सर्वथा । मोही अज्ञानें ॥ ६३ ॥ मायानिवर्तका मापती । माझी अवधारावीं विनति । आर्तीं पुरवितां आर्तीं । भुकेली जी

॥ ६४ ॥ जाणत जाणत जागणें । जाणणें जाणों जाणों ह्मणें । जाणिवेचेनि विशुद्धपणें । वारेचिना ॥ ६५ ॥ जागृती जागृती जागणें । जालें तें नपडे उणें । देवा फिटो पारणें । डोळयांचें ॥ ६६ ॥ डोळां भरलें रूपस । रूप तें बुद्धी उदास । जाणतां जाणीव निःशेष । पांगुळ करी ॥ ६७ ॥ ऐसा कैं मी पाहीन । जेथ न पुरती हे नयन । हारपे गगनीं गगन । गुणातीतीं ॥ ६८ ॥ लागलया आंगा आंगें । नुरे नुरवी रूप अवघें । योगा वियोगा जोगें । नव्हे रूप ॥ ६९ ॥ पाहतां पाहणें आटे । भेटतां भेटी न भेटे । न भेटत भेटणें घटे । आत्मया तुझें ॥ १७० ॥ ऐसा तूं आत्मा परमात्मा । ब्रह्म अरुपा अनामा । श्रीअवधूता शुद्ध श्यामा । कृपाळुवा ॥ ७१ ॥ तुझिया रूपाचें दर्शन । तेंचि आत्मतत्वसंवेदन । सगुणनिर्गुणब्रह्मज्ञान । गुणातीता ॥ ७२ ॥ तुझेनि श्रीपादसेवनें । निष्ठा मानिली मनें । जेथ भेदबुद्धीचीं किरणें । पावतीचिना ॥ ७३ ॥ प्रेम अंकुरलें हृदयीं । तयानें माझां देहीं । पैसु न पुरे मग पायीं । ठेविलें तें ॥ ७४ ॥ आत्मया हृदयस्था गोपति । सन्मया तुझी जे दीप्ति । चिन्मयी कळा ज्योति । प्रकाशली ॥ ७५ ॥ ते प्रकाश्यानें नुरवीत । प्रकाशु प्रकाशें खात । प्रकाशली अद्भुत । अधिष्ठानाकारें ॥ ७६ ॥ तिया मी असतां प्रकाशला । मी तूं हा भाव विसरला । सहजसंविति मूतला । उमजेचिना ॥ ७७ ॥ तेणें स्वप्रकाशसुदिनें । जागृतें जाली करणें । न धरवे मना मनपणें । प्रकाशु तो ॥ ७८ ॥ सूर्यें सूर्यकांतु स्पर्शिला । तया नाच्छादवे प्रकाशु आपुला । मग तदधीनु निज कला । दावूंचि लागे ॥ ७९ ॥ तैसें माझिये बुद्धीतें । तुवां स्पर्शिलें स्वमतें । आतां तुज अधीने तीतें । लोपतांचि नये ॥१८०॥ पृथ्वीचां ठायीं हारपलें । तें जीवनें वटबीज स्पर्शिलें । आतां तें हारपे कें पहिलें । आपण नव्हे ॥ ८१ ॥ पालवापुढें पालव । घेऊंचि लागले धांव । मग आपुली मर्यादा तंव । झाड विस्तारलें ॥ ८२ ॥ तैसें हें माझें ज्ञान । विषयभूमिके होतें लीन । तेथें तुझी कृपा जीवन । पावलें तें ॥ ८३ ॥ आतां कैसें आच्छादैल। आतां कैसें न स्फुरैल। यालागीं वृद्धीचें बल। अनिवार जालें ॥८४॥ अंकुरलया तया ज्ञाना । पुरेसा पैसु दिसेना । अनंतां ब्रह्मांडांची रचना । मोडों लागली ॥ ८५ ॥ कार्यकारणाचां संकटीं । न संटे याची वाढि मोठी । ज्ञान ये मायाकपाटीं । सांटेचिना ॥८६॥ 'भगवद्गीता' हे सन्मयी। अपारु पैसु ईचां ठायीं। जेथ अंकुरलया नाहीं। संकट ज्ञाना ॥८७॥ 'गीता' हे तुझीचि स्वानुभूति । आणि मत्प्रज्ञा तुझी ज्ञप्ति । श्रीअवधूता स्वयंज्योति । प्रकाशतासि ॥ ८८ ॥ येथ न सरे माझा अभिमानु । परंतु तोही तुज आधीनु । आत्मा अव्ययो सनातनु । तूं अधिष्ठान तया ॥ ८९ ॥ तरि आतां काये बोलावें । कासया कांहीं न बोलावें । तुजशीं वेगळें न व्हावे । हेंचि पुरे ॥ १९० ॥ ऐसें करूनि अभिवंदन । श्रीयोगिराजाचें स्तवन । आत्मत्वें आत्मया स्मरण । अवधूताचें ॥ ९१ ॥ आरंभिलें ग्रंथकथन । 'श्रीभगवद्गीतेचें' व्याख्यान । यथामति विवरण । प्राकृता वाणी ॥ ९२ ॥ तरि सज्जना साधूतें । प्रार्थीन मी आदरें बहुतें । स्वामी अवधान देईजो येथें । कृपा करूनि ॥ ९३ ॥ हें प्राकृत आरूप बोलणें । नव्हे विषयो तुह्मांकारणें । परंतु गीतेचेनि येणें । संबंधें आइकावें ॥ ९४ ॥ स्वमति चालिला अर्थु । न कळतु गीताभावार्थु । तथापि न चुके परमार्थु । ह्मणौनि आइकावे ॥९५॥ ग्रंथु केला अव्युत्पन्नें । परमार्था न मिळे बोलणें । तथापि आत्मान्वयें वचनें । ध्यावीं तुह्मीं ॥ ९६ ॥ आत्मान्वयो न दिसे । ऐशी वस्तु तंव कांहीं नसे । भावाभावभावें आभासे । द्रष्टाचि जैं ॥ ९७ ॥ येथें नेदितां अवधान । महत्वा लागैल [illegible] । आतां तयाची जतन । कवणें करावी ॥ ९८ ॥ आपुलेनि स्वयंबोधें । न विचाराल अर्थु पदें [illegible] परमानंदें । तयां शब्दु तो कायी ॥ ९९ ॥ तरि हें माझें वचन । व्यर्थचि जालें ह्मणौन । प्रा[illegible] अवधान । देणें स्वामी ॥ २०० ॥ शंकरा शंकर सुरस ।

गायन जेणें मानस । रमे तें तया निद्रितास । देखूनि कीजे ॥ १ ॥ तैं श्रमुचि श्रमाकारण । श्रमु श्रमाचें साधन । तया श्रमाचें उपसहन । कैसें करावें ॥ २ ॥ मांरमारें रमणु । रमे समाधी त्रिनयनु । तैं रंभे ऐशीचा शीणु । तो कवणें हरावा ॥ ३ ॥ ना कीं जन्मुनि आंधळा । तया सूर्यो देखोनि शंकला । तयाप्रति त्याचिया कळा । चालतीचिना ॥ ४ ॥ दर्पणीं पुरुषु दर्प लाही । परि शिरहीनु दर्पोनि कायी । तेथ प्रयोजनु तो नाहीं । दावावयाचा ॥ ५ ॥ षड्रस अन्न पाचिलें । रसने ज्वरें विटाळिलें । तें अवघेंचि विष जालें । काय कीजे ॥ ६ ॥ तैसा शास्त्रबहिर्मुखु । न रुचे तया हा विवेकु । तो सावधान असोनि मूर्खु । काये करावा ॥ ७ ॥ ह्मणौनि श्रोते जे सर्वज्ञ । तेहीं समाधीचें काढून मन । येथ निरोपणीं सावधान । नावेक करावें ॥ ८ ॥ हां जी समाधीची अखंडता । भंगे जैं येणेंकरितां । तैं अखंडतेतेंचि तत्वतां । दोषु जाणावा ॥ ९ ॥ सर्वत्राभेददर्शन । समाधीचें अखंडपण । सर्वदा तैं हें वचन । नाइकावें कां ॥ २१० ॥ गुणसहितु निर्विकारु । समाधीचा भाव निरंतरु । चढे वोहटे ऐसा पूरु । सागराचा नव्हे ॥ ११ ॥ दुरुनि आलिया मेघधारा । आंगीचिया लता समग्रा । स्वरूपचि जैसें सागरा । तैशी समाधि कीं ॥ १२ ॥ तरी हें ह्मणें अव्हेराल । आणि उपेगाही तुह्मां येईल । येथिंचें बोलणें सखोल । विचारा पां ॥१३॥ इतुलेंही बोलणें जाइल । तुमचें चित्त न मनील । तरी माझें काये चालैल । केलें आतां ॥ १४ ॥ समर्थें उपेक्षा केली । तो काये भीड धरी बोलीं । आतां जोडलां करकमळीं । नमस्कारु तयां ॥ १५ ॥ मीचि मातें श्रोता । मीचि मातें वक्ता । मननरूपें हे 'गीता' । विचारितु असे ॥ १६ ॥ श्रीअवधूताचेनि स्मरणें । बोधला अर्थु स्वानुसंधानें । तो आत्मा बुद्धी बोधणें । आपुलिया मना ॥१७॥ ऐसा विचारु करितां । मीचि श्रोता आणि वक्ता । आरंभीत असें ' गीता '। ह्मणे दिगंबरानुचरु ॥१८॥ न पाहें श्रोतयांचें वदन । न करीं भाष्याधारें विवरण । स्वानुभवें हें मनन । ह्मणौनि संपादीं ॥ १९ ॥ आइकैल तेणें आइकावें । मानैल तेणें घ्यावें । नावडे तेणें नेघावें । दोहीं श्रवणीं ॥२२०॥ स्वसंप्रदायिक जे योगी । यया मननाचे विभागी । टीका हे तयांचिजोगी । तेहीं आइकावी ॥ २१ ॥ स्वानुभवचि येथिंचें प्रमाण । स्वानुभव हेंचि साधन । अन्यत्र शास्त्रश्रवण । तैसें हें नव्हे ॥ २२ ॥ प्राकृत ह्मणौनि दूषिती । तेचि यया ज्ञाना वंचती । भाषाचि केवळ भजती । ते मूर्ख कीं ना ॥ २३ ॥ हातीं देतां नवरत्नें । मऱ्हाटेन बोलें नेघेणें । आतां हानी तयाकारणें । ते दूरि नसे ॥२४॥ संस्कृतें बोलिलें सेवणें । तेंचि सांडावें प्राकृत वचनें । ऐसियां मूर्खां मुंडणें । किती आतां ॥ २५ ॥ असो आतां प्रळयपण । येथूनि गीतेचें व्याख्यान । मागां कथेचें अनुसंधान । तेंचि कैसें ॥ २२६ ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

ॐ श्रीमद्दत्तात्रेयादिगुरवे नमः ॥ ॐ सर्वज्ञाय गुरवे नमः ॥

स्वस्वानंदामृतानंतं पूर्णचंद्रामितोत्सवम् । विज्ञानसागरं वन्दे दत्तं दीनार्तिनाशनम् ॥ १ ॥

दत्तं वन्देहमात्मानं विज्ञानानंदपूरितम् । सर्वतोनंतरूपेण ज्ञानविज्ञानसागरम् ॥ २ ॥

जयजयाजी गुरुमूर्ती । जयजयाजी पुण्यकीर्ती । विश्वात्मया विश्वपती । देवदेवा ॥ १ ॥ जयजया ज्ञान-सागरा । जयजया विश्वंभरा । जयजया कृपामंदिरा । आदिदेवा ॥ २ ॥ जयजयाजी पूर्णकामा । जय-जयाजी नितकामा । आत्मया प्रभो रामा । योगिराया ॥३॥ सकला विद्यांचें तूं स्थान । सुभक्तां सकळांचें जीवन । हृद्गत केवळ धन । योगियांचें ॥ ४ ॥ मुनिजनमानसरामा । तूं आत्मा सर्वज्ञ परमात्मा । देवा तुझा महिमा । नेणती ब्रह्मादिक ॥ ५ ॥ विश्वाभासें निराभासा ! आभासें जगदाभासा । आभासरूपा

निरंशा । निर्वाणमूर्ती ॥ ६ ॥ स्वगुणाध्यासें पूर्णभाना । सच्चिदानंदैक–रस–घना । दत्तात्रेया सगुणा । नमो तूंतें ॥ ७ ॥ ब्रह्मात्मविद्येचें द्योतक । स्मरण देवा तुझें एक । संसारतापविच्छेदक । होचि लागे ॥ ८ ॥ तुझिया स्मरणा एकासाठीं । वेंचीन मी योगांचिया कोटी । रिघोनि वाचेचां पोटीं । तेंचि होईल ॥ ९ ॥ योगें तपें पुरे ज्ञानें । न करी मीं कांहीं साधनें । तुझ्या स्वरूपीं नुरणें । तेंचि अपेक्षी ॥ १० ॥ देवा तूं माझा आत्मा । तैं मातें कवणु परमात्मा । यालागीं सांडूनि गुणागुणधर्मा । राहीन तेथेंचि ॥ ११ ॥ देवा तूं माझी विश्रांति । मोक्षदशा पूर्ण प्राप्ती । तरी तुजहूनि मी गती । तें काय पां करूं ॥ १२ ॥ देवा तूं माझा नियंता । तरी मी कां करूं भवचिंता । तुझेनि स्मरणें कृतकृत्यता । सहज मातें ॥ १३ ॥ देवा तूं सत्य सर्वगत । ब्रह्म एक शाश्वत । तरि जाणावें इतुलेंचि मत । पुरे साधनाचें ॥ १४ ॥ देवा तूं चेतन साक्षी । तरि मी तूंतें कैसा लक्षी । यालागि मीपणेसी नापेक्षी । जाणणें सर्व ॥ १५ ॥ देवा तूं चैतन्यघन । तरि माझें मज मीपण । स्वतंत्र कैंचे ह्मणोन । तूं तेंचि मी ॥१६॥ देवा तुजसी समानु । सत्य हो मी कैसा आनु । यालागि हा विलक्षणु । भावोचि विसरिजे ॥ १७ ॥ देवा तूं सर्वत्र अखंडु । तुझें रूप मी कैसें खंडु । आतां स्फुरलिया दंडु । करीन मीपणा ॥ १८ ॥ नाना जे मीपण ह्मणिजे । काय तेथ असे दुजे । आतां दंडु तोचि दंडिजे । ऐसें जालें ॥ १९ ॥ दंडा दंडिता दंडात्मा । आत्मा तूं देवा परमात्मा । तैं परिहाराचि सीमा । वोलांडिली जी ॥ २० ॥ आतांचें जें अनु-वादन । तें तूं तुझें तुजपासून । ऐसेंहि जें माझेंपण । तेंहि तूंचि ॥ २१ ॥ तरी संकोचु आतां काइसा । गुणी गुणकर्म आभासा । ह्मणौनि यया वाग्विलासा । दिधला पसरु ॥ २२ ॥ बोलेन मोक्षाचें कारण । बोलेन भवदुःखस्फोटन । जेणें होये तें वचन । परमार्थाचें ॥२३॥ मागां 'गीतार्णवा' रचिलें । तें समुद्रचि होऊनि गेलें । न वचेचि कवणा उल्लंधिलें । शब्दार्णव ॥ २४ ॥ परमार्थु तेथें अपारु । ज्ञाना योगा नाहीं पारु । पाहिजे तितुला[१] विचारु । संपूर्ण असतां ॥ २५ ॥ केवळु अर्थु गीतेचा । संवादु कृष्णार्जुनाचा । परमार्थु कितुला[२] तेथिंचा । कारण जो ॥२६॥ तो परमार्थज्ञानयोगें । नुमगितां सहसा न उमगे । आणि लोकांपेक्षा तेणें अंगें । देखोनि प्रवर्तिली ॥२७॥ "गीतार्थबोधचंद्रिका" । आरंभिली हे लघु टीका । संतोषि करूं लोकां । श्रोतयातें ॥ २८ ॥ दिगंबरानुचरु ह्मणे । श्रोतीं कृपा पूर्ण करणें । आइकावि सावधानपणें । गीतेची टीका ॥ २९ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

श्रीगणेशो जयति ॥ श्रीमते भगवते गीताकृते देवाधिदेवाय श्रीवासुदेवाय नमः ॥

जय जय भगवन् वासुदेव । जय जय श्रीदेवाधिदेव । जय जय यदुदेव वासुदेव । अर्जुनगुरो ॥ १ ॥ जय जय जी भगवंता । ऐश्वर्यज्ञानवैराग्यवंता । धर्मयशश्रीमंता । षड्गुणा ॥ २ ॥ तूं गुणातीत निर्गुण । तूंचि सगुण तूंचि त्रिगुण । तूंचि तुझे षड्गुण । तूं प्रत्यक्षीं अपरोक्ष ॥ ३ ॥ इंद्रियें आणि इंद्रियगम्य । तूंचि जो इंद्रियां अगम्य । तोचि तूं ध्येय रम्य । शेषशायी ॥ ४ ॥ तूं निर्गुण अनिर्वाच्य । तोचि तूं षड्गुणत्वें वाच्य । वाच्य तितकें अवाच्य । ठाव नुरतां वाचेसि ॥५॥ तुझें ऐश्वर्य तूंचि । ऐश्वर्यशक्ति ही तुजी कैंची । अवघी सत्ताचि साची । घट मृत्पिंड ही मृत्तिका ॥ ६ ॥ परी षड्गुणांचें विवरण । करितां दिसे कार्यकारण । षड्गुणत्वें षड्विधपण । तें भगवद्रूप जग हेंचि ॥ ७ ॥ जी श्रीसच्चिदानंदगुरु । जें जें वदलासि कल्पतरु । निर्गुण सुवर्ण सगुण मेरु । तो भेटलासि यतिरूपें ॥ ८ ॥ तूं श्रीगुरु चिद्घन ।

१ तितका, तेवढा २ केवढा

" भगवद्गीता " तुझें वचन । प्रत्यक्षीं षड्गुणज्ञान । व्याख्यान तेंचि गीतेचें ॥९॥ प्रत्यक्ष तुझे साही गुण । पाहे तोचि भक्त निपुण । आत्मा भगवंत ऐशी खूण । तो अनुभवी गीतेचा ॥ १० ॥ ऐश्वर्य म्हणिजे समर्थपण । कीं अघटित तेंही घडवणें । विश्व नसोनि मिरवणें । हें ऐश्वर्य ॥ ११ ॥ तूं तंतु विश्व पट । तूं मृत्तिका विश्व घट । ऐश्वर्य तेव्हां निपैट । चराचरचि प्रत्यक्ष ॥ १२ ॥ विश्वपटीं जो तंतू । तो निजात्मा प्रकाशहेतू । भक्त भागवत भगवंत तूं । भेद कोठूनि आणावा ॥ १३ ॥ एवं जगचि ऐश्वर्य जैसें । जगचि तुझें ज्ञान तैसें । एथेंही द्वैत तें कैसें । सांपडेल अणुमात्र ॥ १४ ॥ तूं सुवर्ण विश्व नग । निर्गुणत्वीं हा विश्वयोग । परी तूं न कल्पिसी जग । तों हे रचना घडेना ॥ १५ ॥ आधिष्ठान नेणे विवर्ता । तुज निर्गुणत्वीं न प्रपंचवार्ता । तोचि सर्वसाक्षी विश्वभर्ता । जाणूनि कल्पिसि सर्वज्ञ ॥१६॥ श्रुति बोलती सर्व । कीं धाता कल्पी यथापूर्व । ' सांख्य निरीश्वर ' त्यांचा गर्व । एथें हरे ॥ १७ ॥ जाणोनि कल्पिजे नगर । कल्पना तुझी चराचर । जन्मादि साही विकार । कल्पना तुझी साक्षित्वें ॥ १८ ॥ भूत भविष्य वर्तमान । हें कल्पका सर्वज्ञाचें ज्ञान । तेव्हां विश्वरूपेंचि ध्यान । जगत्कल्पकाच्या ज्ञानाचें ॥ १९ ॥ वृत्तिरूप ज्ञान जग । निर्धर्मज्ञानी त्याचा संयोग । अधिष्ठान कनकीं विवर्त नग । दोन्ही रूपें हेमाचीं ॥ २० ॥ जरी अलंकाररूप । तरी सुवर्णाचें तें स्वस्वरूप । दृष्टीस थिजलें विघरलें तूप । रसनेस रस एकचि ॥ २१ ॥ एवं ज्ञान दुसरा गुण । तोहि जगचि देखे निपुण । ज्यास जगदात्मत्वाची खूण । बाणे दृढ ॥ २२ ॥ विश्व नसोनि दावी । हे ऐश्वर्यशक्ति तुझी वदावी । त्याची सिद्धि अनुभवी । या ज्ञानगुणेंचि देखती ॥ २३ ॥ प्राकृत नरें ही केली कल्पना । परी देहप्रारब्धाचा साचा मना । वाटे तुज तो असेना । तो देह तुझा कल्पिसी ॥ २४ ॥ ' पुरुष एवेदं सर्वे ' असें । वेद बोले याचि रसें । मंगलाचरणमिसें । गुह्य अनुभवी बोलतों ॥ २५ ॥ आपणासि आपण नर । कल्पूनि दावी स्तंभाकार । हे ज्ञानकल्पना चराचर । तरीच अतर्क्य ऐश्वर्य ॥ २६ ॥ ऐसेंचि ऐश्वर्याविण । व्यर्थ जगत्कल्पकपण । स्वप्न प्रपंच कल्पी आपण । मी आपणाचि आपणासि ॥ २७ ॥ हस्ती जाला स्वयें । स्वयें पळे त्याच्या भयें । जगत्कल्पक निश्चयें । परी अनीशें ॥ २८ ॥ ऐसें ऐश्वर्य आणि ज्ञान । जागृतींत करी कल्पूनि ध्यान । परी त्यास न राहे अनुसंधान । विषयवासनेकरितां ॥ २९ ॥ प्रपंच मिथ्या कळला । जरी परमार्थी वळला । तरी देह आहे खवळला । प्रारब्धकर्में ॥ ३० ॥ जरी बाणलें ध्यान । क्षुधा तृषा ओढी मन । ऐशास विश्वकल्पनानुसंधान । राहेल कैसें ॥ ३१ ॥ तुझे अनादि वैराग्य । ज्याच्या लवलेशें आह्मी सभाग्य । त्या वैराग्यें तुज योग्य । करणें कल्पना प्रपंचाची ॥ ३२ ॥ प्रथम संकल्पापासूनि । जों ब्रह्म परार्धे दोन्ही । सृष्टिस्थितिसंहार कल्पूनि । असती नव्हसी विक्षिप्त ॥३३॥ एवं ऐश्वर्यहेतुज्ञान । जें जगत्कल्पनारूप चिंतन । त्यास हेतु वैराग्यसंपन्न । स्वतःसिद्ध ॥ ३४ ॥ देवा हे आमुची बुद्धि । कीं याकरितां त्याची सिद्धि । स्वतःसिद्धि शक्ति प्रसिद्धि । ऐसी निगमांत ॥ ३५ ॥ तुज वैराग्यगुण । कल्पावया हेतु हे खूण । तूं तों स्वतःसिद्ध निपुण । सर्वेश्वर ॥ ३६ ॥ आतां वैराग्यही हेंचि जग । रज्जूस न वाटे साच भुजग । सुवर्णास वासना नग । न उपजवी आपुली ॥ ३७ ॥ प्रपंच वाटता सत्य । तरी वासना उपजती अगत्य । तूं सत्य कल्पिसि असत्य । स्वतःसिद्ध ऐसें वैराग्य ॥३८॥ ज्यास ठाउकी शुक्ति । त्यास मिथ्या रजतीं विरक्ति । तें रूपेंचि विरक्ति ऐशी युक्ति । कीं जें न उपजवी अनुराग ॥ ३९ ॥ वैराग्य नाशी अनुराग । अनुराग नाशी विराग । रागनाशक मिथ्या भाग । वैराग्य

१ केवळ. २ भोंवरा, आभास. ३ असमर्थ.

तुझें हें विश्व ॥४०॥ धर्म तेथें वैराग्य । वैराग्यें ज्ञान ऐश्वर्य भाग्य । तो धर्म तुज असणें योग्य । हें बुद्धिवैभव आमचें ॥ ४१ ॥ लक्षूनि आमुच्या बुद्धी । वेद सांगे तुझ्या स्वतःसिद्धी । निगमागमीं तुझी प्रसिद्धी । आज्ञांनिमित्त ॥ ४२ ॥ मुख्य धर्म समता दया । हे दोन्ही तुझे गुण अव्यया । कर्मानुरूपें देवराया । फळें हरिती वैषम्यें ॥ ४३ ॥ दया समान सर्वांवरी । मेघ सर्वत्र वृष्टि करी । जो जैशीं बीजें पेरी । तैशीं फळें तो पावे ॥४४॥ ज्यां ज्यांस जे जे प्रीति । ते ते तदर्थ कर्में करिती । फळ तें तें त्यां त्यांप्रति । देसी देवा ॥ ४५ ॥ सकामास देसी काम । मुमुक्षूस कैवल्यधाम । देऊनि मोक्ष आत्माराम । ऋणी ह्मणविसी भक्तांचा ॥ ४६ ॥ समर्थ तूं अव्यया । मुक्ति सकळां द्यावया । आणि नेदिसी कां सदया । हें निर्दयत्व एथें उडालें ॥ ४७ ॥ मुमुक्षा जया तया मुक्ति । बुभुक्षा तया देसी भुक्ति । इच्छित फळें दे तुझी व्यक्ति । गुण हा कल्पवृक्षाचा ॥४८॥ ऐसा दयाळू आणि सम । हाचि तुझा स्वतःसिद्ध धर्म । तो धर्मही जगचि हें वर्म । देवाधिदेवा ॥ ४९ ॥ धर्म दिसे दों रूपें । फलरूपें कीं कर्मस्वरूपें । फलबंध तुझ्या चरणप्रतापें । कर्में अर्पिती नसे त्यांला ॥ ५० ॥ तुज कैंचें धर्मफळ । धर्ममात्र असे केवळ । यज्ञादि रूपें प्रांजळ । दिसे जैसा याज्ञिकांचा ॥ ५१ ॥ तेव्हां जगचि तुझा धर्म । हेंचि समत्व दयालुत्व कर्म । वांछानुरूप प्राप्तिक्रम । वैषम्य न दिसे ॥ ५२ ॥ अन्नसत्रीं अन्नें नाना । परी आवडे जें ज्याच्या मना । तें तेंच त्या त्या जना । वाढिती अन्न ॥ ५३ ॥ ऐसें अन्नसत्र वसे । तेचि दातयाची समता दिसे । एवं जगचि धर्म असे । भगवच्छब्दवाच्याचा ॥ ५४ ॥ एवं जगचि मुक्तांची मुक्ति । जगचि विषयासक्तांची भुक्ति । समता दयारूपें अभिव्यक्ति । जगचि तुझ्या धर्माची ॥ ५५ ॥ तुझें धर्मरूप जग । दोरीं जैसा भुजग । तो दोर स्वयें उपासक मग । वेगळेपण कैंचें भक्तासि ॥ ५६ ॥ आतां जेथें धर्म तेथें यश । तेव्हां जगचि तव यशलेश । कीं सम दयाळू हृषीकेश । जगचि ऐसें गर्जतें ॥ ५७ ॥ यावेगळे जे जे गुण । ते यशचि ऐशी खूण । त्या गुणांसहित निपुण । देखती जगचि यशरूपें ॥५८॥ आतां श्री नामही यशाचें । श्री वेंचूनि यश साधिती साचें । श्री आणि यश परमपुरुषाचें । हेंचि जग ॥ ५९ ॥ दोरीं जैसा भुजग । कीं सुवर्णामाजी नग । तैसें ब्रह्मीं जग । मायामात्र ॥ ६० ॥ साकारलें ब्रह्म सगुण । माया लक्ष्मी जाली आपण । अधिष्ठानीं माया तैशी निपुण । श्रीधर हृदयीं धरी तीस ॥ ६१ ॥ चित्समुद्रीं मायातरंगा । ते श्रीहृदयीं अंतरंगा । चित्समुद्रा श्रीरंगा । हृदयीं श्री यापरी ॥ ६२ ॥ एवं माया विश्वरूपें । ते श्री धरिली चित्स्वरूपें । जैशी धरी शुक्ति रुपें । श्रीधरें धरिली श्री तैशी ॥ ६३ ॥ ऐसा तूं षड्गुण । विश्व तुझे साही गुण । भगवच्छब्दवाच्य विश्वस्फुरण । निजात्मपण याकरितां ॥ ६४ ॥ एवं भगवच्छब्दवाच्य जग । आत्मरज्जूमाजी भुजग । हा भगवदैक्याचा योग । दिधला तुवां भगवंता ॥ ६५ ॥ जीवत्व आढळे प्रारब्धयोगीं । विश्वात्मत्व या भागवतयोगीं । हे तुझी कृपा ईस उपयोगी । भगवद्गीता ॥ ६६ ॥ त्या गीतेचा अर्थ । तोचि परमार्थ । जिचा वक्ता तूं समर्थ । परमात्मा भगवंत ॥ ६७ ॥ परी अजी भगवंत जी । याकलियुगामाजीं । जो तो गीतार्थ योजी । मतानुरूप ॥६८॥ जे योजिती निर्गुणपर । त्यांस सगुणीं अनादर । सगुणींच योजिती जे नर । ते नेणती निर्गुणत्व ॥ ६९ ॥ दोहींत केवळ सगुणवादी । त्यांची निष्ठा अखंड भेदीं । जयांचें भजन वर्णिलें वेदीं । पशुतुल्य ॥ ७० ॥ ( श्रुति )—**अथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद यथा पशुः ॥**
(श्रुत्यर्थ)—देव अन्य मी अन्य । ऐसा भेद अन्योन्य । दाटूनि आणिती जघन्य । त्यांस ही श्रुति निंदिते ॥ ७१ ॥ ह्मणोनि ते केवळ निषिद्ध । निर्गुणवादी ज्ञानी प्रबुद्ध । जे आत्मा निर्गुण स्वतःसिद्ध । अनुभविती ॥ ७२ ॥ जे सर्वथा मानिती वेद । जे निषेधिती समूळ भेद । जे हरिती खेद । कांडत्रयाचा

॥ ७३ ॥ चित्तशुद्धीकारणें कर्म । ईश्वरप्रसादार्थ उपासनाधर्म । ज्ञानकांडीं निर्गुण ब्रह्म । अनुभविती आत्मत्वें ॥ ७४ ॥ परंतु त्यांचें मत । जों आत्मा कळे निश्चित । तोंवरीच उचित । सगुणोपासना ॥७५॥ आणि भगवंता तुझें मत । कीं निर्गुणात्मक अद्वैत । कळोनि माझे चरणीं रत । भक्त सकळांत तो थोर ॥७६॥ ऐसें गीतेंत जेथें । ते वाखाणिती विपरीत तेथें । पूर्वापर विचारितां एथें । गीता न साहे तो अर्थ ॥ ७७ ॥ ते तों परम सर्वज्ञ । त्यांस बोल ठेवी तो अज्ञ । तरी कां बोलती ऐसें अभिज्ञ । विरळ समजे हें तत्व ॥ ७८ ॥ श्रीगुरुरूपें देवा । मज भेटलासि वासुदेवा । तें हें रहस्य देवाधिदेवा । बोलिलासी ॥ ७९ ॥ तुझीं वचनें तुजप्रति । यालागीं बोलतों श्रीपति । कीं श्रोते तुझ्याच मूर्ति । तूं विश्वरूप भगवंत ॥ ८० ॥ कलियुगीं प्रबळले बौद्ध । वेद जाले असिद्ध । ते क्षीणबल होतां प्रसिद्ध । जालीं मतें भेदाश्रितें ॥ ८१ ॥ प्रत्यक्षवादी चार्वाक । ज्यांच्या मतें न स्वर्ग नरक । न कर्मभोग तेव्हां फलदायक । जगदीश कैंचा ॥ ८२ ॥ ज्यांच्या मतें वेद असिद्ध । त्यांशीं वाद वेदसिद्ध । न करवे ह्मणोनि प्रसिद्ध । तर्कशास्त्र जालें ॥ ८३ ॥ आपला एक सिद्धांत धरावा । तेव्हां वादियांशीं वाद करावा । अन्यथा त्या वादास परावा । वितंडवाद ह्मणेल ॥ ८४ ॥ स्वसिद्धांत बोलावा अभेद । तरी तो न साधे विना वेद । यालागीं सिद्धांत आपुला भेद । तार्किकें गौतमें धरिला ॥ ८५ ॥ कार्यापुरते नृपती । शत्रुहि घडि एक हातीं धरिती । तथापि अंतरीं चिंतिती । घात त्याचा ॥ ८६ ॥ दुःखबीजें एकवीस । गौतम ह्मणे त्यांचा ध्वंस । तोचि मोक्ष तरी हे परमहंस । अद्वैतानुभवीही मानिती ॥ ८७ ॥ जीवांस अखंड ब्रह्मत्व । ब्रह्मचि मोक्षसुख हें तत्व । दुःखनाशें मुक्तत्व । अद्वैतसिद्धांतही ऐसा ॥ ८८ ॥ एवं अंतरीं अद्वैत । बहिरंग कार्यार्थ धरिलें द्वैत । अगत्य वेदविरुद्ध मत । खंडावया ॥ ८९ ॥ परी हें नेणती लोक । गोड वाटती गौतमतर्क । ह्मणुनि ते अद्वैतअर्क । न पाहती जाले दिवांध ॥ ९० ॥ श्रद्धा उपजली वेदीं । परंतु जाले कुतर्कवादी । तेही वळले अभेदीं । जसे तसे ॥ ९१ ॥ कळलियाही निर्गुण । मागुतीं भजावा सगुण । ऐसें बोलतां ते तर्कनिपुण । हांसती शास्त्रासीं ॥९२॥ कीं संसार स्वप्न ज्यांच्या मतें । निर्गुणात्मा ओळखिला जाग्रतें । पुन्हा मायिक सगुणभक्ति त्यांतें । कां बोलती ॥९३॥ आतां सांगावें त्यांस सार । कीं कळलें जरी निर्विकार । तरी मन झालें पाहिजे तदाकार । या निमित्तें सेव्य गुरुदेव ॥९४॥ निर्गुणात्मा कळल्यावरी । गुरुदेवाची भक्ति करी । तेव्हां अपरोक्ष बरवेपरी । बिंबे हें तों श्रुतिसिद्ध ॥९५॥ (श्रुति)—**यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ । तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ॥** (श्रुत्यर्थ)—श्रुति ह्मणे देवाची भक्ति । तैशीच गुरुचरणीं अनुरक्ति । तेव्हां त्या गुरुच्या उक्ति । प्रकाशती याला ॥९६॥ कीं ब्रह्म ओळखे बुद्धि । मग गुरुदेवभक्तीनें स्थैर्यसिद्धि । करावी या रहस्याची प्रसिद्धी । जेव्हां त्यास ॥ ९७ ॥ तेव्हां कठिण वाटोनि मुक्ति । या शास्त्रीं न धरितील अनुरक्ति । ह्मणोनि निर्गुण कळे तोंचि भक्ति । शास्त्राकार ह्मणती सगुणाची ॥ ९८ ॥ परंतु भाव ऐसा चित्तीं । कीं जे निर्गुणात्मत्व समजती । ते गुरुदेवाची प्रीति । धरितीलचि अत्यंत ॥ ९९ ॥ साकरेच्या औषधीं । रोगनिवृत्तीचीच अवधी । गोड ह्मणोनि निरोगीही कधीं । न सोडी साकर ॥ १०० ॥ अमर जाले अमर । तरी पिति अमृत सादर । न सांगतांही हा प्रकार । जीवन्मुक्तही करतील ॥ १ ॥ एवं मूर्खसमजावणीकारणें । अगत्य लागलें अंगीकारणें । कीं निर्गुण कळल्या सगुण । कां भजावें ॥ २ ॥ कीं शास्त्राचा आरंभकाळ । ऐसाच होता कीं लोक सकळ । कुतर्कवादी प्रबळ । जसे तसे आणावे सन्मार्गी ॥ ३ ॥ हें न कळूनि अंतरंग । शब्दज्ञानी जे बहिरंग । त्यांस भजनत्यागप्रसंग । प्राप्त जाला ॥ ४ ॥ जडनिषेधें चैतन्य । इतकेंचि कळतां मानिती धन्य । मनांत थारा जघन्य । विषयवासनेचा ॥ ५ ॥

सगुणाची अद्वैतभक्ति । करितां पूर्वील विषयविरक्ति । दृढ होतां होय मुक्ति । हें शब्दज्ञानी नेणती ॥ ६ ॥ पिसाटाच्या करीं कोलित । तैसें त्यांस शास्त्रसंमत । परी त्यांचा अंतरंग सिद्धांत । न कळे त्यांला ॥ ७ ॥ पशूंस पाजावया पाणी । वडिलीं कूप खारवणी । केला ह्मणोनि गोडवणी । न प्यावें काय ॥ ८ ॥ असो ते प्रस्तुत शास्त्रवाणी । ऐसी अजी चक्रपाणी । परी मी न पीं तें क्षार पाणी । वडिलीं केलें ह्मणोनि ॥ ९ ॥ भवद्रुमातें छेदी शस्त्र । ऐसें तुझें गीताशास्त्र । त्याची दाविती पाठ मात्र । धार लपविती ये रीती ॥ ११० ॥ खड्गास मुख्य पाणी । तैशी भक्तिपर तुझी वाणी । गीतेच्या अंतीं चक्रपाणी । ऐसेंचि बोलिलासि ॥ ११ ॥ ' य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति । भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयम् ॥ ' [ गीता–अ० १८ श्लो० ६८ ] ज्ञान भक्ति वैराग्य । गीतेंत तिन्ही यथायोग्य । त्यांत भक्ति जो सभाग्य । थोर करूनि सांगे ॥ १२ ॥ गीतासिंधुमथन । करूनि भक्तिसुधेचें कथन । थोर करूनि सांगे जो जन । तो अनायासें मज पावे ॥ १३ ॥ याहूनि पुढील श्लोक । त्यांत ह्मणसी तूं उत्तमश्लोक । कीं तैसा पाहतां त्रिलोक । प्रिय ज्याला न होईल ॥ १४ ॥ कोणी येथें आणिक अर्थ । करिती तो नव्हे समर्थ । पुढें विशद होणार एथें व्यर्थ । ग्रंथ कां जी वाढवूं ॥ १५ ॥ कोण्या मिसें तरी कोणी । गीतार्थ अन्यथा वाखाणी । मज नावडे ती थोरांचीहि वाणी । काय करूं जी श्रीकृष्णा ॥ १६ ॥ संसारच्छेदक सार । गीताशास्त्राची भक्तिधार । ते झांकून नुसतें निराकार । मात्र दाविती ॥ १७ ॥ जडदेहनिषेधें निराकार । आत्मा कळला हा प्रकार । व्यतिरेकज्ञान प्रथम विचार । हाचि आत्मज्ञानाचा ॥ १८ ॥ उरला प्रपंच देहासहित । हें जड भ्रांतिरूप द्वैत । तेंही ब्रह्मचि कळतां अद्वैत । तत्त्व आलें अनुभवा ॥ १९ ॥ जडचैतन्यविवेक । या ज्ञानाचें नांव व्यतिरेक । जडीं अनेकीं पाहणें एक । अन्वयज्ञान या नांवें ॥ १२० ॥ तें कळतां जग । आत्मरज्जूंत होय भुजग । तथापि आत्मसुवर्णीं नाना नग । श्रुति ऐसें वर्णिती ॥ २१ ॥ कीं रज्जू कळलियाउपरी । सर्प दिसों नये वरी । जीवन्मुक्तास तरी । प्रपंच दिसतो ॥ २२ ॥ जरी दिसे यथापूर्व जग । तरी सोनेंचि नुसतें जैसे नग । सुवर्णयाचकास उबग । कां आकाराचा येईल ॥ २३ ॥ एवं प्रपंच दिसे । तथापि ब्रह्मचि असे । सगुणभक्ति समरसे । ते या प्रकारें ॥ २४ ॥ ब्रह्मविद्येचें वैभव । ऐसा सगुणभक्तीचा अनुभव । गीतेंत थोर हा भक्तिभाव । सर्वत्र असे वर्णिला ॥ २५ ॥ ऐसें ब्रह्म तेंचि सगुण । ऐसा ज्ञाननिष्ठ भक्त निपुण । भगवंत भागवत ऐशी खूण । जेथें वेगळी न सांपडे ॥ २६ ॥ सगुण ब्रह्म चराचर । गीतेंत या ज्ञानाचा आदर । ह्मणूनि ' धर्म्य ' पद वारंवार । या ब्रह्मज्ञानीं योजिलें ॥ २७ ॥ ' प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् । ' [ गीता–अ० ९ श्लो० २. ] ' ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते । ' [ गीता–अ० १५ श्लो० २०. ] ' अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः । ' [ गीता–अ० १८ श्लो० ७०. ] एवं ऐसें 'धर्म्य'पद । भगवान् बोले प्रतिपद । याचा अर्थ विशद । न बोलती कोणी ॥ २८ ॥ निर्धर्म ह्मणजे निर्गुण । सधर्म ह्मणजे सगुण । ' धर्म्य ' पदें दावी खूण । विश्वात्मज्ञानाची ॥ २९ ॥ पुढें होईल विशद । जे जे ठायीं 'धर्म्य'पद । हें मंगलाचरणीं कृष्णपद । स्मरतां आठवे समग्र गीता ॥ १३० ॥ याकारणें जी भगवंता । यथास्थित हे तुझी गीता । वाखाणावी ह्मणोनि होता । बहुतकाळ संकल्प ॥ ३१ ॥ आणि तुझ्या कृपेचे विभागी । शिष्य संत भक्त योगी । ते ह्मणती कीं जगदुपयोगी । ऐसी टीका करावी ॥ ३२ ॥ परंतु देवकीनंदन । जेव्हां देईल अनुमोदन । तेव्हांच करूनि त्यातें वंदन । करीन पोटीं हा भाव ॥ ३३ ॥ तें अनुमोदन भिन्नत्वें असेना । हृदयीं दाटली गीतार्थ-

रचना । बुद्धिप्रेरकाची मना । तेचि आज्ञा वाटली ॥ ३४ ॥ आत्माचि तूं निखिल । जो बुद्धि प्रकाशी निर्मळ । टीकारंभीं केवळ । तेचि आज्ञा वाटली ॥ ३५ ॥ करूनि तुझें स्मरण । ध्यानीं चिंतूनि चरण । आरंभिलें मंगलाचरण । प्रथम ओंवी संस्कृत ॥ ३६ ॥ विश्वरूपें करूनि स्मरण । भगवत्पदें मंगलाचरण । सात ओंविया होतां पूर्ण । आरंभिली ओंवी आठवी ॥ ३७ ॥ ओंवी लिहितां आठवी । तुज गुरुरूपें आठवीं । यतिरूपीं स्मरतां आठवी । अवतारमूर्ति दीससी ॥ ३८ ॥ करीं वागोरे सारथीं । बैसला अर्जुनाचे रथीं । तोचि वामनमनोरथीं । टीका करितोसि गोविंदा ॥ ३९ ॥ तूंचि लेखणी तूंचि मसी । तूं पत्र विचित्र पदें होसी । तूंचि अर्थ भावार्थ स्फुरसी । तूंचि ऐसा अनुभव ॥ १४० ॥ तूंचि वामनरूपें दीससी । त्रिविक्रम तूंचि अनुभवीं होसी । स्फुरोनि विश्वरूपें उरसी । अनंतत्वें सर्वदा ॥ ४१ ॥ हेंचि तुझें मंगलाचरण । आतां स्मरोनि तुझे चरण । गीतार्थाचें विवरण । करीन तुझ्या प्रसादें ॥ ४२ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीरामचंद्राय नमः ॥ प्रणम्य रामं पुरुषं पुराणं । तथा चिदानंद–गुरुं यतिं च ॥ कुर्वे महाराष्ट्रपदैस्तु गीता । व्याख्यायनं व्याकरणाय पुंसे ॥ १ ॥

नमस्कार करुनियां श्रीरामा । आणि गुरु चिदानंदाश्रमा । महाराष्ट्रपदीं परमात्मा । वर्णीन गीतार्थें ॥२॥ ते संतजनीं परिसावे । आयकोनि सार्थक करावे । मज तेहि निर्भय द्यावे । गीता–व्याख्यानीं ॥ ३ ॥ या भक्ताचेनि तोषलेपणें । भगवद्गीतार्थ बोलणें । जो बोलिला सर्व पुराणें । श्रुतिस्मृति ॥ ४ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः । श्रीपरात्पराय नमः ॥ जयजय सद्गुरु दीनानाथा । पतितपावना समर्था । आदिमध्यअंतरहिता । तुज अनंता नमस्कारु ॥ १ ॥ तूं सबाह्य अंतरिं सदोदित । तुझा वेदशास्त्रा नकळे अंत । ऐसें जाणोनि मी निवांत । तुज प्रणिपात करितसें ॥ २ ॥ म्यां अद्वैतभावें नमस्कार केला । जैसा तरंग भजे जळाला । किंवा अवयव शरीराला । तैसें म्यां तुज नमस्कारिले ॥ ३ ॥ किंवा अलंकार भजती हेमासि । शाखा जैसि भजे तरूसि । जैसा पट भजे कापसासि । तैसें म्यां तुज नमस्कारिले ॥ ४ ॥ तुझे कृपेकरूनि जाण । माझें गेलें द्वैतभान । अनेकाचे ठायीं एक मीपण । ऐसें ज्ञान जालें मज ॥ ५ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

वृत्तः उपेंद्रवज्रा वंदूनि लक्ष्मीशपदारविंदें । गीतार्थ नानाविध पद्यबंधें ॥
न खंडितां पद्धति पंडिताची । मी वर्णितों प्रीति घडो हरीची ॥ १ ॥

## वामन—( शांडिल्य )

वृत्तः– श्रीगणेशाय नमः । श्रीमते भगवते भगवत्तमाय नरसारथ्यनिपुणाय श्रीमन्नारायणाय नमः ॥
अनुष्टुप् श्रीमान् श्रीभगवान् साक्षाच्छेषशायी जगद्गुरु । मंगलाचरणीं वंदूं जगन्मंगल जो हरि ॥ १ ॥

## मोरोपंत

वृत्तः–आर्या विजय-रथ-तुरग-रश्मि-ग्रहण-व्यग्राऽग्रपाणि-पद्मातें ॥
वंदूं जलद-श्याम-ब्रह्मातें सद्गुणैकसद्मातें ॥ १ ॥

# उपोद्घात.

राजा धृतराष्ट्र अंध असल्यामुळें कुरुक्षेत्रांत होणारें युद्ध तो पाहूं शकत नव्हता. त्याकरितां व्यास महर्षि त्याला दिव्य दृष्टि देत होते; पण त्यांत होणारा स्वजनांचा घात तो पाहूं इच्छित नसल्यामुळें त्यांनीं संजयाला दिव्य दृष्टिनें सर्व युद्धवर्तमान प्रत्यक्ष पाहण्याचें सामर्थ्य दिलें होतें आणि कुरुक्षेत्रांत घडणारे सर्व वर्तमान धृतराष्ट्राला यथावत् सांगण्याची आज्ञा केली होती. तदनुरूप संजय-धृतराष्ट्र-संवाद चालला असतां धृतराष्ट्र ह्मणालाः-

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) "

आतां अवधारा कथा गहन । जे सकळां कौतुकां जन्मस्थान । कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ॥ २८ ॥ ना तरी सर्व सुखाचि आदि । जे प्रमेयमहानिधि । नाना नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे ॥ २९ ॥ कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ । शास्त्रजाता विशिष्ट । अशेषांचें ॥ ३० ॥ ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार । लावण्यरत्नभांडार । शारदेचें ॥ ३१ ॥ नाना कथारूपें भारतीं । प्रकटली असे त्रिजगतीं । आविष्करोनि[१] महामतीं । व्यासाचिये ॥ ३२ ॥ ह्मणोनि हा काव्यांरावो । ग्रंथ गुरुवतीचा ठावो । एथूनि रसां झाला आवो[२] । रसाळपणाचा ॥ ३३ ॥ तेवींचि आइका आणिक एक । एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक । आणि महाबोधीं कोंवळिक । दुणावली ॥ ३४ ॥ एथ चातुर्य शहाणें जालें । प्रमेय रुचिस आलें । आणि सौभाग्य पोखलें[३] । सुखाचें एथ ॥ ३५ ॥ माधुर्यीं मधुरता । शृंगारीं सुरेखता । रूढपण उचितां । दिसे भलें ॥ ३६ ॥ एथ कळाविदपण कळा । पुण्यासि प्रतापु आगळा । ह्मणऊनि जनमेजयाचें अवलीळा । दोष हरले ॥ ३७ ॥ आणि पाहतां नोवेक[४] । रंगीं सुरंगतेची आगळीक । गुणां सगुणपणाचें बिकें[५] । बहुवस एथ ॥ ३८ ॥ भानुचेनि तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळिलें । तैसें व्यासमतीं कवळिलें । मिरवे विश्व ॥३९॥ कां सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलियापरी विस्तारलें । तैसें भारतीं सुरवाडलें[६] । अर्थजात ॥ ४० ॥ ना तरी नगरांतरीं वसिजे । तरी नागरचि होईजे । तैसें व्यासोक्तीतेजें । धवळत सकळ ॥ ४१ ॥ कीं प्रथम वयसांकाळीं । लावण्याची नव्हाळी । प्रगटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ॥ ४२ ॥ ना तरी उद्यानीं माधवी घडे । तेथ वनशोभेची खाणी उघडे । आदिलापासोनि अपाडें[७] । जयापरी ॥ ४३ ॥ नाना घनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण । मग अळंकारीं बरवेपण । निवाडु दावी ॥ ४४ ॥ तैसें व्यासोक्ति अळंकारिलें । आवडे तें बरवेपण पातलें । तें जाणोनि काय आश्रायिलें । इतिहासीं ॥ ४५ ॥ नाना पुरतिये प्रतिष्ठेलागीं । सानीव धरूनि आंगीं । पुराणें व्याख्यानरूपें जगीं । भारता आलीं ॥ ४६ ॥ ह्मणऊनि महाभारती नाहीं । तें नोहेचि लोकीं तिहीं । येणें कारणें ह्मणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ ४७ ॥ ऐसी जगीं सुरस कथा । जे जन्मभूमि परमार्था । मुनि सांगे नृपनाथा । जनमेजया ॥ ४८ ॥ जें अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरुपम । परम मंगलधाम । अवधारिजो ॥ ४९ ॥ आतां भारतकमळपरागु । गीताख्यु प्रसंगु । जो संवादिला श्रीरंगु । अर्जुनेंसीं ॥ ५० ॥ ना तरी शब्दब्रह्माब्धि । मथियला व्यासबुद्धि । निवडिलें निरवधि । नवनीत हें ॥ ५१ ॥ मग ज्ञानाग्निसंपर्कें । कडसिलेनि विवेकें । पद आलें

१ उघड करून. २ आकार. ३ पोसलें. ४ क्षणैक. ५ तेज. ६ तेजःपुंज झाले. ७ विशेष.

परिपाकें । आमोदासी ॥ ५२ ॥ जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे संतीं । सोहंभावें पारंगती । रमिजे जेथ ॥ ५३ ॥ जें आकर्णिजे भक्तीं । जें आदिवंद्य त्रिजगतीं । जें भीष्मपर्वीं संगती । ह्मणितली कथा ॥ ५४ ॥ जें भगवद्गीता ह्मणिजे । जें ब्रह्मेशानीं प्रशंसिजे । जें सनकादिकीं सेविजे । आदरेंसी ॥ ५५ ॥ जैसें शारदीयेचें चंद्रकळे-।-माजीं अमृतकण कोंवळे । ते वेंचिती मनें मवाळें । चकोरतलगें[1] ॥ ५६ ॥ तियापरी श्रोतां । अनुभवावी हे कथा । अति हळुवारपण चित्ता । आणूनिया ॥५७॥ हे शब्देंवीण संवादिजे । इंद्रिया नेणतां भोगिजे । बोलाआदि झोंबिजे । प्रमेयासी ॥ ५८ ॥ जैसे भ्रमर परागु नेती । परी कमळदळें नेणती । तैसी परी आहे सेविती । ग्रंथीं इये ॥ ५९ ॥ कां आपुला ठावो न सांडिता । आलिंगिजे चंद्रु प्रकटतां । हा अनुरागु भोगितां । कुमुदिनी जाणे ॥ ६० ॥ ऐसेनि गंभीरपणें । स्थिरावलेनि अंतःकरणें । आथिला तोचि जाणे । मानूं इये ॥ ६१ ॥ अहो अर्जुनाचिये पांतीं[2] । जे परिसणया योग्य होती । तिहीं कृपा करूनि संतीं । अवधान द्यावें ॥ ६२ ॥ हें सलगी म्यां ह्मणितलें । चरणां लागोनि विनविलें । प्रभु सखोल हृदय आपुलें । ह्मणऊनियां ॥ ६३ ॥ जैसा स्वभावो मायबापाचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा । तरी अधिकचि तयाचा । संतोष आथी ॥ ६४ ॥ तैसा तुह्मीं मी अंगिकारिला । सज्जनीं आपुला ह्मणितला । तरी उणें सहजें उपसाहला । प्रार्थूं कायी ॥ ६५ ॥ परी अपराधु तो आणिक आहे । जें मी गीतार्थु कवळूं पाहे । तें अवधारा विनवूं लाहे । ह्मणऊनियां ॥ ६६ ॥ हे अनावर न विचारतां । वायांचि धिंवसा[3] उपनला चित्ता । येऱ्हवीं भानुतेजीं काय खद्योता । शोभा आथी ॥ ६७ ॥ कीं टिटिभू[4] चांचुवरी । माप सूये सागरीं । मी नेणतु त्यापरी । प्रवर्ते येथ ॥ ६८ ॥ आयका आकाश गिंवसावें । तरी आणीक त्याहूनि थोर होआवें । ह्मणऊनि अपाडु हे आघवें । निर्धारिता ॥६९॥ तया गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी । जेथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारोनी ॥ ७० ॥ तेथ हरु ह्मणे नेणिजे । देवी जैसें कां स्वरूप तुझें । तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्व ॥ ७१ ॥ हा वेदार्थ सागरु । जया निद्रिताचा घोरु । तो स्वयें सर्वेश्वरु । प्रत्यक्ष अनुवादला ॥ ७२ ॥ ऐसें जे अगाध । जेथ वेडावती वेद । तेथ अल्प मी मतिमंद । काय होय ॥ ७३ ॥ हे अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें । गगन मुठीं सुवावें । मशकें केवीं ॥ ७४ ॥ परी एथ असे एकु आधारु । तेणेंचि बोले मी सधरु[5] । जैं सानुकूळ श्रीगुरु । ज्ञानदेवो ह्मणे ॥७५॥ येऱ्हवीं तरी मी मूर्खु । जरी जाहला अविवेकु । तरी संतकृपादीपकु । सोज्वळ असे ॥ ७६ ॥ लोहाचें कनक होये । हे सामर्थ्य परिसींच आहे । कीं मृतही जीवित लाहे । अमृतसिद्धि ॥ ७७ ॥ जरी प्रकटे सिद्धसरस्वती । तरी मुकया आथी भारती । एथ वस्तुसामर्थ्यशक्ती । नवल कायी ॥७८॥ जयाते कामधेनु माय । तयासी अप्राप्य कांहीं आहे । ह्मणऊनि मी प्रवर्तों लाहें । ग्रंथीं इये ॥ ७९ ॥ तरी न्यून तें पुरतें । अधिक ते सरते । करूनि हें घेयावें तुमते । विनवितु असे ॥ ८० ॥ आतां देईजो अवधान । तुह्मीं बोलविल्या मी बोलेन । जैसे चेष्टे सूत्राधीन । दारुयंत्र[6] ॥८१॥ तैसा मी अनुग्रहीतु । साधूंचा निरूपितु । ते आपुलियापरी अलंकारितु । भलतयापरी ॥ ८२ ॥ तंव श्रीगुरु ह्मणती राहीं । हे तुज बोलावे नलगे कांहीं । आतां ग्रंथा चित्त देईं । झडकरी वेगां ॥ ८३ ॥ या बोला निवृत्तिदासु । पावूनि परम उल्हासु । ह्मणे परियसा मना अवकाशु । देऊनियां ॥ ८४ ॥

१ चकोरपक्ष्याची पिलें. २ पंक्तिस. ३ धैर्य. ४ टिटवी. ५ आधारानें. ६ कळसूत्री बाहुली.

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

श्रीमद्गीता-श्रुतिर्व्यासो छंदो नानाविधा श्रुतिः । देवतादेवकीपुत्रो मोक्षार्थे विनिपूज्यते ॥
ये गीतामंत्रीं यथानिगुतीं । ऋषित्वें व्यासदेवाची स्थिती । दैवत देवकीपुत्र निभ्रांति । छंदश्रुति नानविधी ॥ ४३ ॥ एवंविध मंत्र हा मोक्षाकारणें । योजावा मुमुक्षू जो तेणें । आतां असो हे बहु बोलणें । प्रथमाध्याय प्रारंभ ॥ ४४ ॥ युद्धविचार करूनि तत्वतां । कौरव आणि पांडव उभयतां । कुरुक्षेत्राप्रती प्रयाण करितां । हस्तिनापुराहूनि पैं ॥ ४५ ॥ धृतराष्ट्रासि तये वेळां । आला निजपुत्रांचा कळवळा । मग ह्मणे यांचा समाचार वहिला । मज कैसा कळो ये ॥ ४६ ॥ हें परम संकट मांडलें त्यांसी । मग स्मरता जाला व्यासदेवासी । स्मरणमात्रें कृपाराशी । तात्काळ तेथें प्रगटला ॥ ४७ ॥ मग आसनीं बैसवून । धृतराष्ट्रें केलें पूजन । वंदूनि साष्टांग नमन । प्रार्थिता जाला ते काळीं ॥ ४८ ॥ स्वामी तूं आमुचा धुर्वासा[1] । आह्मां नुपेक्षी सहसा । हा माझे अंतरीं भरंवसा । ह्मणोनि तूंतें स्मरियलें ॥ ४९ ॥ आतां हे कौरव पांडव सैन्यासी । युद्धार्थ जातात कुरुक्षेत्राशी । तेथिचें चेष्टित त्वरेसी । मजलागिं कळे कैसेनि ॥ ५० ॥ पुत्रांचा समाचार न कळतां । मज पावे शोकाकुलता । ह्मणोनि माझी हरी हे चिंता । ऐसा विनाविता जाला तो ॥ ५१ ॥ ऐसें त्याचें करुणाभाषण । परिसोन पराशरनंदन । शिष्य संजयो तयाप्रति वचन । बोले गंभीर गिरेनें ॥ ५२ ॥ संजया तूं येथें रहावे । या धृतराष्ट्रापासी बैसावे । बैसोनि याप्रति निरोपावे । जें जें वर्तेल कुरुक्षेत्रीं ॥ ५३ ॥ येरु कर जोडूनि करी विज्ञप्ती । स्वामी एवढी कैंची मज शक्ती । जे कुरुक्षेत्रीचा समाचार याप्रती । सांगो अतींद्रीय–दृष्टत्वें ॥ ५४ ॥ ऐकुनी व्यास ते अवसरीं । हातु ठेविला संजयाचे शिरीं । तत्क्षणमात्रें तो सुषुप्तिपरी । जाला अतींद्रिय–दृष्टी ॥ ५५ ॥ जें जें वर्ते त्रिभुवनीं । तें तें संजय देखे ज्ञानीं । कृपा केलिया संतसज्जनीं । ऐसें घडे हें अपूर्व कोण ॥ ५६ ॥ तो आलिया धृतराष्ट्रापासी । व्यासें ठेविलें संजयासी । इतुकें संपादूनि निजधामासि । जाते जाले व्यासदेव ॥ ५७ ॥ अंध नव्हे तो मोहनी केवळ । संजय नव्हे तो विवेक प्रबळ । व्यास नव्हे तो सद्गुरुचि अमळ । मोहातें प्रबोधी विवेकें ॥ ५८ ॥ कौरव नव्हेति हे अनेक विकार । यामाजीं मुख्य दुर्योधन अहंकार । हे मोहाची संतती साचार । अतएव परम अनर्थी ॥ ५९ ॥ पांडव नव्हेत हे वास्तव । जाणावे सत्साधनभाव । यामाजिं स्वधर्मराजाचें श्रेष्ठत्व । संततीसत्व पंडूची ॥ ६० ॥ कृष्ण नव्हे तो आत्माचि केवळ । सत्साधनीं सहाय्य सदाकाळ । एवं हे कौरव पांडव सकळ । नांदती स्थूल देहीं हस्तिनापुरीं ॥ ६१ ॥ तेथूनि त्या संग्रामाकारणें । लिंगदेह कुरुक्षेत्रा जालें येणें । तेथें मध्यवर्ती बुद्धयानुसंधानें । जाणती कळा तो रणस्तंभु ॥ ६२ ॥ वैराग्य-भूमिकेवरि यथास्थिती । सत्साधनाभाव पांडव राहती । आणि विकारभाव कौरव असती । विषयभू-मिकेचें ठायीं ॥ ६३ ॥ एवं ऐसें द्वयार्थ कथानुसंधान । बोलती स्वानुभवी सज्जन । शाहणीया सेवे तैसी खूण । मी प्रसंगीं बोलिलों ॥ ६४ ॥ पुढें येणेंचि अन्वयें साचा । जो अर्थभाव येईल गीतेचा । तो कृतार्थ होईल त्रिवाचा । परमार्थ त्याचा किंकर ॥ ६५ ॥ असो आतां हा प्रसंगु । धरूं नीट निरूपणमार्गु । संजय धृतराष्ट्र संयोगु । जालिया कैसें वर्तलें ॥ ६६ ॥ कुरुक्षेत्रीं गेलिया निजसंतती । धृतराष्ट्रास उपजे खंती । मग व्यासानुग्रही या संजयाप्रती । पुसता जाला आदरें ॥ ६७ ॥

---

१ आसरा.

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

तेचि परिसया कथा गहन । जे कीं ब्रह्मविद्येचें स्थान । कीं भक्तीविरक्तीचें उद्यानवन । जेथ वृक्ष संपूर्ण विवेकाचे ॥ ६१ ॥ जे ज्ञानपुष्पीं मघमघीत । विज्ञानफळें करूनियां लवत । विश्रांतिछाया सुशीतळ जेथ । सुख अद्भुत ब्रह्मानंदें ॥ ६२ ॥ नातरी सर्व सुखाचें हें बीजभूत । नवरसें कडसूनि ब्रह्मसुखमथित । कीं अध्यात्मविद्यांचें मूळ अभिव्यक्त । जेथ विरक्त लोधावले ॥ ६३ ॥ किंवा हें सकळ धर्मोचें माहेर । कीं सज्जनांचें विश्रांतिमंदिर । किंवा हें लावण्यरत्नांचें भांडार । गुह्यतर शब्दब्रह्माचें ॥ ६४ ॥ नानाकथारूपें सर्वगंगौघ । भारतसिंधूसी मिळताती अनेग । त्यांचेंही मथूनि अमृत चांग । काढिलें सांग गीतारत्न हें ॥ ६५ ॥ तया भारतश्रवणाचें पुण्य किंती । हें तव वर्णवेना स्वर्लोकपती । पुण्य गणवेना ऐशी व्यासोक्ती । बोले सर्वार्थी तें सांगेन ॥ ६६ ॥ ॥ संमति ॥ भारतस्य समुद्रस्य मेरोर्नारायणस्यच । अप्रमेयानि चत्वारि पुण्यतोयगुहागुणाः ॥ ६७ ॥ ॥ तरी चारी हीं अप्रमेयें असती । कल्पांतवरी गणितांही न गणवती । परी भारत श्रवणपठनें जीं पुण्यें होती । न बोले भारती शेषाची जेथ ॥ ६७ ॥ तैसेंच समुद्राचेंही उदक । न करवे जाण तयाचे लेख । मेरूच्या गुहा न गणवती देख । तैसेचि अनेक हरीचे गुण ॥ ६८ ॥ शेषादिकीं कोटिकल्पवरी । सर्वोत्तमाचे गुण दोनी सहस्र जिव्हाग्रीं । वर्णितां ही एक निमिषभरी । केले ते थोरी न वर्णवे ॥६९॥ ऐसें हें भारत सर्वेहि वेदार्थु । प्रकट करिता जाला पराशरसुतु । जेथ सर्व चातुर्याचा उपक्षीणार्थु । जाला अंतु सर्वो कळां ॥ ७० ॥ सर्वपुराणमहानदीचें प्रवेशस्थान । तें हें भारताब्धि पूर्ण । काव्य-नाटकादि सर्व उपक्षीण । होय संपूर्ण जयामाजी ॥ ७१ ॥ जैसें तरणितेजसंपत्ती करून । सर्वहि चराचर शोभायमान । तैसें भारतोक्त काव्यनाटकपुराण । अतिप्रमाण सुशोभित ॥ ७२ ॥ जैसें सुक्षेत्रीं सद्वीज पडलें । तें आपुलिया सुरवाडें विस्तारिलें । तैसें भारतीं सर्व सुरवाडलें । जाय पाल्हाळें अर्थजात ॥७३॥ ना तरि उद्यानीं वसंतु प्रकटे । तेथें वनशोभेची खाणी नेटेंपाटें । वनाचे आंगीं सौंदर्यं उतटे । सर्वांही भेटे फळ तेथींचें ॥ ७४ ॥ नाना घनीभूत जैसें सुवर्ण । पहातया दिसतसे साधारण । तेंचि अलंकार शोभायमान । पावे बरवेपण अतिशयेंसीं ॥ ७५ ॥ निगम सुवर्णखोटी साधारण । तेंचि व्यासोक्ति पावलें अलंकरण । सर्व अर्थकौशल्य जाले उपक्षीण । शोभायमान भारत जालें ॥ ७६ ॥ या लागीं महाभारतींचें जें नाहीं । तें नाहीं त्रैलोक्यांत पाहीं । भारतीं आहे तेंचि तिहीं लोकांतही । असे सर्वही ग्रंथमात्रीं ॥ ७७ ॥ ऐसी हे भारतसुरसकथा । वैशंपायन सांगे परीक्षितिसुता । जनमेजय महा नृपनाथा । पातकें भस्मांता जावयासी ॥ ७८ ॥ अहो सकळ वेदशास्त्रांचे जे कीं अर्थ । ते महाभारतामाजी जाले विस्तृत । तया अर्थाचा जो किं मथितार्थ । तो स्वयें अच्युत बोले गीता ॥ ७९ ॥ अहो सर्वांही प्रमा-णाचें प्रमाण । जेणें विधिनिषेध प्रकाशती पूर्ण । वर्णाश्रमाचार आणि संकेत जाण । केले संपूर्ण जेणें वेदें ॥ ८० ॥ तो वेदु जयाचें निःश्वसन । तोचि गीताशास्त्र स्वमुखें करून । अतिस्नेहें सांगे प्रिय शिष्या लागून । त्याचें थोरपण काय वर्णू ॥ ८१ ॥ तेंचि सर्वशास्त्रासि प्रमाणभूत । वेदांतशास्त्राचें सूत्र निश्चित । गीतातडागाचे प्रवाह अद्भुत । तेंचि समस्त शास्त्रें जाण ॥ ८२ ॥ गीता महोदधीचिया लहरी । तेचि सर्व शास्त्रांची भरोवरी । तो महोदधि तरें मी नौके करीं । हें तरि सर्वोपरि अघटमान ॥ ८३ ॥ सर्वजन तारावया श्रीपति । स्वयें आपणचि धरी व्यासमूर्ति । करी श्रीगीतार्थाची अभिव्यक्ति । विश्वस्थिति रक्षावया ॥ ८४ ॥ तेणें ही नव्हे बोध जनासी । विपरीतार्थुचि भासे त्यांसी । ऐसें देखोनि

तो कैलासवासी । स्वयें पृथ्वीसी अवतरला ॥ ८५ ॥ तो स्वयें शंकराचार्यरूपेंकरून । अवतरला श्रीशंकर आपण । सर्व जगासि सुखकर्ता ह्मणोन । शंकराभिधान पावला ॥ ८६ ॥ तेहीं सर्व श्रुतींचा संदोह करून । गीतार्थु प्रकटिला अविरोधेंकरून । तेणें निवताति शास्त्रज्ञजन । परी इतरांलागून बोधेना कीं ॥ ८७ ॥ तेंहि सांकडें देखोनियां श्रीहरी । कलियुगीं मागुता अवतार करी । मोहमधुदैत्य बळेंचि संहारी । राहे शिवपुरीमाजि आपण ॥ ८८ ॥ मधुसूदन येणें नामें विराजतु । चतुर्थाश्रम स्वयें अंगीकारितु । भाष्यानुसार गीतार्थु प्रकटितु । नाहीं व्यभिचार सर्वथा ॥ ८९ ॥ तेंचि मी सद्गुरूचेनि प्रेरणे । गीताशास्त्र हें वाखाणूं ह्मणें । हें अपाड आहे सहस्रगुणें । तरी संतकृपेनें प्रवर्तलों ॥९०॥ अहो गुरूचा पूर्ण अनुग्रहो असतां । आणि संत तुह्मी आपुला ह्मणतां । प्रयास काय या वाखाणितां । मुख चाळितां काष्ठयंत्रासी ॥ ९१ ॥ खांबसूत्राचिये प्रतिमेसी । ओष्ठ हालवितां प्रयास काय त्यासी । सकळ कळाप्रयास सूत्रधारासी । तैसे प्रयास तुह्मांस हे ॥ ९२ ॥ सद्गुरुरायें प्रेरिलें असतां । तुम्ही सूत्रधार मज बोलवितां । आइती जिव्हा मज पडताळितां । प्रयास तत्वतां असतीच ना ॥ ९३ ॥ जयासि शास्त्रीं प्रवेशु नसे । तयांकारणें मी करूनि प्रयासें । गीतार्थु हा महाराष्ट्रभाषे । वेद सर्वांशें यथाभूत ॥ ९४ ॥ जें कीं शांकरभाष्य अनुवादलें । तैसेंचि मधुसूदनेंही वाखाणिलें । तयांचा मार्ग मी हळुहळू चाले । अन्यत्र पाउलें न घालूनियां ॥ ९५ ॥ अहो भाष्यकारांचा अर्थ अतिगूढ । तोचि मी देशभाषा करीन रूढ । तोचि शास्त्रज्ञ जे कीं अतिप्रौढ । परिसतु दृढभावेंकरूनी ॥ ९६ ॥ पिता त्वरान्वित मार्गु चालतु । तो तात्काळ विश्रांतिस्थळ पावतु । तत्पाउलें बाळ चाले लक्षितु । परी तो जातु तयाचि ठायां ॥ ९७ ॥ कां माता त्वरेनें गृहामध्यें जात । तियेचि मार्गें बाळक रिंगत रिंगत । परी तें तियेच्याचि ठायापासीं पावत । परी न जात अन्य ठायां ॥ ९८ ॥ तैसा नामेंचिकरूनि मी रंगनाथु । आचार्यमातेचा मागोवा घेतु । तियेच्याचि ठायासि रिंगतरिंगतु । पावें निश्चित शनैःशनैः ॥ ९९ ॥ अहो स्वयें अंधु जरी झाला । तरी डोळसाचा मार्गु आश्रयिला । तयाचाचि हस्त धरूनि चालिला । तरी स्थळाला पावतु ॥ १०० ॥ तरी अंधाचें ऐसें लक्षण । जो कीं श्रुतिस्मृतिज्ञानविहीन । तैसा मी श्रुतिस्मृति कांहीं नेणोन । आश्रयें सज्ञान डोळसासि ॥ १ ॥ ॥ संमति ॥ श्रुतिस्मृतीउभे नेत्रे विप्राणां परिकीर्तिते । एकेन विकलः काणो द्वाभ्यामधःप्रकीर्तितः ॥ अहो श्रुतिस्मृति दोन्ही जाण । विप्रांचे दोन्ही दिव्य नयन । एक विकल तो काणा पूर्ण । उभयहीन तो अंध बोलिजे ॥ २ ॥ ऐसिये परीचा मी अंध असोन । नेणें वेदशास्त्रस्मृतिपुराण । परी शंकरमधुसूदनांचा कर धरून । पावें मुख्य स्थान गीतातत्त्व ॥ ३ ॥ पक्षी अकस्मात उड्डाण करूनी । वृक्षाग्रीं झेंपावे फळालागूनी । परी पिपीलिका हळुहळू जाऊनी । फळ पावोनी सुखी होत ॥ ४ ॥ ना तरी स्वयें पाक करूनियां मातेसी । तृप्ति होतसे सर्वस्वेंसीं । तेंचि सिद्ध अन्न जेवितां बाळकासी । तेंहि तृप्तीसी पावत ॥ ५ ॥ तैसें श्रीशंकर आणि मधुसूदन । आणिक ही जे आचार्य सज्ञान । तेहीं नाना अनेक क्लेश करून । गीताव्याख्यान केलें असे ॥ ६ ॥ एक एका अक्षराचें व्याख्यान । केलें असे श्रुतिस्मृति मथून । तेंचि तयांचें सिद्ध अर्थान्न । परवडून वाढीं श्रोतयां ॥ ७ ॥ अहो सद्गुरूचें मी असे बाळ । ह्मणोनि तयांचें गुज पावलों निर्मळ । जैसें पितयाचें गुप्तधनही सकळ । पावे आखिल पुत्र जैसा ॥ ८ ॥ तैसा मी सद्गुरूचें अपत्य जाण । ह्मणोनि तयाचें जें गुप्तज्ञानधन । तें प्राप्त झालें मी तत्कृपेंकरून । वेव्हारा पूर्ण स्वयेंचि झालें ॥९॥ तेचि तें कृपा करूनिया संतश्रोतीं । जे कीं अर्जुनाचे बैसले पंक्ती । जयांसि साधनचतुष्टयसंपत्ती । ते एकाग्रमती परिसतु ॥ ११० ॥ इतरांहीं करूनियां नमन । पुनःपुन्हा करितुसे विज्ञापन । निरंतर

करावे गीताश्रवण । ब्रह्म परिपूर्ण लाभे जेणें ॥ ११ ॥ यया गीताश्रवणाचा ऐसा महिमा । अज्ञानुही पावे वस्तु गरिमा । ययासि कोणतीही नाहीं उपमा । पुरुषोत्तमा पावतु ॥ १२ ॥ यालागीं इतुकीचि माझी विनंती । तुह्मांप्रती करीं पुढतीं पुढतीं । अवकाश करूनियां क्षणाप्रती । परिसा सर्वार्थी गीतार्थु हा ॥ १३ ॥ अति हळुवारपण आणूनि चित्ता । प्रमेय घेइजे संतश्रोता । जैसें भ्रमरें पुष्पपराग नेतां । नेणती सर्वथा सुमनें जैसीं ॥ १४ ॥ नाना चंद्रामृताचे कण कोमळ । चकोर वेंचिताती अतिप्रांजळ । तैसें शब्दांतरींचें प्रमेयफळ । घ्यावें निर्मळ एकाग्रमनें ॥ १५ ॥ तेंचि सद्गुरुचरण स्मरोन । तुह्मां संतांसि घालूनि लोटांगण । आचार्यांचे चरण ध्याऊन । करीं व्याख्यान तें परियेसा ॥ १६ ॥ आतां ग्रंथ आरंभावयालागीं । कोण पां अधिकारी इये जगीं । आणि ग्रंथाचा विषय कोण हें प्रसंगीं । सांगीं भागी करूनियां ॥ १७ ॥ तैसेंचि संबंध आणि प्रयोजन । एवं चतुर्विध सामग्री पाहिजे पूर्ण । अधिकारी विषय संबंध प्रयोजन । तेही विवंचूनि सांगों आतां ॥१८॥ तरी प्रथम अधिकारियाचें लक्षण । तें तरि एवंविध असे जाण । अधिकारी शुद्धप्रमाता संपूर्ण । शुद्धपण तेंही ऐसें ॥१९॥ ॥ वाक्य ॥ विधिवदधीतवेदवेदांगत्वेनापाततोऽधिगताखिलवेदार्थोऽस्मिन्जन्मनिजन्मांतरे वा काम्यनिषिद्धवर्जनपुरःसरं नित्यनैमित्तिकप्रायश्चित्तोपासनानुष्ठानेन निर्गतनिखिलकल्मषतया नितांतनिर्मलस्वांतःसाधनचतुष्टयसंपन्नः प्रमातेतिवेदांतसारसूत्रम् ॥६॥ तरि ब्रह्मचर्येंकरूनि जाण । ब्रह्मचर्यव्रतें गुरुगृहीं वसोन । विहितविधीकरूनि अधीत वेदवेदांगें पूर्ण । तेणेंकरूनि ज्ञाता जो कीं ॥ १२० ॥ आपातता सकळही वेदार्थ । जाला असे जाण जयासि प्राप्त । इये जन्मीं का जन्मांतरीं निश्चित । निषिद्धार्थ टाकिला जेणें ॥ २१ ॥ काम्यनिषिद्धांचें परिवर्जन । करूनि केलें सर्व कर्माचरण । नित्यनैमित्तिक प्रायश्चित्ताचें अनुष्ठान । केलें पूर्ण जेणें पुरुषें ॥ २२ ॥ तें इये जन्मीं अथवा जन्मांतरीं । केली कर्मत्रयाची भरोवरी । तेणें सकळ पापाची जाली बोहरी । शुद्ध सर्वोपरि अंतर्बाह्य जो ॥ २३ ॥ ऐसें ज्याचें शुद्ध अंतःकरण । आणि साधनचतुष्टयें संपन्न । तोचि प्रमाता अधिकारी येथ जाण । सांगों खूण सर्वांची पैं ॥ २४ ॥ तरी काम्यनिषिद्ध कर्म तें कोण । ज्याचें पहिलेंचि करावें परिवर्जन । आणि नित्यनैमित्तिकाचें अनुष्ठान । तेंही खूण स्पष्ट सांगों ॥ २५ ॥ नित्यनैमित्तिक प्रायश्चित्त । ययां कर्मांचाही सांगों वृत्तांत । आणि साधनचतुष्टय कोण येथ । सांगों वृत्तांत सर्वांचेही ॥ २६ ॥ तरी स्वर्गप्राप्तीचें जें कीं साधन । ज्योतिष्टोमादियज्ञदान । इहलोकभोगार्थ जें कीं करणें । काम्य जाणणें तें तें कर्म ॥ २७ ॥ आणि निषिद्धें कर्में नरकप्राप्ति । ऐशीं जीं आत्महत्यादिकें असती । तीं तीं पूर्वींच वर्जावीं पैं सर्वार्थी । टाकावीं अंतीं सकामेंही ॥ २८ ॥ आतां करावीं कर्में तींही ऐशीं । न करितां प्रत्यवाय होय सर्वांशीं । तरी स्नानसंध्याअग्निहोत्रासी । पंचमहायज्ञासी करावे ॥ २९ ॥ अतिथिपूजनादिक कर्म जाण । तें नित्यकर्म ओळखावें संपूर्ण । आतां नैमित्तिकाचें सांगों लक्षण । परिसा खूण ज्ञाते हो ॥ १३० ॥ तरी पुत्रजन्मादि जात्येष्ट्यादिक । राहूपरागादि हें नैमित्तिक । आणि प्रायश्चित्त चांद्रायणादिक । उपासनाही हे ऐक ते ऐशी ॥ ३१ ॥ सगुणब्रह्मविषयक मानसव्यापार । ध्यान जप करणें जें निरंतर । इत्यादिकीं बुद्धि शुद्धतर । होय थोर अतिशयेंसी ॥ ३२ ॥ आतां साधनचतुष्टय तें कोण । तेंही सांगों विवंचून । तरी नित्यानित्यवस्तुविवेक जाण । तयाचें लक्षण ऐसें असे ॥ ३३ ॥ तरी नित्यवस्तु तें एक चैतन्य । त्यावेगळें तें वस्तु अनित्य जाण । इहामुत्रार्थफळभोगविराग पूर्ण । तयांची खूण ऐशी असे ॥ ३४ ॥ तरी इहलोकींचे स्रक्चंदनवनिता । हे आदिकरूनि भोगीं चित्ता । विरक्ति उपजे अनित्य देखतां । परलोकता तेही ऐशी ॥ ३५ ॥ रंभादि नायिकांचें परिलालन । आणि विषय अमृतभोगपान । इत्यादि दोहीं भोगांचें

वैरस्य पूर्ण । तोचि जाण फळभोगविराग ॥ ३६ ॥ तिसरें शमदमादि षट्कसाधन । तयाचेंही सांग करूं विवरण । तेंही परियसा वाक्यनिर्वाण । हेंही साधन तेणें कळे ॥ ३७ ॥ शमदमोपरतितितिक्षासमाधानश्रद्धेति वे. सा. सू. ॥ १८ ॥ मन एकश्रवणींच लागलें असे । तयाविगळें विषयांसि न स्पर्शे । सर्वत्र आवरूनि श्रवणींच बैसे । जाण ऐसें शमलक्षण ॥ ३८ ॥ आणि बाह्येंद्रियें सर्व नियमिजे । तयाचें नाम दम ऐसें बोलिजे । एवं श्रवणाच्याचि ठायीं लाविजे । उपरति सहजें याचें नाम ॥३९ ॥ अथवा विधीकरूनी कर्म त्यागिजे । तया संन्यासातें उपरति बोलिजे । शीतोष्णादि द्वंद्वें साहिजे । तितिक्षा जाण याचें नाम ॥ १४० ॥ श्रवण करितां जें कीं सुख उपजे । तयाचें नाम समाधान जाणिजे । गुरुवेदांच्या ठायीं विश्वासु कीजे । श्रद्धा बोलिजे तिये नाम ॥ ४१ ॥ ऐसें हें शमदमादिषट्क जाण । साधनचतुष्टयाचें तिसरें साधन । मोक्षाची इच्छा ते मुमुक्षा पूर्ण । यांहीं संपन्न तो प्रमाता ॥ ४२ ॥ आतां ग्रंथाचा विषय तो ऐसा असे । तरि जीवब्रह्मांसीं ऐक्य सर्वांशें । तें करणें हा विषय जाणा ऐसें । याहूनि नसे आन विषय ॥ ४३ ॥ जीवब्रह्मांसी ऐक्य असेचि जाण । तें जनासि न कळे अज्ञानेंकरून । तें प्रतिपादावया शास्त्र आपण । प्रवर्ते पूर्ण हाणोनि विषय ॥ ४४ ॥ आतां संबंधाचें ऐसें लक्षण । जीवब्रह्मैक्य तें प्रमेय जाण । शास्त्र प्रतिपादी तयालागून । संबंध पूर्ण दोहींस ऐसा ॥ ४५ ॥ बोध्य जें कीं प्रमेय शुद्ध चैतन्य । तयाचें बोधक हें शास्त्रप्रमाण । दोहींस बोध्यबोधकभावें संबंध पूर्ण । असे जाण येणें न्यायें ॥४६ ॥ आतां शास्त्रश्रवणें कोण प्रयोजन । शास्त्रें साधिजेत असे संपूर्ण । तरि जीवब्रह्मविषयक असे अज्ञान । तयाचें निरसन करिजेत असें ॥ ४७ ॥ अज्ञाननिवृत्ति आणि ब्रह्मानंदप्राप्ति । होय तेंचि प्रयोजन जाणा सर्वार्थी । अधिकारी विषयसंबंधप्रयोजनांतीं । ग्रंथप्रवृत्ति ययालागीं ॥ ४८ ॥ हें चतुर्विध ग्रंथारंभासि कारण । तें तरी सांगितलें विवेळ करून । ऐसेंचि श्रुतिही बोलती आपण । तेंचि सावधान परियेसा ॥ ४९ ॥ ॥ तरति शोकमात्मवित् ॥ ब्रह्मविद्ब्रह्मैवभवतीतिच्छांदोग्यः ॥ ७।१।३ ॥ अयमधिकारी जननमरणादिसंसारानलसंतप्तोदीप्तशिखाजलराशिमिवोपहारपाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं गुरुमुपसृत्य तमनुसरतीति वे० सा० सू० ॥३०॥ आत्मवेत्ता तोचि शोक तरत । ब्रह्म जाणे तोचि ब्रह्म असे होत । ऐसा या श्रुतीचा असे अर्थ । सांगों निश्चित अधिकारी ॥ १५० ॥ तरी जन्ममरणादिक जो संसाराग्नि । तेणें तापला जो कीं अतिशयेंकरूनी । मस्तकीं लागला जयाचे वन्ही । जाय धांवोनि डोहीं उडी घाली ॥ ५१ ॥ तेथ अग्नि विजालिया शीतळ होतु । तैसा संसारें तापला तो कोण्हा न पुसतु । हातीं भेटी घेऊनि शरण जातु । गुरूसि पावतु ब्रह्मनिष्ठातें ॥ ५२ ॥ आतां यया ग्रंथाचा सर्व मथितार्थ । तो वेदांतमर्यादेनें सांगों समस्त । तेंचि निरूपण यया ग्रंथा आंत । जाण निश्चित सांगेन ॥ ५३ ॥ ॥ स्वतश्चित्सदानंदाद्वितीयब्रह्मात्मस्वरूपोह्यात्मास्वाश्रयया स्वविषययाऽविद्ययास्वानुभवगम्यया साभासया स्वाभाविकचित्सदानंदाद्वितीयब्रह्मात्मभावात्प्रच्युतोऽनात्मनि देहादावात्मभावमापन्नो प्राप्ताशेषपुरुषार्थः प्राप्ताशेषानर्थोऽविद्याकर्मपरिकल्पितैरेवसाधनैरिष्टप्राप्तिमनिष्टपरिहृतिं चाकांक्षँल्लैकिकवैदिकसाधनैरिष्टतरैरपि परमपुरुषार्थमोक्षाख्यमलभमानो मकरादिभिरिवरागद्वेषादिभिरितस्ततआकृष्यमाणः सुरनरतिर्यगादिप्रभेदभिन्ननानायोनिषु परिवर्तमानो मोमुह्यमानःसंसरन्कथंचित्पुण्यवशाद्वेदोदितेनेश्वरार्थकर्मानुष्ठानेनापगतरागादिमलोनित्यादिदोषदर्शनेनोत्पन्नेहामुत्रफलभोगविरागो वेदांतप्रतीयमानब्रह्मात्वभावं बुभुत्सुर्वेदोदितशमदमादिसाधनसंपन्नो ब्रह्मविदाचार्यमुपेत्याचार्यानुसरणेन वेदांतश्रवणादि-

१ विरक्ति. २ स्पष्ट.

नाऽहंब्रह्मास्मीतिब्रह्मात्मतत्त्वमवगम्यनिवृत्ताज्ञानतत्कार्योब्रह्मरूपोवतिष्ठत इति वेदांतमर्यादा ॥ ॥ तरी हा पुरुष स्वतःसिद्ध आत्मस्वरूपचि असे। चित्सदानंद अद्वितीय ब्रह्मचि सर्वांशें। तयाच्या आश्रयें त्यातेंचि आवरूनि अविद्या असे। त्याचीसीच भासे अनुभवेंकरूनि ॥ ५४ ॥ मी नेणें ऐसें स्वयें ह्मणतां। त्या अज्ञानातें जाणे तो सर्वथा। ह्मणोनि साभासस्वानुभवगम्यता। पावली तत्वता स्वतःसिद्ध ॥ ५५ ॥ मग तियेच्या आवरणेंकरून। आपुलें ब्रह्मत्व गेला विसरोन। अनात्मा जो देहादिक दृश्य जाण। तेंचि आपण ऐसें ह्मणे ॥ ५६ ॥ स्वतःसिद्ध आत्मस्वरूपातें विसरे। देहेंद्रियांस आत्मा ह्मणे निर्धारें। तेणें अशेषपुरुषार्थ न पवोनि खरे। अनर्थभारें दडपतु असे ॥ ५७ ॥ मग तेथूनि सुटावयाकारणें। अविद्येनें कल्पिलीं करी साधनें। इष्टाची प्राप्ति आणि दुःख न होणें। धरूनि मनें कर्म करी ॥ ५८ ॥ त्यालागीं सकामें लौकिकें वैदिक। कर्मे करीत असे निरंतर अनेक। परम पुरुषार्थ मोक्ष जो देख। न पवे सम्यक कोटिप्रयत्नें ॥ ५९ ॥ मग रागद्वेषीं करूनी इतस्तता। मकराचेपरि सर्वत्र वोढिजता। सुरनरतिर्यगादि नाना तत्वता। होय पावता कोटिकल्प ॥ १६० ॥ ऐसिया अनेक योनी पावोनि। अधिकची मोह पावे भरंवसेनी। मग कदाचित् पुण्यबाहुल्येंकरूनी। बैसे अनुष्ठानीं निष्कामकर्माच्या ॥ ६१ ॥ शुद्धवेदोदितें सत्कर्मे करितु। तींहीं अनन्यभावें ईश्वरीं अर्पितु। तेणें रागादि मळ जाऊनि शुद्ध होतु। आणि करितु तें परियेसा ॥ ६२ ॥ तेणें इहामुत्रार्थफळभोगाविरक्ति। वैराग्य उपजे तया सर्वार्थी। अनित्यादि दोष देखोनियां चित्तीं। मग उपजे प्रीति ब्रह्म जाणावया ॥ ६३ ॥ वेदोदितशमदमादिसाधनेंकरून। मग ब्रह्मनिष्ठ गुरूसि जाय शरण। तेथें अनन्यभावें करी गुरुसेवन। तेणें होऊनि प्रसन्न गुरु उपदेशी ॥ ६४ ॥ मग वेदांताचें श्रवण मनन निदिध्यासन। तेणें ब्रह्माहमस्मि ऐसें होय ज्ञान। तेणें ब्रह्मात्मतत्त्व प्राप्त पूर्ण। होय जाण अपरोक्षत्वें ॥ ६५ ॥ अपरोक्षसाक्षात्कार होतांचि क्षणीं। अज्ञान तत्काळ जाय भस्म होऊनी। मग ब्रह्मरूपाचि राहे निर्वाणीं। इतुकी भरंवसेनि वेदांतमर्यादा ॥ ६६ ॥ इतुकेंचि निरूपण गीताशास्त्रीं असे। तेंचि आतां सांगिजेल सावकाशें। गीता हे सर्व वेदरूपचि असे। कांडत्रयविशेषें विराजित ॥ ६७ ॥ कर्मकांड आणि उपासनाकांड। तयावरी तिसरें हें ज्ञानकांड। ऐसे अष्टादश अध्याय प्रचंड। गीता अखंड वेदुचि हा ॥ ६८ ॥ त्यामाजी प्रथम अध्यायषट्केंकरून। कर्मकांड प्रतिपादी अति निर्वाण। दुसरेनि अध्यायषट्कें परिपूर्ण। उपासना जाण निरूपिली ॥ ६९ ॥ तृतीय अध्यायषट्कें अतिनिर्वाण। ज्ञानकांड बोलिलें अतिगहन। परी ज्ञानकर्मसमुच्चयो नाहींच जाण। करितां निरूपण ग्रंथविस्तारू ॥ १७० ॥ कर्म आणि ज्ञानकांडामाझारी। भगवद्भक्ती निष्ठा बोले महाभारी। भक्ति हे दोहींसही उपकार करी। विघ्नें निवारी दोहींचींहि ॥ ७१ ॥ तयांमाजी प्रथम कांडीं इतुकें निरूपण। कर्म आणि तत्त्यागमार्गेंकरून। त्वंपदार्थ शुद्ध निवडिजे जाण। उपपत्ती करून अनेक प्रकारें ॥ ७२ ॥ द्वितीय कांडीं भगवद्भक्तिनिष्ठावर्णन। तेणें मार्गें तत्पदार्थ जो ईश्वर जाण। शोधिला नाना उपपत्तिकरून। अतिनिर्वाण जाणिजे ऐसा ॥ ७३ ॥ आणि तृतीय कांडेकरूनिया जाण। तत्त्वंपदार्थांसि ऐक्य निर्वाण। करिजेल वाक्याचें वर्णन। प्रकट पूर्ण माने तैसें ॥७४॥ येणें रीती परस्परें कांडत्रयासी। संबंध असे अर्थान्वयेंसीं। कांडत्रयें महावाक्यचि हें हृषीकेशी। निजशिष्यासि उपदेशित असे ॥ ७५ ॥ तया कांडत्रयामाजी जे विशेष असती। ते ते तेथ तेथ बोलिजती। मुक्तिसाधन भीष्मपर्व हें सर्वार्थी। बोलों युक्ति शास्त्राचिया ॥ ७६ ॥ तरी सकळ वेदांतमर्यादा संपूर्ण। पूर्वीच सांगितली असे निर्वाण। तत्वज्ञानोदय असतां संपूर्ण। नासे आवरण अविद्या हे ॥ ७७ ॥ आवरण

अविद्या नासली असतां । भ्रम आणि संशय नासती सर्वथा । संचित कर्मही नासे वस्तवता । क्रियमाणीं चित्ता संबंध न घडे ॥ ७८ ॥ ज्ञानाच्या प्रभावेंकरूनी । क्रियमाण कर्मा न लिंपे ज्ञानी । प्रारब्धकर्म देह असेतों निर्वाणीं । तेणेंकरूनि वासना नाशे ॥ ७९ ॥ तेही वासना अभ्यासेंकरून । बळवंत संयमें नाशी संपूर्ण । तयासि यमादिपंचक हें साधून । संयमन करावें कीं ॥ १८० ॥ संयम धारणा आणि ध्यान । हें तिन्ही समाधीचें मुख्य साधन । तेंही साधावया पाहिजे ईश्वरप्रणिधान । मनोनाशन तेणें होय ॥ ८१ ॥ तत्वज्ञान मनोनाश वासनाशांति । एकसमयीं तीन्हीं जरी हीं होतीं । तरी तयासी साधे जीवन्मुक्ति । विप्रतिपत्ती येथ नाहीं ॥ ८२ ॥ अहो जिवन्मुक्ति साधलियावरी । तोचि वरिष्ठ ब्रह्मविदांमाझारी । गुणातीत स्थितप्रज्ञ तो सर्वांउपरी । भक्त सर्वोपरी विष्णूचा तो ॥ ८३ ॥ तो अतिवर्णाश्रमी जीवन्मुक्त । आत्मरति वर्ते तयासि संतत । सर्वथा झाला कृतकृत्य । शास्त्रा निवर्तत त्यापासूनी ॥ ८४ ॥ तयासी शास्त्रश्रवणें नाहीं प्रयोजन । सर्वही अर्थ त्यासी प्रकाशती जाण । ऐसें श्रुतीच बोलत असे संपूर्ण । तेंचि वचन परियेसा ॥ ८५ ॥ ॥ श्रुतिः ॥ यस्य देवे पराभक्तिर्यथा-देवे तथा गुरौ । यस्यैते कथिताह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥ श्वे० उ० ॥ ६।२३ ॥ ॥ इत्यादि श्रुतिप्रमाणेंहींकरून । कायावाचामानसें अतिनिर्वाण । भगवद्भक्ति पाहिजे हो संपूर्ण । सर्वही विघ्न छेदावया ॥ ८६ ॥ अन्यथा विघ्नबाहुल्येंकरूनि जाण । कर्मफळ ज्ञानफळ दुर्लभ त्यालागून । तेचि भगवद्भक्ति असतां निर्वाण । जीवन्मुक्ति पूर्ण बाणत असे ॥ ८७ ॥ ते भक्ति आतां कां पूर्वी केली असे । तरी तेणेंचि संस्कारें होत असे । तेंचि बोलिलें रमाविलासें । तेंचि ऐसें परियेसा ॥ ८८ ॥ पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ॥ अनेकजन्मसंसिद्ध इत्यादि वचो हरेः ॥ गीता० ॥६।४४।४५॥ यालागीं पूर्वीच्या अभ्यासेंकरून । भगवद्भक्ति अकस्मात होय जाण । तियेसी नेणती हे अज्ञान जन । फळसिद्धि पूर्ण कोणें होय ॥ ८९ ॥ मग जीवन्मुक्तिदशेच्या ठायीं । पूर्वीच्या अभ्यासें करूनियां पाहीं । भक्ति करितसे तो अनपायी । परि फळ नाहीं तयासी पैं ॥ १९० ॥ भक्तीचें फळ पावलाचि असे । यालागीं आणिक फळ तयासि नसे । अद्वेष्टृत्वादिलक्षणाचे परी सर्वांशें । स्वभावेंचि असे भजनाचा ॥ ९१ ॥ ऐशीचि संमतिहि असे जाण । तेहि सांगों तुह्मांप्रती सज्ञान । ज्ञान जालियाही श्रीनारायण । स्वभावें जाणा भजताती ॥ ९२ ॥ संमति ॥ आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रंथा अप्युरुक्रमे। कुर्वंत्यहैतुकीं भक्तिमित्थं भूतगुणो हरिः ॥ ॥ तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ॥ भ० गी० ७।१७ ॥ ॥ यायालागीं ऐशी भक्ति जयासी असे । तोचि मुख्य प्रेमभक्त सर्वांशें । हेंचि सर्व गीताशास्त्रीं विश्वेशें । बोलिलें असे अत्यादरें ॥ ९३ ॥ यालागीं हें वाखाणावयाकारणें । थोर उत्साह धरिला अंतःकरणें । तेंचि सांगें मी संतांकारणें । आपणा जेणें लाभु होये ॥ ९४ ॥ मातेपुढां बाळक लाडेंकरून । वक्र बोबडे बोल बोले जाण । तेणें अधिक प्रेमा तियेसि उपजोन । लाडऊन अपूर्व देत ॥ ९५ ॥ तैसा मी स्वयोग्यता न विचारूनी । संतांपुढें बोलें बोबडां वचनीं । तेणें संतोषोनी ते ते मजलागूनी । ज्ञान देऊनि लाडविती ॥ ९६ ॥ तरी तेचि मी आतां निरूपीन । संतांप्रती बोबडे बोल बोलेन । जेणेंकरूनि निवती सज्जन । वर्षतां घन मयूर जैसे ॥ ९७ ॥ तरी मोक्षाचें मुख्य मूळभूत कारण । तें बोलिलें निष्कामकर्मानुष्ठान । तयासी प्रतिबंधक पापरूप हे गुण । सूर्योदया लागोन मंद हे राक्षस जैसे ॥ ९८ ॥ तेंवीं शोकमोहादिकीं गुणींकरून । स्वधर्म टाकूनी निषिद्धा-चरण । अहंकारें करी सकाम कर्मानुष्ठान । न पवे जाण पुरुषार्थसिद्धी ॥ ९९ ॥ मग रागद्वेषादिकीं करूनी । प्राणिमात्रीं द्वेष उपजे अनुदिनीं । दुःखचि पावतसे तेणेंकरूनी । आरंबळे मनीं कुररी

जैसी ॥ २०० ॥ ऐसी दुःखसंतति न व्हावी ह्मणोन । प्रयत्न करितां शोकमोह न जाती जाण । आतां कोणे उपाय करूं हे नाशावयालागून । करी चिंतन अहोरात्र जो ॥ १ ॥ ऐशा आकांक्षा जो कीं धरितां । आणि पुरुषार्थोन्मुख जो कीं सर्वथा । मोक्षाची इच्छा वर्ते जयाच्या चित्ता । रोगी चिंतिता आरोग्य जैसें ॥ २ ॥ ऐशिया अधिकारियां पुरुषांप्रति । गीताशास्त्र उपदेशी स्वयें श्रीपति । ' अशोच्यानन्वशोचस्त्वं ' या युक्ति । करी निवृत्ति शोकमोहाची ॥ ३ ॥ मग स्वधर्मानुष्ठानेंकरून । परमपुरुषार्थ जो ब्रह्मत्व जाण । तयाचें उपायभूत हें शास्त्र निर्वाण । भगवंत आपण उपदेशिती ॥ ४ ॥ सर्व जगाचिया काकुळती । कळवळोनियां तो चैतन्यमूर्ति । धरूनि श्यामसुंदर कृष्णाकृती । जनां तारिती उपदेशेंकरून ॥ ५ ॥ अर्जुनवत्साचें करूनियां मिष । कृष्ण कामधेनु वोळली जगास । बोधामृत पाजी अधिकारियांस । चंद्र चकोरास अमृत जैसें ॥ ६ ॥ कृष्णार्जुनसंवादरूप जाण । विद्यास्तुत्यर्थ आख्यायिका हे पूर्ण । जैशी जनकयाज्ञवल्क्यसंवादेंकरून । कथा जाण उपनिषदीं ॥ ७ ॥ अहो प्रसिद्ध महानुभाव जन्ही अर्जुन । तरी अहंममताभिमान वाढला संपूर्ण । तें निवारावया उपदेश करी कृष्ण । कथानुसंधान तेंचि ऐसें ॥ ८ ॥ तेचि आख्यायिका प्रकट करून । श्रीकृष्णार्जुनसंवाद अति गहन । प्रकट कीजेल ब्रह्मज्ञान । जैसें निधान अंजनेकरूनी ॥ ९ ॥ तन्ही परम ज्ञाता जरी अर्जुन । तरी देहीं अहंकारू धरी अतिदारुण । राज्यगुरुपुत्रमित्रादिकांचा पूर्ण । ममकार जाण थोरावला ॥२१०॥ ॥ राज्यगुरुपुत्रमित्रादिक । ते माझे ऐसें ह्मणे आवश्यक । आणि यया सर्वांचा मी नायक । ऐसा देख मोह जाला ॥ ११ ॥ तया क्लेशनिमित्त शोकमोहो दोन्ही । वाढोनी अभिभविलें विवेक ज्ञानालागूनी । स्वतांचि क्षात्रधर्मयुद्धीं प्रवर्तोनी । स्वयेंचि तेथूनि निवर्तला ॥ १२ ॥ आणि क्षत्रियासी जें निषिद्ध अति । ते परधर्मी भिक्षार्थे वाढे मति । ऐसा थोरा अनर्थामाजी निमग्न अति । कांहींचि चित्तीं न स्मरतु ॥ १३ ॥ तें देखोनियां कृपेनें श्रीकृष्ण । उपदेश करिता जाला अतिनिर्वाण । तेणें ब्रह्मविद्या पावोनि अर्जुन । शोकमोह पूर्ण भस्म करी ॥ १४ ॥ जैसा ब्राह्मणासि जालिया भूतसंचारू । तो आपणा ह्मणवी वीर महारू । पंचाक्षरी तयासी करूनि उतारू । ब्राह्मणाचार करवी जेवीं ॥ १५ ॥ तैसे ते पंचाक्षरी द्वारकापति । अर्जुनासि सावध करिती । तो ही उमजोनियां पुनरावृत्ति । भजे सर्वार्थी स्वधर्मासी ॥ १६ ॥ मागुता स्वधर्मी प्रवर्तोनी । कृतकृत्य जाला स्वस्वरूप पावोनी । ऐशी हे प्रशस्त महाविद्या निर्वाणीं । ये स्तुतीलागूनि आख्यायिका हे ॥ १७ ॥ अर्जुनाच्या उपदेशेंकरून । अधिकारी सूचिला पैं सज्ञान । स्वधर्मी प्रवर्तोनी मागुतेन । शोकमोहांकडून निवर्तला ॥ १८ ॥ ' कथंभीष्ममहं संख्ये ' इत्यादिवचनें । शोकमोह दाखविले स्वयें अर्जुनें । तरी विवेक नसतां युद्धाकारणें । प्रवर्तला कोणें गुणेंकरूनि ॥ १९ ॥ जरी ' दृष्ट्वा तु पांडवानीकं ' एणेंकरून । परसैन्य उठावला देखोनि अर्जुन । युद्धीं प्रवर्तला साटोपेंकरून । हेचि खूण जाणावी पां ॥ २२० ॥ तेंचि आतां उपोद्घातेंकरून । सजयाप्रती धृतराष्ट्र करी प्रश्न । ' धर्मक्षेत्रे ' या श्लोकेंकरून । गजबजोन पुसता जाला ॥ २१ ॥ आतां उपोद्घात तो काय असे । तेंही सांगतों सावकाशें । श्रोतीं परिसिजे एकाग्रमानसें । जेणें नासे संदेह सर्व ॥ २२ ॥ ॥ प्रतिपाद्यमर्थं बुद्धौ संगृह्य तदर्थमर्थांतरवर्णनमुपोद्घातः ॥ ॥ तरी प्रतिपाद्य जो मुख्य अर्थ असे । तो बुद्धीमाजी धरूनियां विशेषें । त्याकारणें अर्थांतरानुवाद करिजेत असे । उपोद्घात ऐसें त्यातें ह्मणती ॥ २३ ॥ तरी मुख्य अर्जुनासी ज्ञानोपदेश । मोहनिवृत्त्यर्थ करी हृषीकेश । त्यानिमित्त कथांतराचा उपदेश । हाची सावकाश उपोद्घात ॥ २४ ॥ त्या माजी ' धृतराष्ट्रउवाच ' ऐसें । मूळ जें कीं ग्रंथीं बोलिलें असे । तें

जनमेजयाप्रती वैशंपायनें ऐसें । कथाविशेष बोलतु ॥२५॥ आतां पांडवांच्या जयाचें कारण । अतिशयें थोर वीर भीमार्जुन । तयाहीवरी सर्वस्वें साह्य श्रीकृष्ण । बहुविध जाण आयकोनियां ॥२६॥ जेणें धृतराष्ट्र अति भयभीतु । स्वपुत्र राज्यापासाव च्यवती या हेतु । स्वपुत्रांसि राज्यप्राप्ति इच्छितु । असे पुसतु संजयासी ॥ २७ ॥ हस्तिनापुरीं ठेवूनि धृतराष्ट्रासी । कुरुक्षेत्रां गेले सर्वही युद्धासी । तेथील वृत्त निवेदावया धृतराष्ट्रापासीं । संजयासी ठेविलें तेथें ॥ २८ ॥ मग पुत्रस्नेहें अति व्याकुळितु । धृतराष्ट्र संजयासि असे पुसतु । तोचि वृत्तांतु वैशंपायन असे सांगतु । स्वयें परिसतु जनमेजय ॥ २९ ॥

## दासोपंत—" गीतार्णव "

पुराणांमाजि अपूर्व । भारत भजती सर्व । तयामाजि आदिपर्व । तेंचि प्रथम ॥ २७ ॥ तया आदि-पर्वीचा अर्थीं । कौरवांपांडवांची उत्पत्ति । विद्या अभ्यासु अंतीं । राज्याचें पाळण ॥ २८ ॥ ऐसें असतां वर्तलें । सभे कौरव पांडव मीनले । द्यूतकर्म खेळिन्नले । ते सभापर्वी कथा ॥ २९ ॥ पांडवीं राज्य हारविलें । द्रुपदीतें कौरवीं जिंकिलें । तये क्षणीं रक्षिलें । तीतें वासुदेवें ॥ २३० ॥ अरण्यपर्वी वनवासु । पांडवीं अनुभविला त्रासु । तोचि कथाविशेषु । संपादिला असे ॥ ३१ ॥ नष्टचर्ये विराटपर्वी । रूपें पालटिलीं अवघीं । अंतीं रूपें पाडवीं । प्रकटे केलीं ॥ ३२ ॥ युद्धाची करूनि विचारणा । कौरव पांडव आले रणा । उद्योगपर्वी विवंचना । सपादिली हे ॥ ३३ ॥ आतां भीष्मपर्व सावें । कौरवपांडवा युद्ध होआवें । कुरुक्षेत्रीं आघवें । मीनलें असतां ॥ ३४ ॥ वासुदेव भगवंतु । तया पराशराचा सुतु । तेणेंसी तो कौरवनाथु । बोलता जाला ॥ ३५ ॥ धृतराष्ट्र ह्मणे वेदव्यासा । तूं प्रकाशु आमुचिया वंशा । तुह्मांचि एकाचा भरंवसा । आहे आह्मा ॥ ३६ ॥ तरी संकट मानिलें जीवें । तें तुजवीण कवणा पुसावें । तरी विनतीये चित्त द्यावे । कृपाकरूनि ॥ ३७ ॥ यया राज्याचेनि अभिलाषें । पांडव आले द्वेषें । माझे पुत्र आवेशें । चालिले तयावरी ॥ ३८ ॥ तिये रणभूमीचां ठायीं । दोघां युद्ध होता समयीं । वर्तेल जें जें अपूर्व कांहीं । जिणे मरणें ॥ ३९ ॥ भयाभय जयाजय । निपजेल जें जें कार्य । तें तें यथार्थभावें ज्ञेय । मी जाणूं अपेक्षी ॥ २४० ॥ जयें क्षणीं जें संभवे । तें तइचि मातें कळावें । ऐशी अपेक्षा घेतली जीवें । पुरवावी ते ॥ ४१ ॥ इतुलें आइकोनि बोलणें । तेणें पराशरनंदनें । तया धृतराष्ट्राकारणें । आश्वासिलें ॥ ४२ ॥ रायां अवधारी वचन । तूतें जेणें वर्तमान । कळे तोचि जाण । उपाव असे ॥ ४३ ॥ दूरदर्शन दूरश्रवण । यया संजयातें मी देईन । अतीतानागत वर्तमान । करीन कळे असे ॥ ४४ ॥ येणें तुजपासी असावें । यथां तैंचि तुवां पुसावे । माझेन प्रसादें सांगावे । संजयें सर्व ॥ ४५ ॥ ऐसें बोलोनियां ठेला । व्यासें संजयो अनुग्रहिला । तो आइको देखो लागला । दूरील सर्व ॥ ४६ ॥ अंधु होता जयें स्थानीं । तेथें संजयातें ठेवूनि । श्रीवेदव्यासु तेथोनि । निघता जाला ॥ ४७ ॥ मग तो संजयो सांगेता । धृतराष्ट्र तयां पुसतां । तेथें विस्तारली कथा । तेचि कैसी ॥ ४८ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

धृतराष्ट्राचे पुत्र शत । पांच पंडुचे सुत । सैन्य मेळवून बहुत । झगडां पाहती कुरुक्षेत्रीं ॥ ४३ ॥ धृतराष्ट्र हस्तिनापुरीं । अंध ह्मणूनि राहिला घरीं । त्यास वर्तमान श्रुत करी । संजय शिष्य व्यासाचा

१ एवढें. २ व्यास.

॥ ४४ ॥ संजयाकारणें ऐसें । त्यास सामर्थ्य दिधलें व्यासें । कीं दों सैन्यांत जें जैसें । वर्तेल तें कळावें तयास ॥ ४५ ॥ धृतराष्ट्र संजया । प्रश्न करी हे जनमेजया । वैशंपायन वदे तेथूनि या । आरंभ भगवद्गीतेचा ॥ ४६ ॥ व्यासशिष्य वैशंपायन । जनमेजय परिक्षितीचा नंदन । तो त्यास ह्मणे संजयाप्रति प्रश्न । करितो राजा धृतराष्ट्र ॥ ४७ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

तो हा सर्वशास्त्र इतिहासु । बोलिला वेदव्यासु । त्यांतु भीष्मपर्व सारांशु । त्यामाजि गीता ॥ ५ ॥ हे सर्वशास्त्रमयी गीता । इचा उपदेशु पंडुसुता । अर्जुना केला स्वभक्ता । श्रीकृष्णदेवें ॥ ६ ॥ तो श्रीकृष्ण लोकहितावतारु । कृपाळू श्रीजगदीश्वरु । वसुदेवात्मजु परात्परु । भगवंतु तो ॥७॥ आत्माचेनि अज्ञानें भ्रांत । शोकमोहीं नाशली विवेकता । स्वधर्म सांडुनी परधर्मीचें तें । करूं इच्छिती ॥८॥ ऐसिया अर्जुना सेवका । धर्मज्ञानोपदेश निका । तारिता झाला तो सम्यक । संसारापासाव ॥ ९ ॥ कृष्ण उपदेशिलियां अर्थातें । वेदव्यासें भगवंतें । सार्विंशति श्लोकीं परिमितें । गीता ग्रंथु केला ॥ १० ॥ त्यामध्यें कांहीं आपुले । श्लोक संगतीचे घातले । ऐसा ग्रंथ तारकु केला । वेदव्यासें ॥ ११ ॥ त्या गीता सर्वदा जपाविया । ज्या कृष्णमुखापासुनि निघालिया । येर ग्रंथीं काय प्रयोजन या । सर्व लोकां ॥ १२ ॥ ऐसें पद्मपुराणीं बोलिलें । तें गीतामाहात्म्यीं ऐकिलें । ह्मणोनि गीताश्रवण केलें । पाहिजे वैष्णवीं ॥१३॥ शास्त्र तयातेंचि ह्मणिजे । जें उपदेशिलें कृष्णराजें । अर्जुना स्वभक्तां आणि मोक्षका जें । हें प्रसिद्ध असें ॥ १४ ॥ तें शंकराचार्यें श्रीधरें । व्याख्यान केलें संस्कृतें बरें । तें मी प्राकृतशब्दें विस्तारें । औथीन ॥१५॥ श्रीधराचार्यांची सुबोधिनी । शंकरभाष्य विद्वज्जनीं । या दोहींचें व्याख्यान पाहोनि । हे ' बाळबोधिनी ' ॥ १६ ॥ मी करितों अच्युताश्रमू । स्मरोनि चिदानंदरामू । हरावया व्याख्यायनश्रमू ।अविशेज्ञाचा ॥ १७ ॥ गीताव्याख्यान ते करूं शकती । जे हे टीका अवलोकिती । ऐकतां जानकीपती । हृदयीं संतोषला ॥ १८ ॥ जें मी यथामती सांगेन[1] । जें उपनिषत्सार गहन । जेणें होय आत्मज्ञान । श्रोतयां ॥ १९ ॥

## माधव—( तंजावर प्रत ).

दोन्हीं दळें समरंगणीं । युद्धासि मीनल्यावरि निर्वाणीं । धृतराष्ट्र संजयातें लक्षूनी । सुवचनीं बोलता जाला ॥ १ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

संदेह अणुमात्र नाहीं मजला । परंतु देह प्रालब्धें असे उरला । ह्मणोनि मऱ्हाटवाणिमध्यें मजला । गीता वाचावयांलागीं कीजे ॥ ६ ॥ कां जे मज संस्कृतचें ज्ञान नाहीं । आणि श्रद्धा असे गीतेचे ठायीं । तुमचा अवतार झाला मही । जनासि पाहि तारावया ॥ ७ ॥ पंडित लोकांचें ठायीं जाण । लोभें केलें असें पठण । ह्मणोनि त्यापासोन ज्ञान । जनासि प्राप्त नोहे ॥ ८ ॥ आणि गीतेचे श्रवणमननापुढें जाणा । जनाचा उद्धार स्वामि होईना । ऐसे जाणूनि मी प्रार्थना । करुणाघना करितसे ॥ ९ ॥ जग आपुला अंश जाणोनि । सांगा स्वामी जे कृपा करूनि । सातसे श्लोकाची प्राकृतवाणी । जेणें आत्म-

१ सांगेन. २ जडबुद्धीचा.

ज्ञानी तरति ॥ १० ॥ जितुके श्लोक गीतेचे असती । तितुकेच बोलावे प्राकृतीं । अर्थान्वययुक्ति । कृपामूर्ति बोलावे ॥ ११ ॥ संस्कृताचा सर्वही अर्थ । जें वाचल्यानें होय प्राप्त । अज्ञजनाचे भवभ्रांत । जाय त्वरित कीजे स्वामि ॥ १२ ॥ गीतेची टीका विस्तारेंकरूनि । शंकरभाष्य श्रीधरी मधुसूदनी । ज्ञानदेव प्राकृतवाणी । टीका सुलक्षणी केली असे ॥ १३ ॥ त्यांचा बहुत विस्तार जाला आहे । ह्मणोनि प्रतिदिनीं पाठ नोहे । पाठाविण प्रकृतिपुरुष ते काये । अज्ञान काय जाणेल ॥ १४ ॥ क्षर आणि अक्षर स्वामी जाण । याहूनि परात्पर परिपूर्ण । ज्याचा अनुभव देहाभिमान । जाय हारपोनि तात्काळ ॥ १५ ॥ ऐसी ऐकोनि विनंति । प्रसन्न जाले सद्गुरुमूर्ति । ह्मणे सावधान होऊनि चित्तीं । श्रवणार्थी बैसावें ॥ १६ ॥ सातसे श्लोकांचि सातसे जाण । सांगतों प्राकृतभाषेकरून । ज्याचें नित्य होय मनन-श्रवण । तेणें पावन पतित ॥ १७ ॥ जेणें संस्कृत वाचल्याचें फळ होये । तेंचि प्राकृत वाचल्यानें लाहे । ज्याचा नित्यनेम घेतल्यानें जाये । किल्मिष पाहे सर्व हें ॥ १८ ॥ जे भाव धरूनि नित्य वाचिती । त्यांचें पुण्यासि नाहीं मिती । नरनारी सर्वहि पावन होती । कां जे अंतरगति अंतराय नाहीं ॥ १९ ॥ संस्कृत प्राकृत वाणीभेद । अर्थ दोहींमध्ये एक शुद्ध । ह्मणोनि वाचल्यानें निर्द्वंद्व । ज्ञान अगाध लाहिजे ॥२०॥ गीता वाची अथवा श्रवण करी । किंवा मनन करूनि मनी धरी । तो तरेल संसारसागरीं । ऐसें श्रीहरि बोलिलासे ॥ २१ ॥

## हरिपंडित—“ गीतार्थप्रकाश ”

उपेंद्रवज्राः– करूनियां पार्थ-निमित्त देवें । सच्छास्त्रगीताभिध वासुदेवें ॥
तारावया सर्व जनासि केलें । हें भाष्यकारीं स्फुट बोलियेलें ॥ २ ॥
भुजंगप्रयातः– दया व्यासदेवें जया पूर्ण केली । त्रिकाळज्ञता संजया प्राप्त झाली ॥
कुरुक्षेत्रदेशीं मिळाल्या दळांचा । पुसे त्यासि वृत्तांत राजा कुरूचा ॥ ३ ॥
वसंततिलकाः– लक्ष्मीनृसिंह वदनी मज सूत्रधार । माझें स्वतंत्रपण येथ नसेचि फार ॥
गीता अगाध जलराशि कसा तरावा । हा धोसरा हरि ह्मणे तरि कां करावा ॥ ४ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्:–भगवान् भगवद्गीता–वक्ता जो भक्तसारथी । टीकाकारहि तो साक्षात् वामनात्मा जगद्गुरु ॥२॥
समश्लोकी इचें नांव जितुके श्लोक मूळिंचे । टीकेचे तितुके श्लोक सज्जनानंदकारक ॥ ३ ॥
श्लोकाचसारिखे श्लोक श्लोकीं श्लोकार्थसंग्रह । करितो उत्तम श्लोक समश्लोक अशी हरि ॥४॥
दृष्टीं दिसति हे श्लोक टीकेचे वामनाकृति । अर्थी त्रिविक्रमतनू संतदृष्टीस दाविती ॥ ५ ॥
कोठें पदपदाचाही अर्थ भावार्थयुक्तही । कोठें कोठें भाव मात्र बोलिले भगवान् स्वयें ॥ ६ ॥
भाषा कैशी तरी हो कां अर्थी तात्पर्य सज्जनां । तथापि भगवद्वाणी हे प्राकृत ह्मणों नये ॥७॥
करी मनुष्यसदनीं अवतार तरी हरि । गीता श्रीभगवद्वाणी भाषा टीकेमधें तशी ॥ ८ ॥
वाणी श्रीचक्रपाणीची वेदगुह्यार्थरूपिणी । कोण्या मिषें प्रकटली तें वेदव्यास बोलतो ॥९॥
कीं पुत्र धृतराष्ट्राचे आणखी पुत्र पंडुचे । युद्धालागीं कुरुक्षेत्रीं मिळाले राज्यकामुक ॥ १० ॥
धृतराष्ट्रास तेथील वृत्त सर्व वदावया । वेदव्यासेंहि दिधला शिष्य संजय आपुला ॥११॥
धृतराष्ट्र पुसे त्याला वृत्त तेथिल येथुनी । गीता अष्टादशाध्यायी भीष्मपर्वांत भारतीं ॥ १२ ॥
सातशें श्लोक हे गीता टीकाही श्लोक सातशें । अध्यायाचे आदिअंतीं थोडेसे श्लोक वेगळे ॥१३॥
टीका अष्टादशाध्यायी शेषशायी जगद्गुरु । करी सप्तशतश्लोकी तीचा प्रारंभ येथुनी ॥ १४ ॥

## मोरोपंत

आर्याः- श्रीमद्भगवद्गीताव्याख्यानीं हृदयहारिवचनांहीं ।
श्रीज्ञानदेव वामन पटु ऐसा अन्य मानवच नाहीं ॥ २ ॥
श्रीज्ञानदेव साक्षात् भगवान् वैकुंठनाथ अवतरला ।
एतत्कृतगीतार्थव्याख्यानें फार लोक भव तरला ॥ ३ ॥
भाषा-ग्रंथीं याची तुळा नये आणिकासि या लोकीं ।
प्रतिमा धरूं करातें कवि-धर्महि सर्व किंकराचि हो कीं ॥ ४ ॥
श्रीज्ञानदेव एकोपंत श्रीरामदास वामनहीं ।
श्रीमत् मुकुंदराज स्वयशें केली इहीं पवित्र मही ॥ ५ ॥
श्रीनामदेव केशवराज तुकोबा असे महाज्ञानी ।
यांच्या स्वैरालापी श्रुत्यर्थ विचारिजेति सुज्ञानीं ॥ ६ ॥
निःसीम भक्त झाले या लोकीं फार पांडुरंगाचे ।
साचे ह्मणुनि जगत्पति-कीर्तनसमयीं जयापुढें नाचे ॥ ७ ॥
त्यांचे पाय नमुनि मी दीन अति ज्ञानहीन परि भावें ।
गावें गीतार्थाते ह्मणउनि टीका करावया धांवें ॥ ८ ॥
परि रामचरणपद्मप्रसाद झाला ह्मणोनियां आर्या ।
गीताटीका करितों त्याही गीतीच सप्तशत आर्या ॥ ९ ॥
वृत्त कुरुक्षेत्रींचें धृतराष्ट्रातें कळावया व्यासें ।
आज्ञा केली संजयशिष्या वर देउनि स्वहृव्यासें ॥ १० ॥
त्याणेंचि भीष्मपर्वी हें गीताशास्त्र त्या नृपा कथिलें ।
ज्या अमृतार्थ उपनिषत्पयोधिला कृष्णमंदरें मथिलें ॥ ११ ॥
मी तों अगाधगीतासुधानदीमाजिं घालितोंचि उडी ।
नरजन्मपर्व दुर्लभ जाणुनि याची कसी न येथ बुडी ॥ १२ ॥
गीतासुधानदींत स्नानें जाताति ताप मळ सर्व ।
सर्वज्ञत्व सहज ये गर्व पळे स्तविती देव गंधर्व ॥ १३ ॥
अमृत-प्रपा उदारें सदयें कृष्णें विनिर्मिली मोठी ।
घोंटीना तो वेडा स्वमुखें आकंठ सांठवा पोटीं ॥ १४ ॥
आर्याबुधिपरतीरा पावाया मी प्रवर्तलों नीट ।
पोहाया न कळे परि अमृताबुधि ह्मणुनि मज्जनीं धीट ॥ १५ ॥
आर्या देखुनि सज्जन चित्तीं होतील फार सानंद ।
मंदाऽज्ञानिच सरतिल मागें कीं ठाउकें नसे छंद ॥ १६ ॥
श्रीमद्वामनविरचित गीता टीकोत्तमा समश्लोकी ।
आर्या टीका तेचि च्छंद निराळें विचित्र हें लोकीं ॥ १७ ॥
पुरुषाचा धर्म-भ्रम ह्मणउनि कांहीं पडेल येथ उणें ।
पूर्ण करावें शोधुनि भगवत्प्रीत्यर्थ सज्जनें निपुणें ॥ १८ ॥

[ पहिल्या श्लोकांत धृतराष्ट्र संजयाला युद्धाची माहिती विचारीत आहे. दुसऱ्या श्लोकांत संजयानें राजा दुर्योधन द्रोणाचार्यांजवळ जाऊन त्यांच्याशीं बोलूं लागला असें सांगितलें आहे. पुढील ९ श्लोकांत दुर्योधनानें दोन्ही सैन्यांतील प्रमुख वीरांचीं नांवें, दोन्ही सैन्यांचें सामर्थ्य वगैरेंचें वर्णन करून कुरुवृद्ध पितामह भीष्म यांचें रक्षण करण्याची खटपट करावी अशी सूचना द्रोणाचार्यांना केली. भीष्माचार्यांनीं आणि दोन्ही सैन्यांतील प्रमुख योद्धयांनीं केलेल्या शंखनादाचें वर्णन श्लोक १२:१९ यांत आलेलें आहे. कोणाबरोबर आपणांस युद्ध करावयाचें आहे हें प्रत्यक्ष पाहण्यासाठीं अर्जुनानें आपला रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यें नेऊन उभा करण्याची विनंति श्रीकृष्णांस केली ( श्लोक २०:२३ ). पुढील दोन श्लोकांत रथस्थापना आणि अर्जुनाला श्रीकृष्णांकरवीं युद्धकर्तव्याची पूर्ण ओळख झाली आहे. श्लोक २६:२७ मध्यें अर्जुनाच्या दृष्टीस कोण कोण पडले व त्या वेळीं तो करुणेनें कसा व्याप्त झाला हें आलें आहे. श्लोक २८ पासून अध्यायसमाप्तिपर्यंत अर्जुनानें आपली स्थिति काय झाली आहे हें सांगून युद्ध न करण्याचीं कारणें—स्वजनवध, कुलक्षय, कुलस्त्रियांचें बिघडणें, वर्णसंकर, श्राद्धतर्पणादि क्रियांचा लोप, कुलघ्नांचा नरकवास—दिलीं आणि तो " मला कौरव ठार मारतील तर बरें " असें बोलून शोकानें विव्हल होत्साता रथांत स्तब्ध बसला; इतका कथाभाग पहिल्या अध्यायांत आला आहे. ]

## धृतराष्ट्र उवाचः— धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
## मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

**अर्थः—संजया, धर्मक्षेत्र अशा कुरुक्षेत्रीं युद्धाच्या इच्छेनें एकत्र झालेल्या माझ्या आणि पंडूच्या पुत्रांनीं काय केलें ?**

### श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) "

तरी पुत्रस्नेहें मोहितु । धृतराष्ट्र असे पुसतु । ह्मणे संजया सांगे मातु । कुरुक्षेत्रींची ॥ ८५ ॥ जें धर्मालय ह्मणिजे । तेथ पांडव आणि माझे । गेले असती व्याजें । जुंझाचेनि ॥ ८६ ॥ तरी तेचि येतुला अवसरीं । काय कीजत असे येरयेरीं । ते झडकरी कथन करीं । मजप्रती ॥ ८७ ॥

### सोपानदेव—" सोपानदेवी "

धृतराष्ट्र ह्मणे संजया । धर्मक्षेत्र कुरुक्षेत्र ठाया । कौरव पांडव मिळोनियां । तेथें काय करिताति ॥ १ ॥

### माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

ह्मणे गा संजया अवधारीं । पुसेन तें सांगावें लौकरी । काय करिताति कुरुक्षेत्रीं । माझे आणि पांडव ॥ ६८ ॥ तूं कुरुक्षेत्र ह्मणसी कवण । तरी तें केवळ धर्मसदन । जे भूमिका अति पावन । करी जगत्त्रयातें ॥ ६९ ॥ येथें युद्ध हे धरूनि मनोगत । जे गेले आहेति समवेत । त्यांचें समूळ युद्धचेष्टित । मजप्रती सांगावें बापा ॥ ७० ॥

### रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

तंव धृतराष्ट्र ह्मणे संजयासी । घोर व्याकुळता होतसे माझिया चित्तासी । माझे आणि हे पांडव

युद्धासी । करावया इच्छेसी धरिते जाले ॥ २३० ॥ तुज मी यथालागीं असें पुसतु । जें तूं संजय-नामातें असती धरितु । सम्यक् प्रकारें रागद्वेषांतें जो कीं जिंकितु । ह्मणोनि ह्मणिजतु ' संजय ' नामें ॥ ३१ ॥ ॥ सम्यक्प्रकारेण रागद्वेषादि दोषाञ्जयति असौ संजयः ॥ ॥ एकाच्या ठायीं राग एकाच्या ठायीं द्वेष । तुज संजया नाही एकही लेश । ह्मणोनि निर्व्याज सांग पां आह्मांस । द्वेष अंगीकार न करूनियां ॥ ३२ ॥ तरी माझे जे कीं दुर्योधनादिक । आणि युधिष्ठिरादि पांडव सकळिक । कुरुक्षेत्रीं युद्धार्थ होऊनियां एक । सांग निश्शंक काय करिताति ॥ ३३ ॥ जैसा पूर्वी युद्धार्थ उत्साह धरिला । तैसेचि युद्ध करितात काय राज्याला । किंवा कोणें निमित्तें उत्साह मोडला । सांग वहिला मजप्रती ॥३४॥ जरी तूं संजया ऐसें ह्मणसी । कोण कारण युद्धीं निवर्तावयासी । तरी दृष्टादृष्ट कारणें दोन्हीं तुजसी । सांगों परियेसीं एकाग्र तूं ॥ ३५ ॥ तरी आमुच्या दळीं भीष्म महावीर । करील त्रैलोक्याचा संहार । तैसाचि अर्जुन त्यांचा थोराहूनि थोर । त्रैलोक्य भस्मसार करील क्षणें ॥ ३६ ॥ उभयतां भयेंकरूनियां जाण । निवर्ततील युद्धापासून । दुसरें अदृष्ट निमित्तही सांगेन । परिस सावधान संजया तूं ॥ ३७ ॥ तरी कुरुक्षेत्रासी ते गेले असती । तें तरी धर्मक्षेत्र जाण पां सर्वार्थी । नसतांही धर्म उपजे ते तीर्थी । असिला तरी अति वृद्धि पावे ॥ ३८ ॥ जैसें धान्य उपजे वाढे जिये ठायीं । तयासी क्षेत्र ऐसें ह्मणती सर्वही । तैसे धर्म उपजे वाढे जेथ अनपायी । धर्मक्षेत्र पाहीं यालागीं ह्मणती ॥ ३९ ॥ जाबालश्रुतीसी स्वयें बृहस्पति । बोलता जाला याज्ञवल्क्याप्रती । तेचि परियेसीं एकाग्र श्रुति । कळे सर्वार्थी महिमा त्याचा ॥ २४० ॥ ॥ श्रुति ॥ यदनु कुरुक्षेत्रं देवानां देवयजनं सर्वेषां भूतानां ब्रह्मसदनमिति जाबालश्रुतिः ॥ कुरुक्षेत्रं वै देवयजनमिति शतपथश्रुतिः ॥ ॥ कुरुक्षेत्र तें देवाचें देवयजन । सकळा भूताचें तें ब्रह्मसदन । शतपथश्रुतिही ह्मणे देवयजन । वृद्धिस्थान धर्माचें तें ॥४१॥ किंबहुना ऐसिया कुरुक्षेत्राप्रती । युद्धालागीं हे गेले असती । त्यांत पांडव पूर्वीच धार्मिक असती । हिंसेसि भीती उभयपक्षीं ॥ ४२॥ ययालागी पांडव युद्धापासूनी । निवर्तले जरी अनायासेंकरूनी । माझे पुत्र राज्यालागूनी । भवेंसेनि पावतील ॥ ४३ ॥ शिंकें तुटलिया अनायासें । मार्जारा दुभतें होय सर्वांशें । माझिया पुत्रांसी राज्य तैसें । होय सर्वांशें कारणें येणें ॥ ४४ ॥ अथवा त्या धर्मक्षेत्रमाहात्म्यें-करून । माझ्या पुत्राचे होईल शुद्धांतःकरण । कपटोपात्त राज्य न करूं ह्मणोन । पांडवांलागून स्वयेंचि देतील ॥ ४५ ॥ तरी युद्धेंवाचूनिच माझे पुत्र । मृततुल्य झालेचि सर्वत्र । हीं दोन्ही निमित्तें दिसतीं विचित्र । दृष्ट परत्र युद्ध न करावया ॥ ४६ ॥ तरी युद्ध नव्हतां येणेंप्रकारें । स्वपुत्रांसि राज्य नव्हे निर्धारें । ऐसिये चिंतेनि धृतराष्ट्रें । प्रश्न आदरें आरंभिला ॥ ४७ ॥ प्रश्न करावयाचें मुख्य कारण । इतुकेंचि असे तयाचें जाण । राजा धृतराष्ट्र इतुकें बोलोन । राहे उद्विग्न तूर्णीभूत ॥ ४८ ॥ ऐसा पुत्रस्नेहें अति मोहितु । पांडवांच्या ठायीं द्वेष करितु । आणि अंतर्बाह्य अंध निश्चितु । कृपायुक्तु संजय झाला ॥ ४९ ॥ त्याच्या प्रश्नाचा अभिप्राय जाणोनि । परम धार्मिक संजय बोले वचनीं । ऐसें वैशं-पायन जनमेजयालागूनी । कथा निर्वाणी सांगतु ॥ २५० ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

ह्मणे धर्म प्रथम आचार । सेविती त्याचा होय विस्तार । यालागीं धर्मक्षेत्र सार । कुरुक्षेत्रासि ह्मणताति ॥ २५ ॥ तेथें समस्त राजे मिळाले । स्वधर्म करण्या प्रवृत्त झाले । क्षत्रियांचा धर्म युद्ध चांगलें । तेथें माझे आणि पंडूचे ॥ २६ ॥ काय करिते जाले, संजया । सांग मजला कळावया । ऐकोनि वचना त्याचिया । काय बोलत संजय पैं ॥ २७ ॥

## वामोपंत—" गीतार्णव "

पुत्रमोहें विमोहितु । चिंतासागरीं तरतु बुडतु । धृतराष्ट्र सदेहग्रस्तु । बोलता जाला ॥४९॥ [ हे संजय ] धृतराष्ट्र बोले संजया । मातें नुलंघे वैष्णवी माया । ह्मणौनि उपजलें पुसावया । निरोपण करीं ॥२५०॥ [ कुरुक्षेत्र ] आह्मी आणि पंडु जाण । हे जयाचें धर्मसंतान । कुरु ऐसें अभिधान । तया रायाचे ॥५१॥ तया कुरूचें पवित्र । तेंचि जाण कुरुक्षेत्र । महत्व तयाचें अपार । तेंचि कैसें ॥५२॥ [ धर्मक्षेत्र ] जयें क्षेत्रीं द्रव्य पेरणें । तें उगवे अपारपणें । उत्तम दानाकारणें । स्थान जें कां ॥५३॥ जेथें देइजे येक गुणा । तें उपतिष्ठे सत्वगुणा— । —अनुसार जाण सहस्रगुणा । दातयासि ॥५४॥ बळीसमानु नाहीं दाता । वामनासमानु जैसा मागता । तैसा कुरुक्षेत्रापरुता । नसे धर्मठाव ॥ ५५ ॥ दान देइजे सत्पात्रीं । धर्मरूपे कुरुक्षेत्रीं । तें अनंत गुणा अवधारीं । फळों लागे ॥ ५६ ॥ सहज हातीचें पडलें । तेंचि ब्रह्मार्पण केलें । पुढती नेघिजे सांपडलें । हिरण्यादिक ॥ ५७ ॥ तें धर्मरूप होये दान । वायां न वचे जेथ धन । तेंचि धर्मरूप जाण । कुरुक्षेत्र जें ॥ ५८ ॥ धर्मक्षयापासाव तारी । तें धर्मक्षेत्र अवधारीं । उगेचि वसिजे तरी । पुण्य थोर ॥ ५९ ॥ धर्मरूप धर्मस्थान । कुरुक्षेत्र संजया जाण । तये क्षेत्रीं दारुण । मांडलें असे ॥ २६० ॥ [ युयुत्सवः ] धरूनि युद्धाची वासना । आपुलालियां अंगवणा । न संटे प्रतापु मना— । —माझारी जयां ॥ ६१ ॥ [ समवेताः ] ऐसे होत्साते मीनले । येक येकां प्रमुख मांडले । ते कवण बोलिले । पाहिजती गा ॥ ६२ ॥ [ मामकाः ] तरी माझे पुत्र आइक । जे कीं दुर्योधनादिक । येर कौरव सकळैक । तयां पाठिराखे ॥ ६३ ॥ [ पांडवाश्चैव ] ययासीं वैरभावें । पंडूचे नंदन अघवे । धर्म मुख्य जाणावे । पांचही जे ॥ ६४ ॥ येकमेकां वैरभावें । मिनिले कुरुक्षेत्रीं अघवे । पुसां घेतलें जीवे । तयांचें क्षेम ॥ ६५ ॥ [ किमकुर्वत ] तरी ते काय करीत असती । हें सांगावें तुवां मजप्रती । आर्त माझ्या चित्तीं । दिवा रात्रौ ॥ ६६ ॥ न कळत तयांचें वर्तमान । स्थिर न बैसे, प्रिय न । वाटे उदक अन्न । चिंतेकरितां ॥ ६७ ॥ चिंता पुरुषातें नंधन । चिंता जीतचि मरण । चिंता सुखाचे छेदन । दुःखदाती ॥ ६८ ॥ चिंता हृदयींचा रोगु । चिंता नाशी परम योगु । आंगीं लागला सुखभोगु । भोगूं नेदी ॥ ६९ ॥ इंद्रियांचे करी शोषन । देहावरी नये मन । चिंता भ्रमवी वन । नेदी विश्राति ॥ २७० ॥ चिंता हृदयींचा अंधकारु । चिंता हा कृष्णु—विखारु[१] । चिंता नाशी तोचि गुरु । संसारत्राता ॥ ७१ ॥ बाह्यांतरीं व्याकुळता । पुरुषा आणी चिंता । चिंतासागरीं बुडतां । दुजें न पवे ॥ ७२ ॥ दैन्य घडवी वदन । तटस्थ राहती करचरण । निमिषोन्मेषही नयन । विसरोनि जाती ॥ ७३ ॥ कार्यातें सांडूनि करणें[२] । उगींचि राहतीं जडपणें । न स्फुरती विषयज्ञानें । चिंतेकरितां ॥ ७४ ॥ भक्षितां न कळे अन्न । न कळे बोलाया वचन । आइकताचि दोन्ही श्रवण । बधिर होती ॥ ७५ ॥ आंगा आदळलेंही न कळे । सुख-दुःख चिंताकाळें । मन इंद्रियां न मिळे । इंद्रियें अर्थां ॥ ७६ ॥ आंगा खुपे शेज । गंधु न कळे जाणिज । डोळां देखिलें मनुज । बोळखेना ॥ ७७ ॥ आगीवीण चिंता जाळी । सुखांशु अवघा गिळी । चिंते ऐसें भूमंडळीं । दुष्ट नाहीं ॥ ७८ ॥ ऐशी चिंता प्रवर्तली । माझ्या हृदयीं बैसली । दूरी नव्हे कांहीं केली । काय करणें ॥७९॥ तरी तूं मित्रु प्राणसखा । बापा संजया आइकें आतां । छेदूनि माझी हे शंका । चिंता हरी ॥२८०॥

१ कृष्णसर्प. २ इंद्रियें.

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

कौरवपांडवांची कथा । संजयो तिचा वक्ता । राजा धृतराष्ट्र पुसता । जाला तयाप्रती ॥ ३० ॥ पुत्रमोहें कवळितु । हृदयीं चिंता वाहातु । धृतराष्ट्र बोले मातु । आइके संजया ॥ ३१ ॥ दुर्योधन आदिकरून । माझे समग्रही नंदन । आणि धर्ममुख्य पांचहीजण । कुमर पांडूचे ॥ ३२ ॥ सैन्यभारेसीं वेगळाले । कुरुक्षेत्रीं असती मीनले । रणभूमिकेप्रति आले । ऐसे जे ते ॥ ३३ ॥ काय जाले करिते । सांग पां ते स्थिति मातें । विश्रांति माझिया मनातें । जेणें होये ॥ ३४ ॥ कां ह्मणशील तेथ मीनले । कैसें हो तेथें राहिले । तरि राज्याभिलाषें पेटले । वैरभावासी ॥३५॥ अपेक्षूनि युद्ध अंतरीं । मीनले ते कुरुक्षेत्रीं । आतां कुरुक्षेत्राचि ते जरी । कैसें ह्मणशील ॥३६॥ विस्तीर्ण हें महामंडळ । परि धर्म करावया तेंचि स्थळ । यालागीं धर्मक्षेत्र हें केवळ । अभिधान ज्याचें ॥ ३७ ॥ एवं धर्मस्थान कुरुक्षेत्र । तेथ मीनले ते समग्र । साधावयालागीं वैर । काय करिते जाले ॥ ३८ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

धृतराष्ट्र अंबिकापुत्र । ह्मणे संजया कुरुक्षेत्र । धर्म पिकविं परम क्षेत्र । उभय पक्ष तेथें मिळाले ॥ ४८ ॥ युद्धाची अपेक्षा मनीं । ऐसे दोन्ही पक्ष मिळोनी । कुरुक्षेत्रभूमी दावुनी । तेथें काय करिते जाले ॥ ४९ ॥ त्यांत माझेच एक शत । दुर्योधनादिक सर्वांस विदित । ते पांच पांडूचेहि सुत । होतीच कीं ॥ १५० ॥ कुंती माद्री पांडूच्या स्त्रिया । जरी आणिकांपासूनि गर्भ तयां । तरी अगा संजया । पांडूचेचि ह्मणोनि मानितों ॥ ५१ ॥ त्यांत धर्मराज धर्मसुत । तो धर्मी अत्यंत रत । आणि कुरुक्षेत्र धर्माचें शेत । परी झगडूंच पाहे तो तेथें ॥ ५२ ॥ आपण पांडूचे क्षेत्रज । हें तों आपल्याच बापाचें बीज । धर्मक्षेत्रीं धर्मगुज । सुचावें हें धर्मराया ॥ ५३ ॥ धर्मतत्त्व ऐसें असोनि । युद्धाचीच इच्छा धरूनि । माझे आणि पांडूचे तेहि मिळोनि । करिते जाले काय सांग ॥ ५४ ॥ या भावें कुरुक्षेत्र । त्यास ह्मणे धर्मक्षेत्र । 'मामका एव' ह्मणिजे माझेच पुत्र । 'पांडवाश्च' ह्मणजे पांडूचेही ॥ ५५ ॥ भावार्थ विशद ऐसा जाला । तो या श्लोकामध्येंच निघाला । पाल्हाळ पदरचा नाहीं घातला । पदें योजूनि पाहणें ॥ ५६ ॥ 'जिकडे कृष्ण तिकडे जय । श्री नीति धर्म अव्यय' । उत्तर देईल ऐसें संजय । श्लोकीं अंतीं गीतेच्या ॥ ५७ ॥ प्रस्तुत दोन्ही पक्ष मिळाले । प्रश्न कीं 'ते काय करिते जाले' । त्याचेंचि उत्तर बोले । संजय ॥ ५८ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

धर्मस्थान जें कुरुक्षेत्र । तेथें मिळाले जे एकत्र । झुंजी इच्छिते पंडुपुत्र । आणि माझे सुत ॥ २० ॥ संजया काय करिते जाले । हें पाहिजे मज सांगितलें । व्यासें असे तुज दिधलें । दूरदर्शन—ज्ञान ॥२१॥

## निवृत्तिदेव

धर्मक्षेत्रीं कुरुक्षेत्रीं मिळोनि । युद्धवांछा धरूनि मनीं । माझे आणि पांडव झुंझुनी । काय करिताति संजया ॥ १ ॥

## उद्धवचिद्घन

सवाई:– प्रश्न पुसे धृतराष्ट्र कुरुपति धर्म करी निज क्षेत्र दळाचें ।
हें कौरवदळ अकरा क्षोणिहि या कुरुक्षेत्रिंच वीर बळाचे ॥
एकवटोनि युयुत्सव मानुनि मामक कौरव पांडव साचे ।
काय कसें करिती वद संजय यावरि तो वदतो निज वाचे ॥ १ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

आरंभींहूनि भूमि पवित्र । ह्मणोनि तया नाम धर्मक्षेत्र । कुरूचेनि विस्तारिलें क्षेत्र । 'कुरुक्षेत्र' वास्तव नाम ॥ २ ॥ युद्ध–अपेक्षा धरूनि मनीं । परस्पर मिळाले ते स्थानीं । मामक पांडवीं काय करणी । योजिली ते वाणी संजया सांग ॥ ३ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

धर्मक्षेत्र कुरुक्षेत्राचे ठायीं । समग्र मिळालेति पाहीं । माझे आणि पंडुपुत्र ये समयीं । करिती काय तें सांगावें ॥ २२ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

भुजंगप्रयातः– अती स्वल्पमही धर्म घे वाढि जेथें । कुरुक्षेत्र झुंजावया वीर तेथें ॥
मिळाले हटें पांडुचे आणि माझे । कसें वर्तलें संजया सांग वोजें ॥ ५ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

धृतराष्ट्र ह्मणे संजया । धर्मक्षेत्र कुरुक्षेत्राच्या ठायां । कौरव पांडव मिळोनियां । तेथें काय करिताति ॥१॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंग:– धर्मक्षेत्रीं कुरुक्षेत्रीं रणांगणीं । मिळाले आयनीं झुंजावया ॥
प्रज्ञाचक्षु पुसे संजयास गोष्टी । अंतरीं तो कष्टी पुत्रदुःखें ॥
पांडुपुत्र आणि आमुचे आत्मज । कैसें केलें काज राज्यलोभें ॥
तुका दास प्रार्थी ऐकावे सज्जनें । व्यासाचें आज्ञेनें संजय बोले ॥ १ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्:– धर्मक्षेत्रीं कुरुक्षेत्रीं मिळाले युद्धकामुक ।
माझे आणिक पांडूचे संजया वर्तलें कसें ॥ १५ ॥

## मोरोपंत

आर्याः- धर्मक्षेत्रीं कुरुच्या क्षेत्रीं मिळुनी करावया समर ।
माझे आणि पंडूचे करिती तें सांग संजया कुमर ॥ १ ॥

× × × ×

धर्मक्षेत्रीं कुरुच्या क्षेत्रीं जे युद्धकामुक मिळाले ।
माझे आणि पांडव ते प्रवर्तले संजया कसें सांग ॥ १९ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

धृतराष्ट्र ह्मणे गा संजया । धर्मभूमि कुरुक्षेत्र नाम जया । तेथें कौरव पांडव झुंजावया । गेले ते काय करिताति ॥ १ ॥

**संजय उवाचः- दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।**
**आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥**
**दुर्योधन उवाचः- पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥**

**अर्थः-तेव्हां पांडव सैन्याचा व्यूह रचलेला पाहून राजा दुर्योधन आचार्यांजवळ जाऊन बोलता झाला, "आचार्या, आपल्या बुद्धिमान शिष्यानें—द्रुपदपुत्रानें—व्यूह रचलेली अशी ही पांडुपुत्रांची मोठी सेना पहा.**

## श्रीज्ञानेश्वर—"भावार्थदीपिका (ज्ञानेश्वरी)"

तिये वेळीं तो संजय बोले । ह्मणे पांडव सैन्य उचललें । जैसें महाप्रळयीं पसरलें । कृतांतमुख ॥ ८८ ॥ तैसें तें घनदाट । उठावलें एकवाट । जैसें उसळलें कालकूट । धरीं कवण ॥ ८९ ॥ ना तरी वडवानलु सार्दुकला[1] । प्रलयवातें पोखला । सागरु शोषूनि उधवला[2] । अंबरासी ॥ ९० ॥ तैसें दळ दुर्धर । नाना व्यूहीं परिकर । अवगमलें भयासुर । तिये काळीं ॥ ९१ ॥ तें देखोनियां दुर्योधनें । अव्हेरिलें कवणें मानें । जैसें न गणिजे पंचाननें । गजघंटातें ॥ ९२ ॥ मग द्रोणापासीं आला । तयातें ह्मणे हा देखिला । कैसा दळभारु उचलला । पांडवांचा ॥ ९३ ॥ गिरिदुर्ग जैसे चालते । तैसे विविध व्यूह सभंवते । रचिले आथी बुद्धिमंतें[3] । द्रुपदकुमरें ॥ ९४ ॥ जो कां तुम्हीं शिक्षापिला । विद्या देऊनि कुरुठा केला । तेणें हा सैन्यसिंधु पाखेरिला[4] । देख देख ॥ ९५ ॥

१ अडकला. २ उसळला. ३ शहाणा. ४ पसरिला.

## सोपानदेव— "सोपानदेवी"

संजय ह्मणे रायासी । पांडवसैन्य दृढ देखिलें परियेसीं । राजा दुर्योधन द्रोणाचार्यांपाशीं । जाऊनि सांगता जाला ॥ २ ॥ द्रोणाचार्या हें पांडवसैन्य पाहे । द्रुपदपुत्रें रचना केली आहे । हा तुझा शिष्य होये । बुद्धि अधिकु ॥ ३ ॥

## माधव नारायणदास— "नारायणकीर्ति"

ऐसें धृतराष्ट्र पुसतां । संजय जाला बोलता । ह्मणे ऐक गा नृपनाथा । कुरुक्षेत्रींचा समाचार ॥ ७१ ॥ सात अक्षौहिणी पांडवाचें दळ । रथ गज पदाति अश्व प्रबळ । चतुरंग सन्नद्ध झाले सकळ । योद्धे वीर नामाथिले ॥ ७२ ॥ ते सैन्यरचनेची कुसरी । अपूर्व त्रैलोक्यामाझारीं । कळिकाळासही आणिती हारी । ऐसे जेथें बलाढ्य ॥ ७३ ॥ ये सन्नद्ध तीचे उत्पत्ती । सैन्य उचलूं पाहे कौरवांप्रती । इतु-कियांत दुर्योधन अति । साशंकित जाला हृदयीं ॥ ७४ ॥ तेव्हां तो राजा स्वयें आपण । जाऊनि द्रोणाचार्यांपासीं जाण । लगबगें बोलता जाला वचन । तें कैसें ह्मणसी तरी अवधारीं ॥७५(२)॥ अगा आचार्या हें पैलें पाहे । पंडुपुत्रांचें सैन्य दिसताहे । ज्याच्या ठायीं थोरपण आहे । प्रतापयोगेंकरूनी ॥ ७६ ॥ त्याच्या चतुरंगदळाची रचना । अभिनवता उपजवी मना । तेथें सेनापती असे ब्राह्मणा । पुत्र द्रुपदरायाचा ॥ ७७ ॥ तो तरी तुझा शिष्य तूं केला । परंतु ये समयीं विसरला । असो तेणें द्रुपदपुत्रें तव शिष्यें, भला । हा असे रचिला दळभार ॥ ७८ ॥ बुद्धिलाघवाचिया परवडीं । व्यूह योजिलासे कडोविकडी । जैशी प्रलयकाळींचीं मेहुडीं । तैसीं स्तोमें भासतीं ॥ ७९ (३) ॥

## रंगनाथ मोगरेकर— "चित्सदानंदलहरी"

अहो पांडवां भीष्मादिकींकरून । दृष्टभय नाहींच निर्पेट्रन । अदृष्ट भय अर्जुनासि भ्रांतीकरून । तेंही श्रीकृष्ण निवारिती ॥ ५१ ॥ ऐसा पांडवांचा उत्कर्ष देखोनि अति । 'तु' शब्दें बोले धृतराष्ट्राप्रती । स्वपुत्र राज्य देतील हे रायाची भ्रांती । फेडी वचनोक्ती संजय आधीं ॥ ५२ ॥ रायासि आनंद उपजवितु । दुर्योधनाची दुष्टता असे बोलतु । संजय धृतराष्ट्राप्रति बोले मातु । तें दत्तचित्तु परिवेसा ॥ ५३ ॥ तंव संजय ह्मणे धृतराष्ट्रासी । दुर्योधन देखोनि पांडवसेनेसी । तत्काळ आला आचार्यापासीं । मातु कैसी करिता झाला ॥ ५४ ॥ जैसें प्रळयकाळीं कृतांतमुख । पसरलें असे अति भयानक । ना तरी वडवानळ खवळला देख । तैसें सम्यक पांडवसैन्य ॥ ५५ ॥ व्यूहरचना करूनि अतिदुर्धर । रचिता झाला द्रुपदकुमर । जें देखोनियां दुर्योधन वीर । अति सत्वर चालिला ॥ ५६ ॥ द्रोणनामें करूनियां विख्यात । धनुर्विद्येचा प्रवर्तक अद्भुत । त्याप्रति दुर्योधन असे येत । न पाचारित द्रोणासीं ॥ ५७ ॥ पांडवांच्या सैन्यातें देखोनी । भयभीत झाला अंतःकरणीं । यालागीं द्रोणासी समीप न पाचारूनी । स्वयेंचि गजबजोनि गेला तेथें ॥ ५८ ॥ भयें आपुलिया रक्षणार्थ । आचार्याचें गौरव असे वाढवित । राजनीति बोले 'अल्पें बहु अर्थ' । तेंचि दत्तचित्त परियेसा ॥ ५९ ॥ तेंचि वाक्यविशेषरूप वचन । बोलता झाला राजा दुर्योधन । 'पश्यैतां' यया श्लोकापासून । करित निरूपण नवां श्लोकीं

१ पलीकडे. २ प्रकारानें, चातुर्यानें. ३ ढग, मेघ. ४ समूह, ढेग्यें. ५ निखालस.

॥ २६० ॥ 'तस्य संजनयन्हर्षं' श्लोकपर्यंत । बोलता जाला थोर एकांत । पोटीं संदेह धरूनियां अद्भुत । भयशंकित बोले प्रीत्या ॥ ६१ ॥ ह्मणे पांडवांच्या ठायीं याची प्रीती । आणि ते निकट शिष्य प्रिय अती । कृपाळु हृदय याचें तयांप्रती । युद्ध तयांप्रति न करी द्रोण ॥ ६२ ॥ ऐसिया संभावना करूनियां स्वचित्तीं । तैसेंचि बोलता झाला द्रोणाप्रती । तयांची अवज्ञा सांगोनियां अती । क्रोध चित्तीं उपजवितु ॥ ६३ (२) ॥ तंव दुर्योधन ह्मणे जी सद्गुरुमूर्ति । हे पांडवांची चमू पाहें पां महामति । हे आमचिये सेनेतें न गणिती । असे दिसती उभी पुढां ॥ ६४ ॥ अहो तुह्मांसारिखे अति सन्नद्ध । महानुभाव पराक्रमी अतिप्रसिद्ध । एकु एकु त्रैलोक्याचा करी बाध । ऐसे उभे सिद्ध तुह्मी असतां ॥६५॥ ऐसिया तुह्मां सर्वांतें न गणून । युद्धाचेंही कांहीं भय न धरून । पांडवांची सेना देख सिद्ध होऊन । युद्धालागून उभी असे ॥ ६६ ॥ अहो अनेकां अक्षौहिणींसहित । दिसे दुर्निवार हे अत्यद्भुत । जैसें काळदुर्ग असता चालत । पाहें साक्षात् सद्गुरुराया ॥ ६७ ॥ हें अत्यंत भयासुर दिसत कैसें । जाणों कृतांतें मुख पसरिलें असे । मी तुह्मा शिष्य ह्मणोनि आचार्य ऐसें । संबोधन असे यालागीं करितु ॥ ६८ ॥ तुह्मी साक्षात् देखिलियानंतरें । तयांची अवज्ञा कळेल निर्धारें । आह्मीच सांगतां तुह्मांस न वाटेल खरें । यालागीं आदरें पहा ह्मणे ॥६९॥ ना तूं ऐसें ह्मणसी जी सद्गुरुमूर्ति । जे आमुचेनी प्रतीकारू नव्हे सर्वार्थी । यालागीं अवज्ञा सहावी जे हे करिती । तरी महामती ऐसें न ह्मण ॥ २७० ॥ हें तंव तुझेनि शिष्यें रचिलें असे । शिष्यावरि सद्गुरूसी तरि आधिक्य सर्वांशें । या तुज निवारावया हें अशक्य नसे । नको मानसें उपेक्षूं यासी ॥ ७१ ॥ आणि धृष्टद्युम्न ऐसें नाम नेघोनी । द्रुपदपुत्र ऐसें ह्मणे द्वेषेंकरूनी । द्रुपद पूर्वीचा वैरी हा ह्मणोनी । क्रोध मनीं उपजवी द्रोणा ॥ ७२ ॥ ना शिष्य ह्मणोनि हेळणा करिसी । तरि तो बुद्धिमंत असे गा परियेसी । द्रोण व्यासंग सांडूनि त्वरेसीं । प्रवर्ते युद्धासी तैसें करितु ॥ ७३ ॥ अथवा दुसरें ऐसें असे व्याख्यान । हे 'पाण्डुपुत्राणां आचार्य' संबोधन । पाण्डुपुत्राच्या आचार्या द्रोणालागून । दुर्योधन पाचारी ऐसें ॥ ७४ ॥ हा माझा कांहीं आचार्य नव्हे । हा पाण्डवांसीं वर्ते अतिस्नेहभावें । अर्जुन पढिये यासी प्राणें जीवें । ह्मणोनियां भावें संबोधन ऐसें ॥ ७५ ॥ आणि तुझियाचि वधार्थ हा उत्पन्न । झाला असे जी हा धृष्टद्युम्न । तो कपटें तुझा शिष्य होऊन । विद्याग्रहण केलें असे ॥ ७६ ॥ आणि तो कैसा अति बुद्धिमंत । तुझिया वधार्थ जे विद्या उपायभूत । ते तुज वैरियाचिपासूनि जाला घेत । शिष्य निश्चित होऊनियां ॥ ७७ ॥ यालागीं पाण्डवांची सेना देखोनी । तुज आल्हादु न व्हावा भ्रान्तिकरूनी । निगूढ द्वेष उपजवी ऐसें बोलोनी । धृतराष्ट्रालागूनी संजय सांगे ॥ ७८ ॥ अहो ऐसिया धर्मक्षेत्रासि पावोन । आणि गुरूच्याही ठायीं ऐसें दुष्ट मन । तयासि अनुताप उपजेल कोठून । ना राज्यसमर्पण करील ॥ ७९ ॥ ना तूं ऐसें जरि कांहीं ह्मणसी । जे एकु द्रुपदपुत्र तोहि अप्रसिद्ध सर्वांशीं । तेणें रचिलें हो व्यूहरचनेसी । इतुकेनि भीसी तरी युद्ध कैसें ॥ २८० ॥ ना आमुचिया महाशूरांमधून । एखादा तरही जिंतेल पाण्डवसैन्य । तरी त्यांचेही असती महाशूर दारुण । ते ही कोण परियेसीं ॥ ८१ (३) ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी "—टीका

तो ह्मणे देखोन पांडवदळभार । रथावरी दुर्योधन थोर । धरूनि आचार्य द्रोणा सार । वचन त्यास

बोलतसे ॥ २८ ॥ पहा पांडूचे पुत्र गुरुराया । ससैन्य धरूनि ठाँया । रथ संजोगिले समुदाया- । माजीं द्रुपदपुत्रही असे ॥ २९ ॥ तो तुझा शिष्य बुद्धिवंत । व्यूह–रचना जाणे संतत । आणिकही धर्नुर्वाडे अनंत । तुजलागोन सांगेन ॥ ३० ॥

## दासोपंत—" गीतार्णव "

इतुलें आइकोनि बोलणें । संजयो तो काये ह्मणे, । ते कथा श्रवण करणें । श्रोतां सर्वज्ञीं ॥ ८१ ॥ संजयो ह्मणे गा भूपति, । करिताति चिंता जये अर्थी । तोचि वृत्तांतु तुजप्रति । सांगिजैल ॥ ८२ ॥ चित्त करूनि सावधान । समूळ आयकें कथन । कौरवीं पांडवीं रण । शोभलें असतां ॥ ८३ ॥ तदा तेणें काळें तये रणीं । मांडले असतां मांडणी, । विचारूनि आपुले मनीं । परदळें अवलोकी ॥ ८४ ॥ [ दुर्योधनो राजा ] कौरव राजा दुर्योधनु । जो कीं तुझा नंदनु । अरिवर्गपंचाननु । प्रतापिया ॥ ८५ ॥ तंव तेथें वर्तलें कैसें । तेंचि आतां परियेसें । सांगिजैल उल्हासें । मनाचेनि ॥ ८६ ॥ [ पांडवानीकं ] पांडवसैन्य अपार । दृष्टीं पडिलें समोर । तें पैं कैसें समग्र । तेणें काळें ॥ ८७ ॥ [ व्यूढं ] दळ तंव तें असंख्यात । रचने रचलें समस्त । पवना न फुटे तेथ । मधूनि जावया ॥ ८८ ॥ मेघांची जैशी गगनीं । निबिड दाटे मांडणी । तैसें उंचावलें रणीं । दिसे पांडवसैन्य ॥ ८९ ॥ अनेकत्व येकवटलें । मग तें अखंड जालें । सैन्य रचने आलें । फुटेचिना ॥ २९० ॥ ऐशिया निबिडा निकटातें । राया अवधारीं निरुतें । रचल्या पांडवसैन्यातें । तेणें काळें ॥ ९१ ॥ [ दृष्ट्वा तु ] निर्धारें देखोनि नयनीं । दचकला स्वता मनीं । दुर्योधनु तो तेथूनि । काय करिता जाला ॥ ९२ ॥ [ आचार्यमुपसंगम्य ] द्रोणाचार्यो विद्यागुरु । कौरवमान्यु प्रवरु । तयाप्रति सत्वरु । जाऊनियां ॥ ९३ ॥ [ वचनमब्रवीत् ] बोलता जाला वचन । अत्यंतें आश्चर्येंकरून । कांहीं धैर्यापासाव मन । चळलें तयाचें ॥ ९४ ॥ अधैर्यवंताचें बोलणें । वैरियाचें बल वर्णणें । क्षणक्षणां अवलोकणें । भयस्था बुद्धी ॥ ९५ ॥ सैन्याचा अनुमानु कीजे । युद्धाची त्वरा सांडिजे । विचारीं मन घालिजे । परदळ देखोनि ॥ ९६ ॥ ह्रुदयींचें धैर्य सुटे । तें राखिजे वाचेचेनि नेटें । अभयकाराचा प्रगटे । उगाचि शब्दु ॥ ९७ ॥ बोलोनि धैर्य दाखवणें । दाखवूनि येरां उपजवणें । नाहीं तो पदार्थु आणणें । ऐसें होये ॥ ९८ ॥ वर्णिजे परदळाची रचना । आंगवण तुळिजे आंगवणा । ध्यानाचि लागे नयना । तैं धैर्य नाहीं ॥ ९९ ॥ स्वेद कंप देहीं उपजती । न साहे दुजयाची उक्ति । भय दावितां चित्तीं । भयचि उपजे ॥ ३०० ॥ अभयें वाटे अभय । भयें वाटे सत्य भय । परवचनें तें धैर्य । जाणावें सुटलें ॥ १ ॥ बहुतांशीं निश्चयो करणें । न पुसत परबळ सांगणें । धैर्यापासाव सुटणें । तें ऐसें आहे ॥ २ ॥ कांतीतें सांडी वदन । ह्रुदयीं स्पंदती प्राण । वागविले तैसे करचरण । वागतीचिना ॥ ३ ॥ मागें पुढें पाहों लागे । येकाचा आधारु मागे । तैं धैर्य सांडिलें अंगें । ऐसें जाणावें ॥ ४ ॥ उगाचि वाटे त्रासु । कांहीं न वटे संतोषु । निःशेषु होय उल्हासु । धैर्येंवीण ॥ ५ ॥ धैर्याच्या जाण वोहँटीं । साम्योंच्या येती गोष्टी । पुरुषार्थु कपाटीं । पडोनि जाये ॥ ६ ॥ फारही थोडकें दिसे । आपुलें बळ परियसें । आणि परवच आवेशें । पावलें गमे ॥ ७ ॥ ऐशीं अधैर्याचीं लक्षणें । अशूरु तो येकु जाणे । येरा अनुभवाकारणें । नसे कांहीं ॥ ८ ॥ तैसें जालें दुर्योधना । देखोनि पांडवांची सेना । तो आश्चर्यवंतु मना– । माजूनि जाला ॥ ९ ॥ मग द्रोणाचार्याप्रति । परसैन्याची महती । आपण होऊन

१ ठिकाणीं. २ धनुर्विद्येंत शहाणे. ३ उतरण्यानें, कमीपणानें. ४ सामोपचाराच्या.

भूपति । राजा बोलिला ॥ ३१० ॥ तेंचि कैसें वचन । राया देईं अवधान । सांगिजैल येथून । संजयो ह्मणे ॥ ११ ॥ जें वचन आइकतां । करावीचि नलगे चिंता । परंतु तुझा मोहो ममता । विचारु नेघे ॥ १२(२) ॥ [हे आचार्य] सन्मुख उभा राहोनि । अहो जी आचार्या ह्मणोनि । दुर्योधनु तो वचनीं । बोलता जाला ॥ १३ ॥ [एताम्] धर्मु तो अवघेयां वडिलु । अर्जुनु धनुर्बाडां कुशलु । भीमसेनु अति बलु । प्रतिमौंमृत्यु ॥ १४ ॥ नकुल सहदेव धाकुले । परंतु आंगवणा असती आगळे । हे पांडूचे पुत्र कथिले । पांचही जण ॥ १५ ॥ राज्याचेनि अभिलाषें । रणा आले रोषावेशें । द्रोणाचार्या परियसे । ययां वैरियांची ॥ १६ ॥ [चमूं पश्य] सेना पाहे असंवर । आतां ते कैशी आइके उत्तर । मातें पाहतां साचार । दिसों आली ॥ १७ ॥ [महतीम्] रण पांगलें अपार । बळवंतचि दिसती समग्र । रणीं न टळती झुंझार । ऐसें वाटे ॥ १८ ॥ पायीं तोडर ब्रीदावळी । वारू हिंसु करिती अंत्राळीं । तेणें शब्दें टाळी । बैसों आली ॥ १९ ॥ दणदणा वाजे धरणी । हृदय थरारी तेणेंकरूनि । उलंडे नांकीं मेदिनीं । ऐसें वाटे ॥ ३२० ॥ गज रथ वारू वीर । चतुरंग सैन्य अपार । नादें कोंदाटलें अंबर । शब्द न कळती ॥ २१ ॥ दणदणा धांवे पायदळ । वारुवांचे वाजती तळें । धडधडाटे केवळ । शब्द रथांचे ॥ २२ ॥ नाग गर्जती सत्राणें । वीरांचीं होती गर्जनें । ऐसे ते शब्द गगनें । सांटतीचिना ॥ २३ ॥ धुळोरा उठिला गगनीं । सूर्यो लोपला तेणेंकरूनि । तो पवनें हाला येऊनि । आह्मांवरि पडे ॥ २४ ॥ प्रळयकाळींचे जलधर । तैसें दळ एकत्र । हें देखोनि अंतर । धैर्य सोडी ॥ २५ ॥ कुरूनि पहावें दृष्टी । तंव भय प्रवेशे पोटीं । सहसा न पडावी गांठी । ऐसें वाटे ॥ २६ ॥ येथेंचि आह्मीं रहावें । तेथेंचि तेहीं थोकावें । ऐसे घडे तें बरवें । परि घडावें कीं ॥ २७ ॥ असंवर बळाची उकळी । वारू न थरती भूमंडळीं । योद्धे आंगवण आगळी । बोलती बहुसाल ॥ २८ ॥ आह्मांसन्मूख चालतां । नाहीं भय आणि चिंता । मुखांवरि लक्ष्मी समस्तां । शोभती असे ॥ २९ ॥ नारायणु जया सारथी । काय वर्णू तयाची महती । आह्मी शिष्य, ते शोभती । गुरूसमान ॥ ३३० ॥ येका केशवाचेनि बळें । व्यापिलीं काये तयांचीं स्थूळें । ब्रह्मांडा ऐशीं विशाळें । उलंडिती ते ॥ ३१ ॥ गजांचिया थाटांवरि । सिंह चालती जया परी । तैसे हे आमुचे वैरी । आह्मांवरि आले ॥ ३२ ॥ शस्त्रांपासाव तेज तळपे । तें देखोनि देखणें दिपे । रविबिंब हरपे । तेणें प्रकाशें ॥ ३३ ॥ उंचे भूमिके राहवले । उधळूनि वरि चालिले । क्षणेकु असती वेगळे । तंवचि बरें ॥ ३४ ॥ [तव शिष्येण] दळवैंयी येथ पाहतां । तुझा शिष्यु तो सर्वथा । कवणु ह्मणशील तरि आतां । सांगिजैल ॥ ३५ ॥ [द्रुपदपुत्रेण] जो राया द्रुपदाचा नंदनु । नामें विख्यातु धृष्टद्युम्नु । तेणें यये सैन्यीं गुणु । दाविला ॥३६॥ [व्यूढां] चतुरंग पांडवांची सेना । तिची केली रचना । आतां तो कैसा दळवैपणा । ऐसें जैं पुसाल ॥ ३७ ॥ [धीमता] तरि कुशलत्वाची जो खाणी । विवेकाची सर्व करणी । संग्रामविषयीं ज्ञानी । दुसरा नाहीं ॥ ३८ ॥ भूमिका जाणोनि ते साधिली । दळाची मांडणी मांडिली । पवनीं न फुटे फळी । ऐसें केलें ॥ ३९ ॥ थोंगीं थोंगीं इतर । राजे जे तयांचे भार । आमुतें लक्षूनि समोर । उभे केले ॥३४०॥ उभय भारांचां संकटीं । रीघु करूनि पाहिजे दृष्टी । तंव तिये संधीचां शेवटीं । मध्यें भारू ॥ ४१ ॥ फळी फोडूनि जेणें जावें । तेणें खोळेसिचि पडावें । मागुतें परतोनि न यावें । ऐसें केलें ॥ ४२ ॥ आणि पुढील मार्ग जाला । तो मागिलीमागूनिहाला । ऐशी अपूर्व कळा । भाररचनेची ॥ ४३ ॥

१ अप्रतिम. २ आकाशांत. ३ पृथ्वी. ४ घोड्याच्या टापा. ५ हत्ती. ६ सेनापति.

ऐसा फांकूनि येरु भारु । मध्यें स्थावरिला राजभारु । तेथिंचिये रचनेचा प्रकारु । तो काये बोलावा ॥ ४४ ॥ पुढें तळप ते वारुवांचे । दाविती वेग अश्वांचे । शब्द बोलती पैजेचे । उपजविती आवेश ॥ ४५ ॥ तेहीं कळीतेंचि काढावें । परावें दळ फोडावें । युद्ध नेऊनि घालावें । मागिलांवरि ॥ ४६ ॥ तंव मागील कैशी रचना । आचार्यो आणावी मना । बापु बापु शाहणा । दळवै तो ॥ ४७ ॥ हस्ती थावरूनियां विशाळ । मध्यें मध्यें पायेदळ । येकें येकातें बळ । ऐसें केलें ॥ ४८ ॥ गजदळा रक्षण पायांचें । पायदळा दुर्ग गजांचें । ऐसें मत युद्धाचें । आदरिलें तेहीं ॥ ४९ ॥ जंववरि नेहेटु पडे । तंव ऐसेंचि युद्ध हें गाढें । मग गज गजां सोंडादंडें । पेलित असतां ॥ ३५० ॥ पायदळा मागिलांचा आधारु । गजांमागें हयभारु । तोचि शके आवरू । भंगलिया संग्रामा ॥५१॥ अश्वारूढ वीर टणक । पाठीशीं घालूनि तेहीं लोक । गजां आंगेंचि प्रमुख । चालावें परदळ ॥ ५२ ॥ अश्वगती युद्ध करितां । गजगति राहिलिया समस्ता । महा घोर युद्ध करितां । न टळावें माघारें ॥ ५३ ॥ मुद्गल तोमर फरश । खड्गाचे हाणिती अवश । गदायुद्ध असमसास । ऐसें प्रवर्ततां ॥ ५४ ॥ राहिलिया अश्वगती । वीर वीरां भिडती । नेटांचे पायां येती । सत्ववंत ॥ ५५ ॥ भंगलिया अश्वदळा आधारु । मागें रथांचा असे भारु । समस्तु भंगला परिवारु । तेथें राहे ॥५६॥ मग शस्त्रास्त्रयोगें प्रवीण । प्रेरूं जाणती बाण । विद्यामंत्र आंगवण । येणेंयोगें ॥ ५७ ॥ ऐशी हे दळाची रचना । सर्वथा न कळे आना । तुझा शिष्यु द्रोणा । ह्मणोनि भला ॥ ५८ ॥ मातें दृष्टी पाहतां । दुर्गम तंव माने चित्ता । परंतु येक आतां । विनवितु असे ॥ ५९ ॥ तुवां पहावे स्वयें दृष्टीं । गोष्टी जाणवैल खरी खोटी । बुद्धि आठवैल ते पोटीं । आपुलांचि राखावी ॥ ३६० ॥ आधीं दृष्टीं अवलोकावें । मग विचारेंही पहावें । टिके तेंचि करावें । येथें आपण ॥ ६१(३) ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

इतुलें रायाचें बोलणें । परिसोनि सावधानपणें । संजयो त्याप्रति वचनें । बोलता झाला ॥ ३९ ॥ पांडवसैन्य रचलें । देखोनि समीप पातलें । राजा दुर्योधनु तो येणें काळें । काय करिता झाला ॥४०॥ वेगेशीं रथ पेलून । द्रोणाचार्याप्रति जाऊन । बोलता जाला वचन । तेंचि कैसें ॥ ४१ ॥ दुर्योधनु ह्मणे महावीर्या । प्रतापें तपतया श्रीसूर्या । माझें वचन द्रोणाचार्या । अवधारीं पां ॥४२॥ हे पांडवांची थोर सेना । पाहे चालली आंगवणा । अवलोकीं पां अनुमाना । करी येथ ॥ ४३ ॥ आतां ते सेना कैसी । सांगिजैल तूं परियेसी । कां तें अवगमिली तैसी । अनुवादैन ॥ ४४ ॥ बुद्धीचा पूर्ण सागरू । राया द्रुपदाचा कुमरु । धृष्टद्युम्न पवित्रु । शिष्य तुझा ॥ ४५ ॥ तेणें हे रचिली सेना । मानवलों मी चतुरपणा । दळवाई होये शाहाणा । पांडवांचा ॥ ४६ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

व्यूहरचनेनें रचिले । तें पांडवांचे सैन्य देखिलें । देखोनि दुर्योधनें काय केलें । संजय ह्मणे तें आइक ॥ ५९ ॥ तेव्हां राजा दुर्योधन । द्रोणाचार्याप्रति हें वचन । जवळी येऊन भाव गहन । बोलता जाला ॥१६०॥ अजी आचार्य मोठी हे । पांडुपुत्रांची सेना पाहे । व्यूह रचनेनें रचिली आहे । तुझ्याच शिष्यें ॥ ६१ ॥ जी तुमचा शिष्य परी । तुझापरीस शाहणा भारी । हा भाव धरूनि अंतरीं ।

बुद्धिमंत ह्मणे द्रुपदपुत्र ॥ ६२ ॥ कीं तुमच्या वधालागीं वैरी । द्रुपदपुत्र उत्पन्न करी । तो तुमच्चेच पाय धरी । विद्या सांगा ह्मणोनि ॥ ६३ ॥ तो बुद्धिमंत ह्मणे द्रुपदपुत्र । तुह्मी शहाणे नव्हां अणुमात्र । कीं आपला मृत्यु तो पात्र । केला शस्त्रास्त्रविद्येशीं ॥ ६४ ॥ भाव कीं या महत्कार्या । ह्मणीं ऐसाच आचार्या । असावध होसी गुरुवर्या । ह्मणोनि व्यंगोक्ति बोलतो ॥ ६५ ॥ आतां तरी सावध राहे । ह्मणोनि ह्मणतो हे वीर पाहे । कीं बहुतेक जो तो आहे । महारथी यांत ॥ ६६ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

संजयो ह्मणे राया ऐक । देखिलें पांडवांचें कटक । जें व्यूह क्रमें राहिलें निकें । त्यांतें देखोनि ॥ २२ ॥ दुर्योधन काय करिता झाला । द्रोणाचार्याजवळि गेला । मग काय बोलता जाला । राजा वचन ॥२३॥ आचार्या पांडवसैन्य पाहे । व्यूहकर्म मांडिलें आहे । धृष्टद्युम्नें महायोरें हें । तुझियानि शिष्यें ॥ २४॥ तो बुध्दिमंतु महावीरु । चक्रव्यूह–रचना–चतुरु । अनेकीं युक्ती युद्ध करूं । जाणे तो ॥ २५ ॥ ऐसेनि तेणें ऐक । रचिलें असे कटक । तेथें असती वीरनायक । त्यांतें सांगेन ॥ २६ ॥

## निवृत्तिदेव

देखोनि पांडवसैन्य सुरचित । आचार्याप्रती जाऊनि त्वरित । राजा दुर्योधन यथोचित । बोलता जाला ॥ २ ॥ राजा ह्मणे पाहे पां आचार्या ईतें । सुरचित पांडवसैन्यातें। द्रुपदपुत्रें धीमंतें । तुझियानि शिष्यें ॥ ३ ॥

## उद्धवचिद्घन

सवाईः— पाहुनि पांडवसैन्यविभू दृढ राव सुयोधन जो गुढबुद्धी ।
श्रीगुरु–द्रोणरथानिकटीं मग येऊनिया शिरिं पाऊल वंदी ॥
जोडुनिया कर किंकर त्यापरि बोलत वाक्यपरायणबुद्धी ।
तें तुजला कथुं गुह्य सविस्तर सावध बैसुनि ऐक त्रिशुद्धी ॥ २ ॥
पाहि ह्मणे गुरुवर्य कृपानिधि पांडवसैन्यविभू रणरंगीं ।
रचियेलें दळ जोथिल तेथाचि फार भयंकर युद्धप्रसंगीं ॥
जो द्रुपदात्मज शिष्य तुझा गुढ सैन्यपती तिकडे हरिसंगीं ।
युद्धविशारद शुद्ध मनीं बहु बुद्धिमतांतहि श्रेष्ठ निसंगी ॥ ३ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

संसाराचा विवेकें जय करी । ह्मणोनि संजय जो नामधारी । तो धृतराष्ट्राशी वदे वैखरी । कुरुक्षेत्रीं वर्ततें तें ॥ ४ ॥ देखोनि पांडवांचे सिद्धभार । दुर्योधन योजका नरेश्वर । द्रोणाचार्यापासीं येऊनि उत्तर । राजा सादर बोलता झाला ॥ ५ ॥ पाहाजी पांडुनंदनाची । आचार्या महती चमू साची । रचिली धृष्टद्युम्नें ज्याची । बुद्धि युक्तावि जो शिष्य तुमचा ॥ ६ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

पांडवसैन्यालागोनि । दुर्योधनें देखोनि नयनि । आचार्यापासीं त्वरें जाऊनि । राजा वचन बोलिला ॥ २३ ॥ देख पंडुपुत्रांचा । आचार्य, समुदाय सैन्याचा । विहु रचणार पुत्र द्रुपदाचा । जो शिष्य तुमचा धीमति ॥ २४ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

इंद्रवज्राः— संजूत ठालें परसैन्य जेव्हां । देखोनि दुर्योधन शीघ्र तेव्हां ॥
द्रोणाचिया जाउनि संनिधानीं । जें बोलिला तें परिसे स्वकानीं ॥ ६ ॥
मोठें गुरूजी दळ पांडवांचें । चातुर्य देखा द्रुपदात्मजाचें ॥
केला तुह्मी शिक्षित जो प्रमाणें । हा व्यूह तेणें रचिला सुजाणें ॥ ७ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

संजय ह्मणे रायासी । पांडवसैन्य परियेसीं । राजा सांगे द्रोणासी । तयाजवळी येऊनि ॥ २ ॥ आचार्य पांडवसैन्य पाहे । द्रुपदपुत्रें रचना केली आहे । तुझाच शिष्य होये । बुद्धिबळें अधिक ॥ ३ ॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः— हांसोनि संजय बोले ऐक राया । पांडवी सेनिया बळिवंत ॥
निजबळदर्पें चढला अभिमाना । दुर्योधना येणें गुरूपासीं ॥
दास तुका बोले द्रोणाचे संनिध । राजा उपबोध करी काय ॥ २ ॥
पाहाजी पांडवसेनासमुदाव । सजवीला जीव घ्यावयासी ॥
शस्त्रें कवचें टोप लेऊनि सजिले । उतावेळ भले झुंजावया ॥
आचार्या शहाणे नव्हत पांडव । परी राखी नांव धृष्टद्युम्न ॥
शिष्य हा तुमचा विद्या तुह्मी दिली । उपकारा आली ऐसें जालें ॥
द्रुपदाचा पुत्र अग्निगर्भी जाला । बुद्धीमध्यें भला तुका ह्मणे ॥ ३ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्ः— रचिलें पांडवदळ तें दुर्योधन देखुनी । राजा वचन हें बोले द्रोणाजवळ येउनी ॥ १६ ॥
पाहे ही पांडवी सेना आचार्या थोर जे बहु । तुझ्याच शिष्यें रचिली शहाण्या द्रुपदात्मजें ॥ १७ ॥

## मोरोपंत

आर्याः— तेव्हां पंडुसुतांची पाहुन सव्यूह सैन्यरचना ते ।
वेगीं द्रोणाजवळीं येउनि बोले नृपाळ वचनातें ॥ २ ॥

हे आचार्या स्वामी पांडवसेना पहावया शर्नें ।
धृष्टद्युम्नें व्यूहा रचिलें शिष्यें तुझ्याच सुज्ञानें ।। ३ ।।
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
रचलें पांडवबळ तें दुर्योधन देखुनी तया काळीं ।
तो राजा वचन असें द्रोणाच्याजवळि येउनी बोले ।। २० ।।
पाहे हे आचार्या पांडवसेना पुढें उभी मोठी ।
रचिली द्रुपदसुतानें शिष्यें तुझियाचि बुद्धिसंपन्नें ।। २१ ।।

## वामन—( द्विजोत्तम )

संजय बोले धृतराष्ट्राप्रति । पांडवांचें सैन्य व्यूहगति । रचिलें देखोनि द्रोणाप्रति । जाऊनि दुर्योधन बोलता जाला ।। २ ।। पांडवसैन्य पाहि गुरु । तुझा शिष्य बुद्धिसागरु । धृष्टद्युम्न द्रुपदाचा कुमरु । तेणें व्यूह रचियेला ।। ३ ।।

**अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।**
**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ।। ४ ।।**
**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।**
**पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ।। ५ ।।**
**युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान् ।**
**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ।। ६ ।।**

**अर्थः–"या पांडवांच्या सैन्यांत युद्धामध्यें भीमार्जुनासारखे महाधनुर्धर व शूर असे वीर आहेत. युयुधान, विराट, द्रुपद असे महारथी; धृष्टकेतु, चेकितान व काशिराजासारखे वीर्यवान; पुरुजित्, कुंतिभोज, शैब्य यासारखे नरपंगुव; विक्रमशाली उत्तमौजा, वीर्यवान युधामन्यु, सुभद्रेचा पुत्र व द्रौपदीचे सर्व पुत्र येथें आहेत आणि हे सर्वच महारथी आहेत.**

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका (ज्ञानेश्वरी ) "

आणिकही असाधारण । जे शस्त्रास्त्रीं प्रवीण । क्षात्रधर्मीं निपुण । वीर आहाती ।। ९६ ।। जे बळें प्रौढी पौरुषें । भीमार्जुनासारिखे । ते सांगेन कौतुकें । प्रसंगेंचि ।। ९७ ।। एथ युयुधान सुभटु । आला असे विराटु । महारथी श्रेष्ठु । द्रुपद वीरु ।। ९८ ।। चेकितान धृष्टकेतु । काशिराज-वीर विक्रांतु ।

उत्तमौजा नृपनाथु । शैब्य देख ॥ ९९ ॥ हा कुंतिभोज पाहे । येथ युधामन्यु आला आहे । आणि पुरुजितादि राय हे । सकळ देख ॥ १०० ॥ हा सुभद्राहृदयनंदनु । जो अपर नवार्जुनु । तो अभिमन्यु ह्मणे दुर्योधनु । देखें द्रोणा ॥ १ ॥ आणीकही द्रौपदीकुमरु । हे सकळही महारथी वीरु । मिति नेणिजे परी अपारु । मीनले असती ॥ २ ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

पांडवसैन्यीं वीर जाण । युद्ध करणार भीमार्जुन । तयासमान विराट आणि युयुधान । द्रुपदही महारथी ॥ ४ ॥ धृष्टकेतु चेकितान । काशिराजा वीर्यवान । पुरुजितु अति तीक्ष्ण । कुंतिभोज शैब्य हे नराधिपति ॥ ५ ॥ युधामन्यु पराक्रमी बहुत । उत्तमौजा वीर्यवंत । सौभद्र आणि द्रौपदीचे सुत । सर्व हे महारथी ॥ ६ ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

हें पांडवदळ येथें थोर । मीनले असती महाधनुर्धर । समरंग योद्धे महावीर । भीमार्जुन मुख्यकरूनि ॥ ८० ॥ येथें युयुधान विराट नृपती । आणि द्रुपद महारथी । निजबळप्रतापें आले असती । सैन्य संप्रती घेऊनी ॥ ८१ ॥ धृष्टकेतु आणि चेकितान । काशिराजा वीर्यवंत जाण । प्रतापें शोभती पूर्ण । तिघेजण पाहे पां ॥ ८२ ॥ पुरुजित् आणि कुंतिभोज नृपती । शैब्य बळियामाजि श्रेष्ठ अती । यांचां ठायीं दृढतर वृत्ती । संग्रामाची दिसतसे ॥ ८३ ॥ युधामन्यु आणि विक्रांत । उत्तमौजा वीर्यवंत । हे दोघेही नृपनाथ । सुशोभित वीरश्री या ॥ ८४ ॥ अभिमन्यू सुभद्रेचा नंदन । जो दुसरा सहस्रार्जुन । धाकटा परी अति गहन । शौर्यसंपन्न दिसतसे ॥ ८५ ॥ पैल द्रौपदीचे कुमर । स्वामी तूं पाहें सादर । बुद्धि अत्यंत करूनि निर्धार । आले असती संग्रामा ॥ ८६ ॥ ऐसे हे सकळ महारथी । पांडवदळीं मीनले असती । असो हे आतां आपली सैन्यस्थिती । अवधारी जी आचार्या ॥ ८७ ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

तेंचि आतां श्लोकत्रयेंकरून । वीर सांगेन त्यांचे अति दारुण । जे कां असती भीमार्जुनसमान । एकाग्र मन करूनि आइका ॥ ८२ ॥ अहो यया पांडवाच्या दळीं । एकु धृष्टद्युम्नी नाहीं बळी । ऐसी अनेक वीरमंडळी । काळासी आकळी एक एक ॥ ८३ ॥ ह्मणूनि हे उपेक्षणीय नव्हती । यांसी युद्धप्रयत्न करावा सर्वार्थी । आतां शूर तेही सांगों तुह्मांप्रती । एकाग्रचित्त परियेसा ॥ ८४ ॥ जयांचें धनुष्यचि उचलावया । सामर्थ्य नाहींच कोण्हाही राया । सामर्थ्य कोणा सज्ज करावया । परी सद्गुरुराया, वीरधीर ऐसे ॥ ८५ ॥ महाधनुष्यधर्ते तरी अति कुशल । युद्धाच्या ठायीं अतिशयें प्रबळ । भीमार्जुनासारिखे जयांचें बळ । अति निर्मळ पवित्रपणें ॥ ८६ ॥ तरी युयुधान ह्मणिजे सात्यकि जाण । दुसरा विराट वीर अतिदारुण । आणि द्रुपद तुह्मा शत्रु जाण । महारथी पूर्ण थोर वीर ॥ ८७ ॥ अथवा युयुधान विराट द्रुपद । हे तिघे महारथी जाण प्रसिद्ध । आणि धृष्टकेतु चेकितान अति प्रबुद्ध । जाणती युद्धकळा सर्व ॥ ८८ ॥ तिसरा काशिराज नृपति । हे वीर्यवंत तिघे पराक्रमी अति । पुरुजित् कुंतिभोज शैब्य सर्वार्थी । थोर अति नरामाजी ॥ ८९ ॥ नरपुंगव ऐसें विशेषण । तिघांही वीरांचें अतिभूषण । आणि

युधामन्यु अतिविक्रांत दारुण । उत्तमौजा जाण वीर्यवंतु ॥ २९० ॥ अथवा सर्वही सर्वांचीं विशेषणें । एक एकाच्या प्रतापें त्रैलोक्य ठेंगणें । तैसाचि हा सुभद्रानंदन जाणणें । कृतांतपणें तिष्ठतु असे ॥९१॥ अहो सुभद्राहृदयनंदनु । हा महाप्रतापी दुसरा अर्जुनु । तो वीरांमाजी श्रेष्ठ अभिमन्यु । तेजें भानु तैसा दिसे ॥ ९२ ॥ आणि द्रौपदेय जे द्रौपदीचे कुमार । प्रतिविंध्यादिक पांचांचे पांच वीर। 'च' कार मूळीं असे तयाचें अर्थांतर । अन्यकुमारही होते तयाचे ॥ ९३ ॥ तरी धर्मराजाचा प्रतिविंध्य जाण । भीमसेनाचा सुतसोम दारुण । अर्जुनाचा महावीर चित्रसेन । नकुळाचा पूर्ण शतानीक ॥ ९४ ॥ सहदेवाचा पुत्र श्रुतकीर्ति । हे पांचही द्रौपदीचे पुत्र महामति । पांचहीजण हे जाण महारथी । जैसी मूर्ति पांडवांची ॥ ९५ ॥ पांडव्यराज घटोत्कचादिक । पांचांहि बंधूंचे पुत्र सकळिक । आणिकां स्त्रियांपासूनि उत्पन्न देख । नामविशेष लिहावा किती ॥ ९६ ॥ पांचही पांडव अतिप्रसिद्ध असती । ते तरी ठाऊकेचि आहेति तुह्मांप्रती । ह्मणोनि तयांचीं नामें श्लोकोक्तीं । नाहीं उक्ती मूळग्रंथीं ॥ ९७ ॥ ह्मणोनि सप्तदश वीर महाथोर । तुजप्रति वाखाणिले अति घोर । आणिकहि तयाचे महाशूर । सर्वही थोर महारथी ॥ ९८ ॥ परी तयामाजी अर्धरथी एकरथी । सर्वथा कोण्हीच वीर नसती । महारथी हें उपलक्षण परी अतिरथी । सर्व असती महावीर ॥ ९९ ॥ ययांच्या शेवटील जो वीर असे । तोही महारथी जाण सर्वांशें । महारथी अतिरथी याचें लक्षण ऐसें । सांगों विन्यासें परियेसीं ॥ ३०० ॥ ॥ संमति ॥ एको दशसहस्राणि योधयेद्यस्तु धन्विनाम् । शस्त्रशास्त्रप्रवीणश्च महारथ इति स्मृतः ॥ अमितान्योधयेद्यस्तु संप्रोक्तोऽतिरथस्तु सः । रथस्त्वेकेन यो योद्धा तन्न्यूनोऽर्द्धरथःस्मृतः ॥ ॥ असो दहा सहस्र जे धन्वी असती । तयांसि एकलाचि युद्ध करी जो रथी । शस्त्रीं आणि तच्छास्त्रीं जो प्रवीण अति । महारथ ह्मणती तयातें ॥ १ ॥ आणि अपरिमितां धनुर्धरांशीं । युद्ध करी तो अतिरथी परियेसीं । आणि युद्ध करी जो एकेचि रथेंसी । एकरथी ह्मणती त्यासि संत ॥ २ ॥ तयाहूनि न्यून तो अर्धरथी । ऐसीं लक्षणें जाण पां सर्वार्थी । पांडवदळीं तरी सर्व अतिरथी । सद्गुरुमूर्ति जाण तूं ॥ ३ ॥ तंव द्रोणाचें मनोगत जाणोनी । मागुता दुर्योधन बोले पुरुषार्थवचनीं । जे तुह्मी ह्मणों पाहतां मजलागूनी । सांगसी निर्वाणीं बळ त्यांचें ॥ ४ ॥ पांडवांचे दळ असे अतिदारुण । तें देखोनि भयभीत जरी तुझें मन । तरी संधि करावा मैत्रीकरून । विग्रहें कोण कार्य असे ॥ ५ ॥ ऐसा आचार्याचा अभिप्राय पूर्ण । दुर्योधनें स्वबुद्धीनें जाणोन । नेटें बोले वीर उत्साहवचन । संतोषवून स्वकीयांतें ॥ ६ ॥

## रमावल्लभदास—"चमत्कारी" टीका

तेथें योद्धे नांवानिगे असती । जे शस्त्रविद्येनें पूर्ण दिसती । भीमार्जुनसमान विराजती । प्रचंड चापधारी जे ॥ ३१ ॥ युयुधान विराट द्रुपद । हे तिघे महारथी विशद । आणिकही धरूनियां मद । युद्धालागीं सरसावले ॥ ३२ ॥ धृष्टकेतू चेकितान । काशीराज महावीर्यवान । पुरुजित् कुंतिभोज कीर्तिमान । शैब्यही नरपुंगव ॥ ३३ ॥ बलाढ्य युधामन्यु फार । तैसा विक्रांतही साचार । उत्तमौजा अपार । वीर्यवंत सौभद्रही ॥ ३४ ॥ आणिकही पुत्र द्रुपदीचे । बोलिजताति बलाचे । ऐसे महारथी वाचें । किती काय अनुवादूं ॥ ३५ ॥

## दासोपंत—"गीतार्णव"

येथें पाहतां निर्वाणीं । जे जे पांडवांच्या सैन्यीं । मातें दिसे नयनीं । तेचि बोलैन ॥ ६२ ॥ [ शूराः ]

महा महा असती शूर । प्रतापवंत पवित्र । नीतीचे ठायीं सादर । तेचि कैसे ॥ ६३ ॥ [ महेष्वासाः ] धनुवाड्यामाजी मेरु । बाणांतें जाणती प्रेरूं । शस्त्रास्त्रविद्याभारु । बहुसाळु जयांप्रति ॥ ६४ ॥ [ युधि ] आणि युद्धाच्या ठायीं प्रवर्तले । मंत्रसामग्रिया विद्यावलें । धैर्यें चातुर्यें आगळे । पराक्रमें कैसे ॥ ६५ ॥ [ भीमार्जुनसमाः ] जैसे हे भीमार्जुन । आचार्या सत्य जाण । तैसेचि तयांशीं समान । सर्वां पक्षीं ॥ ६६ ॥ अर्जुनाचि अवघे ह्मणावे । भीमसेनचि सत्य मानावे । आगळाचि परी उणा नव्हे । येकु येका ॥ ६७ ॥ केवळ अग्नीचें स्वरूप । सारिखेचि जैसे दीप । लागले मग अमूप । संग्रामीं होतां ॥ ६८ ॥ गव्हाळे तैसेचि शंखपाळ । विषधर सारिखेचि व्याळ । दर्दुरें किती बळ । करावें तेहींसीं ॥ ६९ ॥ विषाचा मेघु वोळे । तैं कवणें बिंदुवें आंग न जळे । तैसे खवळले ना खवळले । मग सारिखेचि हे ॥ ३७० ॥ सिंह जैसे यातीचे । सारिखेचि पराक्रम तयांचे । तेथें गेले गजांचें । काये चाले ॥ ७१ ॥ विष्णुचे जैसे अवतार । ह्मणो न येती सान थोर । तैसे प्रतापें समग्र । सारिखेचि हे ॥ ७२ ॥ सागराचे जैसे वेग । उदकाचें समान अंग । तैसे धर्मवंत अभंग । संग्रामीं हे ॥ ७३ ॥ सारिखीचि निष्ठा स्वधर्मी । सारिखेचि संग्रामधर्मी । सारिखेचि बलपराक्रमीं । वीर पां हे ॥ ७४ ॥ बावनकस निखळ । सारिखेचि कनकगोल । येक वानें येक मोल । रूप येक ॥ ७५ ॥ पांडवांचां दळीं तैसे । वीर आपुल्यालेनि आवेशें । समान समान ऐसे । जाण पुनः पुनः ॥ ७६ ॥ वरि अनंतु तो पाठिराखा । अधिकार हा आइका । यये अर्थी आशंका । ते आथीचिना ॥ ७७ ॥ आतां भीमा-अर्जुनासमान । योद्धे ते कवण कवण । राजे पृथ्वीपाळ आन । तयांचें संबंधी ॥ ७८ ॥ ऐसा प्रश्न कराल । तरि तेही सागिजतील । आता मन निश्चळ । करूनि आइका ॥ ७९ ॥ [ युयुधानः ] ईश्वराचा तृतीय नयनु । तया आगळा कां समानु । तो राजा युयुधानु । आपुलेन सैन्येंशीं ॥ ३८० ॥ देखिलाचि पुरे नयनीं । भिडतां युयुधानु रणीं । काळिजाचें होये पाणी । महा शूरां ॥ ८१ ॥ सांडूनि जावें रणा । देखोनि युयुधाना । तयाची वेगळीचि सेना । पैल पाहें ॥८२॥ आला रे आला ह्मणती । वैरी सन्मुख न होती । हातींचीं शस्त्रें गळती । तो हा युयुधानु ॥ ८३ ॥ प्रतापाचा हा सागरु । प्रकोपाचा महापूरु । युयुधानु नरेंद्रु । पांडवदळी ॥ ८४ ॥ [ विराटश्च ] प्रतिमा देखोनि जयाची । हृदयें कांपती शूराची । सेना तया विराटाची । पैल पाहें ॥ ८५ ॥ मेरूशीं तुक साहे । ऐसा पर्वतु कें आहे । विराटु हो जोगा नोहे । आह्मां ॥ ८६ ॥ जयाचेनि शब्दें भयंकरें । गळती हातींचीं हतियारें । कवणाशीं शूरें । विराटे भिडावे ॥ ८७ ॥ पादघातु हाणे त्राणें । तैं दणाणिती चौदा भुवनें । वैरी नुरती प्राणें । तितुलेचि ॥८८॥ मर्यादा नाहीं दहना । जैं तो लागे इंधना । तैसा भिडतां आंगवणा । राजा विराटु ॥ ८९ ॥ आपलेनि सैन्येशीं निराळा । पैलु पाहे असे रचला । कवणें कवणें तया महा-काळा–।–पुढें निघावे ॥ ३९० ॥ [ द्रुपदश्च महारथः ] तयाचि ऐसा समानु । महारथी द्रुपद आनु । तो राखे तरिचि मानु । आपुला होये ॥९१॥ तंवचि पुरुषार्थ बोलती । जंव तो द्रुपदु न देखिती । मग महा वीर कांपती । मनामाजी ॥ ९२ ॥ भुजा कवणु उचलील । ब्रीद कवणु वागवील । अहं कवणु ह्मणेल । द्रुपदेवीण ॥ ९३ ॥ प्रलयकाळु तो वैरियां । अवधारीं द्रोणाचार्या । द्रुपदाचिया वीर्या । कवणें सहावे ॥ ९४ ॥ काळाची जैशी मिठी । तैशी येणेंशीं पडतां गांठी । पुढें होतां कंठीं । प्राणु येकवटे ॥ ९५ ॥ ऐसा द्रुपद असंवरु । वेगळाचि तयाचा भारु । पांडवदळीं हा झुंजारु । आगळा बहू ॥ ९६ ॥ येणें वीरेंशी समान । वीर असती आन । आतां तयांचें ज्ञान । करीन तुजप्रति ॥९७॥ [ धृष्टकेतुः ] वैरियांचा पुरवी अंतु । ऐसा तो राजा धृष्टकेतु । तेणेंशीं भिडावया समर्थु । दुसरा

नाहीं ॥ ९८ ॥ जयाचा येकुचि हातु । जिंके ऐसा विख्यातु । यया पुरत्रया आंतु । कव्हणही नसे ॥ ९९ ॥ देखता जयाचे चिन्ह । शरीरी न थरती प्राण । पळावया असमर्थ चरण । वेंगडी वळती ॥ ४०० ॥ आंगवणेचिया लाठिया । न पाहे क्षत्रियां सर्वां । जो न देखिजे तंव जीवां । संतोषु वर्ते ॥ १ ॥ येकलाचि पुरे रणी । तर्‍ही वरि करी धरणी । येरातें शस्त्र घेऊनि । काजचि नसे ॥ २ ॥ निज सैन्येसीं निगळा । धृष्टकेतु पाहें डोळां । आतां कैंची जीवनकळा । कौरवांतें ॥ ३ ॥ [ चेकितानः ] तैसाचि तेणेसीं समानु । राजा पाहे चेकितानु । स्वसैन्येशी आपणु । वेगळाचि मांडला ॥ ४ ॥ शेवटु जाला जन्माचा । ऐसा मनोभाव होये शूरांचा । पराक्रमु यया चेकितानाचा । देखोनियां ॥ ५ ॥ चेकितानु ह्मणिजे कैसा । कुंजरावरि केसरी जैसा । ‘ आतां सांडा रे जीवाशा ’ । ह्मणती क्षत्री ॥ ६ ॥ करणे सागरु उलंडावा । मनुजें पर्वतु लोटावा । चेकितानु आंगवावा । निज पराक्रमें ॥ ७ ॥ द्रोणाचार्या अवधारी । चेकितानु नसता जरि । तरि येथें युद्धसामग्री । करितां बरें ॥ ८ ॥ येणें काळें दुश्चिन्ह । हाचि येथ विघ्न । तंव येणेंशीचि समान । बळ आणिकांचें ॥९॥ [ काशिराजश्च वीर्यवान् ] काशिराजु वीर्यवंतु । अति समर्थु अति समर्थु । पुरत्रयी विख्यातु । प्रतापु जयाचा ॥४१०॥ देखोनि जयाचीं शस्त्रें । चळचळा कापती गात्रें । कदलीदळ समीरें । जैसें स्पर्शलिया ॥ ११ ॥ रणा आलियां सांकडें । वीर पाहती मागे पुढें । जया आपुले पवाडे । तेचि आवडती ॥ १२ ॥ रोषावेशाची उकळी । ते जैशी प्रळयकाळीं । महारुद्राची पेटली । नयनप्रभा ॥ १३ ॥ मर्यादा न सांडी नियमाची । युद्ध हे क्रीडा जयाची । वर्णना तया शूराची । किती करूं ॥ १४ ॥ तो आपुलेनि निजभारें । वेगळाचि ठेला धैरें । आता येथूनि पुरे । युद्धाचे मत ॥ १५ ॥ [ पुरुजित् ] जयाचेनि प्रतापें । पुरत्रय हें कांपे । सूर्यो जैसा तपे । वैरियावरि ॥ १६ ॥ पराक्रमें जो अगणित । पवित्र राजा पुरुजित । पुरवू शके अंत । येकलाचि तो ॥ १७ ॥ आइके आचार्यशिरोमणि । पुरुजित देखिला नयनी । आतां पुढील करणी । ते कठीण जाणवे ॥ १८ ॥ रण देखोनि मातला । मग तो नवचे आगवळा । आतां हा वैरी जाला । पाडवाकरिता ॥ १९ ॥ पृथ्वीवरि हा येकु । पुरुजितु वीरु टणकु । संग्रामविषयीं निःशंकु । प्रवर्तला ॥ ४२० ॥ आपुलेनि सैन्येसीं निराळा । पुरुजितु आधी माडला । तुह्मी पहा आपुला डोळां । बोले दुर्योधनु ॥ २१ ॥ [ कुंतिभोजश्च ] दुसरा तैसाचि आणिकु । पराक्रमी महामंडलीकु । कुंतिभोजु ग्रासकु । काळु दुजा ॥ २२ ॥ येणेचि येकें काये नव्हे । कामया क्षत्री मेळवावे । आतां येथूनि बरवें । न पडे दृष्टी ॥ २३ ॥ धगधगीतु वैश्वानरु । कीं हा क्षत्रियांमाजी मेरु । क्षात्रविद्येचा सागरु । कुंतिभोजु ॥ २४ ॥ येणे काळातें आकळावें । महाकाळेसी भिडावे । मानवांजोगें नव्हे । ययाचें बळ ॥ २५ ॥ कुंतिभोजु ह्मणिजे कैसा । प्रलयकाळींचा अग्नि जैसा । परदळाचिया हारासा । येकु पुरे ॥ २६ ॥ कुंतिभोजु हा स्वबळेंसी । मीनला असे पांडवासि । वेगळाचि असे तयासि । पहा दृष्टीं ॥ २७ ॥ [ शैब्यश्च नरपुंगवः ] पुरुषामाजी जो पुरुषु । क्षत्रियां जयाचा त्रासु । पराक्रमें असमसासु । शैब्य राजा ॥ २८ ॥ वज्राचे होय पाणी । राया शैब्यातें देखोनि । हाये ह्मणिजे देवगणीं । ऐसा योद्धा ॥ २९ ॥ नामरूपवानें सारावे । हा नाहीं तरिचि तें बरवें । दृष्टीं पडतां नुचलवे । वरुती मान ॥ ४३० ॥ वाणाचा वर्षतां महावोघु । प्रतापाचा ये वोघु । शैब्या न पुरे जगु । येकल्यातें ॥ ३१ ॥ आंगवणेचेनि गुणें । गरलाचि असे साभिमानें । देईल की नेदील प्राणदानें । हेंचि वाटे ॥ ३२ ॥ ऐसा शैब्य हा समर्थु । निजपरिवारसहितु । पैलु येकलाचि शोभतु । पांडवामाजी ॥ ३३ ॥ [ युधामन्युश्च विक्रांतः ] धीटु दाटुगा दमनशील । युधामन्यु तो प्रळयानळु । जेणेंसीं होतां आढळू ।

पुरे जिणें ॥ ३४ ॥ जुनाटु झुंझारु हा येकु । नाहीं जयातें कलंकु । युद्धीं वारला क्षणेकु । ऐसा नव्हे ॥ ३५ ॥ स्वतेजें तेजहरण । वैरियांचें आक्रमण । येणेंचि येकें निर्वाण । करूं शकावे ॥ ३६ ॥ तैसाचि विक्रांतही जाण । जेणेंसी न शकती देवगण । असंवर करी संधान । प्रतापवंतु ॥ ३७ ॥ प्रतिज्ञा करूनि झुंझणें । सावधान करूनि मारणें । अचूक संग्रामीं जिंकणें । वैरिकुळ ॥ ३८ ॥ ऐसे हे दोघे जाण । समानधर्मसंपन्न । एक एकाचे प्राण । कीं जीव दोवेही ॥ ३९ ॥ [ उत्तमौजाश्च वीर्य-वान् ] धैर्यवंतु वीर्यवंतु । उत्तमौजा बळवंतु । क्षत्रियांमाजी विख्यातु । सर्वदा जो ॥ ४४० ॥ पृथ्वी देखोनि जया कांपे । मेरु भरेंचि चेंपे । सूर्यो व्योमीं न तपे । तपतां यया ॥ ४१ ॥ शब्दें ब्रह्मांड दणदणी । न शकिजे राहो रणीं । उत्तमौजा हा चालोनि । आला असतां ॥ ४२ ॥ दुःसहु दुर्धरु दुर्वार्यु । उत्तमौजा काळु क्षेयु । पाडवां जाला प्रियु । बरवें नव्हे ॥४३॥ भय शंका ना अधैर्य । करितां युद्धाचें कार्य । चढोंचि लागे वीर्य । सामर्थ्य आंगीं ॥ ४४ ॥ ऐसा हा बळिया राजा । महा वीरु उत्तमौजा । पैलु वेगळाचि जाणिजा । पांडवदळीं ॥ ४५ ॥ [ सौभद्रः ] प्रळयकर्ता त्रिनयनु । तैसा हा सुभद्रानंदनु । अरिवर्गकुळदीपनु । तावी स्वतेजें ॥४६॥ शस्त्रास्त्रविद्यासामग्री । हे जयापासीं पुरी । आता वैरियांचा घरीं । यश येणें ॥ ४७ ॥ दुसरा जाणावा अर्जुनु । कीं भीमु हा अभिमन्यु । साना अथवा सामान्यु । बोलता नये ॥ ४८ ॥ लक्ष तेथ बाणु । वेगु जयाचा दारुणु । रणशृंगार-व्युत्पन्नु । विदग्धु योद्धा ॥ ४९ ॥ अरिकुळवनीं कुठारु । महाविष्णूसी झुंझारु । येणेंसीं मांडतां वीरु । कव्हणचि नसे ॥ ४५० ॥ ऐसा सौभद्र वेगाडा । पांडवांमाजी फुडा । द्रोणा पाहें निजगडा । नेटका कैसा ॥ ५१ ॥ [ द्रौपदेयाश्च ] द्रुपदीचे पांचही जण । ते तयाचि असती समान । आतां कवण ते कवणापासून । जाले सुत ॥५२॥ धर्मापासाव जाला । द्रुपदीतें प्रतिविंध्यु आपुला । सुतसोमा उपजला । वृकोदरें तेणें ॥ ५३ ॥ अर्जुनापासाव द्रुपदीते । श्रुतकीर्ति जाणा निरुते । शतानीकु नकुळातें । जाला द्रुपदीपोटीं ॥ ५४ ॥ सहदेवें श्रुतकर्मा जाणु । जाला पांचाळीपासूनु । यया पाचांचा समानु । पराक्रमु असे ॥ ५५ ॥ पांचा वदनीं त्रिनयनु । प्रलयकर्ता जैसा आपणु । तैसाचि काये सगुणु । जाला यांचेनि रूपें ॥ ५६ ॥ पांचही योद्धे हे अनिवार । शस्त्रास्त्रविद्येचे सागर । शूळधरेसीं झुंझार । ह्मणों काये ॥ ५७ ॥ जयांवरूनि वायो गेला । तोचि न साहवे शूरां सकळां । कवणें सहावें हालाहाला । तैसें वाटे ॥ ५८ ॥ ययांसी युद्ध करणें । तें आधीं आयुष्यें सुटणें । आपुलें पोष्यें घालणें । येकांचां पालवीं ॥ ५९ ॥ निवारणचि जयाचिया । बाणां नाहीं आचार्या । दशभुजीं दशदिशा तिया । आक्रमिती हे ॥ ४६० ॥ रिघाले परदळीं माघारे । हेंचि नेणती वीर खरे । दळ भंगिती येकसरें । पगतें हे ॥ ६१ ॥ आले ह्मणतांचि पळावे । कां उगेचि शरण रिघावे । प्राणधन जोडावे । जोडे जरि ॥ ६२ ॥ धैर्यें सत्वें पराक्रमें । सारिखेचि संग्रामधर्में । जाणोनि हाणती वर्में । ऐसे दक्ष ॥ ६३ ॥ [ सर्व एव महारथाः ] एवं युयुधानु आणि विराटु । द्रुपदु योद्धा धीटु । चौथा तो धृष्टकेतु येकटु । महा पराक्रमी ॥ ६४ ॥ चेकितानु पाचवा । काशिराजु जाणा सावा । पुरुजितु सातवा । महा वीरु ॥ ६५ ॥ आठवा कुंति-भोज जाणा । शैब्यु नववा तैसाचि माना । युधामन्यु अनुमाना । दहावा वीरु ॥ ६६ ॥ अकरावा उत्तमौजा आहे । बारावा अभिमन्यु पाहे । विक्रांतु प्रतिविंध्यादिक हे । पांचही द्रुपदीचे ॥ ६७ ॥ हे महारथी अठरा जाण । परम श्रेष्ठ असाधारण । भीमा अर्जुना समान । संग्रामविषयीं ॥ ६८ ॥ ययां-वेगळे जे असती । ते ग्रेत्नें आगवूं येती । परंतु दुर्जय महारथी । अठराही हे ॥ ६९ ॥ येकें रथेसीं जो भिडे । तया रायातें फुडे । रथी ह्मणणें घडे । निवाडें न्यून तो अर्धरथी ॥ ४७० ॥ दहा सहस्रांसि

उठावला । तो महारथी ह्मणितला । अमितांसि येकु चालिला । अतिरथी तो ॥ ७१ ॥ ह्मणौनि ते पैं महारथी । पांडवदळीं असती । रण हें शोभत आथी । जयांकरितां ॥ ७२ ॥ आरक्तें पीतें हरितें । छत्रें विचित्रें शुद्ध श्वेतें । साधी जाळियांची बहुतें । बहुतां प्रकारीं ॥ ७३ ॥ कनकदंडें चामरें । वरि ढळती साधीं विचित्रें । तोडर ब्रीदें अपारें । वारुवां पायीं ॥ ७४ ॥ रथचक्रें रत्नजडितें । वरि ध्वजस्तंभ शोभते । नाना वर्णाचे निरुते । शोभा देती ॥ ७५ ॥ येक मर्गजाचे निखळ । रत्नजडित येक केवळ । येक कांचनाचे निर्मल । वोप देती ॥ ७६ ॥ येक निखळ नीळाचे । येक अखंड पाचीचें । येक माणिकां हिरयांचे । खणोखणीं ॥ ७७ ॥ येक साधे येक विचित्र । ऐसे रथ शोभती परिकर । वारू पवनेसीं स्पर्धापर । होते जाले ॥ ७८ ॥ श्वेत पीत आरक्त । चित्रविचित्र बहुत । येक कृष्ण येक शोभत । सेंदुरवर्ण ॥ ७९ ॥ एके पायी दो पायीं । येक विलासले चहूं पायीं । श्वेतें वर्णे जाणयी । मुखावरि ॥ ४८० ॥ सकळां खोर्डा सुटले । सकळां लक्षणीं आथिले । वस्त्रीं अळंकारीं आच्छादिले । दिसतीचिना ॥ ८१ ॥ मोहाळीं पांखरांवरी झांटा । पायीं नोपुरें क्षुद्र घंटा । कंठीं माळा मुखीं पट्टा । जटित सूत्रीं ॥८२॥ पुच्छें वरुतीं वाऊनि । पाउल करिती स्वस्थानीं । अनिवार जैसी नाचणी । स्थिर नव्हे ॥ ८३ ॥ देहीं न पुरे बळा स्थान । वरि सारथियाचें आकर्षण । वारू करिती हिंसाण । पाउलें टायीं ॥ ८४ ॥ तेजें दिपले नयन । भयें व्यग्र जालें मन । कैसें पांगलें हें रण । पांडवसैन्यें ॥ ८५ ॥ मातले कुंजर न सावरती । भूमीतें चरण घांसती । सोंडां पर्वत उलंडिती । आंवरिले असतां ॥ ८६ ॥ भाट नागारी वर्णिती । ब्रीदें रायांचीं वाखाणिती । तेणेंच सुखें विश्रांति । भूपाळातें ॥ ८७ ॥ येक ते रणपिसेंचि आले । कंवर सोडूनि मोकळे । हाकां देती अंत्राळे । भूते जैशीं ॥ ८८ ॥ येक आनंदले गाती । येक रण देखोनि नाचती । एक भुजा मर्दिती । बलाचे जे ॥ ८९ ॥ पर्वतां देती थडके । नेणती आपुले पारिखे । उन्मत्त झाले देखे । ऐसे वीर ॥ ४९० ॥ येक पाहती क्रूरा दृष्टीं । येकां चळवळ मोठी । येके सांगती गोठी । संग्रामनीतीचिया ॥ ९१ ॥ येक येकां पुढारती । चमत्कार वेगें दाविती । साधिली विद्या उजळिती । तये ठायीं ॥ ९२ ॥ बहुतां दिवसांचें पारणें । तें देखिजे मिष्टान्नें । तेथें आळुकेपण ब्राह्मणें । जैसें कीजे ॥९३ ॥ देखोनि मूषकांची मांदी । मार्जारा मांडे गवादी । तीं आकळिलिहीं पादीं । फिस्कारु करिती ॥ ९४ ॥ तैसें असंवर पातले । परिणिती करितां आंकळले । पांडव वैरी आपुले । बळीं कटकीं ॥ ९५ ॥ दुर्योधनु ह्मणे नवल । कैसें या पांडवांचें बळ । उठीना कीं खळबळ । आमुच्या सैन्यीं ॥ ९६ ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

आतां यये दळीं पांडवांचां । वीरा आगळा वीरु सत्वाचा । समुदाय देखे मी ययाचा । तोचि कैसा ॥ ४७ ॥ शूरवीर समस्त ! शौर्यें पराक्रमें अद्भुत । जाणती बाणाची अत्यंत । प्रेरणा जे ॥ ४८ ॥ पडला युद्धाचां प्रसंगीं । भीमें अर्जुनेशीं समान योगी । तयांची नामें मी अवघीं । तुजप्रती सांगैन ॥ ४९ ॥ युयुधान आणि विराटु । द्रुपद महारथी सुभटु । महासंग्रामीं धीटु । परतणारु नव्हे ॥ ५० ॥ धृष्टकेतुश्चेकितानु । काशिराजु असाधारणु । वीर्यवंतु प्रतापनु । दिनकरु दुजा ॥ ५१ ॥ पुरुजित् वीरु खरा । कुंतिभोज तैसाचि दुसरा । नरपुंगव अवधारा । शैब्यु क्षत्रियु ॥ ५२ ॥ युधामन्यु समर्थु । तैसाचि राजा विक्रांतु । उत्तमौजा वीर्यवंतु । तो तेणेंचि पाडें ॥ ५३ ॥ सुभद्रानंदनु जाण । द्रौपदीचे पांचजण । हे महारथिये ह्मणौन । जाणावे समग्रही ॥ ५४ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

धनुर्ध्ये ज्यांचीं थोर थोर । या सैन्यांत उभे समोर । ते भीमार्जुनांसमान शूर । या युद्धीं ॥ ६७ ॥ सात्यकी विराट द्रुपद । हाही महारथी विशद । तो तुझा वैरी दुर्मद । आचार्या ॥ ६८ ॥ धृष्टकेतु चेकितान । काशीराज वीर्याचें निधान । पुरुजित् कुंतिभोज यांसमान । नरश्रेष्ठ हा शैब्यही ॥ ६९ ॥ युधामन्यु विक्रमयुक्त । उत्तमौजा वीर्यवंत । अभिमन्यु द्रौपदीसुत । हे महारथी सकळही ॥ १७० ॥ दहा सहस्र धनुर्धर । त्यांशीं झगडे एक वीर । शस्त्रास्त्रप्रवीण नर । तो महारथ बोलिजे ॥ ७१ ॥ अगणितांशीं करी युद्ध । शस्त्रास्त्रविद्येनें समृद्ध । तो अतिरथ ह्मणोनि प्रसिद्ध । या महाभारतीं ॥ ७२ ॥ एकाशींच युद्ध करी । रथी ह्मणावा यापरी । त्याहुनि उणा जरी । अर्धरथ ॥ ७३ ॥ हें आइकोनि वीर । ह्मणीं ब्राह्मण होय अधीर । ह्मणूनि त्यास देतो धीर । वर्णूनि योद्धे आपुले ॥७४॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

त्या सैन्यामाजी महाशूर । थोरा धनुष्यातें धरिते वीर । भीमार्जुनासारिखे निष्ठूर । असती ॥ २७ ॥ त्यांची नामें मी सांगेन । विराट द्रुपद युयुधान । हे अवघे महारथी जाण । द्रोणाचार्या ॥ २८ ॥ धृष्टकेतु आणि चेकितान । काशिराज वीर्यवंत जाण । पुरुजित तो वीर राणा । पैं कुंतिभोजु ॥ २९ ॥ शैब्य तो नरामध्यें अधिकु । बहुवांसि पुरे एकु । जो आणि संग्रामविवेकु । थोरु ॥ ३० ॥ युधामन्यु आणि विक्रांतु । उत्तमौजा वीर्यवंतु । अभिमन्यु आणि सुतु । द्रौपदीचे पांच ॥ ३१ ॥ हे पांच महारथी कुशल । धर्मादिकां पांचांचे आले । द्रौपदीचां ठायीं जाले । आचार्या ॥ ३२ ॥

## निवृत्तिदेव

अतिशूर महाथोर । भीमार्जुनसमान वीर । युयुधान विराट युद्धां चतुर । द्रुपद महारथी ॥ ४ ॥ धृष्टकेतु चेकितान । काशिराज वीर्यवंत जाण । पुरुजित् कुंतिभोज आपण । शैब्य नरश्रेष्ठ ॥ ५ ॥ युधामन्यु आणि विक्रांत । उत्तमौजा बळिवंत । सौभद्र द्रुपदपुत्र आद्यंत । सर्वेही महारथी ॥ ६ ॥

## उद्धवचिद्घन

वीर तयां दळिं धीर पराक्रमि भीम धनंजय यापरि पाडें ।
काळ कृतांतहि सन्मुख पाहुनि साधिती जाउनि युद्ध निवाडे ॥
तो युयुधान विराट महारथ द्रूपदपुत्र सभें तव चाडें ।
साह्य सुसैन्य तया दळिं आणिक सांगत आइक तें सुरवाडे ॥ ४ ॥
आणिक त्याप्रति साह्य धरापति युद्धसमागति आइक आतां ।
तो धृष्टकेतुहि आणि चेकितान काशिपती बळवीर्य पहातां ॥
भूप पुरुजित कुंतिभोजही शैब्य महाबळि आमुचे घाता ।
साह्य सुसैन्य यथापर तें गुरु तूज निवेदिन वीर विजाता ॥ ५ ॥
वीर युधामनु धीर पराक्रमि उत्तमवंशज सर्व बळानें ।
सादर संगरकाळ विलोकित सिद्ध उभे सम साह्य दळानें ॥
हा अभिमन्यु महारथि पांचहि द्रौपादिचे सुत मातृछळानें ।
सिद्ध उभे रथिं बैसुनि पाहति कामुक कामरती अवळानें ॥ ६ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

येथें शूर महा धनुर्धारी । युद्धीं भीमार्जुनाची करते सरी । युयुधान विराट झुंझारी । द्रुपद भारी महारथ ॥ ७ ॥ धृष्टकेतु चेकितान नामी । काशिराज वीर्यवंत भूमी । पुरुजित् कुंतिभोज विक्रमी । शैब्य संग्रामी नरपुंगव ॥ ८ ॥ युधामन्यु आणि विक्रांत वीर । उत्तमौजा वीर्यवंत दुर्धर । अभिमन्यु आणि द्रौपदीकुमर । सर्वही चतुर महारथी ॥ ९ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

याचेमध्यें महाशूर जाण । भिमार्जुनसमा युध्यमान । युयुधान विराट आपण । द्रुपद पूर्ण महारथी ॥ २५ ॥ धृष्टकेतु चेकितान । काशिराज वीर्यवान । पुरुजित् कुतिभोजमान । शैब्य बलवान नरपुंगव ॥ २६ ॥ युधामन्यु विक्रांत जाण । उत्तमौजा वीर्यवान । सौभद्र आणि द्रौपदपुत्रमान । सर्व जाण महारथी ॥ २७ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

इंद्रवज्राः— भीमार्जुनातुल्य रणीं समर्थ । धानुष्यगाढ बहु वीर येथ ॥
पांचाल की सात्यकि की विराट । युद्धीं जयाचें बळ जी अचाट ॥ ८ ॥

रथोद्धताः— धृष्टकेतु आणि चेकितानही । काशिराज आणि कुंतिभोजही ॥
शैब्य आणि पुरुजित्पराक्रमी । या नृपास तरि जाणता तुह्मी ॥ ९ ॥

भुजंगप्रयातः— युधामन्यु तैसाचि पैं उत्तमौजा । तुह्मी जाणता थोर झुंजार वोजा ॥
सुभद्रात्मजा एवढा वीर गाढा । नसे द्रौपदीच्या कुमारासि जोडा ॥ १० ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

पांडवसेनेंत वीर जाण । युद्ध करणार भीमार्जुन । यासम विराट युयुधान । द्रुपद ऐसे महारथी ॥ ४ ॥ धृष्टकेतु चेकितान । काशिराज वीर्यवान । पुरुजित अतितीक्ष्ण । कौंति शैब्य नराधिप ॥ ५ ॥ युधामन्यु पराक्रमी बहुत । उत्तमौजा वीर्यवंत । सौभद्रेय आणि द्रौपदीचे पुत्र । हे सर्वही महारथी ॥ ६ ॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः— येथें भीमार्जुनतुल्य महावीर । युयुधान शूर विराटही ॥
द्रौपदीचा पिता पूर्ण महारथी । धृष्टकेतु मूर्ति शिशुपाळाची ॥
चेकितान काशिपती वीर्यवान । पुरुजित् आपण कुंतिभोज ॥
नरपुंगव नृप शैब्य पराक्रमी । तुका ह्मणे नामें पुढें ऐका ॥ ४ ॥
युधामन्यु वीर उत्तमौजा जैसा । अभिमन्यु खासा पार्थपुत्र ॥
द्रौपदीचे पांच सर्व महावीर । आमुचेहि थोर अवधारी ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्:—

येथें भीमार्जुनातुल्य शूर थोर धनुर्धर ।
युयुधान विराटाख्य द्रुपदाख्य महारथी ॥ १८ ॥
धृष्टकेतु चेकितान काशिराजा पराक्रमी ।
पुरुजित्कुंतिभोजाख्य शैब्याख्य पुरुषर्षभ ॥ १९ ॥
महावीर युधामन्यु उत्तमौजा पराक्रमी ।
अभिमन्यु द्रौपदीचे पुत्र सर्व महारथ ॥ २० ॥

## मोरोपंत

आर्या:—

भीमार्जुनसम येथें दिसती धन्वी समग्र शूर रथी ।
सात्यकि विराट आणिक द्रुपदादिक हे महारथातिरथी ॥ ४ ॥
तो धृष्टकेतु आहे काशीश्वर आणि चेकितान असे ।
दिसती वीर पहा हे पुरुजित्सह शैब्य कुंतिभोज असे ॥ ५ ॥
अतिवीर्य उत्तमौजा विक्रमशाली तसा युधामन्यु ।
सर्वहि महारथी ते पांचाळीचे कुमार अभिमन्यु ॥ ६ ॥

: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :

येथें भीमार्जुनसम शूर महाथोर चापधर असती ।
युयुधान विराटाख्य द्रुपदाख्य महारथ प्रसिद्ध जगीं ॥ २२ ॥
पुरुजित्कुंतीभोजहि शैब्यहि नरवर्य चेकितान तसा ।
वीर्याढ्य काशिराजहि तसाच तो धृष्टकेतु वीरवर ॥ २३ ॥
वीरेश युधामन्यु वीर्याढ्य तसाच उत्तमौजाही ।
द्रौपद्यात्मज पांचहि अभिमन्युहि सर्व हे महारथची ॥ २४ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

ऐसेनि थोर धनुर्धर । भीमार्जुनसमान वीर । एकुचि दहासहस्र झुंजार । हे युयुधान विराट द्रुपद ॥ ४ ॥ चेकितान धृष्टकेतु । काशिराज वीर्यवंतु । कुंतिभोज पुरुजितु । आणि शैब्य जो कां नरपुंगव ॥ ५ ॥ युधामन्यु आणि विक्रांतु । उत्तमौजा वीर्यवंतु । सौभद्र आणि द्रुपदीसुतु । हे सकळही महारथ ॥ ६ ॥

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥
भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥
अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।
नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥

अर्थ—" आतां, हे द्विजश्रेष्ठा, आमच्या सैन्यांतील जे श्रेष्ठ व नेते असे वीर आहेत ते ऐका. आपणांला कल्पना यावी म्हणून त्यांचीं नांवें सांगतों. आपण, भीष्म, कर्ण, विजयी कृपाचार्य, अश्वत्थामा, विकर्ण, तसाच सोमदत्ताचा पुत्र आणि माझ्या-साठीं प्राणार्पण करणारे शूर दुसरे पुष्कळ आहेत. ते सर्वच युद्धविशारद असून नानाप्रकारचीं शस्त्रें पेलण्यांत व प्रहार करण्यांत हुषार आहेत.

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) "

आतां आमुच्या दळीं नायक । जे रूढवीर सैनिक । ते प्रसंगें आइक । सांगिजती ॥ ३ ॥ उद्देशें एक दोन्ही । जाथिजती बोलोनी । तुह्मी आदिकरूनी । मुख्य जे जे ॥ ४ ॥ हा भीष्म गंगानंदनु । जो प्रतापतेजस्वी भानु । रिपुगजपंचाननु । कर्ण वीरु ॥ ५ ॥ या एकेकाचेनि मनोव्यापारें । हें विश्व होय संहरे । हा कृपाचार्य न पुरे । एकलाचि ॥ ६ ॥ एथ विकर्ण वीरु आहे । हा अश्वत्थामा पैल पाहें । याचा आडदरु सदा वाहे । कृतांतु मनीं ॥ ७ ॥ समितिंजयो सौमदत्ति । ऐसे आणीकही बहुत आहाती । जयांचिया बळा मिती । धाताही नेणें ॥ ८ ॥ जे शस्त्रविद्यापारंगत । मंत्रावतार मूर्त । हो का जे अस्त्रजात । एथूनि रूढ ॥ ९ ॥ हे अप्रतिमल्ल जगीं । पुरता प्रतापु अंगीं । परी

१ भय.

सर्व प्राणें मजचिलागीं । आरौयिले असती ॥ ११० ॥ पतिव्रतेचें हृदय जैसें । पतीवांचूनि न स्पर्शे । मी सर्वस्व या तैसें । सुभटांसी ॥ ११ ॥ आमुचिया काजाचेनि पाडें । देखती आपुलें जीवित थोकडें । ऐसें निरवधि चोखडें । स्वामिभक्त ॥ १२ ॥ झुंजती कुळेकणी जाणती । कळे किर्तीसी जिती । हे बहु असो क्षात्रनीती । एथोनियां ॥ १३ ॥ ऐसें सर्वोपरी पुरते । वीर दळीं आमुतें । आतां काय गणूं यांतें । अपार हे ॥ १४ ॥

## सोपानदेव-- "सोपानदेवी"

आह्मांमध्यें जे विशिष्ट । ते तूं आईके द्विजश्रेष्ठ । माझिया सैन्यांत जे सुभट । ते तुज जाणावया सांगेन मी ॥ ७ ॥ तूं आणि भीष्म कर्ण । कृपाचार्य जयवंत संपूर्ण । अश्वत्थामा विकर्ण । सौमदत्ति श्रेष्ठ हे ॥ ८ ॥ आणिकही बहुत वीर । माझे अर्थी प्राण त्यजावया निरंतर । नाना शस्त्रें प्रहरणार । सकळ कुशळ युद्धासी ॥ ९ ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

आमुचे श्रेष्ठ जे जे वीर । ते द्विजोत्तमा आईक सादर । सांगिजती सविस्तर । पृथगाकारेंकरूनी ॥ ८८ ॥ आमुची वीरमंडळी अनंत अपार । बोलतां वाचेसी अतिदुस्तर । ह्मणोनि तो आतां असो विस्तार । संक्षेपमात्रें वदों कांहीं ॥ ८९ ॥ माझे सैन्याचे नायक । ते संज्ञाकारें तुज सांगेन देख । ज्यांचा शौर्य पराक्रम चोख । विश्वतोमुख विश्रुत ॥ ९० ॥ तुह्मी आणि भीष्म महामती । शोभत असा प्रतापें अती । ज्या तुमची पूर्ण बळस्थिती । ऐकोन भीती सकळ नृप ॥ ९१ ॥ सवितानंदन कर्ण वीर । जो शौर्यें कटाक्षसागर । आमुचें सैन्यां अळंकार । हा कृपाचार्य साच पैं ॥ ९२ ॥ पाहे पां स्वामी हा समितिंजयो । युद्धीं पावोनि नेणे अपजयो । पैल अश्वत्थामा तुझा तनयो । तुझेचि प्रतिबिंब सत्य कीं ॥ ९३ ॥ विकर्ण आणि सौमदत्ती । हे तरी तुह्मां कळलेचि असती । शौर्यसंपदे पूर्ण असती । कोठें न माती वीरश्री या ॥ ९४ ॥ हे मुख्यकरूनि आणिकही बहुत । आमुचे दळीं वीर अद्भुत । जीही मजचिलागीं आपुलें जीवित । अर्पिलें असे सर्वथा ॥ ९५ ॥ नानाशस्त्रप्रहरणीं अति गाढे । जे युद्धाचे ठायीं प्रवीण पुढें । कळिकाळ पाहो न शके ज्याकडे । ते हे योद्धे सकळही ॥ ९६ ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

मुळींच्या 'तु' शब्दाचें व्याख्यान । दुर्योधनासि अंतरीं भय दारुण । तें लोपूनि दावी आपुलें दृढपण । वीर पंचानन सांगे आपुले ॥ ७ ॥ अहो जी सद्गुरुराया परियेसी । आह्मां सर्वांमध्यें थोर वीर सर्वांशीं । त्यांचीं नामें सांगेन तुह्मांपाशीं । एकाग्रमानसीं परिसावे ॥ ८ ॥ असंख्य आमुचे अतिश्रेष्ठ वीर । त्याहीमध्यें सांगेन थोर थोर । संज्ञार्थ तुह्मी आदिमहाशूर । सांगेन धीर परियेसा ॥ ९ ॥ द्विजोत्तम येणें संबोधनेकरून । गुरुचि स्तुति करूनि करी सम्मुखपण । बाह्य दृष्टी तरी हा असे ब्राह्मण । करुणेंकरून युद्ध न करी ॥ ३१० ॥ ह्मणोनि आह्मांसि जरी विमुख होसी । तरी भीष्मादि वीरप्रवर असती आह्मांसी । यालागीं क्षति नाहीं जाण सर्वस्वेंसी । ऐसें कपट मानसीं धरूनि

१ अर्पिलें. २ चातुर्य.

बोले ॥ ११ ॥ अथवा ' संज्ञार्थ ' ययाचा अर्थ । जे पांडव तुझे प्रियशिष्य बहुत । तयांची सेना देखोनियां अद्भुत । व्याकुळ चित्त हर्षे तुझें ॥ १२ ॥ तयां देखोनियां सुखकल्लोळ । तेणें आपुल्या वीरांचा विसरु पडेल । ह्मणोनि संज्ञार्थ सांगों वीर प्रबळ । आइक निर्मळ एक दोनी ॥ १३ ॥ जे कीं आमुच्या सैन्याचे नायक । थोर थोर वीर मांडलिक । ते परियेसा जी वीर सम्यक । सांगों मुख्य अतिरथी जे ॥ १४ ॥ द्रोणासी सुख उपजावे ह्मणोन । भीष्माआधीं ह्मणे तुह्मी द्रोण । आणि आपुला बंधु जो विकर्ण । त्याआधीं जाण अश्वत्थामा सांगे ॥ १५ ॥ तरी तुह्मी द्रोणा वीर नायक । दुसरा गंगासुतु हा भीष्म मांडलिक । कर्णवीरु हो एकलाचि देख । जिंतील लोक तीन्ही ॥ १६ ॥ संग्रामातें सर्वदा जिंकिता । ह्मणोनि समितिंजय ह्मणती तत्वतां । हें कृपाचें विशेषण बोले सर्वथा । कर्णापरता बोलिला ह्मणोनि ॥ १७ ॥ हे चारी वीर सर्वत्र विशिष्ट असती । आतां नायकहि सांगेन तुह्मांप्रती । तरी तुमचा पुत्र अतिक्रांत अति । नामें बोलती अश्वत्थामा ॥ १८ ॥ तैसाचि विकर्ण हा वीर थोर । सोमदत्ताचा पुत्र सौमदत्ति वीर । अतिश्रेष्ठ ह्मणोनि भूरिश्रवा थोर थोर । ह्मणती साचार जयासी ॥ १९ ॥ आणि सिंधुराज जयद्रथु । वीरांमाजी वीर अति महंतु । तेथें वचःपाठें सौमदत्ति बोलिजत । तसी जयद्रथु नाहीं तेथ ॥ ३२० ॥ ऐसे सात अथवा आठ जण । वीर सांगितले अतिदारण । इतुकेचि नायक नाहींत पूर्ण । आणिक गहन बहुत असती ॥ २१ ॥ तरी आणिक शल्यकृतवर्मादिक । वीर बहुत आहाती थोर थोर मांडलिक । तयांचीं नामें सांगतां न पुरे मास एक । अतिशूर देख शूरांहूनी ॥ २२ ॥ नाना शस्त्रास्त्रीं अतिप्रवीण । युद्धाच्या ठायीं सर्वही विचक्षण । तयांचें वर्णितां महिमान । वाचेकरूनि न वर्णवे ॥ २३ ॥ सर्व शस्त्रविद्या ययांपासूनी । शिकती जाली सर्व वीरश्रेणी । अप्रतिमल्ल त्रिभुवनी । सांगों वचनीं किती तुह्मां ॥ २४ ॥ ऐसे हे असोनियां वीर महंत । मजलागीं आपुले प्राण वेचूं ह्मणत । तृणतुल्य मानिती आपुलें जीवित । अतिउद्यत युद्धालागीं ॥ २५ ॥ अहो आपुलिया प्राणांवरी जो उठितु । तो सहस्रांसि एकुचि बहु होतु । शेवटीं युद्धीं तोचि जय पावतु । एकाची मातु जेथ ऐसी ॥ २६ ॥ तेथ हे बहुत आणि वीर शूर अति । आणि मजलागीं जीवित समर्पिती । स्वप्रियभर्तारालागीं जैशा सती । प्राण वेंचिती निःशंकपणें ॥ २७ ॥ दोहीं सैन्यासी द्रोण साम्य मानील । ह्मणोनि राजा दुर्योधनु बोले बोल । आपुलिया सैन्याचें प्राबल्य । सांगे सकळ द्रोणाप्रती ॥ २८ ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

आतां आमुच्याही सैन्यामाझारीं । थोर घ्यावयालागीं झुंजारी । ते सांगितले जाईनात हारी । द्विजोत्तमा परिसावे ॥ ३६ ॥ नायक माझ्या सैन्यांतील सकळ । कळावया सांगतो सोज्वळ । मजसी ज्यांचा धीर प्रबळ । कृपें तुमच्या गुरुवर्या ॥ ३७ ॥ मुख्य आपण आचार्या । भीष्म कर्ण कृपाचार्या । हे महाबळी गा आर्या । आणि अश्वत्थामा पैं साच ॥ ३८ ॥ विकर्ण वीर अपार । सौमदत्तीही साचार । ऐसे सहितदळभार । उभे राहूनि उदित ॥ ३९ ॥ आणिकही बहुत वीर । मजकारणें जीवित्व ठेवूनि धीर । आले आहेति शरीर । राखों नेणती संग्रामीं ॥ ४० ॥ नाना शस्त्रेंकरूनि कुशळ । प्राण जातां नव्हती विकळ । छत्तीस दंडायुधी बळ । बोलिलें जाय ते कोणा ॥ ४१ ॥

## दासोपंत—" गीतार्णव "

दुर्योधनु ह्मणे द्विजोत्तमा । हेंचि पुढतीपुढती वाटे आह्मां । परंतु कांहीं येक तुह्मां । सांगणें असे

॥ ९७ ॥ [ अस्माकं तु ये विशिष्टाः ] आमुचांही दळीं विशिष्ट । वीर असती श्रेष्ठ श्रेष्ठ । जे कीं बलियाडे सुभट । पुढती कैसे ॥९८॥ [ मम सैन्यस्य नायकाः ] माझया सैन्याचे नायक । श्रेष्ठ कर्ता आज्ञापक । मातें मान्य लोक । महाबळिये ॥ ९९ ॥ [ तान् ] आतां आइकोनि ऐसें वचन । तूं ह्मणसी ते कवण । व्यक्ति शक्ति अभिधान । तयांचें कैसें ॥ ५०० ॥ तरि आचार्या आइके वचन । माझें नव्हे अप्रमाण । माझां सैन्यीं श्रेष्ठ कवण । वीर ते पैं ॥ १ ॥ [ संज्ञार्थं ते ब्रवीमि ] कीर्तीगुणें अभिधानें । तुजप्रति कळावयाकारणें । सांगैन मी राजा ह्मणे । अहो आचार्या ॥२॥ [ तान्निबोध ] मद्वचन तें आइकोनि । प्रत्यक्ष दृष्टी पाहोनि । कीर्तीपराक्रमेंकरूनि । जाण पां ते ॥ ३ ॥ नाम रूप अवलंबावें । मग तें दृष्टीही पहावें । पाहोनि तेथिंचें जाणावें । विचारें बळु ॥ ४ ॥ मागां केली जे करणी । पुढें आतां यये रणीं । मुखश्री दृष्टी पाहोनि । वीर मानावे ॥ ५ ॥ आतां तयांचीं अभिधानें । लागतील मातें सांगणें । चित्त देऊनि आइकणें । सर्वज्ञ तुवां ॥ ६ ॥ [ भवान् ] प्रथमचि तुह्मी येक । सर्वांमाजी नायक । आह्मी आणि पांडव सकळैक । जयांचे विद्यार्थी ॥ ७ ॥ अंशांशें जे तुह्मी कळा । तिया हा अर्जुनु आगळा । संग्रामें जेणें कैलासपाळा । संतोषविलें ॥ ८ ॥ तुह्मेनि पादप्रसादें । पांडव जिंकती युद्धें । तिये विद्येचें न सुधें । भांडार तूं ॥ ९ ॥ अद्यापिही तुह्मी सेवा । बहुसाळ प्रिय पांडवां । तो तूं आचार्या आह्मां सर्वां । येकला रक्षिसी ॥ ५१० ॥ अर्जुनें तुह्मां देखावे । उगेंचि धनुष्य सांडावे । ऐसें होईल जाणवे । माझां मनीं ॥ ११ ॥ जालीही बलवंत परि । दासी स्वामिणीतें न मारी । आला घाव आंगावरि । उगाचि घे ॥ १२ ॥ आइके गा द्विजोत्तमा । हाचि भरंवसा आहे आह्मां । सन्मुखु अर्जुनु तुह्मां । न दावी वदन ॥१३॥ [ भीष्मश्च ] तुह्मांचि ऐसा दुसरा । भीष्माचार्यो अवधारा । जो वडीलु आजा समग्रां । पांडवांतें ॥१४॥ देखोनि तया भीष्मा । हातु नुचलवे अर्जुना भीमा । बोलु लागेना धर्मा । अनुचित करितां ? ॥ १५ ॥ भीष्मु देखोनि गा द्रोणा । खालुतिया करिती माना । ऐसें हें बरवें मना । आलें माझया ॥ १६ ॥ तेहीं हातियेर सांडावें । आह्मीं ते जीतचि धरावे । धर्ममुख्य अघवे । पांचही जे ॥ १७ ॥ कृष्णु पाहिलेंचि अशास्त्री । असोनि तो काये करी । पांडव पडले आहारीं । येणें विचारें ॥ १८ ॥ आतां ते युद्धचि करितील । तरि विद्या यश नेतील । येक गुरु येक वडील । ह्मणोनियां ॥ १९ ॥ यशही तयां खरें । आलेंही येके प्रकारें । तन्ही तुह्मी आणि दुसरे । जेथें भीष्माचार्य ॥ ५२० ॥ तें दळ तुमचेनि बळवंत । मरतो परि न टळती समस्त । रणीं धैर्य अत्यंत । आमुचियां लोकां ॥ २१ ॥ जालियाही देह जर्जर । भीष्मु न परते हें साचार । आणि तुह्मां ऐसे वीर । प्राणु देती ॥ २२ ॥ [ कर्णश्च ] तैसाचि कर्णु नेटाचा । जो कीं नंदनु सूर्याचा । साह्यकर्ता तयाचा । पावैल सूर्यो ॥ २३ ॥ सूर्येसीं युद्ध करितील । ऐसें काये पांडवबल । नाना असो केवळ । ऐसें न घे ॥ २४ ॥ आणि कर्णा ऐसा नेटकु । दुजा नाहीं आणिकु । शस्त्रास्त्रभावीं टणकु । पाठी नेदी ॥ २५ ॥ आंगाचीं होतु खंडें । परि न पाहे मागें पुढें । पांडवां नेट येव्हढें । तें आथीचिना ॥ २६ ॥ वणवा लागैल हा पांडवां । संग्रामीं वेंचील जीवा । भरंवसा ययाचा बरवा । आहे मातें ॥ २७ ॥ ऐसा हा कर्णु बळवंतु । आमुचां सैन्यीं उपस्थितु । येणें येकें निश्चिंतु । द्विजोत्तमा मी ॥ २८ ॥ [ कृपश्च ) तैसाचि कृपाचार्यो वीरु । रणसंग्रामा जो अमरु । वधूं न शके धनुर्धरु । तदा येका ॥ २९ ॥ ईश्वराची इच्छा न कळे । परि पांडव न जिंकती यया बळें । अमरगणु हा येणें काळें । आह्मांमाजी ॥ ५३० ॥ आमुतें तंव ऐसें मानें । कृपाचार्याचिये आंगवणें । पावलाही शक्रु त्राणें । परंतु न पुरे ॥ ३१ ॥ होणारा न चले कांहीं । परि पांडवांमाजी ऐसा नाहीं । मरणाचि नातळे

देहीं । जयासि कां ॥ ३२ ॥ आला घाव निवारूं । फावलयां जाणे मारूं । बापु बापु जुंझारु । कृपाचार्या ॥ ३३ ॥ ऐसा सर्व भावें आगळा । काळु तो जेणें जिंकिला । शस्त्रास्त्रविद्या सकळां । प्रेरूं जाणें ॥ ३४ ॥ [ समितिंजयः ] ह्मणोनियां हा जुंझारु । संग्रामातें जिंकण्हारु । भरंवसे याचा विचारु । ऐसा आहे ॥ ३५ ॥ येणें सर्वथा न मरावे । सर्वथा परदळ जिंकावे । भविष्य तेंचि नेणवे । परि ऐसें आहे ॥ ३६ ॥ ( अश्वत्थामा ) अश्वत्थामा दुजा वीरु । तेणेंसी समानु अमरु । साह्यों न शके इंद्रु । पराक्रमु जयाचा ॥ ३७ ॥ येकलाचि पुरे योद्धा । वैरियांपासाव नाहीं बाधा । ययाचेनि सर्वदा । क्षेम आमुतें ॥ ३८ ॥ पांडव येणें मारावे । कृष्णातें तेथूनि पळवावे । धर्मातें धरूनि आणावे । येकलेनि ॥ ३९ ॥ अविनाश देह संग्रामीं । आणि प्रवीणु युद्धधर्मी । अक्षयीं सामग्री आह्मी । तयाची जाणों ॥ ५४० ॥ ययापासाव सुटती । पांडव निराळे उरती । राज्याची गोष्टि करिती । ऐसें न घडे ॥ ४१ ॥ गति न कळे भविष्याची । न कळे इच्छा ईश्वराची । परंतु वासना तंव आमुची । ऐसी आहे ॥ ४२ ॥ ( विकर्णश्च ) तैसाचि योद्धा असाधारणु । संग्रामीं वेंचील प्राणु । अभिमानु आमुचा विकर्णु । राखेल हा ॥ ४३ ॥ येणें विकर्णें दाटिला । तो प्रतापुचि विसरे आपुला । इतुला परभारु चालिला । येकुचि पुरे ॥ ४४ ॥ नियमाचें करणें संधान । अचूक जयाचें विंदान । पांडव सुटती ययापासून । तरि अपूर्व ह्मणा ॥ ४५ ॥ अग्निमुखीं उरे कापुरु । व्याघ्रामुखीं उरे नरु । तरिचि हा विचारु । ऐसा घडे ॥ ४६ ॥ यशाचि असावे साह्यकर्ते । मग जिंकितां पांडवांतें । क्षणु नलगे विकर्णातें । ऐसें आहे ॥ ४७ ॥ स्रष्टया ईशाची करणी । तेचि सत्य निदानीं । परि विकर्णू हा अभिमानी । ऐसा आहे ॥ ४८ ॥ ( सौमदत्तिस्तथैव च ) अरिगर्वपंचाननु । पैलु सोमदत्तीचा नंदनु । भूरिश्रवा सुजाणु । संग्रामविपर्यी ॥४९॥ आंगावरि आले घाये । मागें पुढें न पाहे । आमुतें सांडूनि नच जाये । ऐसा मित्रु ॥ ५५० ॥ धनुर्विद्येचा मेरु । धैर्याचा सखोलु सागरु । वीरां आगळा वीरु । भूरिश्रवा हा ॥ ५१ ॥ सौमदत्ती आला ह्मणतां । हृदय उले पर्वतां । वज्र गळे सर्वथा । पाणी होये ॥५२॥ थांबू शके मंडळातें । मोडूं शके सृष्टीतें । येसणें बळ ययातें । आंगीं असे ॥ ५३ ॥ अदृष्ट तें मातें न कळे । वीर तंव हे येवढाले । नारायणें सानुकूळें । फळे प्रेत्नु ॥५४॥ ( अन्ये च ) दुर्योधनु ह्मणे द्रोणा । सत्यता मानीं वचना । पाहतीं आमुची सेना । आणिकही ॥ ५५ ॥ ( बहवः शूराः ) बहुसाल असती शूर । वीर धनुवाडे अपार । परंतु कैसें हें उत्तर । आइकें माझें ॥ ५६ ॥ ( मदर्थे त्यक्तजीविताः ) मजकारणें आपुलालें । जिणें तें जेहीं सांडिलें । मरण बांधोनि आले । पालैवीं येथ ॥ ५७ ॥ आपुलिया प्राणांचीं दुर्गे । करूनियां ठेले अवघे । माझे प्राण अंतरंगें । घालूनियां ॥ ५८ ॥ आधीं आपण मरती । तारीचि मजवरि युद्ध घालिती । माझें मरण झेलिती । आंगावरी जे ॥ ५९ ॥ सांडूनि आशा राज्याची । आपुलिया देहसुखाची । बळी देऊनि प्राणांची । येथें आले ॥ ५६० ॥ ह्मणें लागैल मातें वारा । आड करिती तेथ शरीरा । ऐसे अपार मा विप्रेंद्रा । माझे मित्र ॥ ६१ ॥ जंव ते असती मागें पुढें । तंव आत्मभय मज कां येवढें । जेहीं मजकारणें धडें । आपुलीं दिधलीं ॥ ६२ ॥ जीवें प्राणें माझे जाले । माझयां काजा आपुलाले । देह देती परि येणें काळें । न वचती मुरडोनियां ॥ ६३ ॥ [ नानाशस्त्रप्रहरणाः ] आणि नाना शस्त्रांची परजणी । ते असे जयांचां स्थानीं । प्रेरिती विद्या निर्वाणीं । अनिवार तें ॥ ६४ ॥ अस्त्रविद्यांचीं प्रहरणें । ठाऊकीं जयांकारणें । अमुकें युद्ध मी नेणें । ऐसें नाहीं

---

१ गांठीस.

॥६५॥ [ सर्वे युद्धविशारदाः ] सर्वही युद्धीं प्रवीण । सर्वांचें सारिखेंचि मन । येकयेकांतें दाऊन । युद्ध करते ॥ ६६ ॥ शूरता आणि दक्षता । धैर्य आणि माझी ममता । ययां रायां बहुता । असे हृदयीं ॥ ६७ ॥ पृथ्वी पाणियां मेळविती । पाणी अग्निमुखीं जाळिती । ब्रह्मांडप्रळयो करिती । ऐसे वीर ॥ ६८ ॥ पराक्रमु न समाये सृष्टी । आणि माझांचि हिर्तीं दृष्टि । ऐसे नव्हती जे संकटीं । सांडूनि जाय हार ॥ ६९ ॥ यश कैसें तें मी नेणें । परि हे मरती मजकारणें । दुर्योधनु ऐसें बोलणें । बोलिला नियमाचें ॥ ५७० ॥ ऐसें बोलोनि वचन । पुढें करी प्रळपन । तेंचि ह्मणे सांगैन । संजयो राया ॥ ७१ ॥ दुर्योधनु ह्मणे द्रोणा । दोन्हीं सैन्यें आलीं रणा । वीर आपुलालिया आंगवणा । उभे असतां ॥ ७२ ॥ दृष्टीं कैसीं अवगमतीं । दोन्हीं सैन्यें शोभतीं । तें मी सांगेन उक्ति । हृदयीं राखावी ॥ ७३ ॥ पुढील यश अयश । चिन्ह कळों ये साभास । मुखश्री वोळखे तयास । सर्व कळे ॥ ७४ ॥ तरि मातें जैसें कळे । तितुकें सांगैन येणें काळें । आतां मन तुवां ठेविलें । पाहिजे शब्दीं ॥ ७५ ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

अवधारी द्विजोत्तमा । पांडवसैन्य आह्मां । दिसों आलें तुह्मां । सांगितलें तें ॥ ५४ ॥ आतां आह्मां-माजि वीर टणक । श्रेष्ठ पराक्रमें अधिक । जे विशिष्ट महाधनुष्क । अवधारी त्यांतें ॥ ५५ ॥ आणि जे माझिया सैन्यांतें । वीर असती चाळविते । संज्ञेकारणें तयांतें । सांगेन तुजप्रती ॥ ५६ ॥ धनुर्धरां-माजि मेरु । तो द्रोण तूं एक गुरु । तैसाचि भीष्मु महावीरु । कर्णु तैसाचि ॥ ५७ ॥ संग्रामीं सर्वदा विजयी । तो कृपाचार्यो जाणयीं । अश्वत्थामा वीरु पाही । तैसाचि द्रोण ॥ ५८ ॥ विकर्णाची महा-ख्याति । तैसाचि पैल सौमदत्ति । विद्यासमुद्र हे असती । आह्मांमाजि ॥ ५९ ॥ आणिकही बहुसाळ । वीर अग्नीकल्लोळ । एकाहून एक प्रबळ । शूर असती ॥ ६० ॥ मज एकाकारणें । टाकूं इच्छिलें जेहीं जिणें । मजचि सांघातें मरणें । हें जयांचें वृत्त ॥ ६१ ॥ नाना शस्त्रांचीं परजणीं । विद्या ते जयांचां स्थानीं । प्रेरुं जाणती रणीं । शस्त्रास्त्रभार ॥ ६२ ॥ महायुद्धांचां ठायीं । संग्रामविद्याविषयीं । निपुण ते अवघेही । ऐसे वीर ॥ ६३ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

आमचे तों विशिष्ट । वीर त्यांहूनि वरिष्ठ । तुज कळावया स्पष्ट । द्विजोत्तमा सांगतो ॥ ७५ ॥ माझ्या सैन्याचे पति । कळावे ह्मणुनि तुजप्रति । सांगतों ह्मणे कुरुचक्रवर्ति । द्रोणांते ॥ ७६ ॥ तूं द्रोण भीष्म कर्ण । विजयी कृप अश्वत्थामा विकर्ण । तैसाचि भूरिश्रवा वीर्य पूर्ण । पुत्र सोमदत्ताचा ॥७७ ॥ हे थोर थोर सैन्याचे नायक । यांवेगळे शूर अनेक । तेही ह्मणतो ऐक । दुर्योधन द्रोणांतें ॥ ७८ ॥ आणिकही शूर बहुत । मजकारणें मरतील निश्चित । जे नाना शस्त्रांसहित । चतुर युद्धीं सकळही ॥ ७९ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

आतां सांगेन आमुचे वीर । जे महायोद्धे थोर थोर । ते तूं जाण द्विजवर । नांवाकारणें ॥ ३३ ॥ आमुच्या सैन्याचे नायक । एकाहुनि एक अधिक । जे कां ये चैद्यादिक । महावीर ॥ ३४ ॥ तूं भीष्म कर्ण कृपाचार्या । अश्वत्थामा विकर्ण गा आचार्या । सौमदत्ति विचारिया-।-मध्यें श्रेष्ठ ॥ ३५ ॥

कृपाचार्य तो संग्रामीं । युद्ध करूं जाणे नाना वर्मी । ह्मणोनि तो थोर जाणा स्वामी । द्रोणा ॥ ३६ ॥ आणिकही शूर बहुत । मजकारणें सांडिलें जे जीवित । नानाशस्त्रें प्रेरूं जाणत । सर्वही युद्धीं कुशळ ॥ ३७ ॥

## निवृत्तिदेव

आमचे विशिष्ट आइक द्विजोत्तमा । नायक सैन्याची महिमा । तें संज्ञार्थेंकरूनि तुह्मां । सांगेन देखा ॥ ७ ॥ तूं आणि भीष्म कर्ण कृपाचार्या । अश्वत्थामा विकर्ण गा आचार्या । सोमदत्ती महावीर्यां–।–मध्यें श्रेष्ठ ॥ ८ ॥ आणि महाशूर बहुत । मजकारणें त्यक्तजीवित । नाना शस्त्र सोडूं जाणत । युद्धीं कुशल जे ॥ ९ ॥

## उद्धवचिद्घन

सवाईः–

आइक यावरि आपुलिये दळिं वीर महाबळि जे दळवाडे ।
श्रीगुरुमूर्ति तुला मि निवेदिन तीं परिसें विर–नांवें निवाडें ॥
सैन्यपती नृपती मग संगति संगरकाज करी परिपाडें ।
संज्ञित सांगत मुख्य प्रसिद्धचि हैं द्विजवर्य तुं ऐक सुरवाडे ॥ ७ ॥
तूंचि गुरूवर साह्य पुरस्सर भीष्म पुढें आणि कर्ण उभा हा ।
हा कृपया गुरु पाहि चिरंजिव हा समितिजय दृष्टिस पाहा ॥
हा तव पुत्र अणीक विकर्णहि चंडपराक्रमि भूरिश्रवा हा ।
युद्धयुयुत्सव मानुनि वैभव सिद्ध उभे अरिकाननदाहा ॥ ८ ॥
आणिक भूपति वीर महारथि तुच्छ जयांप्रति जीवित झाले ।
साह्य सखे अति माझे मनोगति ते मजसंगति निश्चित आले ॥
आयुध शस्त्र अखंड सुमंडित जे रणपंडित घालिति घाले ।
युद्धविशारद सर्वहि सिद्धचि क्रुद्ध विरुद्ध प्रबुद्ध निवाले ॥ ९ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

ऐसे हे अमित्रांचे सबळ । नामार्थिले सांगितले केवळ । आतां आमचे मुख्य प्रांजळ । तेही निवळ ऐकावे तुह्मीं ॥ ९ ॥ आमुचे श्रेष्ठ जे कां गुणी । ते ऐका द्विजोत्तमा कानीं । नायक जे मम सैन्या-लागुनी । कळावयासि ते वाणी वदतमे ॥१०॥ तुह्मीं आणि कर्ण भीष्मवीर । कृपाचार्य संग्रामचतुर । अश्वत्थामा विकर्ण धीर । आणि नरेश्वर सौमदत्ती ॥ ११ ॥ येणेंपरी बोलिला दुर्योधन । परिसोनि श्रोतयांचें मन । आशंका अंतरीं धरून । संशयापन्न होईल ॥ १२ ॥ जें कर्ण पूर्वी ऐसें बोलिला । "जंवरी मृत्यु नये भीष्माला । तंवरी च्याप मी संग्रामाला । न वाहें भला नेम माझा" ॥ १३ ॥ ऐसें वदला तो वीर जेठी । आणि उद्योगपर्वाचें शेवटीं । कौरवसेनेसी आले उठाउठी । जेव्हां कर्णाची गोष्टी ऐकिली नाहीं ॥ १४ ॥ तरि तो युद्धसमयीं कैसा आला । प्रतिज्ञा आपुली काय विसरला । नाहीं ह्मणावा जरी पावला । तरि निवाडिला दुर्योधनें ॥ १५ ॥ जें भवान् आणि भीष्म कर्ण । ऐसें

बोलिला राजनंदन । ह्मणोनि मिश्रयेसीं तो आला जाण । नाहीं अनुमान यदर्थीं कदां ॥ १६ ॥ ऐसें घडावया कारण काये । ह्मणोनि उपजेल संशये । तरि ऐकायाचा अभिप्राये । राधातनयो आला सत्य ॥ १७ ॥ पुढें आल्यावरी सर्व वाहिनी । प्रथम युद्ध पहावया नयनीं । कर्ण आला सकळांमागुनी । निज स्यंदनीं बैसोनिया ॥ १८ ॥ परि युद्धसंकल्प नाहीं धरिला । नाहीं हातीं च्याप घेता जाला । उगाचि रथीं निवांत ठेला । कौतुक डोळां लक्षावया ॥ १९ ॥ त्यासहित सेनापती दुर्योधनें । निवडिले स्वमार्वे स्ववदनें । प्रथमदिन गेल्यावरी मानें । पुन्हां कर्णें नाहीं येणें केलें ॥ २० ॥ इतुकेनी वारली कर्णें आशंका । श्रोते हो संदेह धरूं नका । पुढील कथा अभिप्राय ऐका । गुरुसी नेटका राजा बोले ॥२१॥ गुरु भीष्म आणि कर्ण । कृप अश्वत्थामा आणि विकर्ण । सौमदत्तीचें नाम सांगोन । पुन्हां आपण बोलता होये ॥ २२ ॥ अन्य शूरही बहुत । जीवत्याग करणार मदर्थ । ह्मणो जाणती नाना शस्त्रघात । युद्धीं समस्त विशारद ॥ २३ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

आहेति माझिया सैन्यामाझारि । वरिष्ठ द्विजोत्तम अवधारि । सैन्यनायक पराक्रम भारि । सांगतों अंतरिं धरावे ॥ २८ ॥ स्वामिआदिकरोनि भीष्म द्रोण कर्ण । कृपाचार्य समितिंजय जाण । अश्वत्थामा आणि विकर्ण । सौमदत्ति जाणा महावीर ॥ २९ ॥ आणिक शूर आहेति बहुत । जे मजकारणें त्यजिति जीवित्व । नाना शस्त्रें प्रेरण करित । सर्व युद्धांत विशारद ॥ ३० ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

भुजंगप्रयातः— दळीं आमुच्याही बळी वीर जे जे । असे विप्रवर्या वदों सर्व वोजें ॥
जरी जी तुह्मां सैन्य सारेचि ठावे । तरी सूचनेलागि म्यां तीं उठावे ॥ ११ ॥
स्वयें जी तुह्मी आमुचा भीष्म आजा । तसा कर्ण जो अंगदेशासि राजा ॥
कृपाचार्य झुंजार भाचा तयाचा । विकर्णाख्य भूरिश्रवाही बळाचा ॥ १२ ॥

शालिनीः— माझ्या काजीं अर्पिले प्राण जेहीं । ऐसे नेणो कैं महावीर पाही ॥
नानाशस्त्रें जे मुठाळूनि हातीं । युद्धीं साधूं ख्याति ऐसें पहाती ॥ १३ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

आह्मांमध्यें जे विशिष्ट । तें तूं ऐक गा द्विजश्रेष्ठ । माझिया सैन्यांत सुभट । ते तुजलागि सांगतो ॥७॥ तूं आणि भीष्म कर्ण । कृपाचार्य नीतिसंपूर्ण । अश्वत्थामा विकर्ण । सौमदत्ति ऐसे हे ॥ ८ ॥ आणिकही बहुत वीर । माझ्यानिमित्तें मरणार । नाना शस्त्रांचे प्रेरणार । सकल कुशल युद्धासीं ॥ ९ ॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः— अधिकारी त्यांचीं वर्णितसे नामें । सूचना उत्तमें ऐकावी जी ॥
तुका ह्मणे गीतेमाजी नव श्लोक । बोलिला पृथक दुर्योधन ॥ ७ ॥
पितामह तुह्मी संहारिते अरी । तैसा धनुर्धारी कर्ण माझा ॥

१ कर्ण.

कृपाचार्य गुरु श्रेष्ठां श्रेष्ठ खरा । समान साजरा विजयाख्य ॥
द्रोणपुत्र चिरंजिवी अश्वत्थामा । विकर्णाचा महिमा काय वानूं ॥
भूरिश्रवा तसा कळूं द्या तुह्मांसी । महिमा बोले ऐसी तुका ह्मणे ॥ ८ ॥
आणिकही बहु शूर महाबळी । रणीं चेंडूफळी खेळणारे ॥
मजसाठीं जीव संकल्पिला जींहीं । हाणणारे घाई शस्त्रें नाना ॥
समरीं कुशल नामाथिले भले । शिपाई दादुले काळदूत ॥
अहंतेच्यायोगें बोले राजेश्वर । ऐकोत चतुर तुका ह्मणे ॥ ९ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्:—आमचे थोर जे त्यांतें आईक ब्राह्मणोत्तमा । सैन्याचे जे धनी माझ्या त्यांतें संज्ञार्थ सांगतों ॥२१॥
तूं भीष्म आणखी कर्ण कृप जो विजयी रणीं । अश्वत्थामा विकर्णाख्य तोही भूरिश्रवा तसा ॥२२॥
आणीकही बहु शूर मदर्थ मरणार जे । नाना शस्त्रें हाणणारे युद्धीं कुशळ सर्वेही ॥ २३ ॥

## मोरोपंत

आर्याः—
ऐकावे द्विजवर्या नायक माझ्या विशिष्ट सैन्यातें ।
संज्ञार्थचि मी वदतों जाणावे लोकमान्य मान्यातें ॥ ७ ॥
एक तुह्मी आणि भीष्म प्रौढ कृपाचार्य आणि हा कर्ण ।
तो सौमदत्ति आणिक अश्वत्थामा गुणाकर विकर्ण ॥ ८ ॥
आणिक शस्त्रास्त्रीं हे बहुत शूर निपुण समरा या ।
माझ्या अर्थासाठीं धरुनी आलेहि मानस मराया ॥ ९ ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
जे थोर आमुचे ते कथितो त्यांतें द्विजोत्तमा परिसे ।
माझ्या या सेनेचे धणीच संज्ञार्थ मी तुला कथितों ॥ २५ ॥
तूं भीष्म कर्ण विजयी श्यालक तूझा बळी कृपाचार्य ।
त्वत्सुत अश्वत्थामा विकर्ण तैसाचि सौमदत्तीही ॥ २६ ॥
आणिकही शूर बहुत मदर्थ मरणार जे रणांमाजी ।
नाना शस्त्रें युद्धीं प्रहार करणार सर्वेही कुशल ॥ २७ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

आतां आमुच्या सैन्यांत थोर थोर । सैन्यनायक जे वीर । ते तुज कळावे सविस्तर । सांगतों ते अवधारी ॥ ७ ॥ तूं ये नांवें द्रोणु । भीष्म कृपाचार्यो कर्णु । समितिंजय अश्वत्थामा विकर्णु । सोमदत्ताचा पुत्र बाल्हिकु ॥ ८ ॥ आणिक आहेत बहुसाल शूर । माझे कार्यी जीवित्व टाकणार । नाना शस्त्रांचा करिती प्रहार । सकळही युद्धीं कुशळ ॥ ९ ॥

# अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।
# पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥

**अर्थः—" याप्रकारें भीष्मानें रक्षण केलेलें आपलें सैन्य फार अफाट आहे; तर भीमानें रक्षण केलेलें त्यांचें सैन्य मोजकें आहे.**

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) "

वरी क्षत्रियांमाजी श्रेष्ठु । जो जगजेठी जगीं सुभटु । तया दळवैपणाचा पाटु[1] । भीष्मासि पैं ॥ ११५॥ आतां याचेनि बळें गवसले । हे दुर्ग जैसे पन्नासिलें[2] । येणें पाडें[3] थेकुलें । लोकत्रय ॥ ११६ ॥ आधीच समुद्र पाहीं । तेथ दुवाडपण[4] कवणा नाहीं । मग वडवानळु तैसे याही । विरजा[5] जैसा ॥ ११७ ॥ नातरि प्रलय-वन्हि महावातु । या दोघां जैसा सांघातु[6] । तैसा हा गंगासुतु । सेनापति ॥ ११८ ॥ आतां येणेसि कवण भिडे । हें पांडवसैन्य कीर थोकडें[7] । परि वरचिलेनि पाडें । दिसत आहे ॥ ११९ ॥ वरी भीमसेन बेथु[8] । तो जाहला असे सेनानाथु । ऐसें बोलोनियां मातु । सांडिली तेणें ॥ १२० ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

आमुचें सैन्य असे गाढें । भीष्मदेव रक्षितो प्रौढीनें धडफुडे । त्यांचें सैन्य असे थोडें । भीम रक्षितो बळेंकरूनि ॥ १० ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

भीष्मासारिखा सेनानाथु । आमुचें दळीं असे अद्भुतु । जो अत्यंत कुशळ तो समर्थु । सैन्यरचनाठायीं ॥ ९७ ॥ तेणें भीष्में संरक्षिलें होत्सातें । परी आमुचें दळ तें दिसें अपुरतें । हें माझें अंतरीं आश्चर्य वर्ते । अगा आचार्या स्वामी ॥ ९८ ॥ अशक्त आणि बळें अपुरते । तें भीमसेन संरक्षक होत्सातें । परंतु दिसतसे अति पुरतें । या पांडवाचें सैन्य हें ॥ ९९ ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

मग ह्मणे आचार्या परियेसीं । अपर्याप्त आमुचा सैन्यराशी । अनंत अपरिमित सर्वस्वेंशीं । गणना सैनिकासी कोण करी ॥ २९ ॥ एकादश अक्षौहिणी अति उन्नत । एकापरिस एकु वीर अत्यद्भुत । त्याहीवरी भीष्मा ऐसा सेनानाथ । असे रक्षित सर्व सेना ॥ ३३० ॥ तरी अक्षौहिणीची संख्यासंपत्ती । श्रीव्यासें लिहिली महाभारतीं । तेचि सांगेन मी तुह्मांप्रती । एकाग्रचित्तीं परिसिजे ॥ ३१ ॥ ॥

१ अधिकार. २ आश्रित झाले. ३ योग्यता. ४ कठीणपणा. ५ साहाय्यकर्ता. ६ जोडी. ७ थोडे. ८ मोठा, दांडगा.

एको रथो गजश्चैको नराः पंचपदातयः । रथश्च तुरगास्तज्ज्ञैः पत्तिरित्यभिधीयते ॥ ११ ॥ पत्तिं तु त्रिगुणामेतां विदुः सेनामुखं बुधाः ॥ त्रीणि सेनामुखान्येको गुल्म इत्याभिधीयते ॥ त्रयो गुल्मा गणो नाम वाहिनी त्रिगुणास्त्रयः ॥ स्मृतास्तिस्रस्तु वाहिन्यः पृतनेति विचक्षणैः ॥ चमूश्च पृतनास्तिस्रः तिस्रश्चम्वस्त्वनीकिनी ॥ अनीकिनीं दशगुणां प्राहुरक्षौहिणीं बुधाः ॥ अक्षौहिण्याः प्रसंख्यानं रथानां द्विजसत्तमाः ॥ संख्यागणिततत्वज्ञैः सहस्राण्येकविंशतिः ॥ शतान्युपरिचैवाष्टौ तथा भूयश्च सप्ततिः ॥ गजानां परिमाणं तु एतदेवात्र निर्दिशेत् ॥ ज्ञेयं शतसहस्रं तु सहस्राणि तथा नव ॥ नराणामपि पंचाशच्छतानि त्रीणि चानघ ॥ पंचषष्टिसहस्राणि तथाश्वानां शतानि च ॥ दशोत्तराणि षट् प्राहुर्यथावदभिसंख्यया ॥ एतामक्षौहिणीमाहुः संख्यातत्वविदो जनाः ॥ म० भा० आ० अ० २ ॥ ॥

तरी सेना ते चतुरंग जाण । रथ गज पदाति अश्व पूर्ण । ऐसें हें चतुरंगसेनेचें गणन । सांग सांगेन परियेसा ॥ ३२ ॥ तरी एक रथ एक गज । पांच नर तीन अश्वराज । इतुकी गणना ते पत्ति सहज । एवं व्याज दहाचें पैं ॥ ३३ ॥ हेचि गणना त्रिगुणित कीजे । तयाचें नाम सेनामुख बोलिजे । तीन रथ तीन सहजें । पंधरा जाणिजे पदाति पैं ॥३४॥ आणि नव अश्वांचें पैं गणित । एवं सकळ तीस बोलिजत । सेनामुख केल्या त्रिगुणित । गुल्म होय एकु जाणा ॥ ३५ ॥ नव रथ आणि नव कुंजर । सत्तावीस अश्व पंचेचाळीस नर । एवं नव्वद संख्या साचार । गुल्म थोर यातें ह्मणती ॥३६॥ तेंचि गुल्म केलिया त्रिगुणित । एकु गण होतसे निश्चित । एक गणाचे सत्तावीस रथ । तेंचि गणित कुंजरांचें ॥ ३७ ॥ नर एकशत पंच तीस । एक्यांयशी जाणा पां अश्व । एवं दोनी शतें सत्तरियांस । सावकाश गणित गणाचें ॥ ३८ ॥ तोचि गण केलिया त्रिगुणित । एकी वाहिनी असे होत । वाहिनीचे एक्यांयशी रथ । तेंचि गणित गजांचें ॥ ३९ ॥ चारी शतें पांच नर जाण । दोनी शतें त्रेचाळीस अश्व पूर्ण । एवं आठ शतें दहा गणन । वाहिनी पूर्ण चतुरंग सेना ॥ ४० ॥ ऐसी वाहिनी केलिया त्रिगुणित । एकी पृतना होतसे निश्चित । इचे दोन्ही शतें त्रेचाळीस रथ । तेंचि गणित गजाचें पैं ॥ ४१ ॥ बारा शतें पंधरा पदाति । सात शतें एकुणतीस अश्वयति । एवं चोव्वीस शतें तीस गणती । पृतना संत तत्वज्ञ जे ॥ ४२ ॥ तेचि त्रिगुणित केलिया पृतना । एकी चमू होतसे विचक्षणा । सात शतें एकुणतीस रथगणना । गजही जाणा तितुकेची ॥ ४३ ॥ छत्तीस शतें पंचेचाळीस नर । एकवीस शतें सत्यांयशी अश्व सार । एवं सात सहस्र दोनशें नव्वद थोर । गणना साचार चमूची हे ॥ ४४ ॥ तोचि चमू केलिया त्रिगुणित । एकी अनीकिनी असे होत । तिचे एकवीस शतें सत्यांयशीं रथ । तोंचि गणित गजांचें ॥ ४५ ॥ दहा सहस्र नव शतें पंच तीस । नर जाणावे सावकाश । सा सहस्र पांच शत एकषष्टि अश्व । गणना परीस सर्वांची ॥ ४६ ॥ एकवीस सहस्र आठ शतें सत्तरीं । एकी अनीकिनीची महाथोरी । हे दशगुणित केल्या महाभारी । जाण कुसरी अक्षौहिणी ते ॥ ४७ ॥ एके अक्षौहिणीचें गणन । एकवीस सहस्र आठ शतें सत्तरीं पूर्ण । इतुकें रथांचें गणन जाण । तेचि परिमाण गजांचें ॥ ४८ ॥ एक लक्ष नवसहस्र तीनशें पन्नास । इतुकी पदाति जाण सावकाश । पासष्टिसहस्र सा शतें दहा अश्व । अक्षौहिणीची गणना इतुकी ॥ ४९ ॥ एवं दोनी लक्ष अठरा सहस्र सात शतें । एके अक्षौहिणीची गणना निश्चितें ।

ऐसिया अकरा अक्षौहिणी अमितें । सैन्य पुरतें तेंही ऐसें ॥ ३५० ॥ दोनी लक्ष चाळीस सहस्र पांच शतें सत्तरीं । रथसंख्या जाण पां सर्वांपरी । इतुकेंचि कुंजर सैन्यामाझारी । मदें करी अतिउन्नत ॥ ५१ ॥ बारा लक्ष दोनी सहस्र आठ शतें पन्नास । पायींचे शूर जाण पां सावकाश । सात लक्ष एकवीस सहस्र सातशें दहा अश्व । असमसाहस अतितेजस्वी ॥ ५२ ॥ एवं चोव्वीस लक्ष पांच सहस्र शतें सात । अकरा अक्षौहिणींचें गणित । ऐशी चतुरंगसेना आमुची अद्भुत । अपर्याप्त ह्मणोनि ह्मणे ॥ ५३ ॥ आणि पांडवांचें सैन्य पर्याप्त । सात अक्षौहिणी जाण परिमित । तयांचें हि सांगेन गणित । सावचित्त परियेसा ॥ ५४ ॥ एक लक्ष त्रेपन्न सहस्र नउ रथ । तितुकेचि गजही मदोन्मत्त । चारी लक्ष एकुणषष्टि सहस्र दोनशें सत्तरी गणित । महा हिंसत अश्वयाति ॥ ५५ ॥ सात लक्ष पासष्टि सहस्र चारिसें पन्नास । अनेकें शस्त्रें धरते नर बहुवस । एवं पंधरा लक्ष तीस सहस्र नवशतें यांस । असमसाहस गणना इतुकी ॥ ५६ ॥ याही परी दोहींचे सेनापति । तेही मी सांगेन तुह्मांप्रती । आमचा भीष्म महामति । त्यांचा अनर्थी भीमसेनु ॥ ५७ ॥ तरी आमुचे दळीं सेनानाथु । भीष्म महावीर गंगासुतु । एकलाचि सेनेतें असे रक्षितु । काय वृत्तांतु सांगो याचा ॥ ५८ ॥ आधींच प्रळयकाळींचा वैश्वानरु । तयासि साह्य होय जैसा समीरु । जैसा हा भीष्म वसूचा अवतारु । सेनाधरु स्वयें झाला ॥ ५९ ॥ साक्षात जो कीं गंगेचा नंदनु । प्रतापकिरणीं तेजस्वी भानु । रिपुगजयूथपंचाननु । तो भीष्म आपण रक्षकू यांचा ॥ ३६० ॥ अहो जयाचा महिमा अतिप्रख्यात । सूक्ष्मबुद्धि दूरद्रष्टा वीर महंत । तेणें हें सैन्य सर्वत्र रक्षित । भय किंचित न दिसे आह्मां ॥ ६१ ॥ आधींच सैन्यसिंधु अतिदुर्धर । त्यावरी भीष्म वडवाग्नि साह्य थोर । त्यासि अवलोकाया नुपजे धीर । तेथ परपार पावे कोण ॥ ६२ ॥ ऐसें या पुरुषें अधिष्ठिलें । ह्मणोनि आमुचें सैन्य दिसे आगळें । या पांडवांचें सैन्य पर्याप्त भलें । असें संचलें परिमित ॥ ६३ ॥ सप्त अक्षौहिणी मात्र ह्मणोन । आमच्या सैन्यापरीस अति न्यून । तयासिही रक्षकु भीमसेन । चपळ मन सर्वदा त्याचें ॥ ६४ ॥ एकनिष्ठ बुद्धि नाहींच तयासी । शस्त्रास्त्रविद्याही नाहीं भीष्माऐशी । यालागीं विजय दिसत असे आह्मांसी । सर्वस्वेंसीं जाण तूं ॥ ६५ ॥ अथवा दुसरें ऐसें व्याख्यान । हें पांडवांचें बळ पर्याप्त जाण । आह्मां जिंके ऐसें नव्हे परिपूर्ण । दिसे न्यून सर्वार्थें पैं ॥ ६६ ॥ आणि अमचें बळ तें असे पर्याप्त । ययासि जिंकावया अतिसमर्थ । भीम अजि दुर्बळहृदय असे बेथ । तयासि रक्षित सेनानाथु ॥ ६७ ॥ भीष्म शस्त्रविद्येसि योग्य अति । भीमसेन अयोग्य असे सर्वार्थी । ह्मणोनि आमुचेचि तयातें जिंकिती । भयाचि प्राप्ति नाहींच आह्मां ॥ ६८ ॥ ना गा ऐसा जरि तुं निर्भय आहासी । तरी इतुके बोल कासया बोलसी । ऐसें ह्मणाल जरी तुह्मी आह्मांसी । तरी परियेसी विनंती गा माझी ॥ ६९ ॥ माझें इतुकियाचिलागीं बोलणें । या भीष्मासि रक्षावे जीवेंप्राणें । आह्मांसि कल्याण याचेनि रक्षणें । हें तुह्मांकारणें प्रार्थितसे ॥ ३७० ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

संख्या न करवे आमुच्या दळासी । आपुलेनि बळें सकळांसी । भीष्म रक्षिता त्रिकळांसी । जो काळासी नाटोपे ॥ ४२ ॥ परी उणीव एक दिसताहे । पांडव यश घेतील पाहे । त्यांचे गांठीस श्रीकृष्ण आहे । बळराम आमुचा परी नाहीं ॥ ४३ ॥ त्यांचें सैन्य नेमिलें आहे । त्यास भीमसेन बळाचा पाहे । तो अखंड सावधपणें राहे । यालागीं मुख्य तो सर्वांना ॥ ४४ ॥

## दासोपंत—" गीतार्णव "

[ अस्माकं बलम् ] आमुचें दळ अप्रमित । महा महा वीर जेथ । सैन्यबळ बहुत । अलंकारलें ॥ ७६ ॥ अश्व नर गज रथ । योद्धे पराक्रमवंत । शस्त्रास्त्रसामग्री बहुत । जयांपासीं ॥ ७७ ॥ समस्त राये मुकुटांचे । कुंचे ढळती मयोरपत्राचे । कनकदंडां चामरांचें । तेज फांके ॥ ७८ ॥ रणकंकणें शोभती । पायीं ब्रीदें ती रुळती । भाट नागारी वर्णिती । अनंत पवाडे ॥ ७९ ॥ गजावरि राजचिन्हें । दुरूनिचि वोळखि अवलोकनें । वस्त्रे अलंकार भूषणें । ययां मिति नाहीं ॥ ५८० ॥ दहाही अंगुळिका सुरेखा । तेथ तेथ नाना मुद्रिका । आंगीं सुंदरता लोकां । तें काये सांगणें ॥ ८१ ॥ श्याम-गौरकृष्णवर्ण । शोभती अवघेचि तरुण । जयांचें पाहतां वदन । भुलती कामिनी ॥ ८२ ॥ श्रवणीं कुंडलें झळफळितें । मुकुटीं रत्नें बहुतें । दोन्ही तेजें मीलितें । येकत्रें होती ॥ ८३ ॥ तेणें प्रकाशें प्रकाशलें । वदन विराजों लागलें । मुखीं तांबोळ घेतलें । तेणेंकरूनि ॥ ८४ ॥ अधरोष्ठ दिसती सुरंग । टिळक चंदनाचे अभंग । वरि अक्षतांचे रंग । ते माणिकांहूनि ॥ ८५ ॥ कंठीं माळा बरवती । कवचें आंगीं शोभती । वस्त्रें सुकुमारें पातळ तीं । पाणियाहूनि ॥ ८६ ॥ नानाविधें दिसती छत्रें । मध्यें मध्यें ढळती चामरें । ते पुरुप तेणें अलंकारें । अत्यंत शोभती ॥ ८७ ॥ गजांचें घंटाभूषणें । गगन दुमदुमी नादें तेणें । शब्द करिती अतिमानें । कुंजर जैं ॥ ८८ ॥ वारुवां जडितअळंकारें । तें तेज तेजीं येकत्र । तेथ रथतेज विचित्र । युक्त होये ॥ ८९ ॥ जटितें चक्रें विशाळे । जैशीं सूर्याचीं मंडळें । ध्वजस्तंभ रचले । अग्नीचे काये ॥ ५९० ॥ येक हिरवे पाचीचे । निखळ येक वज्राचे । अपूर्व येक मर्गजाचे । ध्वजस्तंभ ॥ ९१ ॥ गोमेद ये वैडुर्यें । जटित नवरत्नीं पाहें । जयांचें तेज न समाये । मइप्रकाशीं ॥९२॥ ऐसीं सकळें तेजें मीनलीं । अंबरा येकत्र जालीं । वेगळीचि कळा उमटली । तयांचां योगें ॥ ९३ ॥ तेणे तेजें विराजत । सैन्य दिसे शोभित । तें कैसें अवगमत । आइकें द्रोणा ॥ ९४ ॥ सूर्येहूनि आगळा । तेजे भारूचि उद्वेजला । कीं अनंतां विजूंचा घडला । समुदाय हा ॥ ९५ ॥ वरि शस्त्रांची झळफळ । पाहतां दिपती नेत्रगोल । दृष्टि न थरे बुबुळ । पातीं आड करी ॥ ९६ ॥ [ अपर्याप्तम् ] इतुकेंहीं असोनि परि । तया पुरुपांचां शरीरीं । कांहीचि सामर्थ्यसामग्री । ते नये दिसों ॥ ९७ ॥ असामर्थ्याचीं चिन्हें । आंगीं जडलीं ययांकारणें । तींचि कैसीं मद्वचनें । अवधारावीं ॥ ९८ ॥ घालुनि खालुतिया माना । वीरु उभे आइकें द्रोणा । निर्द्रवा जालिया रसना । येकायेकीं ॥ ९९ ॥ सन्मुख पाहों न शकती । पांडव तेज ययांप्रति । न साहवें ऐसें चित्तीं । गमे माझां ॥ ६०० ॥ अधरोष्ठ चाटिती पाहें । ऐसियां चिन्हां करणें काये । गळोनि गेले हातपाये । महावीराचे ॥ १ ॥ मुखींची फोडि मुखीं भिजे । हातींचें पान हातीं सहजें । विडा घेणें हें नुमजे । भ्रमित झाले ॥ २ ॥ येक क्षारेवीण पान खाती । येक ते पान फोडि सांडिती । चावणें सांडिलें दंती । येकां वीरांचां ॥ ३ ॥ क्षणक्षणा लागे मूत्र । क्षणक्षणा मलाची येरधार । येकेंचि क्षणें सूत्र । सुटलें शरीराचें ॥ ४ ॥ तान लागे भूक लागे । येका आड येकु रिघे । व्यग्रचित्त अवघे । आमुचे लोक ॥ ५ ॥ हृदयीं कांडी घसा । वाळोनि गेला घसा । कांती कळा पुरुषां । सांडुनि गेली ॥ ६ ॥ हिंसु आइकोनि वाचा । धाकु वाहती पांडवांचा । आला आला अर्जुनाचा । रथु ह्मणती ॥ ७ ॥ आड करूनि येकांतें । पाहती येक निर्गमातें । एक दाविती हातें । अर्जुनासि ॥ ८ ॥ अवधि जाली जन्माची । ऐसी वदंती येकांची । येक ह्मणती वायांचि । यांचे

जालों ॥ ९ ॥ आघातु पडतांचि श्रवणीं । गजंबु उठी आमुचां सैन्यीं । विसरोनि युद्धाची करणी । अपेक्षिती पळों ॥ ६१० ॥ उठती बैसती निद्रा करिती । येक व्यथा आहे ह्मणती । येक प्रताप वाखाणिती । पांडवांचे ॥ ११ ॥ तें आइकोनिचि एक विराले । येकां अश्रुपात आले । परिग्रह आपुलाले । आठवोनियां ॥ १२ ॥ पांडव न वचति जिंकिले । जो तो ऐसेंचि बोले । मुख काजळें उटिलें । ऐसें शोभे ॥ १३ ॥ शक्ति पळाली आंगून । उगेचि गळती धनुष्यबाण । पडे जो नरु अडखुळोन । तो चौघीं उचलावा ॥ १४ ॥ कंपु घेतला शरीरें । आली हुडहुडी शोर । दाटले व्रीदांचेनि भारें । तीं सांडिती काढूनि ॥ १५ ॥ येकांचेनि घेतले जीवें । क्षात्रधर्मचि हे सांडावें । कृषिकर्म सुखें करावें । जळो हें शस्त्र ॥ १६ ॥ काये करणें कोठें जाणें । भारांतूनि कैसें फुटणें । यये विचारीं शाहणे । जाले सकळैक ॥ १७ ॥ हळूचि आंवरिती वागोरे । वीर पाहती माघारे । येकु येका आधारें । आगळे फुटों ॥ १८ ॥ [ तत् ] ऐसें जें सामर्थ्यें सुटलें । आमुचें दळ भंगों आलें । तें धैर्याचेनि येकें बोलें । येणें काळा ॥ १९ ॥ [ भीष्माभिरक्षितम् ] भीष्में राखिलें निर्वाणीं । 'ना भि रे ना भि ह्मणौनि । न जुंझावें तुह्मीं कव्हणी । पांडवांसीं ॥६२०॥ निवांत पाहवें येथें तुह्मीं । पांडवां जिंकैन येकला मी । तुह्मीं आपुलाला स्वधर्मी । ह्मणे चला ॥ २१ ॥ भीम अर्जुन यें लेकुंरं । न घलीं ययांवरि हातियेरें । सांडूनि अवघीं शस्त्रें । धरीन जितेचि ॥ २२ ॥ नकुळ सहदेव कक्षाद्वयीं । भीम अर्जुन हातीं दोहीं । धर्म कवळीन हृदयीं । भुजादंडे ॥ २३ ॥ श्रीकृष्णा धाडीन द्वारके । युद्धचि जालं असकें । हें म्यां करावें येकें । पाहवें तुह्मीं ॥ २४ ॥ अर्जुनें मातें देखावें । हातीचें शस्त्र सांडावें । लेकुरपणें रुदन करावें । ऐसेंचि होईल ॥ २५ ॥ मग तयाची बुझावणी । आह्मींचि करावी मागुतेनि । का सदेहो तो चक्रपाणी । पडैल कृष्णातें ॥ २६ ॥ न चलती पांडवाचीं हातियेरें । ऐसें केलें मग न पुरे । आता तुह्मी मजमाघारे । उगेचि असा' ॥ २७ ॥ सामर्थ्यहीन सकळ । भंगले जे आमुचें दळ । ते भीष्में आपुलें बळ । देऊनि रक्षिलें ॥ २८ ॥ [ एतेषां बलम् ] आतां यया पांडवाचें । सैन्यबळ जें साचें । मांडलें प्रळयकाळाचें । जैसें मेहुडें ॥ २९ ॥ [ पर्याप्तं तु ] इये दृष्टिचेनि सावकाशें । निश्चयें पाहता तें कैसें । दिसे सांगैन तें अनारिसें । ह्मणे माना ॥ ६३० ॥ महासमर्थ बळवंत । धैर्यवीर्यतेजयुक्त । सैन्य थोडेंचि परि असंख्यात । ऐसें वाटे ॥ ३१ ॥ सामर्थ्यवंताचें लक्षण । भासे कैसें तें सांगेन । बाह्यदृष्टी जें चिन्ह । तें अंतरीं जाणावें ॥ ३२ ॥ अवघेचि पाहती क्रूरा दृष्टी । आंवळिती शस्त्रांचिया मुठी । घालूं अपेक्षिती मिठी । आह्मांवरि ॥ ३३ ॥ गजाचिया थाटांवरि । जैसा चाले केसरी । तैसें पांडवदळ भारी । उंचावले ॥ ३४ ॥ आरक्त जयाचे नयन । करकरा वाजती दशन । आवेशले भुजापीटण । पांडव करिती ॥ ३५ ॥ खांड मिसिया सरसाविती । आह्मा उजू माथे तुकिती । भयचि नाहीं चित्तीं । जयां आमुचें ॥ ३६ ॥ धैर्य प्रतापु शरीरीं । न सटे तो ये बाहेरि । रोषावेशा तोचि करी । आह्मां देखोनियां ॥ ३७ ॥ तेजें ताविती परदळ । शूरत्वाचे स्पंद प्रबळ । बोल बोलती ते मवाळ । येतीचिना ॥ ३८ ॥ धैर्य विसांवलें अंतरीं । दक्षता प्रकटे बाहेरि । पळोनि जावे हे सामग्री । करूंचि विसरलें ॥ ३९ ॥ 'प्राण दानें घ्या रे' ह्मणती । आपुलेनि सामर्थ्यें उडविती । आतां मग झोंबती । माझां पदरीं ॥ ६४० ॥ कलीचिवरि हे उठिले । दाविती अनिवारें बळें । आह्मीं अहंमत सांडिलें । ह्मणोनि बरें ॥ ४१ ॥ हांकोचिसवें स्फुरण । उठी आंगीं आंगवण । तयाची करावया जतन । समर्थ जे कां ॥ ४२ ॥ न जिंकों ऐसें वचन । न बोले थोर सान । आवेशु रोषु स्फुरणें । ययांचें बहू

॥ ४३ ॥ मुखावरि विजयकळा । पडोंचि पाहती गळां । हळूहळू पाउलां पाउलां । साउमे येती ॥ ४४ ॥ पालवें पुसोनि खड्गातें । आले उगारलेनि हातें । पांडवसैन्य आमुतें । अनिवार दिसे ॥ ४५ ॥ [ इदम् ] हें ऐसें अनिवार परि । कां राहिलें हातु न करी । ह्मणशील तरी अवधारी । माझें वचन ॥ ४६ ॥ [ भीमाभिरक्षितम् ] भय दाऊनि आपुलें । हें भीमसेनें वारिलें । नीतिमांडणी मांडिलें । फुटों नेदी ॥ ४७ ॥ रचनया राखिलें दळ । आंवरूनि ठायीं निश्चळ । आगळे उणे भूपाळ । फांकतीचिना ॥ ४८ ॥ ' स्थीरु स्थीरु राहा राहा ' । ऐसेंचि बोले भीमु हा । ' आज्ञा धर्माची पहा । मग करा वेगु ॥ ४९ ॥ नमस्कारूनि श्रीकृष्णातें । आज्ञा पुसोनि धर्मातें । अर्जुनु जंव ये येथें । तंव न करा युद्ध ॥ ६५० ॥ इतुलाही योगु घडला । मी पालवीन समस्तांला । मयोरकुंचा भ्रमला । तेचि संज्ञा ॥ ५१ ॥ तंव न झुंझावें कव्हणीं ' । भीमें ऐसें बोलोनि । आज्ञांवरि पर तें आंवरूनि । सैन्य राखिलें ॥ ५२ ॥ ऐसी आपुली उणीव । आणि वैरियांचे प्रकृष्टभाव । आह्मी दृष्टी स्वयमेव । देखोनि आलों ॥ ५३ ॥ इतुलेंचि तुमतें पुसणें । इतुलया कायें करणें । इतुलें असतां उणें । क्षेम कैसें ॥ ५४ ॥ तुह्मीं सर्वज्ञ आणि गुरु । तरि कवणा पुसावा हा विचारु । तथापि आमुतें प्रकारु । येकु स्मरला ॥ ५५ ॥ तेणेंचि प्रकारें बोलैन । समस्तां आज्ञा देईन । ते मानूनि प्राण । कार्यीं वर्तावें ॥ ५६ ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

आजि युद्ध भीष्माचें । तेणें रचिलें सैन्य आमुचें । नेटेंपाटें परि तयाचें । कैसें चिन्ह ॥ ६४ ॥ वीरश्रीची कळा । ते मुखावरी नाहीं सकळां । असमर्थता नृपाळा । कां नेणों आली ॥ ६५ ॥ उगाचि दचकु भरिती । वारु ते बुजू[1] घेती । पुढें करिताही दंती[2] । होतीचि ना ॥ ६६ ॥ मागें पुढें पाहतां । आगाणूक नाहीं समस्तां । संग्रामापूर्वीच अवस्था । ऐसी जाली ॥ ६७ ॥ आता हें पांडवांचें केवळ । सैन्य जें प्रबळ । तें कैसें हें सकळ । अवधारी पां ॥ ६८ ॥ आजि रणपटु भीमातें । युद्ध संपादिता तो । तेथें तेणें स्थावरिलें सैन्यातें । स्वता आपुलिया ॥ ६९ ॥ युद्धभूमिका पाहोनि । केली अपूर्व मांडणी । आतां तयाची उभारणी । अवलोकितां ते ॥ ७० ॥ सैन्य तें भासे समर्थ । आवेशें वीर समस्त । नृत्य करिती उपस्थित । देखोनि युद्ध ॥ ७१ ॥ जंव जंव नेटु पडे । तंव तंव वीरश्री चढे । गर्जती वीर धनुवाडे । अपांडेंशी[3] ॥ ७२ ॥ एक ते दाविती आवांका । घेती पर्वतेसी थडका । थरथरा कांपे भूमिका । येसणें न माये ॥ ७३ ॥ एका पायीं बिरुदावळी । एक ते देती आरोळी । उड्डाण करिती अंतराळीं । उगेचि एक ॥ ७४ ॥ उलथू पाहती मेदिनी । सूर्यातें दाटिती नयनीं । स्वतेजें तपती रणीं । आपणचि जे ॥ ७५ ॥ एक ते राये मुकुटांचे । क्रौंचमयूरपत्रीं एकाचें । एक न सुधे शंकेचें । पान न धरिती ॥ ७६ ॥ एकांचे मोकळे कैंवर । एक नृत्य करिती वीर । उन्मत्त जाले समग्र । पिसाळले ॥ ७७ ॥ वारु हिंस करिती । तो नादु न साहे येरांप्रती । कां ये द्विजमूर्ति । प्रवर्तले हो ॥ ७८ ॥ सजळ मेघ चालिले । कीं प्रळयाचे मान पावले । संहारकर्ते न प्रेरिले । पुरुष पाहे ॥ ७९ ॥ एकाचीं शस्त्रें झळझळतीं । एक धारां निरपतीं । रविबिंब तया दीसीं । झांकोळले हें ॥८०॥ आवेशें करिती पाउल । बोलती प्रतापाचे बोल । पुढें पुढें केवळ । पाशीं पावले ॥ ८१ ॥ ऐसें सैन्य पांडवांचें । समर्थ दिसें साचें । ययाखालि आमुचें । लोपलें बल ॥ ८२ ॥

१ बुजतात. २ हत्ती. ३ योग्यतेहून अधिक. ४ सामर्थ्य. ५ आरडाओरड. ६ डोईवरील केशपाश.

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

आमचे वीर असे । ह्मणोनि तें सैन्य असमर्थ दिसे । भीष्में रक्षिलें असे । समर्थ हें सैन्य आमुचें ॥ १८० ॥ ज्यांत पूर्वोक्त वीर । आणि भीष्म ज्यास रक्षणार । तो समर्थ कां न दिसे भार । भाव ऐसा ॥ ८१ ॥ या पांडवांचा भार । त्यास तो भीम रक्षणार । तो काय सरी पावणार । या भीष्माची ॥ ८२ ॥ भीष्म इच्छामरण अमर । आणि निःसीम धनुर्धर । भीम टोणपा मुडकैर । बलाढ्य जाला तरी काय ॥ ८३ ॥ या श्लोकाचा अर्थ । प्रकारांतरें दिसे तो व्यर्थ । कीं आमुचें पूर्ण असमर्थ । समर्थ सैन्य पांडवांचें ॥ ८४ ॥ कीं भीष्मद्रोणादि मनीं । सख्य कळावे ह्मणूनि । हा बोलला भय मानूनि । तरी ते ह्मणते सख्य करी ॥ ८५ ॥ मी जिंकेन हा भरंवसा । ह्मणूनि युद्धाचा वळसा । तो कां बोलेल ऐसा । कीं समर्थ बळ पांडवांचें ॥ ८६ ॥ आतां समर्थ जरी आपण । तरी ह्मणे सावधपणें । तुह्मीं असा हे नीतिनिपुण । नीति सांगे ॥ ८७ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

तथापि आमुचें जें सैन्य । जऱ्हीं भीष्में केलें रक्षण । तऱ्हीं दिसे त्यांसीं अपूर्ण । हे द्रोणा ॥३८॥ भीमें रक्षिलें पांडवसैन्य । तें युद्धीं दिसतें परिपूर्ण । ह्मणोनि त्यांचे आधिक्य जाण । कृष्णाश्रयें ॥ ३९ ॥

## निवृत्तिदेव

अमुचें भीष्में सैन्य रक्षिले नेमें । पांडवसैन्य रक्षिलें भीमें । ह्मणोनि तें अधिकाक्रमें । श्रीकृष्णाश्रयें ॥ १० ॥

## उद्धवचिद्धन

सवाईः— जे असमर्थ दळीं अमुचे विर [1]भ्याड असंगर त्याजप्रती ।
देउनियां धिर रक्षि महा विर भीष्म उभा पुढें सैन्यपती ॥
पाडवसैन्य तया परिपूर्तिस रक्षित भीम सहर्षमती ।
सैन्यविभाग करूं अपुला ह्मण रंचितसे बहु शीघ्रगती ॥ १० ॥

## माधव—( तंजावर प्रत )

बहुत हें आमुचें सैन्य । शस्त्र अस्त्रीं महाप्रवीण । आणि भीष्म ऐसा रक्षक सर्वज्ञ । अमित्रजन ते किती ॥ २४ ॥ मज दिसतें ऐसें पाहतां । आह्मांसीं संग्राम करितां । यश न चढेचि तयांच्या हातां । जय सर्वथा प्राप्त मज ॥ २५ ॥ आधींच त्यांचें बळ थोडकें । तें रक्षिताहे भीम अविवेकें । ज्यासि संग्रामकौशल्य निकें । नाहीं ठाउके कदापिहीं ॥ २६ ॥ जो उगाचि दिसे आकारें पुष्ट । नव्हेचि शस्त्रास्त्रीं वरिष्ठ । आतां मज कल्पतें जें इष्ट । तें मी स्पष्ट सांगतों तुह्मां ॥ २७ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी. "

अपर्याप्त आपुलें सैन्य । याचा रक्षित भीष्म बळवान । पर्याप्त पांडवांचें सैन्य । त्याचें रक्षण भीम करी ॥ ३१ ॥

[1] आडदांड.

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

भुजंगप्रयातः– जऱ्हीं रक्षिलें शंतनूच्या सुतानें । तऱ्हीं थेकुलें आमुचें सैन्य मानें ॥
मला पांडवांचें गमें सैन्य थोर । जया रक्षितां भीम झुंजार वीर ॥ १४ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

आमुची सेना असे गाढी । भीष्म रक्षिताहे प्रौढी । त्यांची सेना बलहीन थोडी । भीम राखी बळानें ॥ १० ॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः– परंतु निर्बळ दिसे पांडवदळ । भीम रक्षपाळ असतांही ॥
आमुचें सबळ तुह्माबीण दिसे । तुह्मी रक्षा कैसें काय वाणूं ॥
विश्वाचे अंकुर तैसे महावीर । काळदंतोंकार[1] शस्त्रें हातीं ॥
तुका ह्मणे संतां ऐकावे सावध । बोलतां सक्रोध राव झाला ॥ १० ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुपः– असमर्थ तयांचें तें, समर्थ बळ आमुचे । जें सैन्य रक्षिलें भीष्में, त्यांचें तो भीम रक्षिता ॥२४॥

## मोरोपंत

आर्याः– दिसती अपूर्ण अमुची भीष्में रक्षोनि भीमसेना ही ।
पूर्ण दिसे पार्थाची अनुसरतां जाण भीमसेना ही ॥ १० ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
असमर्थ तयांचे तें, समर्थ बळ आमुचें मला वाटे ।
जें सैन्य रक्षिलेंसे भीष्में, त्यांचेहि भीम तो रक्षी ॥ २८ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

आमुचें जें सैन्य अपुरतें । तें भीष्मानें राखिजेतें । त्यांचें सैन्य पुरतें । तें भीमसेनें राखिजे ॥ १० ॥

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।
भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ॥ ११ ॥**

**अर्थः—" तरी आतां आपण सर्वांनीं आपापल्या नेमून दिलेल्या सैन्याच्या सर्व प्रवेशद्वारीं राहून भीष्माचेंच चोहोंबाजूंनीं रक्षण करावें."**

---

१ अक्राळविक्राळ, महातीक्ष्ण.

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी )"

मग पुनरपि काय बोले । सकळ सैनिकांतें ह्मणितलें । आतां दळभार आपुलाले । सरसे करा ॥ २१ ॥ जया जिया अक्षौहिणी । तेणें तिया आयणी । वरगण कवणकवणीं । महारथीया ॥ २२ ॥ तेणें तिया आवरिजे । भीष्मातळीं राहिजे । द्रोणातें ह्मणे पाहिजे । तुह्मी सकळ ॥ २३ ॥ हाचि एकु रक्षावा । मी तैसा हा देखावा । येणें दळभारु आघवा । साचु आमुचा ॥ २४ ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

तरी ठायीं ठायीं रणभूमीसी । जतन करावें भीष्मदेवासी । तो तुह्मां रक्षील समस्तासी । यासी संदेह नाहीं ॥ ११ ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

आतां तुह्मी समस्तें ऐसें करावे । आपुल्या वाहनीं आरूढावे । आरूढोन सन्नद्ध असावे । यथाविभाग स्थिती पैं ॥ १०० ॥ हा भीष्म आमुच्या जीवाचें जीवन । याचें सर्वात्मना करावे संरक्षण । भीष्मासी जालिया कल्याण । पांडव केउली बापुडी ॥ १ ॥ जैसे पंचाननाचे नादध्वनी । जंबुकासि होय पैं पळणी । तैसें या भीष्मावे प्रतापेंकरूनी । साधी लंघिती दिग्मंडळ ॥ २ ॥ ह्मणोनि याचें संरक्षण । हेंचि कारणामाजि मुख्य कारण । ऐसें द्रोणेसी बोलिला दुर्योधन । तें जाले श्रवण भीष्मासी ॥ ३ ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

विशेष कर्तव्यद्योतनार्थ । मुळींच्या " तु " काराचा ऐसा अर्थ । तेचि विशेष कर्तव्य असे सांगत । ते दत्तचित्त परियेसा ॥ ७१ ॥ ह्मणे तुह्मां आदिकरोनि समस्तांसी । माझी इतुकीच प्रार्थना असे तुह्मांसी । एकु हा भीष्मचि रक्षावा सर्वस्वेंसीं । याचिये आज्ञेसि भंगावे ना ॥ ७२ ॥ यासि देखावें मजचिसमान । सांगेल तें प्रतिपाळावे वचन । इये संग्रामभूमीसि बळकावोन । धैर्य धरोन समस्तीं रहावें ॥ ७३ ॥ जैसें दहाही दिशा व्यापोनी । सैनिक राहिले जें जें स्थानीं । तें तें स्थान राखावे बळकावोनी । आणि सेनानी रक्षूं सैन्य ॥ ७४ ॥ आपुलाली रणभूमि न टाकूनियां । युद्धाचें ठायीं उत्साह धरूनियां । पुढां अतिसावध राहोनियां । लक्ष लाऊनिया रक्षा भीष्मु ॥ ७५ ॥ तैसेचि पृष्ठभागीचे सेनाधिपति । हे तेही भीष्मीं लावूनि चित्तवृत्ति । एकु भीष्मचि रक्षावा सेनाधिपति । जय सर्वार्थी जेणें तुह्मां ॥ ७६ ॥ तैसेचि उभय पार्श्वभागींचे सैनिक । दशदिशांच्या व्यापोनि जे मांडलिक । स्वस्थानीं राहोनि संग्रामोन्मुख । तेहि सम्यक् रक्षावा भीष्म ॥ ७७ ॥ एकुचि हा भीष्मु सेनाधिपति । रक्षिल्या आह्मांसि विजयप्राप्ति । त्याच्या प्रसादें सर्व रक्षिले होती । राज्यप्राप्ति अनायासें ॥ ७८ ॥ ऐसें बोलोनियां दुर्योधन । स्वयें राहिला तूर्णींभूत होऊन । येणें वचनें भीष्म आपण । संतोष पूर्ण उपजवी राया ॥ ७९ ॥

## रमावल्लभदास—“ चमत्कारी ” टीका

तरी आतां सर्वी ऐसें करावें । नेमस्तस्थळीं राहून भीष्मा न विसंबावे । हा सर्वांस रक्षील स्वभावें । संग्रामांत परिसिजे ॥ ४५ ॥ परिसा गीतानिरुपण । सांगे संजयो आपण । भक्तीं द्यावें अंतःकरण । जन्ममरण निवारेल ॥ ४६ ॥

## दासोपंत—“ गीतार्णव ”

* ( १ ) [ सर्वेषु अयनेषु च ] सकळही मार्ग असती । अवधारा जी गुरुमूर्ति । हेचि माझी उक्ति । जे त्या त्या मार्गी ॥५७॥ [ यथाभागमवस्थिताः ] आपुलालेनि भागें राहिले । न चळती कांहीं केलें । मर्यादायुक्त जे भले । महावीर ॥५८॥ [ भवंतः सर्व एव हि ] तयांप्रति हेंचि वचन । तुह्मी सर्वीही मिळोन । आज्ञावाक्य सांगैन । तेंचि करावें ॥ ५९ ॥ [ भीष्ममेवाभिरक्षन्तु ] येकले या भीष्मातेंचि रक्षावें । हा तुह्मां रक्षील स्वभावें । इतुलेनि कार्य अघवें । आमुचें संपादैल ॥६६०॥ निश्चित बोलिला वचन । दुर्योधनु तो राया जाण । तरि येथींचा भाव सांगैन । मार्ग ते कैसे ॥ ६१ ॥ संग्रामु जिंकावयाकारणें । जेणें जेणें प्रवर्तणें । ते ते मार्गचि जाणणें । संप्रदायभेदें ॥६२॥ धनुर्विद्या साधिजे । तो मार्गुचि वेगळा ह्मणिजे । मार्गें तेणें नेणिजे । गदायुद्ध ॥ ६३ ॥ छत्तिसां दंडांची परजणी । भिन्न भिन्नचि मार्ग ते मानी । संग्रामु जिंकिजे जेहींकरूनि । रिघु निघु करितां ॥ ६४ ॥ वेगळी गति वेगळी युक्ति । आयुधांची वेगळी व्यक्ति । वेगळा गुरु वेगळी प्रतीति । तरि मार्ग वेगळाले ॥ ६५ ॥

( २ ) [ अयनेषु च सर्वेषु ] युद्धसाधन अनेक । ते ते मार्गचि सकलैक । तेथें तेथें साधक । क्षत्री जे जे ॥ ६६ ॥ [ यथाभागमवस्थिताः ] तेहीं करितां साधन । जे विद्या होये निष्पन्न । ते जयाची तयाचिलागून । प्रयोजना ये ॥ ६७ ॥ येकाची विद्या येकातें । सत्य नये प्रयोजनातें । ह्मणोनि आपुलालेनि मते । वेगळालें युद्ध ॥ ६८ ॥ जया जितुला विद्यायोगु । तयाचा तितुलाचि विभागु । ऐसा असतां प्रसंगु । काये ह्मणे ॥६९॥ आश्रयूनि नाना मार्ग । अधिकारें पावे विद्याभाग । क्षत्री राहिले अभंग । संग्रामीं जे ॥ ६७० ॥ [ भवंतः सर्व एव हि ] तयातें विनवी स्वभावें । तुह्मी अवघीं येक करावें । सर्वथा निश्चयें मानावें । माझें वचन ॥ ७१ ॥ [ भीष्ममेवाभिरक्षन्तु ] तुह्मी रक्षावें भीष्मातेंचि । पुरें सागणें इतुलेंचि । आतां गति संरक्षणाची । तेंचि कैसी ॥ ७२ ॥ जेणें जेणें मार्गें पडैल । भीष्मावरि युद्ध येईल । तेथें तुह्मी स्वविद्याबळ । आश्रयावें ॥ ७३ ॥ मार्गें घालूनि भीष्मातें । तेणें मार्गें तेथें । पाहोनि अधिकारभागातें युद्ध करावें ॥ ७४ ॥ प्राणाचें दुर्ग कराल । यातें तुह्मी राखाल । तरि महानिर्वाणीं रक्षील । ह्माचि तुमतें ॥ ७५ ॥ अथवा रक्षणप्रकारु । तों आनु येक असे विचारु । सांगिजैल दिगंबरानुचरु । ऐसें ह्मणे ॥ ७६ ॥ भीष्मेंचि युद्ध करावें । यया मागें पुढें तुह्मी असावे । घातकियांपासाव रक्षावे । भीष्माचार्यातें ॥ ७७ ॥ संग्रामु करितां दुःश्चित्तपणें । क्षणें मागूनि येकादा हाणे । सव्यें वामें रक्षणें । तयापासाव तुह्मी ॥ ७८ ॥ पाठि राखां मोकलिला ।

* सूचनाः–दासोपंत कांहीं श्लोकांचे निरनिराळया तऱ्हेनें एकापेक्षां जास्त अर्थ देतात. तेथें हे आंकडे घातले आहेत. पुढें श्लोक ३२ व ३६ पहा.

आणि भीष्मु येकला। वैरीं खोळे घातला। तैं काये करणें ॥७९॥ तरि ऐसिया संकटांपासूनि। रक्षावें तुह्मीं ययालागूनि। वेगळें पाठीपासूनि। जावेंचिना ॥ ६८० ॥ ना तरि आन येकें भावें। येथींचा भावार्थु जाणवे। आचार्याप्रति स्वभावें। बोले दुर्योधनु ॥ ८१ ॥

( ३ ) [ अयनेषु च सर्वेषु ] प्रवर्ततां राजनीती। अनंत मार्ग तेथें असती। त्यांमाजी प्रयोजना येती। संग्रामविषयीं जे ॥ ८२ ॥ आपुलाले सुजाणपणें। जो मार्गु आश्रयिला जेणें। संग्रामीं रिघु निघु जाणे। यया हेतु ॥ ८३ ॥ तोचि तयातें सोपानु। तेणेंचि साधे प्रयोजनु। ययालागीं दुर्योधनु। ऐसें बोले ॥ ८४ ॥ संग्रामीं जयो पावणें। नीतिमार्ग ऐसियाकारणें। तें सर्व मार्ग जाणें। तयांचां ठायीं ॥ ८५ ॥ [ यथाभागमवस्थिताः ] निज योग्यतेनुसार। आपुलाले सैन्येसीं समग्र। भूमि न सोडित वीर। उभे असतां ॥८६॥ देखोनि तया सेना। वेगळाली भाररचना। दुर्योधनु विज्ञापना। कैसी करी ॥ ८७ ॥ [ भवंतः सर्व एव हि ] तुह्मीं नीतिमार्ग जाणतीं। आणि अपार सैन्यवंतीं। येक करावें प्रस्तुतीं। सांगिजैल जें ॥ ८८ ॥ [ भीष्ममेवाभिरक्षन्तु ] भीष्माचि येकातें तुह्मीं। रक्षावें आजि संग्रामीं। निर्धारें हेंचि आह्मीं। मागिजत असे ॥ ८९ ॥ जो फावैल नीतिमार्गु। तैसाचि करावा संग्रामयोगु। नीति सोडूनि प्रसंगु। हटाचा न करावा ॥ ६९० ॥ नीतिमार्गें सैन्यें बळें। तुह्मीं पाहिजे यया रक्षिलें। आतां रक्षण ह्मणितलें। तेंचि कैसें ॥ ९१ ॥ जंववरि आपणा पुरवे। तंव तैसें युद्ध संपादावें। विधिमार्गें आणि प्रभावें। सैन्यबळाचेनि ॥ ९२ ॥ नागवे ऐसें जालया। पाठीसि यावें यया। मागून पुढून तया। भीष्मा रक्षावें ॥ ९३ ॥ जेणें जेणें मार्गें रिघावा। करील तैसा रक्षावा। जिवा वेगळा न करावा। जिवाचा जीवु ॥ ९४ ॥ कीं आपुलालेनि मार्गें मांडले। आपुलालेनि सैन्यभारें रचले। रणीं वीर राहिले। युद्धालागीं ॥ ९५ ॥ तया बोले दुर्योधनु। भीष्मु हा माझा प्राणु। मीचि ऐसा मानूनु। यया रक्षा ॥ ९६ ॥ तुमचीं असती शरीरें। तंव यया न सोडावें अंतरें। मागें पुढें आदरें। सांभाळावा ॥ ९७ ॥ येकु जाईल बहुतांवरि। तैं तुह्मीं याचांचि पदरीं। ह्मणें येकादासि तरि। दृष्टि करावी ॥ ९८ ॥ साम्यें दंडें माया भेदें। परदळ भंगावे विनोदें। परि आपण तेणें प्रमादें। भुलावे ना ॥ ९९ ॥

( ४ ) [ अयनेषु च सर्वेषु ] अथवा दळाची केली रचना। जाणोनि लोकांची धारणा। जे जे कार्यांची ते ते सूचना। मार्ग ॥७००॥ येकीं पुढेंचि असावें। येकीं दोहीं भुजीं चालावें। येकीं पाठीसि यावें। ऐसें केलें ॥ १ ॥ दोहीं पार्श्वी काठीकार। मध्यें मध्यें कांबीकार। आडवे तिडवे वीर। येती कैसे ॥ २ ॥ नियमलेनि नीतिमार्गें। लोकीं वर्तावे आज्ञायोगें। ते तेचि कीं प्रसंगें। मार्ग जाणावे ॥ ३ ॥ ऐसे नियम सकळैक। ते ते मार्ग अनेक। तयां समस्तां मार्गीं लोक। तेचि कैसे ॥ ४ ॥ [ यथाभागमवस्थिताः ] आपुलालेन कार्यविभागें। चालावें आपुलालेन मार्गें। न होआवे पुढें मागें। ऐसा नियमु ॥ ५ ॥ एवं सकळां मार्गीं वर्तते। आश्रयूनि कार्यविभागातें। न सोडित ठायातें। ठेले वीर ॥ ६ ॥ [ भवंतः सर्व एव हि ] तेहीं येक करावें। जें माझेही बरवें। पुढतोपुढती न पुसावें। सांगणें येक ॥ ७ ॥ [ भीष्ममेवाभिरक्षन्तु ] भीष्मु मानूनि माझा ठायीं। हा रक्षावा अवघींहीं। जवळीपासिकही। पारिखा येऊं नेदावा ॥ ८ ॥ ययासमवेत युद्धा जाणें। ययासमवेत परतणें। ययासमवेत राहणें। मार्गें आपुलालया॥९॥आपुलेन मार्गें वर्तावें। आपुलेनि मार्गें यावें। जावें आपुलेनि मार्गें राहावें।

मर्यादावंतीं ॥७१०॥ कार्यविभाग अपुलाला । तो जयाचा तेणेंचि पाहिजे केला । मार्गु सांडी आपुला । तो माझा वैरी ॥११॥ तुह्मी आपुलालेन मार्गें । आणि कार्यविभागें । पाहिजे त्यापरी अवघे । भीष्मा रक्षा ॥१२॥

( ५ ) [ अयनेषु च सर्वेषु ] ना कीं कठिण भूमिका पाहोनि । सैन्याची केली मांडणी । रक्षपाळ स्थानीं स्थानीं । सभंवते तया ॥ १३ ॥ एकीं ठायींचि असावें । येकीं सभंवतें फिरावें । येकीं येका करावें । रात्रीं सावधान ॥ १४ ॥ सैन्यासभंवतें परिस्तरण । मृत्तिका काष्ठें पाषाण । अंतरीं यावया लागून । मार्ग नियमिले ॥ १५ ॥ प्रवेशु जालयाही अंतरीं । पावावया राजद्वारीं । संधी संधी परोपरी । मार्ग केले ॥ १६ ॥ जे जे मार्ग जीं जीं द्वारें । तेथें रक्षक आंतु बाहिरें । पारिखा आंतु बाहेरि न चरे । मार्गी कव्हणीं ॥ १७ ॥ आतां ते मार्ग अनेक । आंतु बाहेरि सकलैक । तेथें तेथें लोक । ठेविले कैसे ॥ १८ ॥ [ यथाभागमवस्थिताः ] जेथें जेथें जो ठेविला । तया व्यापारु जो सांगितला । तया अधीनु लोकु केला । तोचि तयाचा भागु ॥ १९ ॥ एवं मार्गरक्षकां बहुतां । स्वधर्मविभागयुक्तां । राजा ह्मणे सर्वथा । हेंचि सांगणें ॥ ७२० ॥ . [ भवन्तः सर्व एव हि ] तुह्मीं समस्तीं आइकावें । सांगिजैल तें करावें । माझें हित पाळावें । ऐसें जरि ॥ २१ ॥ [ भीष्ममेवाभिरक्षन्तु ] आपुलालेनि निजमतें । येतां जातां येथें । तुह्मीं रक्षावें भीष्मातें । दिवा रात्रौ ॥ २२ ॥ ह्मणे हा येकाटाया येकटु । भीष्म जाईल धीटु । ह्मणौनि रक्षावा सुभटु । सर्वी प्रेत्नीं ॥ २३ ॥ ना जें जेणें मतें नियमिले । जे जे धर्म जया विभागले । श्रेष्ठाश्रेष्ठ दिधले । अधिकार जयां ॥ २४ ॥ तेहीं मर्यादावंतीं धर्मवंतीं । राखावा भीष्मु बहुतीं । हेचि आज्ञा समस्तीं । मान्य करावी ॥ २५ ॥ स्वसैन्यीं परसैन्यीं । दिवसा अथवा निशीमानीं । आसनीं गमनीं शयनीं । भीष्मु रक्षावा ॥ २६ ॥ तुतुळी काय याची जतन । ऐसें बोलसील वचन । तरि द्रोणाचार्या सांगैन । दुर्योधनु ह्मणे ॥ २७ ॥ सामर्थ्यहीन सकळ । भग्न जालें आमुचें दळ । तया भीष्मेंचि येकें बळ । ऐसें जालें ॥ २८ ॥ मृतातें आणिले प्राण । अधैर्या केलें धैर्यदान । सैन्याचे आमुचयालागून । आयुष्य हा ॥ २९ ॥ सैन्य येणें रक्षिलें । तें आमुचें कुनाम चुकविलें । मृता मातें उपचारिलें । अमृता वचनीं ॥ ७३० ॥ येणें आमुची कीर्ति । उजळिली सांगों किती । क्षेत्रीं आह्मां हांसती । चुकविलें ते ॥ ३१ ॥ हा आत्मा हा जीवुप्राणु । आह्मां कौरवां येकु जणु । नसता आजि तैं अज्ञणू । वांचतों आह्मी ॥ ३२ ॥ रणवद्ध ययाचां मस्तकीं । यया अधीन वर्तावें लोकीं । भीष्मु तो मी ऐसी कीं । बुद्धि धरावी ॥ ३३ ॥ येका भीष्मातें रक्षणें । रक्षिले होये आह्मांकारणें । दिधली जाणों प्राणदानें । समस्तांसि ॥ ३४ ॥ येणें आह्मी जीववंत । येणें विण सर्व मृत । देहो जीवु प्राणवंत । हाचि आह्मां ॥ ३५ ॥ ऐसें रायें बोलिले । तंव येरीकडे काये वर्तलें । तें आईके राया वहिलें । सांगिजैल ॥ ३६ ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

नाना मार्ग युद्धाचें । अयना रचिलिया दळांचे । प्रवेशा आणि निर्गमाचे । तयांचां ठायीं ॥ ८० ॥ जया जैसा अधिकारु । तो तो तेथें ठेविला वीरु । येणेंप्रकारें सारु । सन्नद्ध झाला ॥ ८१ ॥ तेही तुह्मीं अवघींजणीं । येक करावे येथूनि । सांगिजेल तें निर्वाणीं । निश्चयात्मक ॥ ८२ ॥ भीष्मासि एकातें रक्षावें । पुढूनि मागूनि स्वभावें । मग येर युद्ध अघवे । तें हाचि जाणें ॥ ८३ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

आजी भीष्म सेना रक्षणार । व्यूहरचना रचणार । परंतु त्यास जतन करणार । तुह्मी सकळ ॥ ८८ ॥

चुकवूनि भीष्माचीं नयनें । व्यूह भेदायाचीं स्थानें । त्यांस ह्मणिजे अयनें । तीं आश्रयस्थळें शत्रूंसी ॥ ८९ ॥ ऐसें जें जें स्थळ । तें यथाविभागें सकळ । सावध राहूनि केवळ । भीष्मातेंचि रक्षणें ॥ १९० ॥ वृष्टिशीतोष्णपरिहार । करीतसे ज्यांचें घर । ते मिळोनि सर्वहि नर । जतन करिती त्या गृहा ॥ ९१ ॥ ऐसे भीष्माचे गौरव । वाढवूनि बोले कौरव । तें ऐकतां अभिनव । स्फुरण आलें भीष्मातें ॥ ९२ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

याकारणें द्रोणाचार्या । आपुलालियां ठायीं राहोनियां । तुह्मीं रक्षावें भीष्माचार्या । सर्वत्र ॥ ४० ॥ कैसें रक्षावें ह्मणसी । भीष्में युद्ध करितां आणिकांसी । पाठिवरि न हाणें तयासी । तसें राख ॥ ४१ ॥ कां भीष्माचेंनि बळें आमुचें । प्राण वांचलें साचें । याकारणें मी तुमचें । प्रार्थन करितों ॥ ४२ ॥ ऐसें दुर्योधन बोलिले । तें वचन भीष्में ऐकिलें । मग तेणें काय केलें । तें सांगेन मी ॥ ४३ ॥

## निवृत्तिदेव

तरि तुह्मीं मिळौनि समस्तीं । भीष्म रक्षावा निगुतीं । आपुलालिया आईतीं । संजूनिया ॥ ११ ॥

## उद्धवचिद्घन

सवाईः- भाग विभागुनि सैन्य स्थळोस्थळिं वीर महाबळि त्यांप्रति सांगे ।
सर्व मिळोनि करा तुह्मि रक्षण भीष्म पितामह सैन्य अपांगें ॥
अग्र विभागुनि सैन्यपती दश दीन तयार्शि नियामित आंगें ।
यापरिचा तव सूत सुयोधन बोलत हर्ष सुखावत गांगे ॥ ११ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

आपुलालिये विभागस्थानीं । युद्धसमयीं स्थिर असोनि । भीष्मासि रक्षावे अवधेजणीं । वीरीं निपुण आमुचिया ॥ २९ ॥ येणेंपरी बोलिला राजसुत । तें द्रोणाचार्यासि जालें संमत । सर्व भीष्मासि राहिलें रक्षित । एकचित्त होऊनियां ॥ ३० ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

तरि ठायीं ठायीं रणभूमिसीं । यत्न करावा भीष्मदेवासी । तो रक्षिजे समस्तांसी । संदेह मानसीं न करावा ॥ १२ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

भुजंगप्रयातः— नेमाल ज्या ज्या स्थळिं युक्त जो जो । डंका तयाचा तरि तेथ गाजो ॥
सर्वासवे येक तुंबा करावे । सेनापतीतेंचि जीवीं धरावें ॥ १५ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी"

ठायीं ठायीं रणभूमीसी । जतन करावें भीष्मासी । तो तुह्मां समस्तांसी । रक्षील जाणा प्रतापें ॥ ११ ॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः— रक्षावया सेनाभार । स्थाने नेमिलीं अपार ॥
तथापि त्या वर्तमाना । तुह्मी आणावे जी मना ॥
भीष्मातेच तुह्मीं रक्षा । राखावया आत्मपक्षा ॥
स्थानीहुनीं तसे सर्व । तुका ह्मणे हें अपूर्व ॥ ९ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्ः— तथापि सैन्यरक्षेचीं स्थाने जीं ज्यास दिधलीं ।
भीष्मातेचि तुह्मी रक्षा सर्व त्या त्या स्थळाहुनी ॥ २५ ॥

## मोरोपंत

आर्याः— अपुल्या अपुल्या स्थानीं तिष्ठति युद्धीं धरोनि दृढ लक्षा ।
अवघे मिळोनि एका भीष्मालागीं जपोनि संरक्षा ॥ ११ ॥
: o : o : o : o : o : o : o : o : o :
तरिही या सेनेच्या रक्षेचीं जीं जयां दिलीं स्थानें ।
त्या त्या स्थळींहुनि बळें भीष्मासचि सर्वही तुह्मी रक्षा ॥ २९ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

यालागि युद्धप्रवेशमार्गि । उभे राहुनि यथाभागिं । भीष्मासि राखावें वेगिं । तुह्मि समस्तिं मिळोनिया ॥ ११ ॥

संजय उवाचः- तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।
सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥

**अर्थः- त्याचा हर्ष उत्पन्न करणारे कुरुवंशांतील वृद्ध प्रतापी पितामह यांनीं सिंहाप्रमाणें मोठी गर्जना करून आपला शंख फुंकिला.**

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) "

या राजाचिया बोला । सेनापति संतोषला । मग तेणें केला । सिंहनादु ॥२५॥ तो गाजत असे अद्भुतु । दोन्ही सैन्यां आंतु । प्रतिध्वनि न समातु । उपजत असे ॥ २६ ॥ तयाचि तुलेंगासवें । वीरवृत्तीचेनि थांवें । दिव्य शंख भीष्मदेवें । आस्फुरिला ॥ २७ ॥ ते दोन्ही नाद मीनले । तेथ त्रैलोक्य बधिरीभूत जाहलें । जैसें आकाश कां पडिलें । तुटोनियां ॥ २८ ॥ घडघडीत अंबर । उचंबळत सागर । क्षोभलें चराचर । कांपत असे ॥ २९ ॥ तेणें महाघोषगजरें । दुमदुमिताति गिरिकंदरें । तंव दळामाजि रणतुरें । आस्फुरिलीं ॥ १३० ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

कुरुवंशीं भीष्म प्रतापया । दुर्योधनासि सुख उपजावया । सिंहनाद करूनिया । शंख वाजविला तेणें ॥१२॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

मग तो कौरवमुख्य भीष्माभिधान । जो पितामहत्वें परिपूर्ण । दुर्योधनाचें हृदय उद्विग्न । ऐसें जाणता जाला पैं ॥ ४ ॥ त्याशीं उपजावया संतोषू । प्रतापवंत तो वीरेशू । सिंहनादें उच्च शंखघोषू । करितां जाला ते काळीं ॥ ५ ॥ जैसा एखादा होय भयभीत । त्याशी कोणीएक दे अभयहस्त । तैसें भीष्में शंखस्फुरित । दुर्योधनाप्रति जालें ॥ ६ ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदामंदलहरी "

एवं पांडवसैन्य देखोनि अद्भुत । दुर्योधनु झाला अति भयभीत । मग आचार्याप्रति कपटें शरणागत । गेला त्वरित हें निरूपिलें ॥३८०॥ त्यावरी मातें चाळवितो दुर्योधन । ऐसा आचार्यें असंतोष मानून । रायासि वचनमात्रेंही आदर न करून । उपेक्षिता जाण ऐसें जालें ॥ ८१ ॥ तयाची उपेक्षा बहु देखोनि । मग ' अयनेषु ' इत्यादि श्लोकेंकरूनि । भीष्माची स्तुति केली प्रियवचनीं । तेणें मनीं भीष्म संतोषला ॥ ८२ ॥ मग रायाच्या भयातें निवारिता । आणि अति हर्षातें उपजविता । आणि आपुलिया विजयातें प्रकटविता । जाला करिता सिंहनादु ॥ ८३ ॥ ' उच्चैः ' शब्दें अति महाथोर । सिंहनाद केला अति गंभीर । सवेंचि शंख आस्फुरिला थोर । तेणें अंबर गडगाडिलें ॥ ८४ ॥ ते दोनी नाद एकत्र मीनले । तेणें सैन्य तें बधिरीभूत जालें । कौरवसैन्य उत्साह पावले । वीर शोभले वीरश्रिया ॥ ८५ ॥ द्रोण दुर्योधनाचा अभिप्राय जाणोनि । वर्तला यास्तव कुरुवृद्ध बोलिजे जनीं । आचार्या ऐसा नुपेक्षीच ह्मणोनि । बोलिजे वचनीं पितामह ऐसें ॥ ८६ ॥ आपुला नातु हा राजा दुर्योधन । तोही आला मज अनन्यशरण । ह्मणोनि अतिमोहें कळवळोन । करी रक्षण स्वसामर्थ्यें ॥ ८७ ॥ पांडवसैन्यासी भय उपजवीत । सिंहनादपूर्वक शंख आस्फुरित । सिंहाचेपरि खटाटोप अद्भुत । प्रतापवंत यालागीं तो ॥ ८८ ॥ तेणें महाघोषाचेनि गजरें । दुमदुमिताती गिरिकंदरें । सेनापतीच्यानि वीरगजरें । रणीं रणतुरें आस्फुरिलीं ॥ ८९ ॥

१ प्रतिध्वनिबरोबर. २ बळानें.

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

संजय ह्मणे भयभीत । देखोनि दुर्योधनाचें चित्त । तयासी हर्ष उपजवित । कुरुवृद्ध पितामह ॥ ४७ ॥ तो भीष्म सिंहनाद करी । आरोळीनें गगन भरी । शंख वाजवून गरगरी । प्रतापवंत महा जो ॥४८॥

## दासोपंतः—' गीतार्णव '

[ कुरुवृद्धः ] कौरवांमाजी वडील । वयें अतिवृद्ध केवळु । कुरुवंशींचा निर्मळु । जुनाटु वीरु ॥३७॥ बुद्धी वाडु वयें वाडु । मानें वाडु त्राणें वाडु । ज्ञानें वाडु गुणें वाडु । संजयो ह्मणे ॥३८॥ [ पितामहः ] धृतराष्ट्र दुर्योधनपिता । तयाचा जो चुलता । ह्मणौनि आजा समस्तां । कौरवां जो ॥ ३९ ॥ जैसा आजा कौरवांतें । तैसाचि तो पांडवांतें । वडील चुलता पंडूतें । ह्मणौनियां ॥ ७४० ॥ ऐसा बहुता काळाचा । जुनाटु वीरु नामाचा । आजा कौरवां पांडवांचा । भीष्माचार्यो ॥ ४१ ॥ [ प्रतापवान् ] प्रतापविषयीं थोरु । प्रकोपविषयीं रुद्रु । विद्याविषयीं सागरु । प्रांतहीनु ॥ ४२ ॥ जयाचेनि तपलेपणें । परदळें करपोनि जाणें । सूर्याचेनि किरणें । भूतृणें जैसीं ॥ ४३ ॥ अमिता बळा मिति नाहीं । तया वर्णावें आतां कायीं । धैर्य तें संग्रामविषयीं । कौतुक जया ॥ ४४ ॥ बहुता काळाचा भुजंगु । सांडूनि चपळता वेगु । असे तो शांतु बहिरंगु । आणिकां दिसे ॥४५॥ परंतु ईश्वरें न करावें । सेणेंसी आंग न लगावें । लागलया तो नागवे । गारुडियांही ॥ ४६ ॥ तैसा हा जुनाटु भुजंगु । अर्जुना लागैल सवेगु । यांसि गारुडी श्रीरंगु । जिंकोनि तयातें ॥ ४७ ॥ ह्मणे वर्षो हाचि मेघु । पळावया नाहीं मार्गु । चालिला आवेशवेगु । असंवरु जयाचा ॥ ४८ ॥ येणें कृष्णेसीं झुंजावें । यापुढें काइसीं पांडवें । परंतु परम भक्त तो नव्हे । आसूरु कहीं ॥ ४९ ॥ जेथें हा राहे वीरु । तें ययाचा शरीरभारु । कौरव पांडव हे परिवारु । ऐसेंचि दिसे ॥ ७५० ॥ [ उच्चैः सिंहनादं विनद्य ] आतां भीष्माचार्यें ऐसेन । आंगवूनि आपलें त्राण । उंचें घोषेंकरुन । काये करितां जाला ॥ ५१ ॥ सिंहाचियापरी आरोळी । देता जाला तये काळीं । टणकु शब्द अंतराळीं । सर्वत्र जाला ॥ ५२ ॥ केलें सिंहनादें प्रगर्जन । तया शब्दाचें थोरपण । सांगों तरि उपमान । सांपडेचिना ॥५३॥ चौदा भुवनें गडबडिलीं । श्रोत्रां टाळी पडली । नादु न निमे पोकळीं । सहसा अपारपणें ॥५४॥ ऐसा टणकु सिंहनादु । करूनि भीष्माचार्यें शब्दु । काय साधी तें साधु । आइके राया ॥ ५५ ॥ [ तस्य हर्षं संजनयन् ] दुर्योधनु संतोषावा । सैन्यातें धिवसा होआवा । आपुला पराक्रमु जाणावा । समस्तां वीरीं ॥५६॥ युद्धाचा कळावा प्रारंभु । वैरियां उपजावा क्षोभु । धाकेंचि गळावा गर्भु । वैरियां दळीं ॥ ५७ ॥ ऐसें अपेक्षूनि मानसीं । मुख्य बीज तेंचि परियेसीं । दुर्योधना रायासि । हर्षु उपजवणें ॥ ५८ ॥ गर्जोनि सिंहनादें । अत्यंत उर्ध्व शब्दें । दुर्योधनहृदय आल्हादें । भरिता जाला ॥५९॥ हर्षु उपजवूनि दुर्योधना । पुढती आपुलिया आंगवणा । भीष्माचार्यों वीरु जुना । काये करिता जाला ॥ ७६० ॥ [ शंखं दध्मौ ] सिंहनादाचिपाठीं जाण । शंखाचें केलें स्फुरण । तेणें शब्दें त्रिभुवन । जालें भयचकित ॥६१॥ अवचटें ह्मणती काये जालें । ब्रह्मांड कां पां थरारिलें । पुरत्रयें कोसळलें । अवघिये रचनेसीं ॥६२॥ विजूचा गडगडाटु कायिसा । ऐसा शब्दु या आकाशा-।-माजूनि निघाला परियसा । कासयाचा तो ॥ ६३ ॥ कौरवदळीं बोलती । भीष्में आवेशु घ्येला आथी । आतां हा लावील ख्याति । पांडवांतें ॥६४॥ गजांचिया भारांवरि । भीष्मु उठावला केसरी । ना किं बकसमुदायांवरि । ससाणा जैसा ॥ ६५ ॥ भीष्मु प्रवर्तला संग्रामातें । ऐसें जाणेवो आलें समस्तांतें । मग तेणेंनि काळें राजे ते । काय करिते जाले ॥६६॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

ऐसें दुर्योधनाचें वचन । धृतराष्ट्राप्रति सांगोन । संजय तो आपण । बोलता झाला ॥ ८८ ॥ वडिल जो कीं कुरकुळिचा । आजा कौरवपांडवांचा । वृद्ध परंतु प्रतापाचा । भीष्माचार्या ॥ ८९ ॥ तो उच्चस्वरेंकरून । करूनि सिंहनाद–प्रगर्जन । आगळें आपणा दाऊन । काय करिता जाला ॥ ९० ॥ जाणोनि दुर्योधनाची वासना । तयातें हर्षु उपजावो मना । ऐसी करूनि कल्पना । आरोळी दिधली ॥ ९१ ॥ कीं त्या काळाचा जुनाटु । भीष्मु वीरु महाधीटु । आवेशला आतां घोंटु । भरीन पांडवांचा ॥ ९२ ॥ ऐसें अवघेचि बोलिले । तें दुर्योधनें मानलें । हृदय आनंदें भरलें । तें आवेशा करी ॥९३॥ ऐसा सिंहनादेंकरूनि । तयातें हर्ष उपजऊनि । मग हर्षाचिये नित्यतेलागूनि । काय करिता जाला ॥९४॥ सिंहनादाचें पाठी जाण । करिता जाला शंखस्फुरण । तेणें तें भयंकर रण । लागलें दिसो॥९५॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

पितामह भीष्म कुरुवृद्ध । आणि प्रतापें परम प्रसिद्ध । त्या दुर्योधना हर्षे समृद्ध । करी सिंहनादें ॥ ९३ ॥ सिंहनादाची आरोळी । आणि शंख वाजवी महाबळी । कीं दुर्योधनाचे हृदयकमळीं । हर्ष उपजो ॥९४॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

तयासि हर्षातें उपजवीत । कौरवांचा वडील तो । आजा सिंहनाद करीत । थोर शंख वाजविता जाला॥४४॥

## निवृत्तिदेव

ऐसें तयाचें बोलणें ऐकोनि । हरिखला गंगानंदनु मनीं । सिंहनाद बाहो आफळुनी । शंख स्फुरिता जाला॥१२॥

## उद्धवचिद्घन

सवाईः–

वृद्ध पितामह तो नृपगौरव पाहुनियां रव सिंहपरी ।
हर्षसमुद्भव युद्धयुयुत्सव मानुनि वैभव घोष करी ॥
पूर्णप्रताप सहस्र दहा रथि मारिन हा मनिं नेम धरी ।
वाजवि शंख निशंकपणें रणकर्कश घोर भया पसरी ॥ १२ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

ऐसी देखोनिया व्यवस्था । परम आल्हाद गंगासुता । सेनापत्य असें आपल्या माथां । त्यास्तव तो उचिता आला ऐसा ॥ ३१ ॥ तया दुर्योधना व्हावया हर्ष । अथवा हर्ष जन्मविता विशेष । कुरुवृद्ध पितामह ज्यास । नाम कर्कश असे लोकीं ॥ ३२ ॥ तो सिंहनादें घोर गर्जिन्नला । शंख निजवदनीं लाविला । उंच स्वर भरूनि आगळा । स्फुरिता जाला प्रतापवंत ॥ ३३ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

ऐसें ऐकोनि हर्षायमान । कुरुवृद्ध पितामह आपण । सिंहनाद करूनि जाण । शंखालागोनि फुंकिलें ॥ ३३ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

वसंततिलका:– हा धाक वाहत असे बहुसाल राजा । ऐसें मनीं समजला कुरुवृद्ध आजा ॥
गर्जोनि सिंह मग तो निज शंख वाहे । जेणें नृपासि बळ धैर्य यथेष्ट राहे ॥१६॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

वडील भीष्म प्रतापप्रिया । दुर्योधना हर्ष उपजावया । सिंहनाद करूनियां । प्रतापी शंख वाजवी ॥१२॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंग:–
अहो तो कौरवांचा राजा । संतोषला जया काजा ॥
ऐसा भीष्म तो वडील । दावी संतोष नवल ॥
हांक फोडी सिंहनादें । शंख वाजवी आनंदें ॥
पूर्ण प्रतापाचें अंग । तुका ह्मणे संतसंग ॥ १० ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्:– तों दुर्योधनसंतोषा ऐसा भीष्म पितामह । गर्जोनि सिंहनादातें प्रतापि शंख वाजवी॥२६॥

## मोरोपंत

आर्या:–
ऐकुनियां नृपवचना त्यासि कराया तयीं प्रमोदातें ।
गर्जोनि सिंह नादें करितो कुरुवृद्ध शंखनादातें ॥ १२ ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
तों दुर्योधनहर्षे असा प्रतापी कुरुप्रवर भीष्म ।
गर्जोनि सिंहनादें वाजवि शंखासि फार मोठ्यानें ॥ ३० ॥

## वामन—( द्विजोत्तम )

ऐकोनि दुर्योधनाचें वचन । त्यास करावया समाधान । भीष्म सिंहनाद करून । शंख वाजविता जाहला १२

**ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।**
**सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥**

**अर्थः–तेव्हां शंख, नगारे, ढोल, मृदंग हीं रणवाद्यें एकदम वाजविलीं गेलीं. तो शब्द फार मोठा झाला.**

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी )"

उदंड सैंघे वाजतें । भयानकें खाखातें । महाप्रळयो जेथें । धाकैंडासी ॥ ३१ ॥ भेरी निशाण मांदळ । शंख काहळा भोंगळ । आणि भयासुर रणकोल्हाळ । सुभटांचे ॥ ३२ ॥ आवेशें भुजा त्राहाटिती । विसणले हांका देती । जेथ महामद भद्रजाती । आवरतीना ॥ ३३ ॥ तेथ भेडांचीं कवण मातु । कांचया केर फिटतु । जेणें दचकला कृतांतु । आंग नेघे ॥ ३४ ॥ एकां उभयांचि प्राण गेले । चांगांचें दांत बैसलें । विरुदाचे दादुले । हिंवताती ॥ ३५ ॥ ऐसा अद्भुत तुरबंबाळु । ऐकोनि ब्रह्मा व्याकुळु । देव ह्मणती प्रळयकाळु । ओढवला आजी ॥ ३६ ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

मग शंख आणि भेरी । अवघी वाजविली येकसरी । पणवानकें गोमुखें घेऊनि करीं । थोर नाद होता जाला ॥ १३ ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

भीष्में शंख वाजविल्यावरी । समस्त कौरवसैन्यामाझारी । त्राहटिलिया निशाण भेरी । शंख समग्रीं वाजविले ॥ ७ ॥ पणवशब्दें मृदंग बोलिजे । आनक ऐसें काहळेसी ह्मणिजे । आणि गोमुखनाम ऐसें सहजे । यासी दुसरें नाम नाहीं ॥ ८ ॥ ऐसीं रणतुरें अगणित । कौरवदळीं वाजती अद्भुत । नाना नाद परस्परें स्पर्शत । तो शब्द होत तुमुळ ॥ ९ ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

भीष्मशंखाच्या नादानंतरें । तेचि समयीं अकस्मात नादें गंभीरें । वीरीं शंख आस्फुरिलें थोरें । आणि गर्जेंहीं वाद्येंहीं वाजतीं ॥ ९० ॥ सकळही वाद्यकार तेचि समयीं । आपुलालीं वाद्यें वाइलीं एकसमयीं । भेरी लागलिया एका घाई । कानीं कांहीं नाइकिजे ॥ ९१ ॥ ढोल दमामे गोमुखें थोर । गिडबिडियांचे नाद गंभीर । काहाळा चीनकाहाळा दीर्घस्वर । आतिघोर बुरुंगे वाजती ॥ ९२ ॥ वाढे वाजंतरांचा महाध्वनी । नादु न माये पृथिवीं गगनीं । ऐसिया वाद्यांतें पृथक कोण गणी । उद्देशें एक दोनी सांगितलीं ॥ ९३ ॥ पंतवाद्यें मूळग्रंथीं बोलिलीं । तें उपलक्षण जाणावें सकळीं । जितुकीं राजवाद्यें असती बोलिलीं । तींहीं तियेकाळीं वाजतीं सर्वे ॥ ९४ ॥ ऐसा महाशब्द तो जाला असता । सर्वांहीं लोकांसि व्याकुळता । परी तया पांडवांचिया चित्ता । क्षोभ सर्वथा नव्हेचि कांहीं ॥ ९५ ॥ तयांसि अधिक वीरवृत्ति दुणावली । अंतःकरणें अतिहर्षनिर्भर जालीं । मग तेथें काय मातु वर्तली । ते एका दों बोलीं निरूपीन ॥ ९६ ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

यानंतरें सकळांचे । शंख वाजती सैनिकांचे । आणि भेरी गर्जती कोण्हाचे । शब्द कोण्हा नायकती

१ अनेक वाद्यें. २ कर्कश. ३ बळवानांस. ४ वाद्यध्वनी.

॥ ४९ ॥ सवेंचि पणव लागले । आनक गोमुखही वाजिन्नले । सर्वही वाद्यांचें दाटले । नाद गगनामाझारी ॥ ५० ॥ तो तुंबल शब्द ऐकिल्यावरी । चढली कौरवसैन्यीं वीरश्री । वीर धनुष्य चढवूनि करीं । सन्नद्धबद्ध जाहले ॥ ५१ ॥

## दासोपंत--" गीतार्णव "

[ ततः ] पाहोनि भीष्माचें चिन्ह । क्षेत्रीं मात्र अवघेजण । तयानंतरें आपण । वाजविते जाले ॥ ६७ ॥ नाना वाद्यविशेष । संख्या नाहीं तयांस । लक्ष आणितां भाष । टाकेचिना ॥ ६८ ॥ [ शंखाश्च ] पृथ्वीपाळीं आपुलाले । आणि त्यांचां योद्धीं वेगळाले । कौरवदळींचेही उठिले । अपार शंख ॥ ६९ ॥ शंखांतें नाहीं गणना । वरि वाद्यविशेषां आनां । नाद करिती आंगवणा । घेतले शूर ॥ ७७० ॥ [ भेर्यश्च ] भेरी वाजविती अपारा । जाणविती येरयेरां । ऐसा भेरीशब्दचि तो अंबरा-।-माजी संटे ॥ ७१ ॥ [ पणवानकगोमुखाः ] पणवशब्दें ढोल । आनक ते पैं मर्दळ । गोमुखें काहाळा केवळ । बुरुंगादिक ॥ ७२ ॥ अपार ययाचें संघात । ठायीं ठायीं गर्जती समस्त । आतां वाद्यां तयां आघात । कैसें केले ॥ ७३ ॥ [ सहसैवाभ्यहन्यन्त ] दुंदुभी ढोल मांदळ । हे आदिकरूनि सकळ । घनवाद्यविशेष केवळ । सिद्ध असतां ॥ ७४ ॥ शंख बुरुंगे काहाळा । इत्यादि सुस्वरा याती सकळा । सिद्ध करूनि नृपाळा । काये केलें ॥ ७५ ॥ येकेचिसमयें त्राहटण । घनातें केले टिपण । आणि सुस्वरे पवनें दाटून । नादु केला ॥ ७६ ॥ मग तीं घनें आणि सुस्वरें । वाद्यें वाजती येकसरें । तेथें निवडिला अंबरें । नकळे येकु नादु ॥ ७७ ॥ अनिवड उठिला टणकु । अंबरी नादु एकु । माजि तयां मेळापाकु । सिंहनादांचा ॥ ७८ ॥ [ स शब्दस्तुमुलोऽभवत् ] तो अनिवाडु शब्दु थोरला । दुमुदुमीतु गगनीं भरला । पोकळींमाजी कोंदला । वाव नाहीं ॥ ७९ ॥ तेणें नादें गर्जती । गिरी पर्वत गडगडिती । तेहि नाद मिळती । तेन्चि नादीं ॥ ७८० ॥ अंबर दाटलें ध्वनी । मुखींचा शब्दु न कळे कानी । ऐसा शब्दु शून्यस्थानीं । अक्षयीं राहिला ॥ ८१ ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

ते देखोनि आवेशले । अवघेचि वीरु उठावले । कौरवदळीं तेणें काळें । वर्तलें कैसें पां ॥ ९६ ॥ शंख आणि भेरी आईके । पणव आनक गोमुखें । नानावाद्यविशेष कौतुकें । युद्धाचेन ॥ ९७ ॥ कौरवदळींचे वीर । एकचि क्षणें समग्र । तेही ते वाजविले अपार । ते वेळीं कैसें ॥ ९८ ॥ अवघे शब्द एकवटले । निवाडें एकुही न कळे । माजी आन शब्द मिनले । तेही तैसेची ॥ ९९ ॥ घडघडाट रथांचे । हिंसकार वारुवांचे । सिंहनाद वीरांचे । जाले अनिवट ॥ १०० ॥ तो शब्दु दाटला अंबरीं । टाळी बैसली श्रोत्रविवरीं । तेणें जवळीलही परी । नाइको ये बोल ॥ १ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

भीष्माचा शंख वाजतां । त्याच समयीं न विचारितां । अकरा अक्षौहिणींत अवचितां । वाद्यें वाजलीं ॥ ९५ ॥ शंख भेरिया पणव । आणखी नाना वाद्यसंभव । ध्वनि तुंबळ अभिनव । उत्पन्न जाला ॥ ९६ ॥ ऐसी संजयाची वाणी । वर्णूनि कौरवांची कहाणी । आतां ज्या दळीं चक्रपाणी । ते कथा एथूनि सांगतों ॥ ९७ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

त्याउपरी शंख आणि भेरी । पणव आणि आनक भारी । गोमुखे ते वाद्यांमाझारी । विशेष तिन्हीं ॥ ४५ ॥ यांचीं नावें अप्रसिद्ध । ते वाजविते झाले यंद्धे । तो घोषु जाला थोर सिद्ध । गा राया ॥४६॥

## निवृत्तिदेव

याउपरी शंख आणि भेरी । पणवे आणि गोमुखभेरी । तेव्हांच वाजविल्या वीरीं । तो घोषु थोर जाला॥ १३॥

## उद्धवचिद्घन

सवाईः— वाद्य धडाडित यंत्र तडाडित शंख दणाणित नाद उठे ।
भेरि भयंकर गोमुख डंबर शृंग अणी कहळे सदटे ॥
साह्य धरापति तेहि तये रिति वाद्यचि वाजति जे न तुटे ।
एकसरे उठला अति तुंबळ नाद जणू अवकाश फुटे ॥ १३ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

तदनंतरें शंख भेरी । पणव आनक गोमुख येकसरां । वाजविते जाले महागजरीं । शब्द अंबरीं तुंबळला तो ॥ ३४ ॥ तया महाघोषाचेनि स्वरें । पर्वतीं पर्वतांगव्हरें । चंड प्रतिध्वनी केली अंबरें । मर्यादा सागरें सांडू इच्छिली ॥ ३५ ॥ शब्दमय दिशा जाल्या दाही । थरथरां कांपीनली मही । खेचर प्राणी जाला विदेही । जन हृदयीं भय पावले ॥ ३६ ॥ कौरवदळींत होतां ऐसें । पांडवचमूंत वर्तलें कैसें । म्हणाल तरि ऐका तैसें । श्रोते हो मानस करूनि स्थीर ॥ ३७ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

मग भेरी पणवानक जाण । गोमुखाआदिकरून । त्याचा नाद जाला अप्रमाण । पुढें सावधान ऐकावें॥ ३४॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

वसंततिलकाः— त्यानंतरें रणतुरे गजरें करोनि । वाजीनलीं अतुळ शंखरवें भरोनि ॥
व्यापून तो रव दिशाविदिशा उदेला । त्याचा प्रतिध्वनि विशिष्ट असाचि झाला॥ १७॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

मग शंख आणि भेरी । पणवानकें घेऊनि करीं । गोमुखादि गजरीं एकसरीं । थोर नाद जाहला ॥ १३॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः— तेव्हां एकवेळां सारी । शंखध्वनीची कुसरी ॥
भेरी गर्जती ठोकव्या । पणवानकाही गाजल्या ॥

एकसरेंची गोमुखें । दाही दिशा नाद मुखें ॥
जाल्या पूर्ण ह्मणे तुका । लीला पांडवांची ऐका ॥ ११ ॥

## वामन–( शांडिल्य )

अनुष्टुप्:– तों वाद्यें शंखभेर्यादि पणवानक गोमुखें । वाजविलीं एकसरें झाला तो ध्वनि तुंबळ॥२७॥

## मोरोपंत

आर्या:–
मग शंखासह भेरी पणवानक गोमुखादि रव दाटे ।
जेंणें शब्देंकरुनी पृथ्वी आकाश सर्व कोंदाटे ॥ १३ ॥

: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :

तंव शंख आणि भेरी पणवानक गोमुखादिकें वाद्यें ।
वाजविलीं एकसरें होय अकस्मात तुंबळ ध्वनि तो ॥ ३१ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

तेव्हां शंख आणि भेरी देख । पणवानक गोमुख । वाजते जाले असंख्य । तो शब्द थोर जाला॥१३॥

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ ।
माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥
पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥
अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

अर्थः– त्यानंतर पांढरे शुभ्र घोडे जोडिलेल्या मोठ्या रथांत बसलेले श्रीकृष्ण व अर्जुन यांनीं दिव्य शंख फुंकिले. श्रीकृष्ण-भगवानांनीं पांचजन्य, अर्जुनानें देवदत्त, ज्याचीं कर्मे भयंकर आहेत अशा भीमानें आपला पौंड्र नांवाचा मोठा शंख, कुंतीपुत्र राजा युधिष्ठिरानें अनंतविजय, नकुलानें सुघोष आणि सहदेवानें मणिपुष्पक असे प्रत्येकानें आपापले शंख फुंकिले.

## श्रीज्ञानेश्वर—“ भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) ”

ऐसी स्वर्गीं मातु । देखोनि तो आकांतु । तंव पांडवदळाआंतु । वर्तलें कायी ॥ ३७ ॥ हो कां निजसार विजयाचें । कीं तें भांडार महातेजाचें । जेथ गरुडाचिये जावळियेचे । कांतले चाऱ्ही ॥ ३८ ॥ कीं पांखांचा मेरु जैसा । रहंवरु मिरवतसे तैसा । तेजें कोंदाटलिया दिशा । जयाचेनि ॥ ३९ ॥ जेथ अश्ववाहकु आपण । वैकुंठींचा राणा जाण । तया रथाचे गुण । काय वर्णूं ॥ १४० ॥ ध्वजस्तंभावरी वानरु । तो मूर्तिमंत शंकरु । सारथी शार्ङ्गधरु । अर्जुनेसीं ॥ ४१ ॥ देखा नवल तया प्रभूचें । अद्भुत प्रेम भक्ताचें । जें सारथ्यपण पार्थाचें । करितु असे ॥ ४२ ॥ पाइकु पाठीसीं घातला । आपण पुढां राहिला । तेणें पांचजन्यु आस्फुरिला । अवलीळाचि ॥ ४३ ॥ परी तो महाघोषु थोरु । गर्जतु असे गंहिरु । जैसा उदेला लोपी दिनकरु । नक्षत्रांतें ॥ ४४ ॥ तैसें तूरबंबाळु भंवते । कौरवदळीं गाजत होते । ते हारपोनि नेणों केउते । गेले तेथ ॥ ४५ ॥ तैसाचि देखें येरें । निनादें अति गजरें । देवदत्त धनुर्धरें । आस्फुरिला ॥ ४६ ॥ ते दोनी शब्द अचाट । मीनले एकवट । तेथ ब्रह्मकटाह शतकूट । हों पाहत असे ॥ ४७ ॥ तंव भीमसेनु विसणैला । जैसा महाकाळु खवळला । तेणें पौंड्र आस्फुरिला । महाशंखु ॥ ४८ ॥ तो महाप्रलयजलधरु । जैसा घडघडिला गंहिरु । तंव अनंतविजयो युधिष्ठिरु । आस्फुरित असे ॥ ४९ ॥ नकुळें सुघोषु । सहदेवें मणिपुष्पकु । जेणें नादें अंतकु । गजबजला ठाके ॥ १५० ॥

## सोपानदेव—“ सोपानदेवी ”

यानंतरें श्वेतघोडे महारथी । परी पांडव आणि श्रीपति । दिव्य शंख घेउनिया हातीं । वाजविते जाले ॥ १४ ॥ पांचजन्यु घेतला श्रीकृष्णें । देवदत्त घेतला अर्जुनें । भीमकर्मा वृकोदर तेणें । पौंडरीक शंख वाजविला ॥ १५ ॥ अनंतविजय गजरें थोरें । वाजविला रायें युधिष्ठिरें । नकुळ सहदेव वीरें । सुघोष मणिपुष्पक वाजविलें ॥ १६ ॥

## माधव नारायणदास—“ नारायणकीर्ति ”

आइकोन तें वाद्यगर्जन । पाडवदळीं होती सावधान । त्याउपरी काय जाले ते श्रवण । करी राया धृतराष्ट्रा ॥ ११० ॥ शुभ्र अश्वें युक्त महारथू । जो महातेजें धवधवितु । ध्वजीं अंजनीचा सुतु । बैसला असे निरंतर ॥ ११ ॥ तया रथावरी आरूढ असती । माधव पांडव उभयमूर्ती । तो रथू नव्हे निभ्रांति । उपशम भासे केवळ ॥ १२ ॥ उपशम भावी साध्यसाधन । तेचि गमती कृष्णार्जुन । कृष्ण तो साध्यवस्तु जाण । अर्जुन सत्साधनभावो ॥ १३ ॥ असो किरीटी आणि शारंगपाणी । बैसले असतां स्यंदनीं । कौरवदळींचा वाद्यध्वनी । ऐकोन जाले सन्नद्ध ॥ १४ ॥ दिव्य शंखांचें आस्फुरण । करिते जाले दोघेजण । तत्प्रसंगें समस्त वीरीं जाण । वाइलें पांडवदळीं ॥ १५ ॥ पांचजन्य शंख

१ बरोबरीचे. २ जोडले. ३ पंखांनीं युक्त. ४ उत्तम रथ. ५ सेवक. ६ सहज. ७ गंभीर. ८ आवेशला.

प्रतापेंसी । वाजविता जाला हृषीकेशी । दुसरा देवदत्त परियेसीं । धनंजय वाजवी ॥ १६ ॥ ज्याची करणी उत्कृष्ट गहन । जो वृकोदर भीमसेन । वाजवी थोर शंख पौंड्राभिधान । बळ प्रौढीचें सामर्थ्यें ॥ १७ ॥ रायें युधिष्ठिरें कुंतिसुतें । वाहिलें अनंतविजय तें । सुघोष मणिपुष्पक या उभयातें । नकुळ सहदेव वाजविती ॥ १८ ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

अहो सकळांसीं रथ आहेती । रथारूढ वीर सर्वेही असती । परी तयांच्या अपेक्षा उत्कर्ष सर्वार्थी । ह्मणोनि वर्णिती तया रथांतें ॥ ९७ ॥ कैलास जैसा शुभ्र गौर । तैसे चारी वारु शुभ्र सुंदर । ना ते चारी क्षीरसागर । अति गंभीर दुर्धर तैसे ॥ ९८ ॥ तैसियां चौंही अश्वां युक्त । अग्निघोष रथ अति सुशोभित । जो कीं अग्नीनें दिधला साक्षात । जाण निश्चित दुर्धर्ष तो ॥ ९९ ॥ अनेकसुवर्णालंकार-मंडित । अलंकार सर्वही रत्नखचित । अतिदिव्यतेजें लखलखित । जैसा उदित सहस्रकरू ॥ ४०० ॥ किंवा तो पक्षांचा मेरुचि जैसा । स्यंदन अतिशयें मिरवे तैसा । तेजें कोंदाटालिया दहाही दिशा । शोभे सहसा अर्जुन तेथ ॥ १ ॥ अहो जेथ अश्ववाहकु आपण । धुरे बैसला जेथ आदिनारायण । श्यामसुंदर राजीवलोचन । तेजें त्रिभुवन कोंदाटलें ॥ २ ॥ एके करीं धरुनि अश्वरशन । दुसरे दक्षिण करीं तोत्रधारण । ऐसा माधवनामें रमारमण । करी परिधान पीतांबराचें ॥ ३ ॥ उत्तरीय वस्त्र ही पितांबर । अनेक सर्वही जडित अलंकार । हास्यवदन सुकुमार सुंदर । तेजें सहस्रकर तैसा धुरे ॥ ४ ॥ आतां किती करावें तयाचें वर्णन । जेथ वर्णितां श्रमला सहस्रवदन । तुष्णीम्भूत राहिला स्वयें चतुरानन । श्रुतींही मौन धरिलें स्वयें ॥ ५ ॥ जरी कोणी कदाचित ऐसें ह्मणती । जे मूळीं वर्णिली नाहीं श्रीकृष्ण-मूर्ती । तरी माझी येथ अतिशयें आर्ती । आवडे चित्तीं कृष्णाचि वर्णूं ॥ ६ ॥ आणि मूळावेगळें अणुमात्रही । आन बोलेंना मी सर्वथा कांहीं । तरि जें जें वर्णिजेल जें कीं कांहीं । असे सर्वही ' माधव ' पदी ॥ ७ ॥ ' मायाधवः माधवः ' ऐसें । शास्त्रीं व्याख्यान केलें असे । लक्ष्मीचा भर्तार जो कीं सर्वांशें । माधव ऐसें त्यातें ह्मणती ॥ ८ ॥ तरी जो कीं लक्ष्मीयेचा भर्तार । तो तंव सर्वगुणांचा खाण होय आकर । लावण्यवैभवाचें भाडार । निरंतर जाणा कृष्णु ॥ ९ ॥ तयातें वर्णिजेल तितुकें थोडें । असो तो बैसला अर्जुनापुढें । नवल तया समर्थाचें अति गाढें । प्रेम केवढें निजभक्ताचें ॥ ४१० ॥ अहो निजभक्त पाठींसी घातला । आपण तयाचा सारथि जाला । ऐसा हा प्रेमभक्तीचा कळवळा । कळे प्रेमळां निजभक्तांसी ॥ ११ ॥ ध्वजस्तंभावरी हनुमंत वानरु । जो कीं मूर्तिमंतु स्वयें शंकरु । हा मूळीं तरी लिहिला नाहीं विचारु । परी हा प्रकारु ऐसा असे ॥ १२ ॥ ' महति स्यंदने ' यया पदेंकरून । सर्व रथाचें बोलिलें उपकरण । त्यामाजि हनुमंत आलाचि जाण । अलंकार पूर्ण रथाचा जो ॥ १३ ॥ आणि पुढां ' कपिध्वजः ' येणें हनुमंत वीरु । रथीं बोलिला असे महाधीरु । असो ऐसिये रथीं सर्वेश्वरु । अर्जुन वीरु दुसरा रथी ॥ १४ ॥ दोघींही दिव्य शंख आस्फुरिले । तेणें नादें अंबर गडबडिलें । शंखही सांगेन वेगळाले । श्लोकमेळें परिसिजे ॥ १५ ॥ आनंदानें मग तो परमानंद हृषीकेश । पांचजन्य शंख अतिवित्रास । आस्फुरिता जाला तो आदिपुरुष । सांगों विशेष नामाचा या ॥ १६ ॥ सर्वा इंद्रियांचा जो प्रवर्तकु । सर्वांतर्यामी परमपुरुषु । तो हृषीकेशनामें

१ घोड्याचे लगाम. २ चाबूक. ३ समुदाय. ४ आनंदानें.

त्रैलोक्यनायकु । सर्वात्मकु सर्वसाक्षी ॥ १७ ॥ तेणें युद्धोत्साहेंकरूनी । तुझीया सैन्यासि भय उत्पादूनी । पांचजन्य शंख वाजविला त्राणीं । रायालागूनी संजयो सांगे ॥ १८ ॥ तेणें नादें विश्व दुमदुमिलें । बधिरीभूत होऊनि सर्वत्र वेडावलें । तंव देवदत्त शंख धनंजयें स्वबळें । तियेचि वेळे आस्फुरिला ॥ १९ ॥ धनंजयनाम बोलावया कारण । राजसूययागीं राजे जिंतोनियां आणिलें धन । तो कौरवांसी अजेय सर्वथा जाण । ऐसें हें दुःखूण रायासि सांगे ॥ ५२० ॥ आणि बहु अन्नपाक करूनि करी भक्षण । अतएव वृकोदर हें नामाभिधाम । हिडिंबादि दैत्यांचें करी निर्मूळण । अतिदारुण कर्म जयाचें ॥ २१ ॥ तो पौंड्र महाशंख अति थोरु । तंवकें आस्फुरिता जाला अतिधीरु । संग्रामीं जयासि उत्साह थोरु । नाद भयासुरु तयाचा तेथें ॥ २२ ॥ अनंतविजयनामें महाशंखातें । राजा युधिष्ठिरु आस्फुरी तयातें । कृष्णाचा उत्साह देखोनि हर्षातें । पावे सर्वार्थें काय सांगों ॥ २३ ॥ आतां २तीं नामांचें काय व्याख्यान । तेंही तुजप्रति सांगेन । कुंतीनें महातप करूनि धर्माचें आराधन । केला प्रसन्न धर्मराज ॥ २४ ॥ तयाच्या प्रसादें प्राप्त हा म्हणोन । 'कुंतीपुत्र' म्हणती धर्मालागून । स्वयें राजसूययागादि केलें यजन । म्हणोन 'राजा' जगप्रसिद्ध ॥ २५ ॥ संग्रामीं जयभागिलें स्थिर रहातु । परसैन्यातें जो कीं विद्रौवितु । म्हणोनि 'युधिष्ठिर' ऐसें म्हणिजतु । आइक मातु संजय म्हणे ॥ २६ ॥ नकुळ सुघोषशंखातें वाजवित । सहदेव मणिपुष्पक आस्फुरित । ययांचे शंखांचीं नामें हीं विख्यात । काय अद्भुत सांगों राया ॥ २७ ॥ तुझिया पुत्रांसी नामधारक । एकुही नाहीं प्रसिद्ध शंख । तुह्मी केला जो वाद्यांचा घोष । तो लोपला देख ययांपुढें ॥ २८ ॥ तेथ भूपतिही होते आणिक । महावीर थोर थोर मांडलिक । तयांसीही युद्धावेश चढला देख । तेहीं शंख आस्फुरिले ॥ २९ ॥

## रमावल्लभदास—"चमत्कारी" टीका

त्यानंतरें श्वेत वारु प्रसिद्ध । महारथीं जुंपिले सुसिद्ध । जगद्गुरूचा गुरु अविद्ध । माधव शोभे पांडवेंसीं ॥ ५२ ॥ तो भक्तजन–वेळाईत । दिव्य शंख झळझळित । श्यामसुंदर अति त्वरित । करीं धरित वाजवावया ॥ ५३ ॥ मग पांडवही दिव्य शंखातें । वाजवावया धरित हातें । त्या तेजें चंद्र आणि सूर्यातें । लाजविलें ते काळीं ॥ ५४ ॥ सर्व इंद्रियां चाळक धणी । यालागीं हृषीकेशी धरणीं । नाम पडलें साचपणीं । पांचजन्य शंख त्याचा ॥ ५५ ॥ त्याचा पांचजन्य वाजत । देवदत्त अर्जुनाचा गाजत । भीमकर्मा जो साजत । वृकोदर या नामें ॥ ५६ ॥ भीमकर्मा भयानक करणी । परसेना कांपवी धरणीं । युद्ध करितां न पुरे धणी । जो अवतार वायूचा ॥ ५७ ॥ लांडग्याचें उदर कैसें । अजीर्ण नाहीं त्यास जैसें । यासीही न बाधी कांहीं तैसें । यालागीं नाम वृकोदर ॥५८॥ तेणें पौंड्र शंख महाथोर । वाजविला तो समोर । तंव अवघेच रणांगणीं घोर । आपुलाले शंख वाजविती ॥ ५९ ॥ अनंतविजयो युधिष्ठिर । सुघोष वाजवी नकुल वीर । मणिपुष्पक अति गंभीर । वाजवी शंख सहदेव ॥६०॥ उपरी एक समुदाय सर्व । वाजविती शंख सगर्व । परवीरांचा हरत गर्व । ऐसें करूं आरंभिलें ६१

## दासोपंत—"गीतार्णव"

[ततः] कौरवसैन्यामाझारी । वाद्यघोष जाले ययापरी । मग तयानंतरें अवधारीं । कैसें वर्तलें

१ आवेशानें. २ राजा, कुंतीपुत्र व युधिष्ठिर अशा तीन नांवांचें. ३ पळवीत. ४ भक्तांचा कैवारी.

॥ ८२ ॥ पांडवसैन्या आणवलें । जें समस्तीं कौरवीं वाइलें । युद्धप्रेत्ना प्रवर्तले । ऐसें जाणोनि ॥८३॥ [ श्वेतैर्हयैः ] शुद्ध श्वेत निर्मळ । गांग जैसें सोज्वळ । तया वर्णाचे केवळ । ते गांगे घोडे ॥ ८४ ॥ ऐसे शुद्ध शुभ्र निर्मळ । आगळे वारुवां मेघबळ । समस्तां अवगुणांवेगळ । तेहीं घोडां ॥ ८५ ॥ [ युक्ते महति स्यन्दने ] युक्ते थोरलां रथीं । अवधारीं राया नरपति । रत्नखचितें प्रदीप्तीं । तेजोमयीं ॥ ८६ ॥ [ स्थितौ ] येकु रथी येकु सारथी । महावीर दोघे असती । ते कवण भूपति । ह्मणसील जरि ॥ ८७ ॥ [ माधवः पांडवश्चैव ] सकले मायेचा नियंता । येकु श्रीकृष्णु लोकत्राता । तेथ रथी दुसरा तत्वता । पंडूचा नंदनु ॥ ८८ ॥ एवं श्रीकृष्णु आणि अर्जुनु । राया पंडूचा नंदनु । ते तितुल्यावरूनु । काये कर्ते जाले ॥ ८९ ॥ [ दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ] देवतोमय टणक । दिव्य शंख अलौकिक । दोघे दोन्ही सम्यक । वाजविते जाले ॥ ७९० ॥ तयांची करावी वर्णना । तरी मति कैंची मातें अज्ञाना । श्रीकृष्णु तो उपमाना । ये कैसेनि ॥ ९१ ॥ साम्या न येती दृष्टांत । उपमानें न गमतीं जेथ । न चले योग्यतेचें मत । श्रीकृष्ण स्तवितां ॥ ९२ ॥ दिगंबरानुचरु ह्मणे । बोलों अपेक्षिलें माझेनि मनें । तंव वाचा च्यान्ही श्रीकृष्णें । आप विसरलिया ॥ ९३ ॥ शब्दें मौनें निमालीं । बोलों काये मी बोली । परंतु आज्ञा जाली । यया दिगंबराची ॥ ९४ ॥ अष्टादशाध्यायी गीता । हे केवळ ब्रह्मकथा । माजीयी प्रथमाध्याय पाहतां । विषादलक्षणु ॥९५॥ तरी साहित्याचेनि अंगें । परमार्थु बोलैनु प्रसंगें । यथामति अहंत्यागें । अवधूतस्मरणें ॥ ९६ ॥ स्वप्रकृतिगुणसाक्षित्वें । निवडला जो आत्मत्वें । तो जीवात्मा शुद्धत्वें । बोलिजे शुद्ध त्वं पदार्थु ॥९७॥ एवं शुद्ध 'त्वं' पदार्थु निखलु । तोचि अर्जुन योद्धा सबलु । तया सारथी गोपालु । परमात्मा तो ॥ ९८ ॥ अशास्त्री ह्मणिजैल कैसा । जो शुद्धु तत्पदार्थु परियसा । सांगैन तयाची दशा । गुणातीत ॥ ९९ ॥ कर्तृत्व कार्य करण । हें गुणांचें सकळ भान । गुणातीता अकर्तेपण । परमात्मा यातें ॥ ८०० ॥ कीं उत्पत्ति स्थिति लय तिन्ही । व्यापार वर्तती मायागुणीं । तयां गुणांची सांडणी । करूनियां जो ॥ १ ॥ एवं निजप्रकृतीचे गुण । सकळां कर्मी तेचि कारण । तयां गुणांचें विसर्जन । करूनियां जो ॥ २ ॥ शुद्धु 'तत्'पदार्थु परमात्मा । तोचि श्रीकृष्णु विज्ञानात्मा । ऐसियां दोघां उपमा । कासयाची ॥ ३ ॥ 'तत्त्वं' पदार्थ शुद्ध दोन्ही । आतां हे मीनले जये स्थानीं । तो रथु कवणू निर्वाणी । ऐसें जाणावें ॥ ४ ॥ 'अग्निघोषु' हें अभिधान । तयाचें कैसें ज्ञान । सांगिजैल वचन । मानावें श्रोतां ॥ ५ ॥ सकार्य अज्ञानदहन । होये तें अग्निरूप ज्ञान । घोषु ह्मणिजे स्फुरण । तयाचें जें ॥ ६ ॥ अग्निघोषु तो कैसा । ज्ञानवादु जो आपैसा । जेणें जीवेश्वर भेदु कळसा –।– सहितु खचे ॥ ७ ॥ जीवेश्वरभेदहरण । ऐसें तें कवण ज्ञान । तरि जहदजहल्लक्षण । जया ज्ञानाचें ॥ ८ ॥ तरि जहदजहल्लक्षणा । स्फुरण जें अग्निरूपा ज्ञाना । अग्निघोषु रथु सुजाणा । तोचि कळे ॥ ९ ॥ तिये जहदजहल्लक्षणारूपे रथीं । जीव ईश्वर येक होती । तरि परमात्मा सारथी । हेंचि कैसें ॥ ८१० ॥ तरि योगसंग्रामीं कर्ता । आपुला आपणचि तत्वता । परंतु ययातें वागविता । पाहिजे सद्गुरु ॥ ११ ॥ वेद शास्त्रें पुराणें । जया वागवावयाकारणें । तया परमात्मयाचें हें करणें । ह्मणौनि सारथी ॥ १२ ॥ आणि कर्म करूनि ईश्वरार्पण । भक्तीं परमात्मयाचें भजन । विशुद्ध आत्मज्ञान । पाविजत असे ॥ १३ ॥ ह्मणौनि परमात्मतंत्रें वर्ततां । जीवा ईश्वरासी ऐक्यता । ययापरी सर्वथा । सारथी कृष्णु ॥१४॥ कीं सकळइंद्रियनियामकु । मना बुद्धीचा चाळकु । सारथी द्वारकानायकु । अर्जुनातें ॥ १५ ॥ ना गुरुयुक्तीचेनि बळें । जीव तो परमेश्वरीं मिळे । तो गुरुचि तेणें काळें । शुद्धु 'तत्' पदार्थु ॥१६॥ यापरी शुद्धु 'तत्' पदार्थु सारथी । नाहीं अनुमानु यये अर्थी । ऐसा अर्जुना द्वारकापति ।

वागविता झाला ॥१७॥ तरि आतां पंडु तो कवणु । जयापासाव हा अर्जुनु । शुद्धु 'त्वं' पदार्थु आपणु । गुणसाक्षी जो ॥ १८ ॥ तरि अविद्येचां अंतीं । शुद्ध विद्या ते कुंती । आतां पांडु ह्मणिजे व्यक्ति । शुद्ध जयाची ॥ १९ ॥ तो शुद्धात्मभाव पांडुरु । विद्ये कुंतीचा करी अंगिकारु । दोघांपासाव झाला कुमरु । तो शुद्ध जीव अर्जुनु ॥ ८२० ॥ अर्जुनु जीवभावें मेला । तो तीचां पोटीं राहिला । बीज दाता भला । शुद्धात्मभाव ॥ २१ ॥ शुद्धात्मभावें विद्ये द्वारा । होणें जालें धनुर्धरा । तरिचि शुद्ध 'त्वं' पदार्थु खरा । अर्जुनु तो ॥ २२ ॥ धर्ममुख्य चौघेजण । येर ते आतां कवण । तरि तयांचेंही लक्षण । यथायोग्य असे ॥ २३ ॥ शुद्धात्मस्वभावें स्वात्मधर्मु । तोचि पांडुनंदनु धर्मु । आत्मलोपु अधर्मु । तो न साहे जया ॥ २४ ॥ भीमु भयंकरु, भेदबुद्धि-। अभ्यासु जो तद्विरोधी । जयाचेनि बळें आधि व्याधि । संसारु दूरि होये ॥ २५ ॥ तेथें निरभिमानु तो नकुळु । अकर्ता दिसे परि सबळु । याचेनि आधारें मेळु । साधक प्राणांचा ॥ २६ ॥ देवसहित जया असणें । होणें जाणें क्रीडणें । तया सहदेवाकारणें । ज्ञानभाव ह्मणिजे ॥ २७ ॥ ज्योतिषां इंद्रियांतें प्रकाशी । विवेक सहदेव ज्योतिषी । स्थूळ प्रेत्नु जयासि । साहेचिना ॥ २८ ॥ एवं आत्मधर्मु धर्मु जाणा । आत्मयोगु भीमु ह्मणा । जयाचिया आंगवणा । योगसंग्रामु हा ॥ २९ ॥ निरभिमानु तो नकुळु । कहीं नव्हे प्रेत्नशीळु । ज्योतिषी सहदेव निर्मळू । ज्ञानभाव तो ॥ ८३० ॥ तेथही नाहीं करणी । परंतु असावा वीरु रणीं । आधारें तयाचेनि वांचूनि । संग्रामु न कळे ॥ ३१ ॥ अवघें साहित्य पावलें । तारि वारू ते कवण आथिले । शुद्धसत्वगुण धवले । ऐसे जे कां ॥ ३२ ॥ तरि पांढरा जयाचा वर्णु । तो जाणावा शुद्ध सत्वगुणु । जाले तेणें गुणवर्णेकरूनु । ते वारू श्वेत ॥३३॥ शुद्धसत्वभाव कवण । वारू हें जया अभिधान । तरि तयांचेंचि लक्षण । सांगिजैल ॥३४॥ अनात्मभावीं वृत्तियोगु । आत्मतत्वीं अनुसंधानयोगु । हा द्विविधु वृत्तिविभागु । शुद्धें सत्वें गुणें ॥ ३५ ॥ असंतभान सकळ । येथ त्यागवृत्ति होये शिथल । योगसंग्रामाचें बळ । तें तें कांहींचि न चले ॥ ३६ ॥ यालागीं अनात्मा असंतभान । ययाचें पाहिजे निराकरण । शुद्धें सत्वें-वांचून । हा स्वभाव कैंचा ॥ ३७ ॥ अनात्मतत्वाचा निरासु । असंता भानाचा ह्रासु । जाला असतां ध्वंसु । वृत्तिमात्रातें ॥ ३८ ॥ तेथें स्वानुसंधानाकारें । वृत्ति ते जैं न स्फुरे । तैं समाधि फावे, इतरें । ऐसें न घडे ॥ ३९ ॥ त्यागयोगज्ञानें चपळ । ते पुढील दोन्ही केवळ । मागीलें धुरेचे शबल । विज्ञानें ते ॥ ८४० ॥ ह्मणौनि आत्मभावीं अनुसंधान । आत्मइतरभावीं निरसन । या दोहीं वृत्तीचे असाधारण । वेग जे कां ॥ ४१ ॥ तेचि वारू तया रथा । श्वेतवर्ण जे सर्वथा । जहदजहल्लक्षणा रथा । वागवूं शकती ॥ ४२ ॥ सारथी गुरु अनंतु । जो परम शुद्धु तत्पदार्थु । शुद्धु जीवु वासनामुक्तु । अर्जुनु तो ॥ ४३ ॥ येके रथीं इतुले जण । तरि हनुमंता साहित्य कवण । ऐसिया परिहासवचन । बोलिजत असे ॥ ४४ ॥ पूर्वीचें संस्कारबळ । ईश्वरानुग्रहरूपें केवळ । तोचि रामदूतु समूळ । वर्म जाणावें ॥ ४५ ॥ संसारसागरीं बुडिला ( जिंकिला ) । स्वधर्में आपुला केला । जेणें तो अर्जुनु भला । योगभ्रष्टु ॥ ४६ ॥ आतां द्रुपदी कवणी मानावी । तरि ते स्व-रति जाणावी । पांची जणीं अनुभवावी । येकी निष्ठा ॥ ४७ ॥ शुद्धें 'त्वं' पदार्थें अर्जुनें । स्वनिष्ठ स्व-रतीरमणें । आतां स्वात्मधर्में तेणें । तेचि अनुभवावी ॥ ४८ ॥ आत्मयोगें तेथेंचि रमिजे । आत्मबोधेंही विचरिजे । निरभिमानता भोगिजे । तेचि स्थिति ॥ ४९ ॥ ऐसी पांचाही जणां । येकी कांता सुलक्षणा । तीचिया पतिव्रतपणा । दूषणचि नसे ॥ ८५० ॥ श्रीकृष्णु जो जगद्गुरु । तो तीचा पाळकु ईश्वरु । स्वयं वाहे भारु । सर्वस्वें तीचा ॥ ५१ ॥ स्व-रति परमात्मा अदूरि । स्व-रति तेचि धांवा करी । गुरु परमात्मा साह्यकारी । जिये स्व-

रतीचा ॥ ५२ ॥ हे दुष्टां हातीं पडली । तैं दुर्गमापासूनि रक्षिली । स्व-रति आपणा धाकुली । ह्मणौनि ईश्वरें ॥ ५३ ॥ ऐसे पांडव शुद्धात्मक । तयां दळींचे कवण लोक । ते सांगावे कव्हणी येक । ऐसे ह्मणती ॥ ५४ ॥ तरि यये अर्थी विचारणा । आपुली परावी सेना । साहित्य आलें गुणा । ऐसें पाहिजे ॥ ५५ ॥ परावे ते पृथ्वीचे राज । आपुले पांडव ते आत्मज । यापरी स्वपरभावीं काज । चाले संग्रामाचें ॥ ५६ ॥ आतां परावे राजे ते कवण । जे नसती आत्मजांसमान । आणि आत्मज आन । जे ते न होती ॥ ५७ ॥ युयुधानु राजा येकु । प्रथम वाखाणिला टणकू । तरि तो धर्माधर्मविवेकु । ऐसें जाणावें ॥ ५८ ॥ विराटु जो तयामागें । तो कर्मयोगु जाणावा प्रसंगें । धर्माधर्मज्ञाना आंगें । उमजला जो ॥ ५९ ॥ द्रुपदु तयापाठीं । तो भक्तियोगु जाणा गोष्टी । कर्म भक्तिरूपें उठी । तरि ज्ञान होय ॥ ८६० ॥ विहितकर्मआचरण । तें भक्तिरूप ईश्वरार्पण । अथवा ईश्वरभजन । तोही भक्तियोगु ॥६१॥ तयामागें धृष्टकेतु । क्रमेंचि तयाचा संकेतु । अभ्यासयोगु विख्यातु । तो तो जाणावा ॥ ६२ ॥ शमु दमु प्राणायामु । प्रत्याहारु सर्व नियमु । ऐसा अभ्यासयोगु उत्तमु । धृष्टकेतु तो ॥ ६३ ॥ वैराग्ययोगु तयावरि । चेकितानु राजा तो निर्धारी । आतां सांडिजे बाह्यसामग्री । तो योगु नव्हे ॥ ६४ ॥ योगीं प्रतिबंधू जेणें । तेंचि सार्वकाळ सांडणें । मग योग्यता पावणें । अध्यात्मज्ञानीं ॥ ६५ ॥ साहवा समर्थु काशिराजु । तो सत्संगु मानावा सबीजु । जेणें द्वारें योगिराजु । आत्मा सांपडे ॥ ६६ ॥ सत्संगें निष्कामु पोपला । तो तयापासाव ह्मणितला । तरि तो पुरुजितु सांगितला । काशिराजापाठीं ॥ ६७ ॥ निष्कामें पुरत्रय । निष्कामें केलें स्वकार्य । सत्संगापासाव वीर्य । यया उत्पत्तीचें ॥ ६८ ॥ पुरुजितापाठीं सांगितला । राजा कुंतिभोजु भला । तो अक्रोधु ह्मणितला । तेणेंचि क्रमें ॥६९॥ निष्कामा अक्रोधु शरीरीं । क्रोधु तो नाशला वैरी । यालागीं कुंतिभोजु क्षेत्रीं । अक्रोधु जो ॥ ८७० ॥ शैब्यु तयामागें नववा । तो अदंभु सत्यु जाणावा । कामा क्रोधांच्या अभावा । उपरि जो होये ॥ ७१ ॥ विक्रांतु आणि युधामन्यु । द्विविधु आस्थायोगु संपूर्णु । उत्तमौजु सुभानु । तो स्वास्थायोगु अकरावा ॥ ७२ ॥ ऐसे हे परराष्ट्रनाथ । बहिरंगचि समस्त । आता अंतरंग सुत । तेंचि कवण ॥ ७३ ॥ सुभद्रेचा जो नंदनु । जाला अर्जुनापासूनु । तो येकु अभिमन्यु । आत्मजु होये ॥ ७४ ॥ तैसा आपणाचिपासाव जाला । सत्प्रेत्नु शुद्धा जीवा आपुला । तोचि सौभद्रु कथिला । अर्जुनाचा ॥ ७५ ॥ आत्मधर्मु जो आधीं । तो अनात्मधर्मा विरोधी । ह्मणौनि गुणीं विविक्तबुद्धी । वर्ते नित्यु ॥ ७६ ॥ एवं स्वात्मधर्में जाला । विविक्तात्मबोधु आपुला । तो धर्मापासाव उपजला । प्रतिविंध्यु सुतु ॥ ७७ आत्मयोगाची जंव स्थिति । तंव भेदाचें भानचि नाथी । अनुभवी जाणती प्रतीति । यया बोलाची ॥ ७८ ॥ आत्मयोगा भीमसेना- । -पासाव श्रुतसोमा जाणा । तो द्वैताभावबंधु ह्मणा । भवेसेन ॥७९॥ अर्जुनु शुद्धात्मा निर्वाणीं । स्ववृत्तिविकाशु तयापासूनि । श्रुतकीर्ति ह्मणौनि । अभिधान तया ॥ ८८० ॥ नकुलु निरभिमानी चोखडा । शतानीकु तत्पुत्र गाढा । तो स्वरूपोपरमु वो गाढा । वीरु जाणावा ॥ ८१ ॥ सहदेव तो स्वप्रकाशु । श्रुतसेनु तयाचा अंशु । तो स्वरूपान्वयप्रकाशु । सर्वत्रु जाणावा ॥ ८२ ॥ एवं धर्में प्रतिविंध्यु जाला । श्रुतसोमा भीमा आपुला । श्रुतकीर्ति उपजला । अर्जुनें तेणें ॥ ८३ ॥ शतानीकु नकुळाचा । श्रुतसेनु सहदेवाचा । आतां निर्धारु ययांचा । तोचि कैसा ॥ ८४ ॥ आत्मधर्में विविक्तबोधु । आत्मयोगें द्वैतच्छेदु । आत्मशुद्धत्वें उद्बोधु । स्ववृत्तिविकाशाचा ॥ ८५ ॥ निरभिमानें उपरमु । स्वप्रकाशें मुख्य धर्मु । आत्मान्वयोपक्रमु । सर्वत्रु स्फुरे ॥८६॥ येकलिये स्व-रतीपासून । पांचांचे हे. पांचही जण । ईवेगळें जन्मस्थान । न वर्ते तयां ॥ ८७ ॥ विविक्तात्मबोधा धाकुला । कां जो तयापाठीं उप-

जला । द्वैताभाव स्फुरला । योगबळें तेणें ॥ ८८ ॥ द्वैताभावापाठींचा । स्ववृत्तिविकाशु पुत्रु तीचा । तया धाकुला गुणांचा । स्वरूपोपरमु ॥ ८९ ॥ तयापाठींचा बुद्धिवंतु । अन्वयात्मबोधु विख्यातु । स्वरतिचि ययां हेतु । पांचां जणांतें ॥ ८९० ॥ अरति स्वात्मभाव विचरे । अनात्मसंबंधीं तेथ दुसरें । तेणेंसीं वेगळीक स्फुरे । ते तयेचि क्षणीं ॥ ९१ ॥ स्व-रति स्वात्मयोगु तो निष्ठा । निष्ठे प्रपंचाभाव द्रष्टा । विविक्तज्ञानी तो कष्टा । कैसा नव्हे ॥ ९२ ॥ प्रपंचाभावें आत्मरति । शुद्धात्मा विचरे प्रतीती । तेथें स्ववृत्तिबोधा उत्पत्ति । ते कैसी न व्हावी ॥ ९३ ॥ स्व-रती निरभिमानु मीळे । तेथें वृत्तिसमूह मावळे । स्वरूपोपरमु तेणें काळें । सिद्धु होये ॥ ९४ ॥ स्वप्रकाशें केवळें । सर्व आत्मा हें कैसें न कळे । ह्मणौनि स्व-रति स्वप्रकाशु मिळे । अन्वया करी ॥ ९५ ॥ विविक्तबोधापासून । प्रपंचाभाव-दर्शन । प्रपंचाभावेंकरून । स्ववृत्ति उमटे ॥९६॥ स्व-वृत्ति जालिया उपरमु । कळे निर्विकल्पु आत्मा-रामु । मग आत्मबोधें सकळु भ्रमु । आत्माचि होये ॥ ९७ ॥ ऐसी अनुभवाची प्रतीती । जयांतें केवळ नाथी । तेचि रचना मोडिती । यया साहित्याची ॥ ९८ ॥ न होतां योगु अंतरंगु । तंव तोचि भीमु बहिरंगु । तेथें देहप्रकृतीसीं संयोगु । घडला तया ॥ ९९ ॥ तेचि हिडिंबा देहप्रवृत्ति । तीपासाव घटा उत्पत्ति । भीमपुत्र ह्मणती । दृढ निश्चयो तो ॥ ९०० ॥ हटेंचि घालावें आसन । हटेंचि न करावें शयन । हटेंचि तोडावें अन्न । करावा जयो ॥१॥ ऐसा हटनिश्चयो घटु । वीरु जाणावा उत्कृष्टु । तया येसणा बलिष्टु । नाहीं कव्हणी ॥ २ ॥ संसारवन विसंची । करणांतें बळेंचि वंची । मिठी नुकले तयाची । महावीरांतें ॥ ३ ॥ ऐसीया ययां पाडवांतें । वैरी कौरव येथें । तेंचि आतां निरुते । कवण जाणावे ॥ ४ ॥ तरि शुद्धदशेचा विरोधी । अभिमानु जो अविद्यासंबंधी । तोचि दुर्योधनु त्रिशुद्धी । धर्मद्रोही ॥ ५ ॥ दुर्योधनपिता अंधु । धृतराष्ट्र जो प्रसिद्धु । तयाचा साहित्यबोधु । तोचि कैसा ॥ ६ ॥ आपुलें यथार्थ अज्ञान । आणि पराचें अयथार्थ ज्ञान । ना कीं अयथार्थु बोधु अन्यथा ज्ञान । स्वपर-विषयीं ॥ ७ ॥ ऐसा अज्ञानपूर्वकु बोधु । तो धृतराष्ट्र राजा अंधु । तयापासाव उद्बोधु । अहंभावातें ॥ ८ ॥ तया धृतराष्ट्राची वनिता । अहंदुर्योधना माता । ते अनात्मरति सर्वथा । ऐसें असे ॥ ९ ॥ अन्यथा बोधें अधिष्ठिली । अनात्मवृत्ती भोगिली । तेणें भोक्तृत्वें उत्पत्ति जाली । अहंदुर्योधना ॥१०॥ तया अभिमानाचिया प्रवृत्ति । अन्यथा बोधाचिया उपपत्ती । शतपर्यंत होती वृत्ति । तेचि बंधुवर्ग ॥ ११ ॥ अन्यथाबोधें अनात्मरति । अभिमानचि अंशरूपें भेदती । तेचि दुर्योधना आपुली याती । येकोदर बंधु ॥१२॥ मी ज्ञाता मी भोक्ता । कर्ता पोषकु चेष्टकु नियंता । चाळकु व्यापकु नियमिता । नित्य आश्रयो ॥ १३ ॥ मी स्थूळु मी कृशु काणु । मी बधिरु मूकु नेत्रहीनु । पंगू खुळा मी सुलक्षणु । अवलक्षणु मी ॥१४॥ मी परिग्रही अपरिग्रही । मी गेलो आलों नाहीं । आहें दिसें देहीं । मीचि देहो ॥ १५ ॥ मी पिता मी पुत्रु । मी शिष्यु मी गुरु । मी आपुला इतरु । तो मी ॥ १६ ॥ मी गृही मी वनस्थु । मी ब्रह्मचारी सन्यस्तु । मी अनतीतु अतीतु । ऐसा अहंभाव ॥ १७ ॥ मी स्त्री पुरुषु नपुं-सकु । मी परिवारु मी नायकु । मी ज्ञाता मी मूर्खु । साधकु सिद्धु ॥ १८ ॥ मी मारिता मी मरें । मी मरण मारणें स्वरें । मी आचारशीळु आचारें । सुटलों मी ॥ १९ ॥ मी भोगी मी त्यागी । मी योगी मी वियोगी । मी मार्गी अमार्गी । मातें पाहें ॥ ९२० ॥ मी दक्षु मी शिथळु । सूक्ष्मु मी, मी स्थूळु । आकाश वायो अनळु । अवनी जळ मी ॥ २१ ॥ मी जागृतु मी निजैला । मी उभा बैठा संचला । मी मी मातें आपुला । आपणास्तव ॥ २२ ॥ मी प्रियु मी अप्रियु । मी ज्ञाता ज्ञान ज्ञेयु । मी जी मरें आकाशमयु । आत्मा तो मी ॥ २३ ॥ मी वैरी मी मित्रु । मी सुहृदु पवित्रु । मी भिन्नु

मी येकत्रु । मी नरु होये ॥ २४ ॥ प्रपंची मी निःप्रपंची । मातें मी दुजा नाहीं–चि । मी भूमिका सर्वांची । भासवाया ॥ २५ ॥ अन्यथाबोधें अनात्मरती । ऐसे अहंभाव क्षुद्र उठती । तेचि बंधु बोलिजती । शत दुर्योधनाचे ॥२६॥ आतां दुर्योधनाचां दळीं । अकरा महारथी असती मेळीं । तयांची संज्ञा बोलिली । तेचि कैसी ॥२७॥ दशकु ज्ञानकर्मकरणांचा । अकरावा चाळकु यांचा । मन ऐसा रूपाचा । निर्धारु जया ॥२८॥ दहा इंद्रियें अकरावें मन । ऐसे महारथी अकरा जण । भारतीं केलें कथन । महावीरे ॥ २९ ॥ ऐसिया यया बंधूंतें । आणि श्रेष्ठा दुर्योधनातें । स्त्री ह्मणिजे ते न वर्ते । येकी प्रकृति ॥ १३० ॥ जे जे प्रकृति तो तो अभिमानु । ते तो रतिरंगु आनु । ह्मणौनि सहस्रधा मनु । भोक्तयाचा ॥ ३१ ॥ पांचां येकीचि द्रुपदी । तिया समस्तां ऐक्यसमाधि । आतां यया अभिमानाचां भेदीं । तैसी नसे ॥ ३२ ॥ नाना अहंकृति जैसिया । प्रवृत्ति क्रीडाही तैसिया । ह्मणौनि अहंभावा उपजलया । येकत्वचि नाथी ॥ ३३ ॥ यया दुर्योधनाचा सैन्यीं । आचार्या रजोगुणु ह्मणौनि । द्रोणाचार्यो तयालागूनि । नाम ठेविलें ॥ ३४ ॥ रजोगुणें अनुगृहीतें । अवघीं पावतीं रतीतें । गती स्थिती क्रीडेतें । अनायासें ॥ ३५ ॥ आजा भीष्मु तो तमोगुणु । ये अर्थी कैसा अनुमानु । तरि तमोगुण तो अप्रकाशमानु । स्वरूप विषयीं ॥३६ ॥ स्वरूपाचेन अप्रकाशें । ह्मणिजे आत्मा ज्ञानदोषें । अन्यथाबोधु प्रकाशे । धृतराष्ट्र जो ॥ ३७ ॥ अबोधापासाव अन्यथाबोधू । अन्यथाबोधें अभिमानु सिद्धु । अनात्मप्रकृतीसीं संबंधु । जैं घडे अन्यथाबोधा ॥ ३८ ॥ ह्मणौनि दुर्योधनातें प्रपिता । भीष्माचार्यो हा तत्वता । तमोगुण सर्वथा । नव्हे अनारिसें ॥ ३९ ॥ यापरी रजोगुण तमोगुण । हे बलवंत येथें गहन । अहं-दुर्योधनाचें सैन्य । समर्थ तेंही ॥१४०॥ ययासीं करितां संग्रामु । योगियांचा पुरे मनोधर्मु । कां योगापासाव श्रमु । वाटे तया ॥४१॥ रजोगुणे तमोगुणें । द्रोणें आणि भीष्में तेणें । दुर्योधनाचें पाळणें । सकळ क्षेम ॥ ४२ ॥ कर्तया पुरुषाचेनि आंगें । कार्यकारणसंयोगें । कामु जाला प्रसंगें । तोचि कर्णु ॥४३॥ विषयज्ञतेचा बोधु । सूर्यो जैसा प्रसिद्धु । तयापासावें उद्बोधु । जया कर्णा ॥ ४४ ॥ पंचबाणाचेनि बळें । शूळधरातें जो नाकळे । ते पंच बाण हिरिले । जयाचे कुंतिया ॥ ४५ ॥ अविद्याअज्ञाननिवृत्ति । शुद्धविद्या ज्ञान कुंती । विवेकें जाली शांति । तया माराची ॥ ४६ ॥ पंचबाणें सांडवला । कर्णु नेटकु उरला । तयाचिया[१] कवचकुंडलां । केला इंद्रें हरासु ॥ ४७ ॥ कवच ह्मणिजे केवळ । कामातें संस्कारबळ । जयातें भंगूं सबळ । न शकती देव ॥ ४८ ॥ असत्संगाचीं वचनें । कुंडलें जीं कर्णभूषणें । असंख्य बळ तेणें गुणें । कामरूपा कर्णा ॥ ४९ ॥ एवं संस्कारु पूर्वीचा । आणि असत्संगु आतांचा । यया कवचा कुंडलांचा । हरिता इंद्रु ॥ १५० ॥ इंद्रु परमात्मा तत्वता । सकळकर्मफळभोक्ता । तो प्रसन्नु जाला असतां । विहितानुष्ठानें ॥ ५१ ॥ दुष्ट संस्कार पूर्वीचा । क्षयो जाला तयाचा । असत्संगु आतांचा । तो लागोंचि न शके ॥ ५२ ॥ ईश्वरानुग्रहें तेणें । प्राचीनें[२] जालीं क्षीणें । सत्संगु पुरुषाकारणें । तोचि न सोडी ॥ ५३ ॥ यापरी कवचकुंडलें । इंद्रें नेलीं पूर्वकाळें । कर्णु उरला येणें काळें । इच्छे आदावळींसी ॥ ५४ ॥ अभ्यासयोगीं जो हटु । तोचि भीमसेनपुत्रु घँटु[३] । तो भरील तिचा घोंटु । प्राणावरूनि ॥ ५५ ॥ प्राणायामें प्रत्याहारें । शमदमसाधनप्रकारें । स्थिति ज्ञान स्फुरे । हे करील हटु घटु ॥ ५६ ॥ तया हटा इच्छा नाशील । ते अधिष्ठानज्ञानें[४] नाशेल । येकयेकांकेंरितां[५] वेंचैर्ले[६] । ऐसीं दोघें ॥ ५७ ॥ विषयप्रबोध भास्करु । तो येईल साह्य करूं । तरि

१ र्‍हास, नाश. २ प्रारब्ध कर्में. ३ घटोत्कच. ४ आत्मज्ञानानें. ५ एकमेकांमुळें. ६ नाशीसीं होतील.

परमात्मा शारंगधरू । सारथी येथ ॥ ५८ ॥ परब्रह्म निर्गुण । तयाचे ठाईं जया गमन । तें धरिलें जेणें ज्ञान । लोकानुग्रहार्थ ॥ ५९ ॥ तोचि परमात्मा गुरु । तयाचा असतां निकटाकारु[1] । अंतर्मुखु होईल विचारु । क्षणमात्रें ॥ ९६० ॥ तेथ तया सूर्याचें न चले । कर्ण मारिजैल अधिष्ठानबळें । ऐसा वीरु तेणें काळें । कौरवांचा ॥ ६१ ॥ हिंसेचें करी पाळण । जयातें भजती कृपण । कृपेचा मित्रु परी ग्रसन । करी तिचें ॥ ६२ ॥ ऐसा क्रोध जो अगाधु । तो कृपाचार्यो वीरु प्रसिद्धु । जयाचा लागे संबंधु । तैं ब्रह्मांड जळे ॥ ६३ ॥ भंगलाचि पुढती न भंगे । लागलाचि वैरी अंतरंगें । जयाचे बाण वेगें । प्रवेशु करिती ॥ ६४ ॥ रोषु हें धनुष कठीण । आवेपु हेंचि संधान । अवाच्यवाद ते बाण । येती सरसरा ॥ ६५ ॥ हस्तक्रिया तें मल्लयुद्ध । तेथेंचि द्रवे जैं अशुद्ध । तैं तें जाणा गदायुद्ध । रोकडेंचि ॥ ६६ ॥ क्रूरा दृष्टी पाहणें । अंतरीं विश्वासघातु करणें । अस्त्रविद्या प्रेरणें । सामर्थ्यें मंत्राचेनि ॥ ६७ ॥ रुद्रातें जिंकोनि लाठा । विष्णु न वचे जयाचिया वाटा । सिंहावतारी येकटा । होता सांपडला ॥ ६८ ॥ आला आला रे ह्मणती । ब्रह्मादिक जया कांपती । तपें जतन करिती । पळती वसिष्ठादिक ॥ ६९ ॥ पांचाही पांडवा येकु पुरे । निवारी कवण यया दुसरे । परि सद्गुरु गदाधरें । बळवंत ते ॥ ९७० ॥ जेथ संग्रामी रिघाला । गुणु करी आपुला । परंतु चिरकाळ राहिला । ऐसा नव्हे ॥ ७१ ॥ मायायुद्धाचेनि गुणें । सितेरावें[2] हें पूर्ण जाणे । फावले घे पारि निर्वाणें । नेट न करी ॥ ७२ ॥ महा विषाचा कल्लोळु । प्रलयाग्नीचा ज्वाळु । क्रोधु कृपाचार्यो शबळु[3] । कौरवांचा ॥ ७३ ॥ आतां वीरु अश्वत्थामा । तो मदु जाणावा अस्थिरात्मा । होतां जयाचिया अभिक्रमा । मोक्षु नाशे ॥ ७४ ॥ नव्हे शाश्वतें अश्वत्थ । नश्वर जें कां निश्चित । अनित्यस्वभावयुक्त । ऐसें जाणावें ॥ ७५ ॥ ऐसी अश्वत्थामया प्रकृति । मोहक जयाची स्थिति । तो अश्वत्थामा ह्मणती । मदु हा जो कां ॥ ७६ ॥ द्रव्यें होये द्रव्यमदु । राज्यें जाला तो राज्यमदु । विद्यायोगें विद्यामदु । मदु तारुण्याचा ॥ ७७ ॥ आतां भोगें प्राचीन क्षैर[4] । तदंग द्रव्य नश्वर । द्रव्यमदातें थार । तेथ कैंची ॥ ७८ ॥ भोगें तपसामग्री सरे । राज्य तेणेंचि काळें वोसरे । राज्यमदु तो खोंकरे । गळे पाणियापरी ॥ ७९ ॥ विद्येआगळी विद्या भेटे । विद्यामदु तेथेंचि आटे । अशाश्वतु हा घटे । येणें आंगें ॥ ९८० ॥ तारुण्य नित्य क्षर असतां । तारुण्यमदा नाहीं नित्यता । यापरी अनित्य सर्वथा । परंतु कैसा ॥ ८१ ॥ सर्वथा नाहीं मरण । प्रगुप्त जयाचे स्थान । स्थिति उपजु संहरण । होतां जातां ॥ ८२ ॥ जें जें कांहीं देहीं मिळे । तदंगें उठी हा तत्काळें । याचेनि नाशे डोळे । लावूनि निजे ॥ ८३ ॥ द्वैतसंगचि जैं जाईल । अद्वैत ब्रह्म उरैल । तैं हा नाशैल तरि नाशैल । येरव्हीं कैंचा ॥ ८४ ॥ अमरा मदु अमरत्वाचा । रत्तमरां ( मर्त्य नरां ) आपुलिया आंगांचा । चढु मात्रु द्वैताचा । तो जैं मदु ॥ ८५ ॥ तैं कांसेन यया मारण । ह्मणोनि अनित्या नाहीं यया मरण । मायारूप विवरण । करितांययाचें ॥ ८६ ॥ राजसभे हाचि शोभे । संग्रामु तो याचेनि लोभें । येकां लाभु दे अलाभें । भतवी येकां ॥ ८७ ॥ येणें जिंकिले क्षत्री । ब्राह्मण ययाचे भिकारी । जे भ्रमोनि दारोदारीं । हाचि मिरविती ॥ ८८ ॥ शास्त्रज्ञां आंगीं संचला । वेडाचि पुरुषु येणें केला । दासत्व देऊनि स्थापिला । जाणता जानु ॥ ८९ ॥ अनवधानें युद्धा करणें । भिडे तैं परावमानें । पर्वता ऐसें मांडणें । न चलत जया ॥ ९९० ॥ सागरा ऐसा पसरु । काल वेरे वया ऐसा अंधकारु । जयामाजी मिळे नरु । तो आप भुले ॥ ९१ ॥ ऐसा मदु कौरवदळीं । पांडवांतें

१ सान्निध्य. २ फसवावे. ३ सबळ. ४ भोगानें प्रारब्धाचा क्षय.

सगळें गिळी । परंतु परमात्मा वनमाळी । सद्गुरु तेथें ॥ ९२ ॥ विकर्णु वीरु टणकु । कर्णहीनु बधिरु मूकु । योद्धा मत्सर नामकु । कौरवाचा ॥ ९३ ॥ आगळी विद्या देखे । ते जैं भावें आइके । तरि सागराचेनि तुकें । पावे महिमान ॥ ९४ ॥ आगळिये विद्येचें श्रवण । आइता परापासून । न धरी तयातें मन । बधिरु तो ॥९५ ॥ नेघत वचन विचारें । उठी मत्सरु द्वेषाकारें । बोलें न घडतीं उत्तरें । ह्मणोनि मूकु ॥ ९६ ॥ ज्ञान नाहीं शरीरीं । जाणतुयाचा द्वेषु करी । मत्सरु आश्रितें मारी । पातेजौनि ॥९७॥ नाइके ह्मणोनि बधिरु । न पुसे वाचाहीनु परु । ऐसा जाणतयाचा मत्सरु । अल्पज्ञा आंगीं ॥९८॥ मत्सरें वाइले पुरे । काये करिती हातियेरे । यया विकर्णाचेनि आधारें । सकळ कौरव ॥९९॥ मत्सरें जिंकिले योगी । जिंकिले देव स्वर्गी । मत्सरें मनुजें अवघीं । घातलीं बंदीं ॥१०००॥ सुरासुर युद्ध करिती । परि दोघे जिंकिले जाती । ऐसा जयो तो हातीं । मत्सरा असे ॥१॥ निंदा धनुष्य कठिण । वर्मवादाचे बाण । मागें पुढें कुचरपण । ते मंत्रविद्या ॥२ ॥ उणी गोष्टि लावणें । ते अग्निबीज पेरणें । अग्न्यस्त्र ह्मणणें । तया-लागीं ॥ ३ ॥ उडवणें परावी उक्ति । पवनास्त्र तया ह्मणती । उणी वरी वदंती । तें वरुणास्त्र कीं ॥ ४ ॥ अपार उपहास जाले । ते मुद्गल तोमर भले । ऐसा पांडवांचीं मूळें । खाणों पाहे ॥ ५ ॥ सोमदत्तीचा सुतु । सौमदत्ती विख्यातु । तो दंभु अमितु । पराक्रमाचा ॥ ६ ॥ सोमु प्रकाशे विश्वंभरीं । आणि कलंक तया अंतरीं । तो भाव मुखावरि । जाणवतु असता ॥ ७ ॥ आच्छादूनि तया कलंका । निर्मळु प्रकाशु दावी लोकां । ऐसा सोमु जो का । ब्रह्मांडीं असे ॥८॥ तेणें स्वभाव आपुला । आपणा ऐसाचि सृजिला । सृष्टीवरि प्रेरिला । दिधला भूतांतें ॥ ९ ॥ सोमदत्तु तो बोलती । युक्तु तेणें तो सोमदत्ति । दांभिकु ऐसी युक्ति । मानावी हे ॥ १०१० ॥ तया दांभिकापासाव जाला । दांभिकां स्वभाव जो आपुला । तो दंभभाव ह्मणितला । सौमदत्ती ॥११॥ दंभाचि कां न योजावा । दांभिकु भाव कां कल्पावा । दंभयुक्तापासाव उद्भवा । पावला जो ॥ १२ ॥ तरि दंभु तो पुरुषाश्रयेवीण । प्रकट दावूं न शके लक्षण । आणि लक्षणमुक्ता कवण । जाणे दंभा ॥ १३ ॥ ह्मणौनि दंभवंतु तो सोमदत्ती । तयाचा स्वभाव सौमदत्ती । पुरुषयुक्तत्वें आला व्यक्ती । तो दंभु कैसा ॥ १४ ॥ बाहेरि दावी दातृत्व । अंतरीं असे कृपणत्व । पुरुषयोगें स्पष्टत्व । यया दंभलक्षणातें ॥ १५ ॥ अंतरीं दुराचारी मन । बाहेरि दावी कर्मठपण । हें आश्रयेवीण लक्षण । बाहेरि न पडे ॥ १६ ॥ अंतरीं दूषण यातीतें । वरि दावी निर्मळा वेषातें । हे दंभलक्षण निरुतें । पुरुषेंचि प्रकाशलें ॥ १७ ॥ क्रोधाचा सागरु अंतरीं । शांति विवरी वरि । तो दंभु शरीरीं । उमटों लागे ॥ १८ ॥ निश्चयो प्रेम नामस्मरण । बाहेरि मांडी देवा-र्चन । तया दांभिकाचें लक्षण । चंद्रा ऐसें ॥ १९ ॥ अंतरीं अनियतु चित्तें । बाहेरि योगु दावी लोकांतें । ऐसें लक्षण दंभातें । परि पुरुषें प्रकटे ॥ १०२० ॥ अंतरीं भोगु विषयांचा । बाहेरि वेषु त्यागाचा । सोंग जैसा विप्राचा । बहुरूपी संपादी ॥ २१ ॥ ऐसा आपुला आंगीं कळंकु । बाहेरि रंजवी लोकु । तो स्वभाव दांभिकु । वीरु सोमदत्ती ॥ २२ ॥ येणें जिंकिले सर्वज्ञ । देव ऋषि साधु-जन । याज्ञिक दाते आन । तापस संन्यासी ॥ २३ ॥ क्षत्रियांमाजी क्षत्री । हाचि मान्यु सर्वत्रीं । येणेंसीं युद्ध करी । ऐसा कवणु ॥ २४ ॥ प्रतिष्ठा हेंचि हातीं धनु । संपादणूक युद्धप्रेत्नु । जया गुणा भजे जनु । बाणु तो तो ॥ २५ ॥ येणें जिंकिलीं धनें । धनंजयो कां न ह्मणणें । लोक भजती तेणें गुणें । ईश्वरही होये ॥ २६ ॥ ऐसा सौमदत्ती बळियाडा । जाणावा कौरवाकडा । जयाचा सैन्यवेढा । पुरत्रयातें ॥ २७ ॥ आणिकही बहुत शूर । दुर्योधनाचे मित्र । दुर्योधनार्थ समग्र । जे प्राणें वेंचती ॥२८॥ ते बहुविध आता कवण । ऐसिया आक्षेपा वचन । सांगिजैल सावधान । श्रोतां होणें ॥ २९ ॥

बाह्य प्रपंचु जो सकळैकु । विचारितां पांचभौतिकु । देहादि इतरु आणिकु । आभासु जो जो ॥१०३०॥ येकु चरु येकु अचरु । येकु आपणु येकु इतरु । येकु आपुला येकु परु । इतरांचा कव्हणी ॥ ३१ ॥ चौदाही भुवनांचे ठायीं । पांचभौतिकु जितुला कांहीं । तो प्रपंचु ये अर्थी नाहीं । संदेहो तो ॥ ३२ ॥ तया प्रपंचाचेनि संगें । उठी स्वप्रकृति गुणा आंगें । स्वभाव तो तो निजांगें । वीरूचि होये ॥ ३३ ॥ शोका ऐसा शबळु । कवणु दुजा महाकाळु । जो करूं शके कवळु । शुद्धा अर्जुनाचा ॥ ३४ ॥ मोहो बळियांचा राणा । प्रपंचा आंगें उपजला जाणा । तो कव घालील अर्जुना । रोकडीचि ॥ ३५ ॥ प्रापंचिकु तैसाचि विषादु । जयाचा योगियां बाधु । जाला मग उच्छेदु । योगा होये ॥ ३६ ॥ भयवेग चिंतावेग । ऐसे वीरु हे अभंग । अगणित बहिरंग । अंतरंग हे ॥ ३७ ॥ दुर्योधनार्थ आपुलें जिणें । सांडिलें राज्यसुख येसणें । तयाचां काजीं प्राणें । जाण्हार जे ॥ ३८ ॥ संकल्पविकल्प संधान । वृत्तींचे प्रेरिती बाण । संग्रामविषयीं प्रवीण । अत्यंत दक्ष ॥३९॥ येहीं महारुद्र जिंकावा । महामेरु उलंडावा । सातां सागरांचा भरावा । येकु घोटु ॥ १०४० ॥ असंवर वेग जयांचे । अमित पुरावे बाणांचे । पेलिल्यावरि येकाचे । अमित होती ॥ ४१ ॥ यापरी काम क्रोध मद मत्सर । दंभ प्रापंचिक वीर । कौरवदळींचे अपार । पराक्रमें ते ॥ ४२ ॥ द्रोणाचार्यो रजोगुणु । तमोगुणु भीष्मु गहनु । दुर्योधनु अभिमानु । प्रिय तयाचे ॥ ४३ ॥ ऐसे कौरव पांडव सांगितले । आतां कुरुक्षेत्र कवण ह्मणितलें । तयाचें नाम रूप वेगळें । सांगिजैल ॥ ४४ ॥ कुरुक्षेत्रज्ञु क्षेत्रद्रष्टा । तयाचें क्षेत्र हें वसैठा । आतां तेंचि कैसें प्रकटा । वाणी बोलों ॥ ४५ ॥ धर्मक्षेत्र हें जया विशेषण । आतां यया बोलाचें विवरण । तरि धर्मक्षयापासून । जें कीं तारी ॥ ४६ ॥ धर्मु ह्मणिजे गुणविकारु । ययाचा जेथें फुटे अंकुरु । तेंचि क्षेत्र निर्धारु । ऐसा जाणावा ॥ ४७ ॥ गुणांचें वाटतें स्थान । तरि प्रकृतिक्षेत्र पुरातन । देहचतुष्टयसमान । सारिखी भूमि ॥ ४८ ॥ अभिमाना दुर्योधना । सारथी कृष्णु हें घडेना । गुरु न संगती अधिकारहीना ह्मणोनियां ॥ ४९ ॥ वडील भाऊ कृष्णाचा । साह्यकर्ता कौरवांचा । बळिभद्रु जो तयाचा । निर्धारु कैसा ॥ १०५० ॥ कृष्णु परमात्मा ब्रह्म जयीं । तयाहूनि थोर कांहीं नाहीं । तरि तोचि अत्यंताभाव तयीं । वडीलु कृष्णा ॥ ५१ ॥ आतां अभाव कौरवदळीं । तो भावा येऊं नेदी जवळी । नामारूपाची होळी । पावती कौरव ॥५२॥ कौरवदळीं अभाव । सर्वांसि रक्षकु वाव । तो कौरवसैन्याचा भाव । उरोंचि नेदील ॥५३॥ सैन्याचें अभावलक्षण । अभावाचें तेंचि सैन्य । कौरवदळा असामान्य । साह्यकर असतां ॥५४॥ भावो तो लागोंचि नेदील । अवघे अभावा नेतील । यापरी कौरवां रक्षितील । अभावे पक्षींचे ॥५५ ॥ अभाव बळिभद्रु स्वमेव । अभाववृत्ति ते यादव । हे कौरवांचे सर्व । करिती आपणा ऐसें॥ ५६॥ पांडव ते हे ऐसे जाणा । कौरव ते हे साच माना । साहित्याची केली रचना । यथामति ॥ ५७ ॥ आतां कृष्णार्जुन येकें रथीं । शंख ते कवण वाजविती । तैसेचि धर्मादिक शब्द करिती । ते शंख कवण कवण ॥ ५८ (१४) ॥ [ पांचजन्यं हृषीकेशः ] पांचभौतिकु विस्तारु । जेथें समरसेनि होये येकत्रु । तोचि निःप्रांतु सागरु । परब्रह्म ॥ ५९ ॥ कीं पांचभौतिक सकळ । जेथिंचे तरंग कल्लोळ । तेंचि ब्रह्मार्णव निर्मळ । निजाकारें ॥ १०६० ॥ कीं पांचा यत्नाचिया देवता । नुरती जेथ पाहतां । येकाकारें समस्ता । जाती मिळोनि ॥ ६१ ॥ कीं धर्मादि पांचही जण । रचिले जे साहित्यकरून । लयोद्भवस्थितिस्थान । तयांचें जें ॥ ६२ ॥ ऐसें पूर्णार्णव निर्मळ । चिदानंदमय केवळ । सन्मात्र सर्वग अखिळ । प्रांतहीन ॥ ६३ ॥ तेचि आपुली स्थिति । असतां उल्लासे स्वप्रकृति । तैं गुणाचे नद भरती । दाटे भरितें ॥ ६४ ॥ तैं चराचराचे तरंग । पांचभौतिक आभासे जग । भरितें वोहटे तैं अंतरंग । तेंनि येकवटे ॥ ६५ ॥ उप-

क्रमोपसंहारें । अथवा व्यतिरेकान्वयप्रकारें । जेथें स्फुरे संहारे । पांचभौतिक हें ॥ ६६ ॥ तया ब्रह्मार्णवापासाव जाला । तो पांचजन्यु शंखु आपुला । हृषीकेशें वाजविला । सकलेंद्रियनियामकें ॥६७॥ पांचजन्या शंखातें । कैसें वाजविलें गोपीनाथें । शब्द उमटले तेथें । तेचि कवण ॥ ६८ ॥ च्यान्ही वेद ते च्यान्ही छंद । मग तयांचे अनंत भेद । शास्त्ररूपें विविध । नाद उमटती ॥ ६९ ॥ नानास्वरीं रुंजि पडे । वेधोनि सुरवर जाले वेडे । बधिराचें बधिरत्व उडे । संचरे नादु ॥ १०७० ॥ जेथें वेधलया पुढती । परती ते सर्वथा नाथी । साही अठराही दमुदमिती । नादें जेणें ॥७१॥ अनुग्रहरूपवाद । ते ते जयाचे भेद । ह्मणौनि सद्गुरूचे शब्द । ते स्फुरण शंखाचें ॥ ७२ ॥ [ देवदत्तं धनंजयः ] आतां धनंजयो तो अर्जुनु । शुद्ध जीव सनातनु । तेणें वाजविला तो आनु । कवणु शंखु ॥ ७३ ॥ गुरु तोचि देव ईश्वरु । श्रीकृष्णु चक्रधरु । तेणें दिधला विचारु । स्वानुभवाचा जो ॥ ७४ ॥ स्वविवेक देवदत्तें । करिता जाला स्फूर्तीते । शब्द उमटती तेथें । तेचि कैसे ॥ ७५ ॥ अमृताहुनि मधुरता । शब्दीं वर्षती या प्रेमामृता । तेथिंची गोडी ऐकतां । चित्ता न सोडवे ॥ ७६ ॥ आत्मानंद हर्षकर । ऐसे जेथिंचे नाना स्वर । जेणें श्रवणें अपार । विश्रांति होये ॥ ७७ ॥ नादश्रवणें कां जेणें । असतचि देह विसरणें । गुणाचिया संगा न मिळणें । गुणीचि गुणि ॥ ७८ ॥ आइकतां नादु सुस्वरु । आंगातें होये पसरु । तैं माया महत्तत्व अहंकारु । प्रपंचु ग्रासे ॥ ७९ ॥ देवदत्तु आत्मविचारु । तेणें उपजला बोधांकुरु । तो चहूं वाचांचा भीतरु । फोडुनियां ॥ १०८० ॥ बाह्याकाशीं प्रवर्तला । जनांतें सुखी करता जाला । देवदत्तु शंखु वाजविला । ऐसा अर्जुनें ॥८१॥ [ भीमकर्मा वृकोदरः ] भीमकर्मा वृकोदरु । जैसा प्रळयकाळीं रुद्रु । वैरियांतें असंवरु । तेणें कवणु वाइला ॥८२॥ [ पौंड्रम् ] रज तम सांडूनि येकसरा । शुद्ध सात्विकें वर्णें पांढरा । योगशंखु अवधारा । पौंड्रनामें ॥ ८३ ॥ [ महाशङ्खम् ] थोरांमाजी थोरपण । तें वर्ते जयालागून । अभ्यासा आंगीं कठिणपण । तेंही असे ॥ ८४ ॥ इंद्राहूनि महिमान । वज्राहूनि कठिणपण । सत्यलोकाहूनि स्थान । आगळें जयाचें ॥ ८५ ॥ आत्मयोगाचिये स्फूर्ती । आइकोनि देव कांपती । येसणी जयाची महती । तो शंखु हा ॥ ८६ ॥ धर्म अर्थ काम तिन्ही । साधारण जयाहूनि । तो महाशंखु निर्वाणीं । भीमसेनाचा ॥ ८७ ॥ भयकरु भीमसेनु । भयंकरु तयाचा गुणु । भयंकरु हा गहनु । शंखु तयाचा ॥ ८८ ॥ कामा क्रोधा दरारा । मदा मत्सरा वीरा । राजसां तामसां समग्रां । हृदय फोडी ॥८९॥ दंभातें लावी त्रासु । दर्पाचा करी ग्रासु । मत्सरु पावे नाशु । जयाचेनि घोषें ॥ १०९० ॥ प्रपंचें न यावें दृष्टी । रोग विरुधांत कावटी । साधे कां सोसणी मोटी । दुर्गम हा ॥ ९१ ॥ आंगाचिया आंगवणा । धरिलाचि नवचे कव्हणा । आइकों ह्मणतां मना । धाकु पडे ॥ ९२ ॥ धरितियांतें दुस्तरु । वैरियांतें भयंकरु । आइकतियां दुःखहरु । पारि आकळेना ॥ ९३ ॥ आत्मयोगस्पंदु ऐसा । महाशंखु हा आपैसा । भीमसेनें परियेसा । आंगवण करूनि ॥ ९४ ॥ [ दध्मौ ] वाजविला अतित्राणें । गडबडिलीं तिन्हीं भुवनें । दचकलीं दोन्हीं सैन्यें । आघातु आइकतां ॥ ९५ ॥ जयाचा ध्वनि आइकोन । दमीं पडलें करणगण । शमीं लपालें मन । बाहेरि न पडे ॥ ९६ ॥ पवनु ठायीं पांगुळला । दहनु मंदता पावला । पुरुषु जीतुचि मेला । ऐसा ठाये ॥९७॥ आवस्था उडालिया च्यान्ही । वाचा दाटलिया अंतरीं । विषय हारविलें समग्रीं । करणीं पहा ॥ ९८ ॥ करितां शंखाचें स्फुरण । क्षीण व्यापारवंत गुण । दाटूनि धरी समाधान । न सुटे ते ॥ ९९ ॥ ऐसा श्वेतु आणि टणकु । भयंकरु अतिभेदकु । महा मोठा शंखु । वाइला भीमसेनें ॥ ११०० (१५) ॥ [ कुन्तीपुत्रो युधिष्ठिरो राजा ]

विद्ये कुंतीचा नंदनु । युधिष्ठिरु राजा सुजाणु । स्वात्मधर्मु सनातनु । पवित्र जो ॥ १ ॥ [ अनंतविजयम् ] तेणें वाइलें विख्यातें । अनंतविजया शंखातें । तो अनंतविजयो येथें । कवणु शंखु ॥ २ ॥ अपारु सनातनु शांतु । आत्मा अजु अखंडितु । सच्चिदानंद अनंतु । आपणचि जो ॥ ३ ॥ तयाचां ठायीं निष्ठा जयो । ऐसा सहजभाव अव्ययो । न चले न ढळे आश्रयो । गुणाचेनि ॥ ४ ॥ शुद्धात्मधर्मी सहजपण । तया सहजाचें सहज स्फुरण । अनंतविजयो अभिधान । तया शंखाचें ॥ ५ ॥ अनंता जयो आत्मयांचा । अनंता जयो भवसर्पाचा । अनंता जयो भूतभेदाचा । आत्मधर्म स्फुरणें ॥ ६ ॥ आत्मधर्मु जो सहजभाव । साध्य साधन तेथें वाव । सहजस्फुरण ठाये ठाव । जे होणें जया विक्षेपा ॥ ७ ॥ तो अनंतविजयो धर्में । वाइला अति संभ्रमें । मुक्तांचें मानस रमे । नादें तेणें ॥ ८ ॥ तो नादु उडवी साधना । सिद्धदशेमाजी गगना । बघतु दिसे आना । तो न धरवे शंखु ॥ ९ ॥ यत्नायत्न पांगुळले । सहजात्मधर्मी दीपले । जेहीं शब्द आइकिले । तया शंखाचे ॥ १११० ॥ [ नकुलः सहदेवश्च ] नकुळे तो अभिमानलयो । सहदेव ज्ञानान्वयो । आधीं अहंभावाचा क्षयो । पाठीं अन्वयज्ञान ॥ ११ ॥ एवं अभिमानवृत्तिविसरु । वृत्तिविसरें आत्मसाक्षात्कारु । तो सर्वत्र भाव एकत्रु । आत्मयाचा ॥१२॥ ऐसेनि नकुळें तेणें । आणि सहदेवें सुजाणें । शंखा केलें बाधावणें । तेचि कवण ॥ १३ ॥ [ सुघोषमणिपुष्पकौ ] स्वभावलोपें नकुळें । वृत्तिलयाचेनि बळें । सुघोषाचें स्फुरण केलें । ठाइके ठायीं ॥ १४ ॥ गुणातीतातें आत्मस्फुरण । तेंचि सुघोषाचें वादन । निर्मळ आत्मस्पंदन । निर्विकल्प ॥ १५ ॥ तेणें सर्वत्र आनंदमयता । सर्वत्र जाली चिन्मयता । तिचाही स्पंद तत्वता । विरोनि गेला ॥ १६ ॥ निद्रा मारूनि ते निजणें । जाग्रति असूनि जागणें । स्फूर्ति नाशूनि स्फुरणें । आंगें आंगें ॥ १७ ॥ तया शंखाचा अमोघ ध्वनि । रिघाला सांती श्रवणीं । त्रिपुटीचा ग्रासु करूनि । स्फुरों लागे ॥ १८ ॥ मणिपुष्पकु जो पवित्रु । ज्ञानरूपु स्फुल्लोरु । निरस्ता गुणां आधारु । आत्मत्वें दे ॥ १९ ॥ गुणातीतात्मान्वयें । निर्विकल्पचि सकळ पाहे । चिन्मय विश्व अवघें । हें स्फुरे जेणें ॥ ११२० ॥ एवं अन्वयात्मज्ञानकळा । पुष्पित दिसे स्वलीला । मणिपुष्पकु ह्मणितला । तोचि शंखु ॥ २१ ॥ मणिपुष्पकु शंखु सद्भावें । नादविला तो सहदेवें । अद्वयात्मबोधु तो स्वभावें । ह्मणौनियां ॥ २२ ॥ तेणें नादें भरलें । नादचि विश्व जालें । भेदभाव गळाले । वैरियांचे ॥ २३ ॥ साधूंते परमानंदु । बंधूतें अक्षयी बोधु । ऐसा निर्मळु आत्मान्वयवादु । संस्फुरला ॥ २४ ॥ ऐसें जालें शंखस्फुरण । तें समस्तीं करूनि श्रवण । यथामति आपण । विबुद्ध जाले ॥ २५ ॥ ते राजे पांडवदळींचे । स्वस्ववृत्ति शंख तयांचे । ते आपुलालेपरी प्रतिज्ञेचे । लाठे वाजविती ॥ २६(१६) ॥

## दासोपंत—“ गीतार्थबोधचंद्रिका ”

इतुलें कौरवदळीं वर्तलें । मग तदनंतरें काय जालें । पांडवसैन्यीं जाणवलें । ऐसें असतां ॥ २ ॥ श्वेतांगीं घोडा संयुक्तु । पांडवदळीं महारथु । ध्वजस्तंभीं हनुमंतु । जेथ वर्ते ॥ ३ ॥ बैसले जे ऐसां रथीं । एकु रथी दुजा सारथी । तयांचीं नामें भूपती । आइके पां तीं ॥ ४ ॥ सकळे मायेचा नियंता । सारथी श्रीकृष्णु तो तत्वतां । दुजा अर्जुनु युद्धकर्ता । रथीं तेथें ॥ ५ ॥ ते दोघे वीर आवेशले । दिव्य शंख आपुलाले । तयांतें वाजविते जाले । तये रणीं ॥ ६ ॥ हृषीकेशु जो श्रीकृष्णु । कारण नियंता नारायणु । तो वाजविता जाला आपणु । शंखा पांचजन्यातें ॥ ७ ॥ धनंजयो जो कीं पार्थु । महाप्रतापिया समर्थु । तो देवदत्तातें वाजवितु । अपाड्यचा ॥ ८ ॥ पौंड्र महाशंखु अतिमानें ।

तयांतें वाजविलें भीमसेनें । ऐसें देखोनि वाघावणें । तयेंचि क्षणीं ॥ ९ ॥ देवी कुंतीचा नंदनु । राजा युधिष्ठिरु आपणु । अनंतविजयो शंखु आनु । तयातें वाजवी ॥११०॥ नकुलें सुघोषातें वाइलें । सहदेवें मणिपुष्पकातें घेयेलें । अपारें चातुर्यें नादाविलें । तये रणीं ॥ ११ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

त्यानंतर ह्मणे संजय । ज्यास यशवर्ण श्वेत हय । त्या रथीं माधवमूर्तिद्वय । पांडवही दिसे जनदृष्टी ॥ ९८ ॥ माधवाकडे ' एव 'कार । पांडवाकडे ' च 'कार । लावूनि ऐसा अर्थविचार । सुचवी शिष्य व्यासाचा ॥ ९९ ॥ ' माधव एव ' ह्मणजे त्या रथीं । माधवच सारथी आणि रथी । अर्जुन वाटे जनमनोरथीं । तरी ' पांडवश्च ' ह्मणजे तोही ॥ २०० ॥ कीं हरावया भूभार । कृष्णजयशक्ति अर्जुनाकार । सर्वात्मभावें तो निर्विकार । माधव एव पांडव ॥ १ ॥ एवं श्वेताश्वयुक्त रथीं । श्रीमाधव भक्तांचा सारथी । आणि पांडुसुत अर्जुन रथी । वाजविते जाले दिव्य शंख ॥ २ ॥ नामार्थ शंखांचे क्रूर । ते न सांगतां न होतां निष्ठुर । नांवेंचि सांगोनि ऊर । फोडी धृतराष्ट्ररायाचा ॥ ३ ॥ गुरुपुत्र सागरीं बुडाला । तो यमापासूनि कृष्णें आणिला । पंचजननामा असुर मारिला । समुद्रांत आधीं ॥४॥ समुद्रासी गुरुकुमार । दे ह्मणतां ह्मणे सागर । पंचजननामा शंखाकार । असुर आहे मजमाजी ॥ ५ ॥ त्याणें गिळिला असेल । ऐसा समुद्राचा बोल । आइकोनि सिंधु सखोल । तेथें प्रवेशे श्रीकृष्ण ॥ ६ ॥ शंखाचें फाडितां उदर । न सांपडतां गुरुकुमार । शंखाकार पंचजनशरीर । जाला पांचजन्य कृष्णाचा ॥ ७ ॥ तो पंचजन वधूनि । गुरुपुत्र यमापासूनि । आणिला हें आइकोनि । धृतराष्ट्र जाणे ॥ ८ ॥ कृतांताच्या मुखांतूनी । गुरुपुत्र जो आणिला वधूनी । तो शंख वाजवी ह्मणूनी । स्मरण संजय देतसे ॥ ९ ॥ जिकडे कृष्ण तिकडे जय । त्यास नाहीं मृत्युभय । पांचजन्यशब्दीं संजय । न बोलतां भाव सूचवी ॥ २१० ॥ अर्जुनाचा देवदत्त । जो खांडवदाहीं अग्निदत्त । जिकडे तो तिकडे निश्चित । जय ऐसें सूचवी ॥ ११ ॥ पौंड्र नामक क्रूर । शंख वाजवी वृकोदर । जो घटघट रक्त पिणार । दुःशासनाचें ॥ १२ ॥ जयास हेतु कृष्णार्जुन । परी तुझे पुत्र भीमसेन । मारील हा अर्थ गहन । शंखप्रसंगें सूचवी ॥ १३ ॥ भाव कीं बोकड माते । तो आपुले तोंडीं मुते । भ्रातृपत्नी द्रौपदीतें । नग्न करूं आरंभिली ॥ १४ ॥ ऐसा बोकडांसी गिळी । तो लांडगा भीम बळी । अतएव तो एक या कुळीं । भीमकर्मा ॥ १५ ॥ पोटीं निर्दय निष्ठुर । ह्मणोनि नांव वृकोदर । वृक लांडगा तैसें उदर । दयाहीन ह्मणोनि ॥ १६ ॥ हा भावार्थ गहन । खोंची धृतराष्ट्राचें मन । आतां संजय वचन । काय बोले आणिक ॥ १७ ॥ कुंतीपुत्र राजा युधिष्ठिर । अनंतविजयनामें सुंदर । वाजविती शंख माद्रीकुमार । सुघोषमणिपुष्पक ॥ १८ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

त्याउपरि श्रीकृष्णार्जुन । श्वेत घोडे रथीं जुंपोन । रथीं बैसले आपण । शंख वाजविते जाले ॥ ४७ ॥ त्या दिव्य शंखांचीं नांवें । मी सांगेन तुज स्वभावें । त्याणें होईल ज्ञान बरवें । कृष्णादिकांचें ॥४८॥ पांचजन्य वाजविला श्रीकृष्णें । देवदत्तातें अर्जुनें । पौंड्र शंखातें भीमसेनें । वाजविलें ॥ ४९ ॥ अनंतविजयशंखातें । युधिष्ठिर वाजवी निरुतें । नकुल वाजवी सुघोषातें । मणिपुष्पक सहदेवो ॥ ५० ॥

## निवृत्तिदेव

तयानंतरें येरीकडे । महारथीं देख श्वेत घोडे । तेथें माधव पांडव संवगडे । शंख वाजविते जाले ॥१४॥ पांचजन्य वाजविला श्रीकृष्णें । देवदत्त वाजविला अर्जुनें । पौंड्र शंख तो भीमसेन । वाजविता जाला ॥ १५ ॥ अनंतविजयशंखातें । युधिष्ठिर वाजवी निरुतें । नकुळ वाजवी सुघोषातें । मणिपुष्पक सहदेवो ॥ १६ ॥

## उद्धवचिद्धन

सवाई :– याउपरी मग श्वेतरथीं हय श्वेत नियोजुनि सज्जुनि सेना ।
माधव पांडव एकरथीं महतीसम आणिक कांहिं दिसेना ॥
शंख महा धरि हो उभयां करिं सायुध सिद्ध उभे वदवेना ।
वाजविती निज शंख महाविर कोणि कुणाप्रति तेथ पुसेना ॥ १४ ॥
वाजवि पाच-जि-अन्य रमाधव अर्जुन वाजवि देवदत्तू ।
पौंड्र विदध्महि शंख भयंकर भीम बळें मग वाजवितू ॥
हे त्रय शंख दणाणित ते क्षणिं सातहि क्षोहिणि त्यात कथूं ।
मुख्य महीवर शंख पुरस्सर तेहि परीकर ऐकसि तूं ॥ १५ ॥
नाम अनंत जया विजयो करिं घेउनि हर्षित वाजवि राजा ।
नाम युधिष्ठिर धर्मपरायण घोष करी अरि-कंदन-काजा ॥
माद्रिसुता सहदेव नकूळहि शंख सुघोष करी घनगाजा ।
तो मणिपुष्पक घे सहदेवहि थोरलिवर वाजत वाजा ॥ १६ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

तंव श्वेतहययुक्तें । महास्यंदनीं जे कां स्थित । माधव पाडव विख्यात । दिव्य शंख अद्भुत स्फुरिते जाले ॥ ३८ ॥ कोण कोण तया शंखांचीं नामें । कोणें कोणतें स्फुरिलें संभ्रमें । तें आतां सांगिजेति अनुक्रमें । श्रोती निभ्रम परिसावें ॥ ३९ ॥ पांचजन्य हृषीकेशें स्फुरिला । देवदत्त धनंजयें वाजविला । पौंड्र महाशंख आगळा । भीमकर्में वाजविला वृकोदरें ॥ ४० ॥ अनंतविजय नामें सुंदर । तो राजा कुंतीचा कुमर । वाजविता जाला युधिष्ठिर । माद्रीकुमर जे दोघे ॥ ४१ ॥ ते नकुल सहदेव नामक । सुघोष आणि मणिपुष्पक । वाजविते जाले निजशंख । वीरनायक निज भारी ॥ ४२ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

श्वेत वारु ज्या रथासि आहेति । महासुंदर तेज दीप्ती । वरि पांडव आणि श्रीपति । दिव्य शंखाप्रति फुंकिते जाले ॥ ३५ ॥ पांचजन्यु फुंकि हृषिकेशि । धनंजय वाजवि देवदत्तासि । भीमकर्मा वृकोदराशीं । पौंड्र महाशंखासि फुंकिलें ॥ ३६ ॥ अनंतविजयासि सत्वर । वाजविती कुंतिसुत युधिष्ठिर । नकुळ सहदेव साचार । वाजविती सुघोष मणिपुष्पक ॥ ३७ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

इंद्रवज्राः– येरीकडे श्वेत तुरंगमाही । जो जुंपिला स्यंदनराज पाहीं ॥
तया रथीं बैसुनि कृष्णपार्थी । केलीं स्वशंखस्फुरणें समर्थी ॥ १८ ॥
शालिनीः– श्रीकृष्णानें फुंकिला पांचजन्य । पार्थे राया देवदत्ताख्य जाण ॥
ज्याचें युद्धीं क्रूर गा कर्म देख । भीमें तेणें फुंकिला पौंड्र शंख ॥ १९ ॥
पृथ्वीः– यमास्तव पृथोदरीं प्रथम पुत्र जो जन्मला । अनंतविजयाख्य तो दर युधिष्ठिरें फुंकिला ॥
वनीं युगुल अश्विनीतनयपुत्र जे जन्मले । सुघोषमणिपुष्पकाभिध तिहीं क्रमें फुंकिले ॥ २० ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

श्वेतवर्ण घोडे महारथीं । वरी पांडव श्रीपति । दिव्य शंख घेऊनि हातीं । वाजविते जाले ॥ १४ ॥
पांचजन्य घेतला श्रीकृष्णें । देवदत्त तो वीरें अर्जुनें । भीम वृकोदर तेणें । पौंड्रशंख वाजविला ॥ १५ ॥
अनंतविजय गजरें । वाजविला युधिष्ठिरें । नकुलें सहदेववीरें । सुघोष मणिपुष्पक वाजविले ॥ १६ ॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः– थोरी थोरला तो रथी । शुभ्रवर्ण हयनाथी ॥
दोघे युक्त रहंवरीं । कुंतीपुत्र पूतनारी ॥
दिव्य वाजविते जाले । शंख करींचे आपुले ॥
अहो माधवीं पांडव । तुका ह्मणे ठेवी जीव ॥ १२ ॥
पांचजन्य हृषीकेशें । वाजवितांचि आवेशें ॥
देवदत्त धनंजयें । वाजविला देऊं भयें ॥
पौंड्रनामा महाशंख । श्रवणें रिपूशीं दे दुःख ॥
भीमें वाजविला बळें । तुका वदे हर्षमेळें ॥ १३ ॥
प्रभु अनंतविजय । श्रवणार्थी दाता जय ॥
शंखालागी युधिष्ठिर । वाजवित हर्षपर ॥
आतां नकुलसहदेवें । शंख वाजविलें ऐकावे ॥
सुघोष मणिपुष्पक । तुका ह्मणे हे रसिक ॥ १४ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुपः– तो थोर रथ शुभ्राश्वीं युक्त एका रथीं तया ।
दिव्य वाजविते झाले शंख माधव पांडव ॥ २८ ॥
हृषीकेशें पांचजन्य देवदत्त धनंजयें ।
पौंड्रनामा महाशंख भीमें वाजविला बळें ॥ २९ ॥
राजा अनंतविजय शंखातें श्रीयुधिष्ठिर ।
माद्रीपुत्रीं वाजविले सुघोष मणिपुष्पक ॥ ३० ॥

## मोरोपंत

आर्याः–

बैसुनि ते श्रेष्ठ रथीं संयुक्त श्वेतवर्ण हय ज्यासीं ।
माधव आणिक पांडव वाजविती तेंचि दिव्य जलजांसीं ॥ १४ ॥
बीभत्सु देवदत्ता वाजवि तो कृष्ण पांचजन्यासी ।
वाजविलें पौंड्रासी भीमें जो नित्य सिद्ध युद्धासी ॥ १५ ॥
राजा अनंतविजया वाजवुनी तो करी महाघोषा ।
सहदेव नकुळ तैसे वाजवि मणिपुष्पकाभिध सुघोषा ॥ १६ ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
तों शुभ्रतुरगयुक्ता मोठ्या एका रथावरी बसले ।
माधव पांडव झाले वाजविते दिव्य शंख ते दोघे ॥ ३२ ॥
श्रीकृष्ण पांचजन्या अर्जुन तो देवदत्तशंखातें ।
पौंड्र महाशंखातें अद्भुतबळ भीम वाजवी तेव्हां ॥ ३३ ॥
कुंतीपुत्र युधिष्ठिर राजा तोही अनंतविजयातें ।
सहदेव नकुळ दोघे सुघोष मणिपुष्पकांसि वाजविती ॥ ३४ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

मग शुभ्र अश्व जुंपिले । थोर रथ बैसले । कृष्ण अर्जुन आपुले । शंख वाजविते जाहले ॥ १४ ॥
पांचजन्य शंखातें कृष्ण । देवदत्तातें अर्जुन । पौंड्रिक शंखातें भीमसेन । ऐसे वाजविते जाले ॥ १५ ॥
धर्म अनंतविजयातें । नकुळ सुघोष शंखातें । सहदेव मणिपुष्पकातें । वाजविता जाला ॥ १६ ॥

**काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।**
**धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥**
**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।**
**सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक्पृथक् ॥ १८ ॥**
**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥**

**अर्थः—आणि महाधनुर्धर काशिराज, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट, अजिंक्य सात्यकि, द्रुपद, द्रौपदीचे मुलगे आणि सुभद्रेचा महाबाहु पुत्र या सर्वांनीं चोहोंबाजूंनीं निरनिराळे शंख वाजविले. आकाश व पृथ्वीसुद्धां दुमदुमून टाकणारा तो नाद धृतराष्ट्रपुत्रांचीं हृदयें विदीर्ण करिता झाला.**

१ शंख. २ अर्जुन.

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) "

तेथ भूपति होते अनेक । द्रुपद द्रौपदेयादिक । हा काशीपती देख । महाबाहू ॥ ५१ ॥ तेथ अर्जुनाचा सुतु । सात्यकि अपराजितु । धृष्टद्युम्नु नृपनाथु । शिखंडी हैन ॥ ५२ ॥ विराटादि नृपवर । जे सैनिक मुख्य वीर । तिहीं नानाशंख निरंतर । आस्फुरिले ॥ ५३ ॥ तेणें महाघोषनिर्घातें । शेष कूर्म अवचितें । गजबजोनि भूभारातें । सांडूं पाहती ॥ ५४ ॥ तेथ तिन्ही लोक डळमळित । मेरुमांदार आंदोळित । समुद्रजळ उसळत । कैलासवेरी ॥ ५५ ॥ पृथ्वीतळ उलथों पहात । आकाश असे आसुडैत । तेथ सडौं होत । नक्षत्रांचा ॥ ५६ ॥ सृष्टि गेली रे गेली । देवां मोकळैवादी जाहली । ऐशी एक टाळी पिटली । सत्यलोकी ॥ ५७ ॥ दिहाचि दिन थार्कैला । जैसा प्रळयकाळ मांडला । तैसा हाहाकारु जाहला । तिहीं लोकीं ॥ ५८ ॥ तें देखोनि आदिपुरुष विस्मितु । ह्मणे ह्मणें होय पां अंतु । मग लोपिला अद्भुतु । संभ्रमु तो ॥ ५९ ॥ ह्मणोनि विश्व सांवरलें । एऱ्हवीं युगान्त होतें वोडवलें । जे महाशंख आस्फुरिले । कृष्णादिकीं ॥ १६० ॥ तो घोष तरी उपसंहैरला । परी पडिसाद होता राहिला । तेणें दळभार विध्वंसिला । कौरवांचा ॥ ६१ ॥ जैसा गजघटाआंतु । सिंह लीला विदारितु । तैसा हृदयातें भेदितु । कौरवांचिया ॥ ६२ ॥ तो गाजत जंव आइकती । तंव उभेचि हियें घालिती । एकमेकांतें ह्मणती । सावध रे सावध ॥ ६३ ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

काशिराज धनुर्धरु । शिखंडिया महारथी वीरु । धृष्टद्युम्न विराट थोरु । सात्यकिया तो अपराजितु ॥ १७ ॥ द्रुपद आणि द्रौपदीचे सुत । सुभद्रेचा पुत्र महाबाहो विख्यात । अगा राया हे मिळोनि समस्त । शंख वेगळे वाजविते जाले ॥ १८ ॥ तया नादाचेनि गजरें । दुमदुमिलीं मेरुशिखरें । दुर्योधना दुःख जालें भेरें । हृदय त्याचे विदारितसे ॥ १९ ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

एवं पाचजन्यादिकांचा ध्वनी । आइकोन इतर जे जे कोणी । तेही हर्षयुक्त होऊनी । करिती शंखस्फुरणाते ॥ १९ ॥ ते नृपवर कवण कवण । सागिजेति आइक सावधान । हें संजयाचें पैं वचन । धृतराष्ट्राप्रती जाणावे ॥ १२० ॥ काशीश्वर धनुर्वाड अती । शिखंडी वीर महारथी । राजा धृष्टद्युम्न महामती । विराट वैराटपती पैं ॥ २१ ॥ जो पराजयातें कहीं । सर्वात्मना पावलाचि नाहीं । तो सात्यकि वीर पाहीं । नामाथिला विख्यात ॥ २२ ॥ पांचाळदेशींचा नृपवर । द्रुपद जगीं विख्यात थोर । आणि द्रौपदीचे कुमर । वीर सुंदर पांचही ॥ २३ ॥ जो जाला सुभद्रेपासूनी । तो अभिमन्यू वीरशिरोमणि । सहस्रार्जुन-अवतार ह्मणोनि । महाबाहो ह्मणिजे ॥ २४ ॥ इत्यादि मुख्य वीरनायक । समुदाय स्थिती सकळिक । शंख वाजविती पृथक पृथक । आईक राया धृतराष्ट्रा ॥ २५ ॥ पृथिविपते हें संबोधन साचें । यया जाणावें धृतराष्ट्राचें । असो एवं अनंत शंखांचे । अनंत घोप उमटती ॥२६॥ अनंत शंखनाद मिळुनी । उठी कोणी येक महाध्वनी । तो न सांठे त्रिभुवनीं । व्योमीं राहे कोंदाटला

१ आणखी. २ धक्कयानें. ३ तुटून पडते. ४ वर्षाव. ५ निराधार. ६ थांबला. ७ नाहींसा झाला. ८ धैर्य.

॥ २७ ॥ जैसें प्रळयकाळींचें मेघगर्जन । तैसें तें गमे शंखस्फुरण । त्रैलोक्य आंदोलायमान । जालें तेणें महाशब्दें ॥ २८ ॥ स्वर्गी ब्रह्मादि देव कांपती । काय प्रळयोचि मांडला ह्मणती । पाताळींचे चंचल नागाधिपती । तेणें शंखघोष त्रासे ॥ २९ ॥ अष्टौ कुळाचळ डळमळती । दिग्गज आपुलाले ठाय सोडिती । मृत्युलोकीं मानवांची गती । ते तों नये बोलतां ॥ १३० ॥ एवं ऐसा तो घोष निरुता । कौरवहृदय विदारी होत्साता । तुमुळत्वें होय व्यापिता । पृथिवी आणि अंबर ॥ ३१ ॥ नादें बहिरावले जन । उडोनि गेलें देहस्मरण । असो यावरी वृत्तांत कोण । वर्तला तो अवधारीं ॥ ३२ ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

तरी त्यांचींही एक दोन नामें सांगेन । आइकें राया तूं चित्त देऊन । तरी अतिधनुर्धर महादारुण । काशिराज जाण काशीश्वरु ॥ ४३० ॥ तैसाचि शिखंडी हा महारथ । जो कीं उदेला भीष्मवधार्थ । आणि धृष्टद्युम्न द्रुपदसुत । सेनानाथ पांडवांचा ॥ ३१ ॥ अभिमन्यूचा जो कीं श्वशुर । तो विराट राजा वीर धीर महाथोर । सात्यकि कृष्णाचा जो बंधु अवर¹ । वीर दुर्धर अपराजितु तो ॥ ३२ ॥ पारिजातहरणाच्या ठायीं जाण । जेणें सर्वही जिंतिले अमरगण । आणि उषाहरणीं जिंतिला बाण । परी पराजय पूर्ण न पवे सुरासुरांसी ॥ ३३ ॥ तैसाचि पांचाळदेशींचा नृपती । द्रौपदीचा पिता द्रुपद अतिरथी । आणि द्रौपदीचे पांच पुत्रादि महारथी । आणि अतिरथी अभिमन्युवीर ॥ ३४ ॥ हे ' पृथिवीपते ' ऐसें धृतराष्ट्रासी । संजय ह्मणे स्थिर होऊनि परियेसीं । प्रत्येकें आपलालिया शंखासी । वीर तेवेंकेंसीं² आस्फुरिते जाले ॥ ३५ ॥ मग तया घोषाचा एकवळा । कंपु सुटला सर्व भूमंडळा । पर्वतांचा हों पाहतसे गोळा । वृक्षमेळा उन्मूळतु ॥ ३६ ॥ तेणें महाघोषाचेनि निर्घातें । शेषकूर्मादि दचकले अवचितें । गजबजोनियां ब्रह्मांडभारातें । भयेंचि ते सांडूं पाहती ॥ ३७ ॥ ऐसे तीन्ही लोक डंडळिती³ । सप्तोदधि⁴ क्षोभातें पावती । दिग्गज परिसोनियां दचकती । पडे आवर्ती महावातु ॥ ३८ ॥ पृथ्वीतळ हें उलथों पाहत । नक्षत्रमाळा जाणों तुटती निभ्रांत । आकाश जालें नादें संपूरित । भयें कांपत कृतांत स्वयें ॥ ३९ ॥ सृष्टि गेली गेली ह्मणोनि । देव गजबजिताती स्वर्गभुवनीं । आश्चर्यें थोंकला दिनमणी । चंद्र गगनीं कंपायमान ॥ ४४० ॥ पूर्वी कौरवदळीं होतां तुरबंबाळ । तो कृष्णशंखें लोपला सकळ । जैसा उदय पावतां तरणिकल्लोळ । नक्षत्रमेळ हारपे जैसा ॥ ४१ ॥ ऐसा त्रैलोक्यांत अत्यद्भुतु । प्रबळ देखोनिया श्रीकृष्णनाथु । तो उपसंहरिला संभ्रम बहुतु । राहे निवांतु तेणें समयीं ॥ ४२ ॥ ह्मणोनि त्रैलोक्य संस्था पावलें । एऱ्हवीं युगांत होतें वोडवलें । तेथ कृष्णादिकीं आस्फुरिले । स्वशंख बळें युद्धालागीं ॥ ४३ ॥ ना कोणी ऐसें जरी ह्मणती । जें मूळीं नाहीं इतुकी व्यक्ति । तरी ' नभश्च पृथिवीं चैव ' हे पदव्युत्पत्ति । कथारसार्थी केली असे ॥ ४४ ॥ परी कांहीं संस्कृतावांचूनी । अणुमात्रही मी आन न वाखाणीं । श्रोते जे कीं अतिसज्ञानी । जाणती मनीं युक्तायुक्त ॥ ४५ ॥ असो हा एथ परिहार आता । परियेसा कथेची अपूर्वता । संजय सांगतसे नृपनाथा । काय मागुता बोलतु ॥ ४६ ॥ ह्मणे गा तुझिया सैन्याचे ठायीं । शंखादिघोष जाला जो पाहीं । तेणें क्षोभ नुपजेचि पांडवांसी कांहीं । सांगों कायी अपूर्व तुज ॥ ४७ ॥ आणि तयांचा महाशंखध्वनी । कौरवांचिये हृदयस्थानीं । तो बाण रुतला गा अतिनिर्वाणीं । तयांलागूनि विदारितु

१ धाकटा, दुसरा. २ वीराच्या आवेशानें. ३ घाबरती. ४ सप्तसागर.

॥ ४८ ॥ भीष्मद्रोणकर्णादिक समस्त । हृदयविदारणतुल्य व्यथा अत्यर्थ । पावोनि तयांचें हृदय फुटत । भयचकित त्रिदांचें जाले ॥ ४९ ॥ इतरांच्या दंतपंक्ति बैसती । भयेंकरूनि थरथरां कांपती । भ्याड ते उभेचि प्राण टाकिती । सांगों किती पराभिक्य ॥ ४५० ॥ अगा पृथ्वी नभ अभिव्यापूनी । प्रळय वर्तला जेथ सुरासुरांलागूनी । तेथ तुझिया वीरांची गणना कोणे कोणीं । करिजे जनीं साग राया ॥ ५१ ॥ जैसा कुंजरसमुदायाआंतु । निःशंक केशरी संचरतु । संचरोनियां कुंभस्थळें विदारितु । तैसा हृदय भेदितु तुझिया वीरांचें ॥ ५२ ॥ नाना अति योग्याच्या वचनीं । धडका लागे मूर्खाच्या मनीं । तैसें कौरवाच्या हृदयालागूनी । विदारी निर्वाणीं महाशब्द तो ॥ ५३ ॥ तंव भीष्मद्रोणादिक महावीर । ते सांवरिती आपुला दळभार । सन्नद्ध होऊनि चालिले धीर । करिती शरभार पांडवसैन्या ॥५४॥ ऐसें कौरवांचें भय सांगोन । पांडवांचा उत्कर्ष संजय आपण । सांगता जाला नृपालागून । श्रोतीं सावधान परिसावें ॥ ५५ ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

काशीराज योद्धा परम । शिखंडी रथिया उत्तम । विराट धृष्टद्युम्न पुरुषोत्तम । लक्षून शंख वाजविती ॥ ६२ ॥ सात्यकी प्रेमळ अति । वाजवी स्मरोनि श्रीपति । आणि पुरुजित राजा सुमति । आपुला शंख वाजवी ॥ ६३ ॥ वाजवी द्रुपद नृपवर । तेवीं ते द्रुपदीचे कुमर । तैसाचि सुभद्रापुत्र मनोहर । महाबाहो अभिमन्यू ॥ ६४ ॥ ऐसे आपुलाले शंख वाजविती । ती गर्जना सांगों किती । भुभुत्कंत अति दाविती । एकवेळा करूनियां ॥ ६५ ॥ तो घोष धृतराष्ट्रा तव कुमर । ऐकतां भयभीत झाले सत्वर । हृदयविदारण पावले नर । कळा उतरूनि गेल्या त्यांच्या ॥ ६६ ॥ नाद तुंबळ वाढला । नभ भेदूनि पृथ्वीत रूढला । मानसींचा पराक्रम मोडला । अधर्मकर्त्या वीरांचा ॥ ६७ ॥ जैसे पाषांडी बरळती । तंव हरिभक्त तेथें मिळती । तेणें ते मनीं विरघळती । तैसें जाहलें कौरवां ॥ ६८ ॥

## दासोपंत—' गीतार्णव '

[ काश्यश्च परमेष्वासः ] सत्संगु जो का सबीजु । महाधनुर्वाडा काशिराजु । बाणांचा प्रेरणी सहजु । जळधरु[2] दुजा ॥ २७ ॥ [ शिखंडी च महारथः ] भीष्माचार्यातें दंडी । ऐसा सत्वगुणु तो शिखंडी । सहनविवेकुप्रौढी । हेचि जया ॥ २८ ॥ [ धृष्टद्युम्नः ] हर्ष जो भक्तियोगाचा । तो पुत्रसमानु शिष्यु द्रोणाचा । अधिकाधिकु दासत्वाचा । परम विषयो जो ॥ २९ ॥ द्रुपदा भक्तियोगाचा नंदनु । एवं परमार्थिकु रजोगुणु । महावीरु धृष्टद्युम्नु । दळवयी[3] पाडवां ॥ ११३० ॥ [ विराटश्च ] कर्मयोगु तो विराटु । सत्वशुद्धीचा जो पाटु । योगसंग्रामीं नेटु । संस्कारु जेणें ॥ ३१ ॥ [ सात्यकिश्चापराजितः ] कर्मयोगा बळ जेणें । तो धर्माधर्मविचारु मानणें । सात्यकी तया ह्मणणें । युयुधान जो ॥ ३२ ॥ जिंकिला नवचे कव्हणा । पर जिंके जो आंगवणा । साधका ह्मचि दावणा । मिरवण आधीं ॥ ३३ (१७) ॥ [ पृथिवीपते ] संजयो ह्मणे पुढती । आइकें राया पृथ्वीपति । आणिक शूर पुढती । पांडवांचे ॥ ३४ ॥ [ द्रुपदः ] द्रुपदु जो जाणे निका । क्षेत्री नांगवे आणिका । तो

१ कोपऱ्यांत. २ मेघ. ३ सेनापति.

भक्तियोगु हें लोकां। साहित्य बुझाविजे ॥ ३५ ॥ [ द्रौपदेयाश्च ] पांचही द्रौपदीचे कुमर। पांडवात्मज जाले वीर। तयांचें साहित्य समग्र। तें मागांचि कथिलें ॥ ३६ ॥ [ सर्वशः ] ते प्रतिविंध्यादिक समस्त। पुढती अवधारीं निश्चित। संजयो ह्मणे तेथ। आणिकु असे ॥ ३७ ॥ [ सौभद्रश्च महाबाहुः ] देवी सुभद्रेचा नंदनु। नाम जयाचें अभिमन्यु। साहित्यस्थानीं सत्प्रेत्नु। बोलिला जो ॥ ३८ ॥ आगळिया भुजासंग्रामीं। प्रवीणु आपुला स्वधर्मी। सत्प्रेत्नु तो विक्रमीं। लागेचिना ॥ ३९ ॥ [ शंखान्दध्मुः पृथक् पृथक् ] ऐसे आपपरावे सकळैक। पांडवदळींचे जें लोक। बोलिले यांहूनिही आणिक। जे मागा कथिले ॥ ११४० ॥ रथी अतिरथी महारथी। अवघे मीनले काये करिती। तया अर्जुना आणि श्रीपती। पाहेनियां ॥ ४१ ॥ अवघेचि करिती शंखस्फुरणें। येकेचि समयें येके त्राणें। आपुलालेनि महिमान। उठावे ॥ ४२ ॥ स्वभाववृत्तिस्फुरणें। तींचि शंखांचीं आत्राटणें। आतां तो नादु गगनें। कैसा व्यक्त जाला ॥ ४३ (१८) ॥ [ स घोषः ] तो जो घोषु अति टणकु। अवघिया खाचु येकु। उपजताचि भयदात्मकु। पुढता कैसा ॥ ४४ ॥ [ नभश्च ] पृथ्वीपासूनि वरुतें। तया सत्यलोकाची परतें। पाविजे जंव कंचुकातें। ब्रह्मांडाचिया ॥ ४५ ॥ सात स्वर्गें जया अंतरीं। ऐसें आकाश जें अवधारीं। ना की चौदा भुवनामाझारीं। जे जे पोकळ ॥ ४६ ॥ [ पृथिवीं चैव ] पृथ्वीपासूनि तळु घेतां। सातही पाताळें जीं तत्वता। तेथिंची धरणी त्या त्या समस्ता। जे लोकां आधारु ॥ ४७ ॥ ना कीं भुवनें चौदाही। कठिण पृथ्वी जे तेथें काही। आणि शून्य पोकळ जें कांही। ते पैं व्योम ॥ ४८ ॥ एवं ऐसिये तिये पृथ्वीतें। आणि ऐसिया तया व्योमातें। नादु तो आपुलेनि मतें। काय करिता जाला ॥ ४९ ॥ [ व्यनुनादयन् ] प्रतिनादें नादवितु। जडातें जाणों बोलवितु। तेणें क्षणें वृत्तातु। तो कैसा जाला ॥ ११५० ॥ पृथ्वीवरिचे समस्त। नादें गर्जती पर्वत। तरुवर पाषाण समस्त। स्फुरोंचि लागले ॥ ५१ ॥ जडातें जाली चेतना। पृथ्वी हे वाजे वीणा। पाषाण जणों पाषाणां। पाचारिती ॥ ५२ ॥ नादुचि नादातें झगटे। तेथें प्रतिनादु आनु उठे। येणे प्रकारें वाटे। नानाविधु तो ॥ ५३ ॥ पर्वतीं करितां शब्दु। जैसा उठी प्रतिनादु। देवालयीं केला शब्दु। जैसा भेदे ॥ ५४ ॥ शब्दें प्रतिशब्दु कपाटीं। तळघरीं जैसा उठी। तेणेंचि प्रकारें नादसृष्टि। नादें उजविली ॥ ५५ ॥ चौदाहि गर्जती भुवनें। पृथ्वी आणि गगन जाणें। भूतेंही प्रतिनादें तेणें। स्फुरतीं जालीं ॥ ५६ ॥ विश्वात्मा विश्वभरितु। शंखु वाजवितां अनंतु। नाद तो तेणेंसीं अन्वितु। ह्मणोनियां ॥ ५७ ॥ विश्वाकारें स्वयं स्फुरला। ना कीं प्रकारु आनु जाला। विश्वात्मेन शंखु वाइला। ऐसें असतां ॥ ५८ ॥ विश्वतोमुखें नादु क्षरे। ऐसें जालें येणे प्रकारें। एवं प्रतिनादवूनि विश्व अंबरें। नादु कैसा ॥ ५९ ॥ [ तुमुलः ] दुमदुमीतु नभी भरला। ब्रह्मांडीं संपूर्ण कोंदला। न भेदी की अवलीला। कंचुकातें ॥ ११६० ॥ प्रतिनादेंसीं तो मिळोन। पावला नादु थोरपण। मग शंखनादुचि हे खुण। नुमटे तेथ ॥ ६१ ॥ उगाचि ध्वनि प्रचंडु। वाडाहूनि वाडु। तया ब्रह्मांडीं पवाडु। पुरतां न दिसे ॥ ६२ ॥ तया नादाचें टणकपण। राया तुजप्रति मी सांगैन। सावधान करूनि मन। श्रवण करीं ॥ ६३ ॥ महाप्रळयींचे मेघ। गर्जती जैसे अमोघ। तयाहूनि येक अग। आगळेंचि नादाचें ॥ ६४ ॥ कोटि विजूंचा गडगडाटु। जैसा होये येकवाटु। तैं नादु तेथें प्रगटु। होये जैसा ॥ ६५ ॥ ऐसा नादु गडगडिला। तो काय करिता तेथ जाला। तेंचि वर्तमान अवलीला। आइकें राया ॥ ६६ ॥ [ धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ] राया धृतराष्ट्रा तुझे कुमर। दुर्योधनादिक समग्र। आणि तया दळींचे वीर।

प्रतापिये जे ॥ ६७ ॥ तयांचीं हृदयें लक्षून । मग तयामाजी प्रवेशोन । तीं विदारिता जाला जाण । नादु तो स्वयं ॥ ६८ ॥ काळरूपी नारायणु । सत्यसंकल्पी श्रीकृष्णु । तेणें कैसा कीं अनुमानु । संकल्पु केला ॥ ६९ ॥ तेणें संकल्पें शंखु वातां । नादाकारें नेणों तत्वता । कौरवां हृदयीं प्रवेशता । जाला स्वभावें ॥ ११७० ॥ तो सत्यसंकल्पु ईश्वराचा । कौरवां हृदयीं सुखाचा । नव्हे तो हरिता प्राणांचा । ऐसा जाला ॥ ७१ ॥ पडताचि शब्दु श्रवणीं । येक उदंडले रथांवरूनि । वारू ते पांगुळ होऊनि । भूमीं नैसले ॥ ७२ ॥ सारथियें सोडिले वागोरे । जाणों तयां आलें फेंपरें । मुरकुंडी देऊनि अवसरें । तेणें पडिले ॥ ७३ ॥ येक हात पाय खोडिती । येक ते नयन लाविती । कासाविस होती । कौरववीर ॥ ७४ ॥ गळाले धनुष्यबाण । शस्त्रें पडिलीं सुटोन । सर्वांगीं महाभ्रमण । उपजतें जालें ॥ ७५ ॥ टाळी बैसली श्रवणीं । आंधारी आली नयनीं । स्थळ सोडिलें प्राणीं । तेणें काळें ॥ ७६ ॥ हृदयीं कांडती साली । द्राव नाहा मुखकमळीं । जीतचि समग्रीं भोगिली । अवस्था मरणाची ॥ ७७ ॥ इतुलेनि येकें काळें । अवघे सावध जाले । रथ वारू आपुलाले । पाहती संयोग ॥ ७८ ॥ संचु करूनि तो पुढती । येक येकातें पाचारिती । ' काये जालें हो ' ह्मणती । कायें हा नादु ॥ ७९ ॥ एक बोलती वचन । मानें हें प्रलयाचें चिन्ह । आह्मीं पूर्वी श्रवण । केलें होतें ॥ ११८० ॥ एक ह्मणती अकाळु । येक ह्मणती कैंचा काळु । फुटला हा ब्रह्मांडगोळु । प्रत्यक्षु पहा ॥ ८१ ॥ येकु ह्मणती खचलीं । चौदा भुवनें रिचविलीं । मेरु पडला भूतळीं । हेंचि खरें ॥ ८२ ॥ येक ह्मणती पळावें । येक ह्मणती कें जावें । जेथिंचें तेथेंचि अघवें । विश्व मरैल ॥ ८३ ॥ वीर दिशेतें भूलले । पांडवांचिकडे चालिले । येक ते लाजावले । देखोनि पार्था ॥ ८४ ॥ येक करिती देवस्मरण । येक न बोलती मोठेन । येक आठविती स्वभुवन । भाकिती करुणा ॥ ८५ ॥ धैर्य हृदयींचें पळालें । भय सहस्रगुणा प्रवेशलें । हृदय फुटों आलें । तेणेंकरूनि ॥ ८६ ॥ तेज सांडिलें क्षत्रीं । ह्मणती करा आतां मैत्री । पराक्रमु तो अंतरीं । कव्हणा न वर्ते ॥ ८७ ॥ अवघे परजणी विसरले । धनुष्यें आच्छादिते जाले । धैर्यप्रभाव सुटलें । थांबतीचिना ॥ ८८ ॥ मागेंचि पाहती सकळ । तंव वाव न देखती केवळ । मग सर्वांगें विकळ । उभे ठेले ॥ ८९ ॥ कितुलेनि येकें व्यवधानें । कळलें पांडवांचें वाधावणें । मग अधिक प्राण तेणें । सांडू प्रवर्तले ॥११९०॥ श्रवणीं सांचळ आइकती । आला आला पार्थु ह्मणती । येक येकातें भिती । देखोनियां ॥ ९१ ॥ क्षणेकु गजबु करिती । क्षणेकु निवांत ठाती । ऐसी पडली विस्मृति । महावीरातें ॥ ९२ ॥ ह्मणती करा वाधावणें । तंव अवघे सुटले प्राणें । कोठें जाणें काये करणें । हेंचि विचारिती ॥ ९३ ॥ येक येकातें आळविती । वारू बुजले न संवरती । सांभाळा सांभाळा ह्मणती । आन येक ॥ ९४ ॥ आपुला शब्दु आपणातें । आइकिला न वचे तेणें मतें । उपशांति नाहीं नादातें । काये कीजे ॥ ९५ ॥ उगीचि आयकोनि हांक । येक ह्मणती राख राख । येक वेळां पाहों मुख । आत्मजाचें ॥ ९६ ॥ वाधावणें सर्व सरलें । पांडव निवांतही ठेले । तथापि नादु तेणें । पोकळें ग्रासिजेना ॥ ९७ ॥ माणुसांचिवरि रथु जाती । उगेचि वीर आडखुळती । साष्टांगीं दंडवता क्षिती । पडती वीर ॥ ९८ ॥ हातींचे अश्व सुटले । मग ते नव्हेचि आपले । गजीं भय धरिलें । परतले ते ॥ ९९ ॥ सव असव तेथ न कळे । येकाचें येका जालें । नादें जें युद्ध केलें । तें न करवे वीरां ॥ १२०० ॥ सर्वांगीं स्वेदु पाझरे । चळचळां कापती गात्रें । वचन बोलता तांतरे । दाटी वाचे ॥ १ ॥ बोलतां सस्पंदे वदन । शब्दु न फुटे तेणेंकरून । पळों जातां चरण । आंढिया घालिती ॥ २ ॥ बैसोनि सुख नवटे । मग तो पुरुष उठे ।

उगाचि चाले वाटे । बैसे पुढती ॥ ३ ॥ टणकु नादें वायस । दशदिशा सेविती आकाश । शब्दु करिती अस्मसास । तैसें जालें ॥ ४ ॥ परंतु ययांचेचि शब्द । ते अवघेचि निर्नाद । न उमटतीचि भेद । तयें नादीं ॥ ५ ॥ सहस्र वाजती भेरी । तो नादु भरे अंबरीं । तेथपासीं वाजती ते परि । नाइकवे वीणा ॥ ६ ॥ नक्षत्रांची प्रभा जैसी । दिवसा न उमटे आकाशीं । सामावे सूर्याचां प्रकाशीं । सर्वांचें तेज ॥ ७ ॥ तैसे कौरवांचे शब्द । नादें जाले निर्नाद । उत्तरा प्रतिउत्तरांचे भेद । तेथ काइसे ॥ ८ ॥ समस्त धैर्यें सुटले । तेजें पराक्रमें गळाले । विद्या वीर विसरले । संग्रामाची ॥ ९ ॥ धैर्यवंते हरपलीं । ना तीं नादें हरिलीं । ययापरी विसंचिलीं । कौरवांचीं ॥१२१०॥ शंखनादें तैसें जालें । तें परमार्थदृष्टीं कैसें देखिलें । पाहिजे कथन केलें । अवधारावें ॥ ११ ॥ नादु जो पांचजन्याचा । तो आज्ञाप्रसादु सद्गुरुचा । देवदत्तु अर्जुनाचा । तें बोलणें शिष्याचें ॥ १२ ॥ एवं आक्षेप शिष्याचे । आणि परिहार गुरूचे । शंख कृष्णा अर्जुनाचे । ऐसे स्फुरले ॥ १३ ॥ शिष्यानुभवाचें कथन । वरि गुरुवाक्य तया समाधान । दोहींचा प्रमाणीं प्रमाण । वेदां शास्त्रां ॥ १४ ॥ एवं गुरुशिष्यांचां येकांतीं । तत्वानुभवाची जे उक्ती । तेचि शंखनाद होती । कृष्णार्जुनांचे ॥ १५ ॥ तेथें पहिलीचि भूमिका योगाची । ह्मणौनि भीमशंखु तयांपाठीचि । प्रेत्नकळा आत्मयोगाची । संपादली ते ॥ १६ ॥ बाह्यशरीरें निश्चळता । मन इंद्रियांतें तत्वतां । मग ज्ञानवृत्ति नियमितां । अधिष्ठानीं ॥ १७ ॥ अतत्वभाव संहरे । आत्मतत्वचि केवळ उरे । शंखु तो तयानंतरे । आत्मधर्माचा ॥ १८ ॥ योगाचेनि आधारें । आत्मधर्माधर्मु स्फुरे । अनंतविजयो खरें । तोचि शंखु ॥ १९ ॥ सहजात्मस्थितिचें स्फुरण । योगाचेनि आंगें उत्पन्न । अनंतविजयो अभिधान । तया शंखा ॥ १२२० ॥ आत्मधर्माचिये स्फूर्ती । पाहिजे नित्यत्वें स्थिति । तरि असती दोन्ही वृत्ति । प्रेत्नाचिया ॥ २१ ॥ येकु लयो अहंभावाचा । भाव निर्विकल्पो स्थितीचा । तोचि सुघोषु नकुळाचा । येकु शंखु ॥ २२ ॥ दुसरा आत्मन्वयो गुणेंसीं । सविकल्पसमाधि ह्मणिजे जयासी । मणिपुष्पकु निश्चयेंसीं । तो शंखु सहदेवाचा ॥२३॥ एवं व्यतिरेकान्वयस्फुरण । संप्रज्ञाता संप्रज्ञात ज्ञान । सुघोषु मणिपुष्पकु सुलक्षण । शंख दोन्ही ॥२४॥ ऐसी गुरुशिष्यांची उक्ति । तिसरी आत्मयोगाची प्रवृत्ति । चौथा आत्मधर्मु आत्मस्थिति । सहज निष्ठा ॥ २५ ॥ व्यक्तिरेकु पांचवा वृत्तिलयो । सर्वां गुणी आत्मान्वयो । ऐसा आत्मानुभवें ज्ञानविषयो । संपादतु असतां ॥ २६ ॥ तया स्वानुभवाचे साह्यकर । योगु उठिले समग्र । तेचि शंख इतर । इतरां रायांचे ॥२७॥ सत्संगाचा आधारु । प्रथमचि पाहिजे निरंतरु । यालागीं तयाचा बडिवारु । तो शंखु काशिराजाचा ॥ २८ ॥ वासनात्यागु सहनशीलता । सत्संगीं पाहिजे हा भाव पुरता । ह्मणौनि शिखंडी वाजविता । जाला तो शंखु ॥ २९ ॥ वासनात्यागाचेनि पैसे । गुरुदास्य असावें हर्षें । ह्मणौनि तो प्रेमउत्कर्षु विशेषें । शंख द्रौपदाचा ॥१२३०॥ कर्मयोगाचा आधारु । सत्वशुद्धीतें पाहिजे अपारु । ह्मणौनि कर्मयोगबडिवारु । नादविला विराटें ॥ ३१ ॥ कर्तव्याकर्तव्य जाणणें । पाहिजे साधकांकारणें । ह्मणौनि तो शंखु युयुधानें । रायें वाजविला ॥ ३२ ॥ सत्प्रेत्नाचा बडिवारु । शंखु वाजवी अभिमन्यु वीरु । सत्प्रेत्नेंवीण इतरु । योगु तो कायी ॥ ३३ ॥ येणें प्रकारें सत्संगु । आणि जाला वासनात्यागु । गुरुभजनीं अभंगु । हर्षु तोही ॥ ३४ ॥ विहिता कार्याचें अनुष्ठान । योगीं कर्तव्याकर्तव्यज्ञान । वरि सत्प्रेत्नुसाधन । संपादत असतां ॥ ३५ ॥ अनुभवाचे स्पंद उमटती । त्या त्या उजळाविया उक्ति । तरिचि वाढे स्वानुभूति । स्थितीचां ठायीं ॥ ३६ ॥ यालागीं द्रुपदीचे नंदन । शंख वाजविती पांचही जण । तयांचेनि नादें नंदन । योगियां होये ॥ ३७ ॥ सर्वत्र सर्वदा असंगपण । साक्षित्वें स्फुरे ज्ञान ।

ते नित्य अलिप्तता वादन । प्रतिविंध्यु करी ॥ ३८ ॥ प्रपंचाभावदर्शन । नामरूपनिराकरण । योगबळें शंखस्फुरण । श्रुतसोमा करी ॥ ३९ ॥ योगाचिये निष्ठेवीण । नाहीं प्रपंचाभावदर्शन । ह्मणौनि योगाधारें खूण । दुसरी अनुभवाची ॥ १२४० ॥ स्ववृत्ति स्वस्वाकारें । स्वानुसंधान जें स्फुरे । तेंचि नित्य चतुरें । वाढविलें पाहिजे ॥ ४१ ॥ ह्मणौनि तिया वृत्ती । श्रुतकीर्ति करी स्फूर्ति । शतानीकु वाजवी युक्ति । तो शंखु कैसा ॥ ४२ ॥ स्वरूपीं उपरमु वृत्तिलयो । निर्विकल्पु आत्मा आश्रयो । ऐसा बोधुक्षयो । तयातें नसावा ॥ ४३ ॥ स्फुरलिये वृत्तीसि अखंडता । श्रुतसेनु होये वाजविता । यापरी अनुभवाची प्रकटता । ते हे शंख ॥ ४४ ॥ ऐसे ज्ञानविज्ञानपुरस्कारें । स्पंद होती आतु बाहिरे । तो नादु तेणें अंबरें । साठेंचिना ॥ ४५ ॥ अंबर तेंचि जे चिदाकाश । तयाची कैसी भाष । जाणताचि जे पामरांस । गोचर नव्हे ॥ ४६ ॥ स्वप्नीं देखिजे प्रपंचभाव । ज्ञातृत्व ज्ञेय आणि ज्ञान । तया भावांत गगन । स्थान होय ॥ ४७ ॥ नाना भान तया आपन । भानसहित तें गगन । तयाचें जें मनस्थान । तेंचि खरें ॥ ४८ ॥ मनाचें जें निरतरपण । तेथे तत्त्वतया भासे गगन । मग तें गगनीं भान । तिये त्रिपुटीचें ॥ ४९ ॥ आतां तें गगन ते त्रिपुटी । भासे मनचि मना पोटीं । निरंतरी अंतर दृष्टीं । पडे ते माया ॥ १२५० ॥ दर्पणीं पदार्थ प्रतिबिंबिले । तेवीं ते आकाशीं भासले । परि दर्पणाभावीं पाहिले । सापडतीचिना ॥ ५१ ॥ दर्पणाभावें प्रतिबिंबितां । आकाशा नाहीं सत्ता । यापरी पूर्णापोटी रिक्तता । माया ते ते ॥ ५२ ॥ आता अवस्थाचां पोटीं । जें भान जे जे त्रिपुटीं । तें मायेमाजि उठी । ऐसें आभासे ॥ ५३ ॥ माया माया ते ' मा या ' । चैतन्यचि सत्यत्व सर्वां तयां । आपणचि आत्मा भावा जया । स्वरूपस्थान ॥ ५४ ॥ स्वरूपाभाव अन्यथा भान । येथिंची त्रिपुटी ही भिन्न । येकें आत्मचैतन्येंवीण । नसे काही ॥ ५५ ॥ जे जे अवस्थे आत्माऽभाव । आणि द्रष्टृत्वें जे जे आत्मभाव । आणि ज्ञानज्ञेयादि भाव । विविध जे कां ॥ ५६ ॥ ते आत्मचिन्मयतेचांचि पोटीं । आत्मचिन्मयताचि तैसी उठी । आत्मचिन्मयत्वें दृष्टी । पडे आत्मया ॥५७॥ आतां जागृति दिसे गगन । दिसे त्रिपुटीचें भान । तया सर्वांचें स्थान । आत्मचिन्मयता ॥ ५८ ॥ आत्मचिन्मयतेचां पोटीं । कार्य कारण सर्व उठी । चैतन्याभाव गमे दृष्टी । तो तयाचिमाजी ॥ ५९ ॥ ऐसें चिन्मय तें चिदाकाश । तयाचां पूर्णत्वीं हे आकाश । प्रतिबिंबित वोस । ऐसें जें दिसे ॥ १२६० ॥ जयामाजी सर्व भान । तें चिन्मय चिन्मयें गगन । जयाचेनि अभावें भान । त्रिपुटी न भासे ॥ ६१ ॥ शून्यापोटीं भान भासे । हें जाणतां न बोले ऐसे । तरि शून्यचि शून्य काहीं असे । तेथें अशून्य ॥ ६२ ॥ मुखु प्रतिबिंबे दर्पणीं । गगन भासे नयनीं । तेंचि वाव मानूनि । पूर्ण जाणावें ॥ ६३ ॥ तैसें जें चैतन्यघन । तेंचि चिन्मय गगन । शंखनादातें स्थान । लयोद्भवा स्थिति ॥ ६४ ॥ ऐसे शंख ऐसा नादु । ऐसा चिदाकाशीं तो शब्दु । अवघा होऊनि येकविधु । तन्मयत्वें भरला ॥ ६५ ॥ कौरवांचीं वाजतीं तुरें । बर्हिमुखेंचि तीं समग्रें । बाह्यकाशीं अपारें । करिती घोषु ॥ ६६ ॥ मनबुद्धिइंद्रियस्पंद । गुणांचे वेग विविध । ते बाह्याकाशीं शब्द । उमटों येती ॥ ६७ ॥ आतां हें बाह्य गगन । आणि चराचरादि दिसे भान । हें चिदाकाशीं अकिंचन । असत्य सर्व ॥ ६८ ॥ यापरी असत्य स्पंद उमटती । ते सत्यामाजी अभावती । स्वतंत्र तेणेसीं गमती । ऐसें न घडे ॥ ६९ ॥ स्वप्नीं जाला मंत्रघोषु । जागृतीं आइके जैं पुरुषु । तरिचि कौरवांचा वाद्यघोषु । ये घोषीं कळे ॥१२७०॥ यापरी आच्छादूनि तया । घोषा कौरवदळींचिया । शंखनादु कौरवां तयां । काय करिता जाला ॥ ७१ ॥ अभिमानु जो दुर्योधनु । तयाचा काढे प्राणु । शंखनादु गहनु । चित्स्पंदु आइकतां ॥ ७२ ॥ रजोगुणाचां देहीं ।

अनुरंजिजे तो भाव नाहीं । भयें हृदयें दों ठायीं । होऊंचि लागलीं ॥७३॥ तमोगुणाचे प्राण । करूं अपेक्षिती प्रयाण । कामाक्रोधातें दारुण । विघ्न जाणवलें ॥ ७४ ॥ मद सांडी आशा । मत्सरु सुटला आवेशा । यया दंभादिकांचा घसा । वाळोनि गेला ॥७५॥ प्रापंचिक बहुसाल । वीर पडिले विकल । जयाचें तया स्थूल । शरीर न सांभाळे ॥ ७६ ॥ पारमार्थिकां पांडवां । देखोनि सुटले गर्वा । ते प्रांपचिक प्रौढ भावा । कौरव कैसे ॥ ७७ ॥ पुढें होतां नाहीं धिवसा । निर्गमाची तुटली आशा । तयां-वेगळा यां बव्हंशा । ठावाचि नाथी ॥ ७८ ॥ मागें मुरडोनि जाणें । ना आवेशें पुढें होणें । धाकें मध्येंचि प्राणु देणें । ऐसे जालें ॥ ७९ ॥ पांडवीं केलें शंखस्फुरण । तेणें भयंकर दिसे रण । तें कुरु-क्षेत्र कीं कवण । ऐसे न कळे ॥ १२८० ॥ नादें तेणें काये केलें । कौरवहृदय विदारिलें । अभिमानादिकां उपजविलें । भय आत्मधर्मकाचें ॥ ८१ ॥ भय उपजवूनि मानसीं । प्रतिध्वनि जाली कैसी । तेंचि आतां निर्धारेंसीं । सांगिजेल ॥ ८२ ॥ निःशब्द निर्विकल्प स्फुरण । तेंचि सशब्द सविकल्प होऊन । जालें चराचरीं संपूर्ण । नादरूप ॥ ८३ ॥ येथें उठावया प्रतिध्वनि । काये कारण मानावें मनीं । तरि संसारु कपाट ह्मणोनि । प्रतिनादु उमटला ॥ ८४ ॥ परा पश्यंती मध्यमा वैखरी । येका नादाचे प्रतिनाद च्यारी । देहचतुष्टयांचां तळघरीं । प्रतिनादु जाला ॥ ८५ ॥ ना कीं अध्यासु वन अपार । गुणांचे पर्वत थोर । तेथें नादें प्रतिनाद अपार । उठिते जाले ॥ ८६ ॥ यापरी शुद्ध स्फुरण तो नादु । तेचि शबळ तो प्रतिनादु । तया अनंतधा भेदु । शबळा स्फुरणांचा ॥ ८७ ॥ ऐसें तें शंख-स्फुरण । नादें कौरव विसंचून । प्रतिनादें भिन्न भिन्न । होऊनि मदभेदें ॥ ८८ ॥ ध्वनिरूप राहिले अंबरीं । अंबर दुमदुमिलें नादु करी । आतां चिदाकाशीं सर्वत्रीं । तो शब्दु स्फुरिला ॥ ८९ ॥ नादें व्यापिलें चिदंबर । नादें व्यापिलें त्रिपुर । नादें व्यापिलें चराचर । कार्यकारण ॥ १२९० ॥ ऐसा नादु तो चिद्बोधु । चिद्रूपीं जाला प्रसिद्धु । तो जेथिंचा तेथें शब्दु । सामावला जैसातैसाचि ॥ ९१ ॥ मग कितुलेनि एके व्यवधानें । तो नादु गिळिला गगनें । कौरव ह्मणती प्राणें । वांचलों आतां ॥९२॥ रण सांडूनि पळावें । तंव रक्षिलें भीष्मदेवें । कौरवसैन्य अघवें । तें कवणें प्रकारें ॥ ९३ ॥ भीष्मु तमोगुण तें अज्ञान । तेणें कवळिलें अभिमान । तयातें पडलें विस्मरण । भवदुःखदर्शनीं ॥ ९४ ॥ पांडव कैसें आपण कवण । कैसें भविष्य कैसें वर्तमान । हें अवघेंचि विसरोन । नवे जाले ॥ ९५ ॥ आत्मा ज्ञानें पोषला । तें अहंकारु मदें स्पर्शिला । यावरि करूं लागला । तेचि शोध सर्व ॥ ९६ ॥ विसरोनि अवस्था पूर्वींची । कौरव सामुग्री युद्धाची । करूं प्रवर्तले अज्ञानाची । ऐसी करणी ॥ ९७ ॥

## दासोपंत—"गीतार्थबोधचंद्रिका"

सकळां धनुर्वाडियांचा मेरु । काशिराजु महावीरु । तैसाचि शिखंडी अपरु । महारथी ॥ १२ ॥ धृष्टद्युम्न विराटु । सात्यकी योद्धा धीटु । अपराजितु सुभटु । पांडवामाजिया ॥ १३ ॥ तैसाचि द्रुपदु जाण । आणि सर्वेही द्रौपदीचे नंदन । अपार भुजांची आंगवण । ऐसा सौभद्र ॥ १४ ॥ संजयो बोले पुढती । आइके राया पृथिवीपती । ऐसे वेगळाले किती । सांगणें रायें ॥ १५ ॥ समग्रही पांडवसैन्यीं । राजे आपुलाले शंख घेऊनी । एकदांचि तये क्षणीं । जाले वाजविते ॥१६॥ मग तो नादु एकवटला । अनिवडु दुमदुमितु भरला । मर्यादा सांडूनि जाला । महाथोरु ॥ १७ ॥ मग तो झगटला व्योमातें । पावला सातांही स्वर्गांतें । सप्तपाताळांसी धरणींतें । जाला संघटता ॥ १८ ॥ मग तीं चौदाही भुवनें । प्रतिनादवूनि नादें तेणें । महाथोरु होऊनि तेणें । काय केलें ॥ १९ ॥ मग कौरवांचां हृदयीं । तो

नादु संचरला देहीं । पाठीं संचरोनियां काई । करिता जाला ॥ १२० ॥ हृदयस्था धैर्यातें नाशिलें । युद्धधर्मातें ग्रासिलें । भयचि अपार भरिलें । तये ठायीं ॥ २१ ॥ नव्हे तो सहसा शांतु । नाशिलीचि हृदयें नाशितु । पुरवूं पाहे अंतु । धार्तराष्ट्रांचा ॥ २२ ॥

## वामनपंडित—"यथार्थदीपिका"

काशीचा क्षितिपति । धनुष्य थोर ज्याचे हाती । आणि ज्या शिखंडी ह्मणती । महारथ त्यासही ॥१९॥ धृष्टद्युम्न विराट सात्यकी । जो जिंकिला न जाय या लोकी । शंख इत्यादि अनेकीं । वाजविले ॥२२०॥ द्रुपद आणि द्रौपदीसुत । अभिमन्यु वीर अत्यद्भुत । आणिक वीर जे बहुत । सकळीं शंख वाजविले ॥ २१ ॥ शंखांचीं नावें संजय । सागतां धृतराष्ट्र मानी भय । घोष वर्णितांही निश्चित जय । तेंचि सूचवी यावरी ॥ २२ ॥ धृतराष्ट्रा तुझे सुत । जे धार्तराष्ट्र एक शत । त्यांचें हृदय निश्चित । विदारिलें त्या घोषें ॥ २३ ॥ पृथिवी आणि आकाश । तुमुलनादें निरवकाश । गर्जवूनि करी प्रवेश । हृदयीं तुझ्या पुत्रांच्या ॥ २४ ॥

## अच्युताश्रम—"बालबोधिनी"

काशिराज महाधनुर्वाडा । शिखंडी महारथी गाढा । धृष्टद्युम्न आणि विराट निजगडा । सात्यकी पांचवा ॥ ५१ ॥ द्रुपद आणि द्रौपदीपुत्र । पृथिवीपति धृतराष्ट्र । सुभद्रापुत्र महावीरां- । -मध्यें श्रेष्ठ ॥ ५२ ॥ हे सर्वही महावीर । शंख वाजवित जाले अपार । पृथ्वीसी आश्चर्यकर । त्यांचा घोषु ॥ ५३ ॥ तो शंखाचा घोष थोरला । समस्तां कौरवां ऐकला । त्यांची हृदयें विदारिता जाला । तें सांगेन ॥ ५४ ॥ आकाश आणि भूतळें । प्रतिध्वनीनें दुमदुमिलें । त्यानें कौरव वचकले । ह्मणती पुरे नव्हे ॥ ५५ ॥

## निवृत्तिदेव

काशिराजा महाधनुर्वाडा । शिखंडी महारथी गाढा । धृष्टद्युम्न विराट प्रचंड । सात्यकी पांचवा ॥१७॥ द्रुपद आणि द्रौपदीचे कुमर । सौभद्राचा महाथोर । पृथ्वीपति राजे अपार । शंख वाजविती पृथकत्वें ॥१८॥ तेणें घोषें काय जालें । कौरवांचें हृदय विदारिलें । पृथ्वी आकाश भरलें । तेणें महानादें ॥१९॥

## उद्धवचिद्धन

सवाई:— काशिपती अणि वीर महारथि नाम शिखंडि जयासि पहा ।
धृष्टद्युम्नहि शंखाचि वाजवि गाजवि तो रणश्वास[1] महा ॥
राव विराट विराटक[2] वाजवि कर्कश तो परसैन्यदहा[3] ।
हो अपराजित वाजवि सात्यकि शंखरवाकुल होत अहा ॥ १७ ॥
द्रौपद आदिकरोनि धरापति वाजविती निज शंख मुखें ।
द्रौपदिचे सुत पाच महाबळि ते स्फुरिती निज शंख सुखें ॥
तो अभिमन्यु महाभुज वाजवि शंख बळें बहुता हरिखें[4] ।

१ रणनाद. २ हे शंखाचें नांव असावें. ३ शत्रुसैन्यांत दाह उत्पन्न करणारा. ४ आनं

घोष महा रणकर्कश वाजत शंख पहा पृथकें पृथकें ॥ १८ ॥
भेरि सयानक शंख भयानक हो भयदायक घोष असा ।
नाद सणाणित मेरु दणाणित तो रण मानित दाहि दिशा ॥
फारचि तुंबळ होत धरातळ तो नभमंडळ यापरिसा ।
तो हृदयासि विदारुनि कौरव मानितसे मनिं योग कसा ॥ १९ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

काशिराज चापधर्ता घोर । आणि शिखंडी [१]महा-रहिंवर । धृष्टद्युम्न तथा विराटवीर । सात्यकी दुर्धर अपराजित ॥ ४३ ॥ द्रुपद आणि द्रौपदीनंदन । अन्य पृथ्वीचे कर्ते पालन । सौभद्रनामें अभिमन्यु । ज्याचे जाण लंबित बाहु ॥ ४४ ॥ ऐसे हे नामाथिले नायक । आपले शंख पृथक पृथक । वाजविते झाले आत्यंतिक । घोषें लोक [२]हडबडिले ॥ ४५ ॥ कौरवसेनेचा लोपून ध्वनी । नाद फांकला अत्यंत गगनीं । प्रळयकाल गमला अवनीं । कोण्हासी कोण्ही न सांभाळीं ॥ ४६ ॥ मही कांपिन्नली अत्यंत । जीवलोक जे कां भयभीत । ते ठायींच्या ठायीं जाले मूर्च्छित । [३]उपमेतीत ऐकोनि घोष ॥ ४७ ॥ तो घोष थोर अप्रमेय । धार्तराष्ट्रवीरांचें हृदय । विदारिता न समाय । भेदूं पाहे भूगोल नभ ॥ ४८ ॥ नभ आणि भूमंडळ । दुमदुमिलें घोषें प्रबळ । प्रतिध्वनी उमटिला तुंबळ । हलकल्लोळ प्राणिमात्रा ॥४९॥

## रत्नाकर—" रत्नाकरी. "

काशिराज धनुर्धर जाण । शिखंडी महारथिमान । धृष्टद्युम्न विराट आदिकरून । सात्यकी आपण अपराजिता ॥ ३८ ॥ द्रुपद आणि द्रौपदीचे सुत । सर्वही पृथ्वीपति विख्यात । सौभद्र महाबाहो बहुत । शंख वाजवित पृथक पृथक ॥ ३९ ॥ त्या नादें धार्तराष्ट्राचे पाहे । हृदयाचें विदारण होये । नाद पृथ्वीनभामाजी न समाये । तेणें जाये धैर्य सर्वांचें ॥ ४० ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

शार्दूलविक्रीडितः— काशीराज विराट सात्यकि महावीरांत जो अग्रणी ।
धृष्टद्युम्न महाबळी दळवई तैसा शिखंडी गणी ॥
सौभद्र द्रुपदाख्य जे [४]द्रुपदजागर्भी नृपा जन्मले ।
त्या सर्वी निजशंख अद्भुत बळें प्रत्येक [५]अध्मोपिले ॥ २१ ॥ ( १७-१८ )
इंद्रवज्राः— तूझ्या सुतांच्या हृदयासि राया । तो जाहला शब्द जणों चिराया ॥
आकाश भूभाग नृपा अशेष । व्यापूनि ठेला अतिपुष्ट घोष ॥ २२ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

काशिराज धनुर्धर । शिखंडी महारथी वीर । धृष्टद्युम्न विराट थोर । सात्यकि अपराजित ॥ १७ ॥ द्रुपद आणि द्रौपदीसुत । सुभद्रापुत्र विख्यात । हेहीं मिळोनि समस्त । वेगळाले शंख वाजविले ॥१८॥ तया नादाचेनि गजरें । दुमदुमिलीं पाताळशिखरें । दुर्योधनासि दुःखानळभरें । हृदय फुटे खेदानें ॥१९॥

१ महारथी. २ घाबरून गेले. ३ निरुपम, कल्पनेबाहेर. ४ द्रौपदीच्या पोटीं. ५ वाजविले.

## तुकाराम--( पांडुरंगदास )

अभंगः-

धनुर्धर महाकाश्य । राजे ज्याशीं सर्व वश्य ॥
तैसा भीष्मप्राणहारी । शिखंडीची केवढी थोरी ॥
धृष्टद्युम्न उत्तरपिता[1] । सात्यकि तो अपराजिता ॥
तुका पुढें विनवितो । ऐका व्यास ज्या वाणितो ॥ १५ ॥
जनक द्रौपदीचा ऐका । ज्याच्या नामें यमा धोका ॥
पांचीं पांडवांचीं मुलें । माजी अभिमन्यु दादुलें[2] ॥
अन्यत्रही देशपति । मिळूनि जळज वाजविती ॥
आपुलाले पृथकाकारें । तुका ह्मणे एकसरें ॥ १६ ॥
घोष तो धार्तराष्ट्रांचें । करी छेदन धैर्याचें ॥
विदारित वक्षस्थळा । दिली सर्वांशीं अवकळा[3] ॥
गगन आणी भूमि । झालीं नादेंकरुनी श्रमी ॥
तुका ह्मणे सैन्य थोवी । महातुंबळ गर्जवी ॥ १७ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्:- धनुर्धर महाकाश्य शिखंडीहि महारथी । अजिंक्य सात्यकी वीर धृष्टद्युम्न विराटही ॥३१॥
द्रुपद द्रौपदीपुत्र अभिमन्यु महाभुज । शंख वाजविले यांहीं आपुलाले पृथक् पृथक् ॥३२॥
तो घोष धार्तराष्ट्रांच्या हृदयांतें विदारुनी । आकाश आणि भूमीतें महातुंबळ गर्जवी ॥३३॥

## मोरोपंत

आर्याः-

काश्यें शिखंडिनेंही त्या केला द्रुपदराज शूरानें ।
सात्यकि वीरें आणिक धृष्टद्युम्नें विराट वीरानें ॥ १७ ॥
द्रुपदें अभिमन्यूनें पृथक् पृथक् द्रौपदीज तनुजांनीं ।
वाजवुनी शंखांतें भरिलीं दाही दिगंतरें ज्यांनीं ॥ १८ ॥
त्या धार्तराष्ट्रचित्तीं लावुन तो घोष तीव्र धाकाशीं[4] ।
झाला तुंबळ ध्वनि हा भरिला पृथ्वींत आणि आकाशीं ॥ १९ ॥

: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :

नृप काश्य महाधन्वी आणि शिखंडी महारथ प्रबळ ।
धृष्टद्युम्न विराटहि अपराजित सात्यकी सखा हरिचा ॥ ३५ ॥
द्रुपद द्रौपद्यात्मज अभिमन्यु महाभुज प्रतापानें ।
वाजविते झाले हे पृथक् पृथक् आपुलालिया शंखा ॥ ३६ ॥

---

१ विराट. २ श्रेष्ठ. ३ भीति, धास्ती. ४ धाकाला, भीतीला.

तो घोष क्षणमात्रें विदारुनी धार्तराष्ट्रहृदयांतें ।
आकाशातें क्षितितें बहु तुंबळ गर्जवी प्रतिध्वनि तो ॥ ३७ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

धृतराष्ट्र गा यानंतर । काश्यप जो का धनुर्धर । शिखंडी महारथी थोर । आणि धृष्टद्युम्न विराट ॥१७॥ द्रुपद आणि सात्यकी । सुभद्रेचा पुत्र विवेकी । द्रौपदीचे पुत्र सर्व नृप कीं । येहीं शंख वाजविले ॥ १८ ॥ तो जो शंखांचा ध्वनी । होता जाला पृथ्वि आकाश व्यापुनी । दुर्योधनादिकांच्या मनीं । त्रासु करिता जाला ॥ १९ ॥

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।
प्रवृत्ते शस्त्रसम्पाते धनुरुद्यम्य पाण्डवः ॥ २० ॥
हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।
अर्जुन उवाचः— सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥
यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥
योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

**अर्थः**—**नंतर कौरव व्यवस्थेनें उभे आहेत हें पाहून शस्त्रप्रहार होण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतां ज्याच्या ध्वजावर मारुतिरायाचें चिन्ह आहे असा पंडूचा पुत्र म्हणजे अर्जुन धनुष्य वर उचलून, हे राजा, श्रीकृष्णाला हें वाक्य बोलला. " हे अच्युता, माझा रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं नेऊन उभा कर. तेवढ्यांत युद्धाची इच्छा असलेल्या व समोर राहिलेल्या या लोकांचें मी अवलोकन करितों. या रणसंग्रामांत मी कोणाबरोबर युद्ध करावें हें आणि दुर्बुद्धि दुर्योधनाचें कल्याण करण्याच्या इच्छेनें जे येथें लढणारे जमले आहेत ते सर्व मी पाहतों.**

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी )"

तेथ बळें प्रौढीपुरते । महारथी वीर होते । तिहीं पुनरपि दळातें । आवरिलें ॥ ६४ ॥ मग सरिसेपणें

१ सारख्या तयारीनें.

उठावले । दुणवैटोन उचलले । तया दंडीं[2] क्षोभलें । लोकत्रय ॥ ६५ ॥ तेथ बाणवरी धनुर्धर । वर्षताती निरंतर । जैसे प्रळयांत जलधर । अनिवार कां ॥ ६६ ॥ ते देखलिया अर्जुनें । संतोष घेऊनि मनें । मग संभ्रमें दिठी[3] सेने । घालीतसे ॥ ६७ ॥ तंव संग्रामीं सज्ज जाहले । सकळ कौरव देखिले । तंव लीलाधनुष्य उचलिलें । पंडुकुमरें ॥ ६८ ॥ ते वेळीं अर्जुन ह्मणतसे देवा । आतां झडकरी रथु पेलावा । नेऊनि मध्यें घालावा । दोहां दळां ॥ ६९ ॥ जंव मी नावेक । हे सकळ वीर सैनिक । न्याहाळीन अशेखें । झुंजते जे ॥ १७० ॥ येथ आले असती आघवे । परी कवणेसीं म्यां झुंजावें । हें रणीं लागे पहावें । ह्मणऊनियां ॥७१॥ बहुतकरूनि कौरव । हे आतुर दुःस्वभाव । वांटिवेवीणें हांव । बांधिती झुंजीं ॥ ७२ ॥ झुंजाची आवडी धरिती । परी संग्रामीं धीर नव्हती । हे सांगोनि रायाप्रती । काय बोले ॥ ७३ ॥

## सोपानदेव—"सोपानदेवी"

यानंतरें सिद्ध जाले कौरवभार । ते अवसरीं कपिध्वजवीर । देखोनि शत्रूंचा पडिभार । धनुष्य उचलिता जाला ॥२०॥ अगा राया भूपति । ऐसें अर्जुन बोलिला केशवाप्रति । दोहीं सैन्यांमाजी निरुति । माझा रथु ठेविजे ॥२१॥ जोपर्यंत पाहीन ऐसें । युद्धकामीं राहिले कोण कैसे । युद्ध करूं कवणासरिसें । या रणामाजी ॥ २२ ॥ हा दुर्बुद्धि कौरवपति । याचें इष्ट जे इच्छुनि आले असती । तयांमाजी योद्धा मजप्रति । कोण तो पाहीन मी ॥ २३ ॥

## माधव नारायणदास—"नारायणकीर्ति"

पांडवशंखघोषें विकळ भाव । तो सोडोनि सावध होती कौरव । मग अपंगूनि आपुली वाटिव । शस्त्रें वर्षत होते पैं ॥ ३३ ॥ एवं युद्धालागीं व्यवस्थित । शस्त्रसंपातीं प्रवृत्त । ऐसे धृतराष्ट्राचे सुत । देखिले तेणें अर्जुनें ॥ ३४ ॥ यानंतर तो कपिध्वज पांडव । अंगिकारी वीरश्रियेची टेव । सज्ज करूनियां वास्तव । टणत्कारी धनुष्यातें ॥ ३५ ॥ मग तेणें काळें हृषीकेशाप्रती । वाक्य बोलता जाला तो सुमती । संजय ह्मणे गा महीपती । आइक राया धृतराष्ट्रा ॥ ३६ ॥ अगा स्वामी आईक अच्युता । अश्व प्रेरूनि ये प्रसंगीं आतां । दोहीं सैन्यांमाझारीं निरुता । स्वामी ने माझा रथ वेगीं ॥ ३७ ॥ देखोनि शत्रूंचा युद्ध-कुरुवाळा । मज स्थिर न राहवे घननीळा । यालागीं रथ चालवी वहिला । न करी विलंब सहसा ॥३८॥ युद्धां आले असती समस्त । ये रणभूमीचे ठायीं अवस्थित । ते मी देखें जंववरी सावचित्त । तेथवरी रथ नेईं बापा ॥ ३९ ॥ यातें पाहों किमर्थ इच्छिसी । ऐसे कदाचित जरी ह्मणसी । तरी मी युद्ध करावें कोणासीं । या रणभूमीचे ठायीं ॥ १४० ॥ मजसी योग्य होतां संग्रामीं । तो-आपुला डोळां पाहेन मी । यालागीं तूतें विनवितों स्वामी । ते मज दिसत ऐसें करी ॥ ४१ ॥ दुर्योधन दुर्बुद्धिमंत । त्यासी जय व्हावा हें मनोगत । धरोनि आले असती येथ । आमसी युद्ध करावया ॥ ४२ ॥ ते हे योत्स्यमान विनयें अवसरी । अवलोकीं ऐसे करी । दुर्जनांचे हित जे अंतरीं । ते काय पावती कल्याण ॥ ४३ ॥

---

१ दुप्पट आवेशानें. २ सैन्याच्या योगानें. ३ दृष्टि. ४ न्यावा. ५ क्षणभर. ६ संपूर्ण. ७ पराक्रमादिवाय.

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

प्रथम भयभीत होऊनियां वीर । एक ते पळोनि गेले सत्वर । एक मूर्छित पडले अधीर । प्रळय थोर ऐसा जाला ॥ ५६ ॥ मागुते जे जे वीर धीर सैनिक । [1]तेहीं धैर्य सांवरिले वीर सकळिक । सर्वही होऊनियां एकमुख । युद्धोन्मुख राहिले ॥ ५७ ॥ मग नाना बाण धनुर्धर । वर्षते जाले शस्त्रसंभार । जैसे प्रळयकाळींचे महाजलधर । वर्षती नीर मुसळधारीं ॥५८॥ ऐसा शस्त्रसंपात होत असतां । धृतराष्ट्राचे सेनानी वरवाळेले देखतां । हर्ष न माये तया पांडुसुता । जाला घेता धनुष्य हातीं ॥ ५९ ॥ हनुमंत रणरंगधीर वीरु । साक्षात श्रीशंकराचा अवतारु । तो ध्वजीं राहोनि पार्थासि अनुग्रह थोरु । करी ह्मणोनि साचार कपिध्वजु ॥४६०॥ एवं सर्वथा सर्वप्रकारें तो भयशून्य । शस्त्रसंपात दृष्टी देखोनि अर्जुन । गांडीव उचलिलें लीळेंचिकरून । मग काय वचन बोलतु ॥६१॥ सर्वेंद्रियांचा प्रवर्तकु जाण । सर्वांतःकरणवृत्तींचा ज्ञाता संपूर्ण । ऐसिया श्रीकृष्णाप्रति बोले वचन । तेंचि वक्ष्यमाण जाणावें ॥६२ ॥ अहो नीति धर्म सर्वत्र विचारूनी । इंद्रियप्रवर्तकासि बोले वचनीं । ययालागीं पार्थु हा कुशल त्रिभुवनीं । जाण मनीं महीपति ॥६३॥ ' महीपते ' हें रायाचें संबोधन । करावया इतुकेंचि कारण । तुवां अविचारें परराज्य अभिलाषोन । अधर्म जाण थोर केला ॥६४॥ ऐसिया धर्माच्या अभावास्तव । तुज जय नाहींच गा स्वयमेव । ऐसी सूचना दाखवूनि कथागौरव । बोले भाव तो परियेसा ॥६५॥ तेंचि अर्जुनाचें वाक्य कृष्णाप्रती । कैसें तेंही सांगों श्लोकसंगती । तेचि एकाग्र परिसावें संतीं । धर्म अति जयामाजी ॥६६॥ तंव अर्जुन ह्मणे जी अविनाशमूर्ति । अच्युता अनंता जी पुण्यकीर्ति । श्यामसुंदरा कृष्णा केवळ[3]शक्ति । माझी विनंती परियेसीं ॥ ६७ ॥ स्वपक्ष प्रतिपक्ष दोहीं माझारी । सन्निहित दोन्ही सैन्यांभीतरीं । माझा रथ नेऊनियां झडकरी । स्थापी श्रीहरी स्थिर करूनी ॥ ६८ ॥ अहो अर्जुनाचें हें आश्चर्य थोर । आपण नियोज्य भक्त किंकर । आणि सर्वात्मा श्रीकृष्ण सर्वेश्वर । सांगे कार्यांतर ऐसें यासी ॥ ६९ ॥ अहो हें भक्तांसि अशक्य सर्वोपरी । जो भक्ताधीन जाला असे श्रीहरी । तोचि आपुलें भक्ताधीनत्व प्रकट करी । अपूर्व परी येथ काय ॥ ४७० ॥ माता सुंदर समर्थ थोर जरी जाली । तऱ्ही ते बाळकाअधीन होऊन ठेली । स्तनपानादिक बळेंचि बोढिली । तऱ्ही उगली तदधीन होय ॥ ७१ ॥ भक्तांसि युक्तायुक्त कांहीं न कळोन । आवडे तें करविती देवाकरवून । ह्मणोनि अर्जुनाची आज्ञा पाळी जाण । तरी जय पूर्ण अर्जुनासी ॥ ७२ ॥ अहो जो योगियांचें समाधिधन । यया त्रैलोक्याचें करी जो पाळण । तो होऊनि ठेला पार्थाधीन । भाग्य कोण भक्ताचें त्या ॥ ७३ ॥ ना भगवंत जरी कदाचित ऐसें ह्मणती । जे मी रथ नेता दोन्ही सैन्याच्या प्रांतीं । तरी बहु शत्रु हे रथ उडवूनिचि टाकिती । तरी ऐसें श्रीपती ह्मणों नको ॥ ७४ ॥ याचिलागीं मी तुझें संबोधन । हे अच्युत ऐसें करितसें संपूर्ण । जे देशकालवस्तूंहींकरून । नाहीं प्रच्यवन जयासी ॥ ७५ ॥ देशें काळें वस्तूकरूनिही । तू अच्युत अक्षयी अनपायी । तुज च्यवि[6]वी ऐसा नाहीं लोकीं तिहीं । येथ हें कायी मशकतुल्य ॥ ७६ ॥ येणें सर्वदा निर्विकार ह्मणोन । म्यां भक्तें कार्य सांगतां नव्हे कोपायमान । हें अच्युतपदें केलें संपूर्ण सूचन । जाणा खूण जाणते हो ॥ ७७ ॥ अहो विकारी जें गुणवंत असे । तें गुणानुसार विकार पावे सर्वांशें । भगवंत गुणनियंता निर्विकार असे । क्षोभ नसे भक्तकार्यीं ॥ ७८ ॥ आतां मध्यें रथस्थापनाचें प्रयोजन । तेंही श्रीकृष्णाप्रति सांगे अर्जुन । तेंचि श्रोतां परिसावें सावधान ।

१ त्यांनीं. २ सरसावलें. ३ ज्ञानस्वरूपी. ४ निमूटपणें. ५ पतन. ६ ढळवी.

शयालागून संजय सांगे ॥ ७९ ॥ तंव अर्जुन ह्मणे जी श्रीहरी । रथु ठेवावा दोही सैन्यामाझारी । तेथ भीष्मद्रोणादिकां सर्वां प्रकारीं । अवलोकन करीं कोण कैसे ॥ ४८० ॥ जों किंचित्कालपर्यंत मी यांतें अवलोकिन । जे युद्धकामार्थ मिनले कोण कोण । हे संधि करावया आले नाहींत जाण । निर्भय ह्मणोन उभे असती ॥ ८१ ॥ ना तूं ऐसें ह्मणसी जी हृषीकेशी । जें तूं योद्धा परीक्षक नव्हसी । काय तूं ययांतें पाहोनि करिसी । युद्ध सर्वांशीं करीं पार्था ॥ ८२ ॥ तरी पारियेसीं जी भवगजकेसरी । यया रणसमुद्रमा भीतरीं । बंधुवर्गचि युद्धोद्योग करिती भारी । मी कोणेपरी युद्ध करूं ॥ ८३ ॥ मजसमान योद्धे कोण असती । आणि येथें कोण कोण मिनले आहाती । ऐसें कौतुक पहावया लक्ष्मीपती । रथ मध्यांतीं ठेवावा कीं ॥ ८४ ॥ ना तूं ऐसें ह्मणसी कमलनयना । बंधुवर्गचि मिनले दोन्ही सैन्यां । हे संधिचि करिती युद्धप्रयोजना । तूं कां अर्जुना सज्ज होसी ॥ ८५ ॥ तरि आइका जी श्रीकृष्णनाथा । यांची सांगेन तुह्मां दुर्जनता । मन मानेल तुमचिया चित्ता । तेचि अनंता आतां करीं ॥ ८६ ॥ तरी हे जे कीं भीष्मद्रोणादिक । युद्धार्थ मिनले आहाती सकळिक । दुर्योधनासि प्रिय करावया देख । युद्धीं संतोष उपजवूं पाहती ॥ ८७ ॥ आणि हा धृतराष्ट्राचा नंदनु । दुष्टबुद्धि खळ हा दुर्योधनु । आपल्या रक्षणोपायाचा प्रयत्नु । अति अज्ञानी दुरभिमानी ॥ ८८ ॥ दुर्योधनासि ये युद्धींच सुख देती । परी दौर्जन्यादि दोष न निवारिती । ते हे युद्धालागीं उभे असती । तयांतें श्रीपती पाहें डोळां ॥ ८९ ॥ ते संधिकाम नव्हती जी सर्वथा । युद्धार्थचि आले असती अनंता । यालागीं आपणायोग्य पहावें तत्वतां । हे विरासि उचिता मिळेचि कीं ॥ ४९० ॥ जऱ्ही अर्जुनें प्रेरिला भगवंतु । तऱ्ही तो सैन्यांत नेईना रथु । हे हिंसा करूं नये ह्मणोनि अनंतु । बोधील पार्थु अहिंसाधर्म ॥ ९१ ॥ ऐसा धृतराष्ट्राचा अभिप्राय । जाणोनि तो निराकरावया संजय । हांसोनि बोलिला साभिप्राय । तेंचि प्रमेय पारियेसा ॥ ९२ ॥

## रमावल्लभदास—"चमत्कारी" टीका

परी धीर धरूनि अमित । कौरव राहिले व्यवस्थित । शस्त्रें वर्षूं लागले शितें । कपिध्वज हें पहातसें ॥ ६९ ॥ घे घे शब्द बहाताति । बाण सणसण येताति । तंव गांडीव उचलूनि हातीं । अर्जुन ह्मणे श्रीकृष्णा ॥ ७० ॥ हृषीक नाम इंद्रियगण । यांसी पूर्ण चाळक तूं श्रीकृष्ण । कौरवीं ठाकिलें रणांगण । उन्मत्त मनीं होऊनि ॥ ७१ ॥ तरी आतां माझ्या सखया । या सैन्यांमाजी उभया । रथा स्थापीं गा माझिया । सांवळिया श्रीकृष्णा ॥ ७२ ॥ जोंवरी मी हे सर्व भूपति । जे युद्धकामीं उभे असती । पाहीन तंव तूं श्रीपति । निश्चळ होऊनि रहावें ॥ ७३ ॥ कोण माझ्या बळासमान । कोणासी धनुर्विद्येचा अभिमान । कोण कैसे धरूनि स्थान । राहिले असती ते पाहूं ॥ ७४ ॥ मजसी रणरंगामाझारीं । रणउद्यम करावया इच्छा भारी । परी कोणासी झुंजों मुरारी । हें बरवें पहातों मी ॥ ७५ ॥ संग्रामासी अति उदितें । आले ते ते पाहीन निश्चित । धृतराष्ट्रपुत्र कुश्चित । बुद्धि त्यांची काय सांगों ॥ ७६ ॥ जाहले संग्रामास सन्मुख । न्यायानीतीस विन्मुख । काय पावतील पुढें सुख । हें मजला कळेना ॥७७॥ दुर्बुद्धि कैसी कौरवांची । तरी तुज ठावीच आहे तयांची । आह्मां लाखौजोहरीं तेव्हांचि । मारावेंसें केलें होतें ॥ ७८ ॥ होतें विष दिधलें भीमासी । उपरी कपटफांसे करूनि सर्वांसी । जिंतिले मग

१ तीक्ष्ण. २ तयार. ३ लाक्षागृहाच्या अग्नींत.

वस्त्रहरणासी । करिते झाले द्रौपदीच्या ॥ ७९ ॥ ती लाज तुवां राखिली । सखया वस्त्रें पुरविलीं । वनीं वसतांही रचिलीं । नाना अरिष्टें दुर्जनीं ॥ ८० ॥ दुर्वास छळावयासी आला । तो तुझें लाघवें घाला । नाहीं वनवास बाधकु झाला । तुजकारितां आह्मांसी ॥ ८१ ॥ नैष्टचर्यही[१] मग क्रमिलें । शिष्टाईस तुज पाठविलें । विचार नेघोनि तूंतें धिक्कारिले । हेचि मोठी दुर्बुद्धि त्यांची ॥ ८२ ॥ आतां युद्धाची प्रीति करूनि । आले आहेति बळ धरूनि । असो सैन्य पाहों दृष्टिभरूनि । संग्रामा योग्य कोणकोण ॥ ८३ ॥

## दासोपंत—' गीतार्णव '

[ अथ ] इतुलें वर्तलें असतां । कौरवसैन्य सरसावता । मग तयानंतरें तत्वतां । कैसें घडलें ॥९८॥ [ कपिध्वजः पांडवः ] हनुमंतध्वजु अर्जुनु । क्षत्रियांमाजी त्रिनयनु । नित्यस्थिति सावधानु । शुद्धात्मा जो ॥ ९९ ॥ [ धार्तराष्ट्रान् व्यवस्थितान् दृष्ट्वा ] राया धृतराष्ट्राचे कुमर । आणि तयांचे वीर संमग्र । संग्रामविषयीं प्रेत्नपर[२] । देखोनियां ॥१३००॥ अज्ञानपूर्वक बोधु । तेणें अहंकारु तो बहुविधु । कार्यी प्रवर्तला उच्छेदु । करूं पाहे योगाचा ॥ १ ॥ अभिमानाचें जें करणें । तें आत्मलोपाचिकारणें । कौरव प्रकार येणें । सरसावले ॥ २ ॥ [ प्रवृत्ते शस्त्रसंपाते ] येक परजिती हातियेरां । येक निरपैती[३] खड्गधारा । येक धनुष्यां येकसरा । लाविती बाणु ॥ ३ ॥ मग बाणांचे संपात । आणि शस्त्रांचा आघात । प्रवर्तले असता तेथ । कौरव कैसे ॥ ४ ॥ आपुलालिया प्रवृत्ती । अभिमाना प्रवर्तती । योगाचा विनाशु अपेक्षिती । ऐसें देखोनि ॥ ५ ॥ [ धनुरुद्यम्य ] राया पांडूचा नंदनु । चढवूनि धनुष्याचा गुणु । गांडीव तें उचलूनु । घेऊनियां ॥ ६ ॥ अवलीळाचि उभा ठाला । परसैन्य पाहों लागला । आत्मशुद्धत्वें जाला । साक्षी गुणांचा ॥ ७ (२०) ॥ [ हे महीपते ] संजयो बोले महीपाळा । राया धृतराष्ट्रा सुशीला । पाहोनि तया कौरवदळा । अर्जुन तो ॥ ८ ॥ [ तदा ] तेणें काळें कायी । करिता जाला जाणयी । तेंचि मातु आइकयी । जरि जाणों अपेक्षिसी ॥ ९ ॥ [ हृषीकेशं वाक्यमाह ] सकळइंद्रियनियंता । सर्वज्ञु सर्वकर्ता । गोपीनाथपासीं होता । अर्जुन तयाप्रति ॥१३१०॥ बोलता जाला वचन । अहो जी कृष्णा ह्मणौन । आतां तें वाक्य कवण । हें जें ह्मणसी ॥ ११ ॥ [ इदम् ] तरि आतां तुजकारणें । सांगिजैल अर्जुनाचें बोलणें । राया धृतराष्ट्रा जाणे । तें ऐसें हे वचन ॥ १२ ॥ ॥ [ हे अच्युत ] अर्जुन जाला विनविता । तो ह्मणे ' जी अच्युता । आदिनारायणा अनंता । अवधारीं विनवणी ॥ १३ ॥ [ सेनयोरुभयोर्मध्ये मे रथं स्थापय ] या दोहीं सैन्यामाझारी । माझा हा रथ स्थिरु करीं । विलंबु ये अर्थी न करीं । वासुदेवा ॥ १४ ॥ मागें साडूनि आमुचें । दळ पुढें कौरवांचें । मध्यें अंतर दोहींचें । ऐसें हें स्थान ॥१५॥ तेथें हा रथु स्थिरु करणें ' । हें जें अर्जुनाचें बोलणें । येथींचें कारण तें कवणें । साहित्यें जाणावें ॥ १६ ॥ शुद्ध आत्मा जो अर्जुनु । प्रकृतिगुण विलक्षणु । आपुला ठायीं आपणु । स्थिति असतां ॥ १७ ॥ आत्मधर्म आत्मयोगें । आत्मत्वविलयें ज्ञानाआंगें । अहंदुर्योधनादिक अवघे । व्यक्त न भासतीचि ॥ १८ ॥ आत्मदृष्टी आत्मइतरु । कैसा भासेल अहंकारु । दीपें पाहतां अंधकारु । सांपडेना ॥ १९ ॥ आत्मधर्में अन्य धर्म । ना विषयो होती अधर्म । आतां तें याचें क्रूर कर्म । जाणवे कैसें ॥ १३२० ॥ शुद्धें आपुलेन आत्मयोगें । निष्ठाचि जोडे प्रसंगें । परंतु गुणादिकांचें अवघें । भान

१ तुझ्यामुळें. २ अज्ञातवास. ३ प्रयत्न करणारे. ४ धार लावतात.

नानुभवे ॥ २१ ॥ आत्मत्वाचा जेथ हर्षु । तेथ तिया दृष्टी परप्रकाशु । नाहीं परंतु गुणध्वंसु । तोचि स्फुरे ॥ २२ ॥ आत्मान्वयबोधें तेणें । द्वैत कैसें पाहणें । यालागीं अर्जुन नेणें । स्ववृत्ती कौरवांसि ॥ २३ ॥ शुद्धात्मा अर्जुनु ह्मणे ' कृष्णा । सद्गुरु ईश्वरा सर्वज्ञा । यया कौरवांची सेना । ते मातें न दिसे ॥ २४ ॥ माझेन शुद्धत्वें मी नेणें । आतां बंधूंचेनि सन्निधानें । यया कौरवांतें जाणणें । हें जैं ह्मणों ॥ २५ ॥ तरि ते आत्मइतरां ज्ञान । उपच्छेदकचि श्रीकृष्णाकारण । न होती कौरवज्ञान । अभिमानादिक जे ॥ २६ ॥ आतां कौरवांचें रूप नाम । लक्षण गुण कर्म वर्म । हें आमुचें पां लोकां परम । पुसावें जैं ॥ २७ ॥ तैं तयांचां आंगीं भाव स्वपर । ते परभावा प्रकाशाकर । तयाचें काये उत्तर । मानावें म्यां ॥ २८ ॥ धर्माधर्मज्ञु युयुधानु । तो परधर्मुचि नेणे आपणु । आणि पराचा प्रकाशी गुणु । तो तैसा नव्हे ॥ २९ ॥ विराटें केली सांडणी । तो विहित कर्मयोगू निर्वाणीं । स्वगुणेंचि परगुण जाणोनि । जाणु जाला ॥ १३३० ॥ तेणें अधर्मु काये जाणावा । परधर्मु कोठें पहावा । संसारु दूरि पडावा । हेंचि चिंती ॥ ३१ ॥ भक्तियोगा द्रुपदातें । कौरव न कळती निरुतें । तो आपुलेनिचि मतें । असे निरंतरु ॥ ३२ ॥ अभ्यासयोगु धृष्टकेतु । तो तयां दूरि दूरि नांदतु । सर्वथा नेणे सांगातु । रजतमादिकांचा ॥ ३३ ॥ चेकिताना काये पुसणें । सर्वही सांडिलें जेणें । वैराग्यदृष्टी तो नेणे । यया कौरवां ॥ ३४ ॥ काशिराजु तो सत्संगु । कौरवांचा नेणे मार्गु । दूरि वैरी बहिरंगु । कौरवनाथु तया ॥ ३५ ॥ पैला पुरुजिता निष्कामातें । कामाचें ज्ञानचि न वर्ते । आणि निष्कामता तेथें । पुसणें ना सांगणें ॥ ३६ ॥ कुंतिभोजा अक्रोधा । कौरव ना ढळती कदा । तयांचा मार्गुचि सर्वदा । नाश्रयी जो ॥ ३७ ॥ शैब्यें अदंभें दंभातें । जाणिजतें तयातें । ज्ञान तेंचि न वर्ते । आपुलां ठायीं ॥ ३८ ॥ अदंभा न कळे अहंकारु । कपटिया कौरवांचा विचारु । ययाचां आंगीं अपारु । दंभु ह्मणौनियां ॥ ३९ ॥ धर्माधर्मविपर्या ज्ञान । तया न कळे धर्माधर्मज्ञान । रात्रि जाणावया दिनमान । नये काजा ॥ १३४० ॥ विहिताकरणशीळांतें । विहित नेणें निजमतें । येक विरुद्ध येकांतें । ह्मणौनियां ॥४१॥ अभक्तधर्मु न कळे भक्ता । कौरव जाणावे कैसे आतां । तयांची नेणती वार्ता । आमुचे लोक ॥४२॥ अयोगयुक्तांची लूण । योगु तंव तेणें आपण । साधनाप्रति असाधन । विपयो नव्हे ॥ ४३ ॥ अविरक्त कौरव सकळ । वैराग्य नेणें तयांचें मूळ । येकमेकातें केवळ । वोळखतीचि ना ॥ ४४ ॥ असत्संगाचे स्वभाव । सत्संगु नेणें ते सर्व । जाणावे आह्मी कौरव । प्रकारें कवणें ॥ ४५ ॥ सकाम कौरव वैरी । निष्कामु जाणे कैसियापरी । अक्रोधा क्रोधसामग्री । जाणतां नये ॥४६॥ दंभयुक्त ते भर्वसेन । अदंभा कैंचें त्यांचें ज्ञान । सांगतील तें अज्ञान । ज्ञानचि नव्हे ॥ ४७ ॥ आस्थाशून्याचे सर्व । नेणें आस्था मनोभाव । यापरी अप्रकट कौरव । ते मारावे कैसे ॥ ४८ ॥ अस्वास्थेचें जें जाळें । ते स्वास्थें न होती आपुले । तयाचें मान न कळे । ज्ञान करिता ॥४९॥ असत्प्रेत्न हे सकळही । सत्प्रेत्ना पुसावे कायी । सौभद्रु नेणे कांहीं । कौरवा तया ॥ १३५० ॥ विविक्तबोधा अविविक्तता । न पडे दृष्टी पाहतां । तेणें प्रतिविंध्यु अविभक्तां । कौरवांतें ॥ ५१ ॥ श्रुतसोमा द्वैताभाव । तो तेणें द्वैतसद्भाव । कौरवांचा नांदता भाव । प्रपंचु जो ॥ ५२ ॥ श्रुतकीर्ति स्ववृत्तिविकाशु । आतां कौरवां परवृत्तिप्रकाशु । तयांचा तेणें आभासु । कैसा जाणावा ॥ ५३ ॥ शतानीकु स्वरूपो परमु । आह्मांहूनि तो उत्तमु । अविद्यागुणांचा धर्मु । तया तो नेणें ॥ ५४ ॥ भेदभारी कौरव । श्रुतसेनु अन्वयोभाव । तेणें ते स्वमेव । कैसे जाणावे ॥ ५५ ॥ अवघेचि येकत्र मीनले । परि कामु कैसा ययां न कळे । क्रोधु सांगती तैं भले । मानीन मी ॥ ५६ ॥ मदाची कैसी संज्ञा । ते येकातेंही कळेना । मत्सरु आला आंगवणां । अवघेचि न

वोळखती ॥५७॥ दंभुचि जाणितला पुरे । प्रपंचु नेणती निर्धारें । रजतमभाव साचोकारें । जाणतीचिना ॥ ५८ ॥ अभिमानु जाणती सामग्री । नाहीं समस्तां शरीरीं । हे बहुसाल दूरि । कौरवांतें ॥ ५९ ॥ ययाचेनि सन्निधानें । दुर्योधनादिकां मी नेणें । दूरि पडले अति मानें । संगास्तव ॥ १३६० ॥ यया संगें ययांपासीं । मिळोनि असतां परियसीं । वासुदेवा आह्मांसि । कौरवज्ञान नव्हे ॥ ६१ ॥ भूमिकाही युद्धाची न कळे । जालों श्रीकृष्णा आंधळे । कौरवरूपा न मिळे । माझी दृष्टि ॥ ६२ ॥ आतां नेणतां कौरवांतें । मारूं कैसें कवणें मतें । ह्मणौनि कौरव आमुतें । कळावेचि ते ॥६३॥ जागृतीं वैरी जाला । तो स्वप्नीं न वचे मारिला । सुषुप्ती विसरीं पडिला । तें मागणें नव्हे ॥ ६४ ॥ समस्तां अवस्थांचां ठायीं । हे वैर साधिती कांहीं कांहीं । शुद्धही आपुलां गेहीं । कळों येती ॥ ६५ ॥ तेथ कळती तयांचे आघात । परंतु न कळे स्वरूप निश्चित । यालागीं मारितां तेथ । फावतीचिना ॥ ६६ ॥ अहं दुर्योधनादिक अघवे । म्यां हे दृष्टी पाहावे । वर्म जाणोनि मारावे । महावैरी ॥ ६७ ॥ जयाची वोळखि तेंचि नाहीं । आतां मारावें तया तेणें कायी । ह्मणौनियां डोळां दोहीं । पाहीन कौरव ॥६८॥ पाहणेंचि पडिलें जीवा । तरि स्वजनसंगु हा सांडावा । यालागीं रथु काढावा । सैन्यामाजूनि ॥ ६९ ॥ कौरव पाहावयाकारणें । तयांचिमाजी रिघणें । आपुलया सैन्या भेटणें । हें पुढती न घडे ॥ १३७० ॥ दुष्टांचां पडो न हातीं । मग तीं आत्मा न सोडती । आत्मा सत्वत्वें मारिती । सर्व सेना ॥७१॥ भवु दुर्गम बंधशाळा । येथें वासना कर्मशृंखळा । घालूनि रक्षिती गोपाळा । तरि तैसें नको ॥७२॥ आपुलें सैन्य सांडावे । आणि ययांमाजी न रिघावे । दोहींतें जाणत रहावे । मध्यप्रदेशीं ॥७३॥ तुरीये ऐसी टेंकुली । रथु नेइजे तियेजवळी । मग उंचूनि सर्व मी न्याहाळीं । ऐसें करणें ॥७४॥ ज्यांचेनि संगें जे देखावे । तेही संगमातें लावावें । परंतु निवडतां फावे बरवें । ऐसें असावें ॥७५॥ श्रीकृष्णनाथा अवधारीं । कौरव मी देखें बरवियापरी । विनविलें ऐसें करावें श्रीहरी । ह्मणौनि '॥७६॥ ऐसें बोलणें आइकोनि । कृष्णु विचारी अंतःकरणीं । हें खोटें चिन्ह ह्मणोनि । पुनः पुनः ॥७७॥ रजतमादिकांचेनि संगें । अहंकारा झोंबैल हा आंगें । मग दुर्योधनादिक अवघे । माझे ह्मणैल ॥ ७८ ॥ गुणसंगेविण नेणें तयां । आतां गुणसंगु शुद्धा यया । शोका ममते मोहा तया । कारण होईल ॥ ७९ ॥ स्वजन येणें सांडिलें । मग तें नव्हें आपुलें । जें कीरु मागें पाडिलें । तें पुढें नये ॥ १३८० ॥ स्वजनांची असंगती । परजनांची होईल संगती । मग आपुला आपणु पुढती । नव्हैल हा ॥ ८१ ॥ भ्रमु पहावया भुलणें । तेणें भुलोनिचि तेथ जाणें । पाहोन ऐसेंही नेणे । तेंचि होये ॥ ८२ ॥ निद्रे देखिला वैरी । जागणें सांडूनि तया मारी । तो स्वप्नीं अज्ञानसागरीं । मारणेंचि विसरे ॥ ८३ ॥ तैसा स्वसंगु सांडील । तयांची दृष्टि पडैल । हा हीं रूपें अवलोकील । ऐसें असतां ॥ ८४ ॥ दृष्टीदृष्टीचां येकपणीं । सुटैल शुद्धत्वापासूनि । रजतमें मोहितु होऊनि । होईल तयांचा ॥ ८५ ॥ ममता उपजैल येकात्मत्वें । मग काये करावें शत्रुत्वें । पोटीं घाव घातकत्वें । घातला नवचे ॥ ८६ ॥ आतां येणें ते न देखावे । ऐसें कीजेल बरवें । परंतु वैरी ते मारावे । नेणतां कैसे ॥ ८७ ॥ अंधें सांडावा अमार्गु । कैसा छेदावा भुजंगु । करावा पाठिलागु । वैरियां केवीं ॥ ८८ ॥ नपुंसकें ब्रह्मचर्य घ्येलें । वागेंद्रिय मुकें जिंकिलें । वृक्षें ध्यान धरिलें । तें ध्यान काये ॥ ८९ ॥ जो जया गुणातें नेणें । तो छेदिला गुणु तेणें । ऐसें जाणतया न मने । आणि घडेही ना ॥ १३९० ॥ ह्मणौनि येणें ते जाणावे । जाणोनि वैरी मानावें । मानूनि समूळ मारावे । तरीचि बरें ॥ ९१ ॥ आतां दावणें कीं न दावणें । रथु नेणें कीं न नेणें । करणें कीं न करणें । गुणसंगीं हा ॥ ९२ ॥ ऐसें विचारूनि मानसीं । श्रीकृष्णु नियंता मायेसि । तो

न विहुतु प्रकृतिगुणासि । चाल ह्मणे ॥ ९३ ॥ गारुडी विद्येचेनि बळें । सर्पु लावी मग तत्काळें । कार्य करुंकरूनि आपुलें । उतरी तया ॥ ९४ ॥ अमृतकरें कां विद्दावें । पाहिजे तें पोटींचें मारावें । वर्म आहे ठावें । उठवावयाचें जया ॥ ९५ ॥ ऐसा करूनि विचारु । कृष्णें केला अंगीकारु । तंव पुढति धनुर्धरु । बोलता जाला ॥ ९६ ( २१ ) ॥ [ योद्धुकामानवस्थितान् ] अर्जुन ह्मणे जी कृष्णा । युद्धाची जयांतें कामना । संग्रामु करणें मना । हेंचि माजी जया ॥ ९७ ॥ कौरवमुख्य-करूनि । येऊनि राहिले जे रणीं । बाण लाविले गुणीं । करिती युद्धसामग्री ॥९८॥ [ अहमेतान्या-वन्निरीक्षे ] आता ययांतें जंव मी पाहें । तरि माझा रथु तेथे राहे । ऐसें करावें यादवरायें । श्रीकृष्णें तुवां ॥ ९९ ॥ पहावया कवण कारण । ऐसें बोलाल वचन । तरि तेंचि आतां येथून । बोलिजेल ॥ १४०० ॥ [ अस्मिन्रणसमुद्यमे ] इये रणभूमीचा ठायीं । प्रेत्नेवंत संग्रामविषयीं । ययांमाजी आइकयीं । गोपिनाथ ॥ १ ॥ [ कैः सह मया योद्धव्यम् ] कवणासीं म्यां युद्ध करणें । आधीं कवणा पाचारणें । धुरेचिवरि घाये घालणें । ऐसे पाहिजे ॥ २ ॥ जेणेंसीं संग्रामु करितां । जया तोही न ये मिरवितां । ऐसिया दुर्बला अशक्ता । पाचारूनि काये ॥ ३ ॥ जेणेंसीं करितां संग्रामु । हारि आली घडला श्रमु । तो सांगतां उत्तमु । सांगोंही ये ॥४॥ ऐसेनि येकेसीं भिडावें । ना तरि धनुष्य कासया धरावें । अपुरुषार्थिया हाणावें । तें धिग् जिणें ॥ ५ ॥ आनही येकु श्रीकृष्णा । धूरचि ये जेथ रणा । तेथ न जिंकतां येरि सेना । जिकिली होये ॥ ६ ॥ उगेंचि समस्तीं पळावें । तें छायेनेंचि पाठीं लागावें । ऐसें होईल स्वभावें । धूर सांपडता ॥ ७ ॥ ह्मणोनि माझया रथातें । तुवां नेईजे पां तेथें । पाहतां फावे कौरवांतें । जेथूनियां ॥ ८ ॥ कौरव काये हे नवे । अवघे असतीचि ठावे । ना आतां दृष्टीं पाहावे । ऐसें ह्मणाल ॥ ९ ॥ तरि अवधारा जी गोपिनाथा । पाहणें नाहीं कौरवां समस्तां । वाढलों येकयेकां देखतां । हे ठावेचि असती ॥ १४१० ॥ परंतु येथ येक पाहणें । घेतलें माझेन अंतःकरणें । तेंचि लागैल सांगणें । देवा पुढां ॥ ११ ( २२ ) ॥ [ दुर्बुद्धेर्धार्तराष्ट्रस्य ] दुष्ट दुर्मति दुराचारी । जन्मला धृतराष्ट्राच्यां उदरीं । परतला कुळाचिवरि । दुर्योधनु हा ॥ १२ ॥ पापियां-माजी अग्रिकु[1] । धर्मद्रोही तुझा निंदकु । स्वपरहितनाशकु । ऐसिया ययातें ॥ १३ ॥ [ प्रियचि-कीर्षवः ] प्रिय करूनि वर्तती । आणि ययातेंही प्रिय होती । प्रीती परस्परां प्राणु देती । येकयेकां ॥ १४ ॥ [ अत्र युद्धे ] मग दुर्योधनाचेनि जाणा । लोभें आपुलाली सेना । घेऊनि येथे श्रीकृष्णा । ययें युद्धीं ॥ १५ ॥ [ य एते समागताः ] जे आले असती रायगणे । आह्मांसीं युद्धाकारणें । आच्छादलीं जेहीं रणें । भूमिका न दिसे ॥ १६ ॥ अवधिये पृथ्वीचे भूपाळ । अवघे येकवटले सबळ । महाप्रतापिये निर्मळ । युद्धकर्ते ॥ १७ ॥ [ योत्स्यमानान् ] ऐसे जुंझार बरवे । राजे जे कीं परावे । ह्मणती जे युद्ध करावे । समस्तां तयांतें ॥ १८ ॥ [ अवेक्षेऽहम् ] निवांडें[2] मी पाहीन । मजसीं जुंझार ते कवण । इतुलेंचि अपेक्षी मन । पासाव तुह्मां ॥ १९ ॥ एवं कौरव-दळींचे वीर । दुर्योधनातें प्रियकर । परावे राजे अपार । शूर जे जे ॥ १४२० ॥ आले असती यया रणा । पाहीन तया समस्तां जाणा । इतुलेंचि मागणें तुह्मां । कृष्णा गोकुळपति ॥ २१ ॥ जंव मी पाहें तयांतें । तंव रथसहिता मातें । नेऊनि दावूनि समस्तांतें । सर्वेचि आणा ' ॥ २२ ॥ ऐसें अर्जुनाचें बोलणें । विचारु नारायणें । घेतलें परमार्थें जेणें । तें साहित्य कैसें ॥ २३ ॥ अनात्मकां नाहीं सत्ता । ययांत पाहीं अपेक्षितां । आत्मा आपुली आत्मसत्ता । ती चालों उपावें ॥ २४ ॥ आत्म-

१ अग्रणी, मुख्य. २ शांतपणानें.

लोपाचेनि आंगें । येकदेशी ते आपणु जागे । ते स्वरूपीं दृश्य अवघे । देखें स्वसत्तया ॥ २५ ॥ जागृति सांडूनि निजैला । तो आपण यया गाहळला । स्वप्नाकारें उमटला । देखें दिसे ॥ २६ ॥ यापरी असताचें भान । पाविजे आत्मलेपेंकरून । तरि कृष्णु ह्मणे स्वस्थान । सांडावेंचि कीं ॥ २७ ॥ असतां नाहीं प्रकाशु । आणि जाणावा तयांचा भासु । तरि आपुला आपण चिद्विशेषु । आच्छादावा ॥ २८ ॥ आपुलें देखणें माल्हवूनि । स्वप्नीं मागुसें देखाणीं । करूनि देखावीं ह्मणौनि । हेंही तैसेंचि ॥ २९ ॥ स्वगुणसहित अधिष्ठान । तें दृष्टीमार्गें घालून । सैन्य जें स्वप्रकाशमान । हरी परप्रकाशा ॥ १४३० ॥ मग आपणावरिची काढावी । इतर भावीं आरोपावी । मग तेथें दिसे देखों दावी । आपुलीचि तया ॥ ३१ ॥ दृश्य दृश्याकारें भासे । देखणें तयाचें होऊनि वसे । द्रष्टा द्रष्टत्वें प्रकाशे । तो आत्मचिन्मात्रतया ॥ ३२ ॥ आपणां आपुलयां विसरणें । तरिचि कौरवां पाहणें । चांगचि हें मनें । घेतलें अर्जुनाचेनि ॥ ३३ ॥ स्वरूप स्वस्थान स्वदर्शन । सांडावेंचि लागैल येथून । ना तरि अहंदुर्योधनाचें ज्ञान । होईल कैसें ॥ ३४ ॥ आणि अहंदुर्योधन मित्र । अरि षड्वर्ग राजे अपार । योगसंग्रामातें समग्र । आले जे कां ॥ ३५ ॥ तयांमाजी कवण योद्धे । कवण वधती कवणाचेनि वधें । हें आधीं न बाधे । तंव संग्राम कायी ॥ ३६ ॥ कवणु कैसा जिंकावा । कवणु मुख्यु पाचारावा । कवणावरि न घालावा । आपण हातु ॥ ३७ ॥ कवणेसीं भिडतां कीर्ति । भिडतां कवणेसीं अकीर्ति । ऐसी जाणीव ते निरुती । वोज संग्रामाची ॥ ३८ ॥ न करितां घाव तमोगुणा । आपण आपुलिया अज्ञाना । संकल्पुचि आधीं आंगवणां । काये मारावा ॥ ३९ ॥ रजोगुणु तैसाचि देहीं । वरि विषयतोषु मारणें कायी । रजोगुण दडतां घाई । तो सहज पडैल ॥ १४४० ॥ कामु न वचतां मारिला । स्त्रीसंगुचि आधीं हाला । तो कवण उपयोगा आला । त्यागु तैसा ॥ ४१ ॥ क्रोधु असतां आंगेसीं । हांगिजे न्यासें आश्रमासि । वरि कामु बळिया तयासि । आक्रमूं न शकिजे ॥ ४२ ॥ तैसा संग्रामु ह्मणावा ना । सांगतांचि लाजिरवाणा ।ययालागीं अर्जुना । बरवें कळलें ॥ ४३ ॥ भोगु ठेवूनि संगु मारणें । दंभु ठेवूनि प्रपंचु सांडणें । मधु आगेसीं वरि हाणणें । असत्संगा ॥ ४४ ॥ मत्सरु लागला सत्संगा । आपणु लागे शोका मागां । तेणें वैरी तो जोगा । आपण नव्हे ॥ ४५ ॥ यापरी नेणोनि युद्ध करणें । श्रमचि तयाकारणें । बोलतां लाजिरवाणें । क्षत्रियाप्रति ॥ ४६ ॥ कामु जिंकावा निर्वासनें । क्रोधु जिंकावा सहनें । रजोगुणु ज्ञानें । ऐसी मर्यादा ॥ ४७ ॥ ऐसिये नीतीतें जाणतां । पार्थुचि काये तत्वता । ह्मणोनि अपेक्षी मागुता । क्षत्रीं पाहों ॥ ४८ ॥ समुदाव पाहिजे अवघा । तंवचि रथु तेथें ठेवावा । सर्वेचि काढूनि आणावा । ऐसा भाव ॥ ४९ ॥ तरी कौरव हे असद्गुण । बाधील तयांचें संनिधान । आत्मविषयीं मौन । पडैल तैं ॥ १४५० ॥ तैंचि आतांचि चिंता । रथु काढावा ह्मणे मागुता । इतुल्यावरी नेणता । कैसा अर्जुन ॥ ५१ ॥ संगें पडैल अज्ञान । तैसेंचि होईल तैं मन । परतोनि पाहवे हें ज्ञान । लोपु पावैल ॥ ५२ ॥ मग तैं चालेल काये । यालागीं आतांचि प्रार्थितु आहे । अर्जुन हा तैसा नोहे । जो परमार्थु सांडी ॥ ५३ ॥ अर्जुनाचा जैं मी सारथी । तैं याची गति माझां हातीं । मार्गाभार्ग ते मजप्रती । असती ठावेंचि ॥५४॥ तरि काय येक येणें न देखावे । कासया अर्जुना बिहावे । असो चढउतार ते अघवे । जाणे मी गुरु ॥ ५५ ॥ ययाची शुद्धता आच्छादीन । गुणांची दृष्टि लावीन । क्रूर कौरव असज्जन । दावावे या ॥ ५६ ॥ सांडूनि आपुलिया भूमिकेतें । आणि दृष्टि मार्गें स्वसैन्यातें । त्याचेंही ज्ञान ययातें । न पवतें करीन ॥५७॥ आत्मज्ञानें इतर ज्ञान । तैं करीन येथ प्रमाण । बाधिता संग दारुण । निवारीन तें ॥५८॥ ऐसें विचारूनि मानसीं । मनेंचि आश्वासी पार्थासि । बा रे वासना ही आपैसी । पुरवी आपुली ॥५९॥(२३)

## दासोपंत—“ गीतार्थबोधचंद्रिका ”

संजयो ह्मणे भारता । इतुलें हें वर्तलें असतां । ययापरी व्यवस्था । कैसी वर्तली ॥१२३॥ राया पांडुचा कुमरु । कपिध्वजु महावीरु । रणरंग महाधीरु । प्रतापिया ॥ २४ ॥ राया धृतराष्ट्रा तुझे कुमर । क्षत्रिय महावीर । पुढें चालिले भार । तयांचे देखोनि ॥२५॥ बाणांचे मेघ वोळले । मग ते वर्षोंहि लागले । एकांचे घाय पडिले । झेलिले एकीं ॥ २६ ॥ एकमेकांतें पाचारिती । शस्त्रें उगारूनि धांवती । घे घे मारि ह्मणती । राहे राहे ॥ २७ ॥ ऐसे शस्त्रांचे संपात । प्रवर्तले असतां तेथ । कौरव मांडले समस्त । पुढां देखोनि ॥ २८ ॥ अवलीळा धनुष्य उचलूनि । मग तें गुणातें आणूनि । वामा करीं घेऊनि । काय करितां जाला ॥ २९ ॥ तें मी सांगेन तुजप्रती । आइके राया पृथ्वीपती । संजयो ह्मणे वदंती । माझी अवधारी ॥ १३० ॥ तेणें काळें तो अर्जुनु । राया पांडुचा नंदनु । श्रीकृष्णाप्रती आपणु । बोलता जाला ॥ ३१ ॥ तें हें वचन अवधारी । राया अर्जुनाचे बरव यापरी । अर्जुनु ह्मणे ‘ श्रीहरी । देवदेवा ॥ ३२ ॥ अनंतगुणसंपूर्णा । अजा अजेशा नारायणा । अच्युता लक्ष्मीरमणा । अवधारी वचना ॥ ३३ ॥ दोन्हीं सैन्यांचां मध्यदेशीं । नेऊनि माझिया रथासी । तेथें स्थिरु करावा हे ऐसी । विनवणी जी ॥ ३४ ॥ कवणु काळ येथें राहणें । आणि राहोनि काये करणें । हें पुसिजेल नारायणें । तरि तें अवधारावें ॥ ३५ ॥ तरि युद्धाची धरूनि कामना । जे वीर आले या रणां । माझी ऐसी वासना । जे पाहणें तयांतें ॥ ३६ ॥ आतां मी जंव पाहे तयांतें । रणीं राहिलिया वीरांतें । तंव माझा रथु तेथें । स्थिरु करावा ॥ ३७ ॥ तुह्मी ह्मणाल हें कायी । आजि येक देखला नवलाई । पाहोनि काज नाहीं । वैरियांतें ॥ ३८ ॥ तरी रणव्यवसायु संग्रामु । ऐसा हा रणसमुद्यमु । आपुला आचारु विहीनु धर्मु । ययाचा ठायीं ॥ ३९ ॥ कवणांसीं म्यां युद्ध करणें । कवण वीर पाचारणें । दुर्बळावरि हातु न करणें । ऐसा भावो ॥ १४० ॥ आतां बोलिजेल देवें । कौरव काये हे नवे । मी जवळूनि दृष्टीं पहावें । ऐसी वासना ॥ ४१ ॥ तरि नाहीं पाहणें ययांतें । जाणतचि असो समग्रांतें । परंतु पाहिजे तें येथें । असे आनु ॥ ४२ ॥ दुर्बुद्धि जो दुर्योधनु । तो आपुला प्रिय मानूनु । याचिये प्रीतिलागूनु । ययाचे प्रिय ॥ ४३ ॥ जे हे येथ ययेसमयीं । आले पां युद्धाचां ठायीं । राजे पृथ्वीचे अवघेही । थोर थोर ॥ ४४ ॥ तयां झुंजारां महावीरां । दृष्टीं पाहीन समग्रां । मग पाचारूनि नामधारा । बाणु लावीन जी ’ ॥ ४५ ॥

## वामनपंडित—“ यथार्थदीपिका ”

संजय ह्मणे यानंतर । ते धृतराष्ट्राचे कुमार । धैर्य धरूनि पुन्हां सादर । उभे राहिले ॥ २५ ॥ शस्त्रें हाणों लागले । तों पांडवही सरसावले । हेही कांहीं हाणिते जाले । प्रवर्तला शस्त्रपात ॥ २६ ॥ प्रवर्ततां शस्त्रपात । गांडीव घेऊनि हातांत । काय करितां जाला पंडुसुत । संजय ह्मणे परिस तें ॥२७(२०)॥ तेव्हां हृषीकेशाप्रती । हें वाक्य वदे गा महीपती । कीं ‘ दों सेनेंत क्षिती । उभा करीं रथ तेथें ’ ॥ २८ ॥ हृषीकें ह्मणजे इंद्रियें । त्यांचा ईश जो चाळी स्वयें । कृष्ण ‘ हृषीकेश ’ या अन्वयें । त्यातें तेव्हां हें बोले ॥ २९ ॥ जो वदवी वागिंद्रिया[1] । अर्जुन वदे त्या अव्यया[2] । कीं ‘ अच्युता रथास या । उभा करीं दों सेनेंत ’ ॥२३०॥ एवं कृष्णाचि बोलवितो । संजय हा भाव सूचवितो । कीं एथून अर्जुन

१ वाचेला. २ ईश्वराप्रति.

तो । युद्ध न करीं ह्मणेल ॥ ३१ ॥ तेंही कृष्णाचि बोलवील । आणि जेव्हां कुरुसेना दावील । कृपा तोचि उपजवील । युद्ध न करीं ह्मणावया ॥ ३२ ॥ त्या प्रसंगें हे गीता । उपदेशूनि तत्त्वतां । त्याची अज्ञानयुक्त अहंता । विश्वरूपें[1] नाशील ॥ ३३ ॥ कीं कृष्ण सकळांचा हंता । आपणास कां हे अहंता । आत्मज्ञानें अकर्तृता । देणार आतां पार्थातें ॥ ३४ ॥ साध्य व्हावया राज्यपद । सारथ्यार्थ वंदिलें पद । परी हा देणार पैरंपद[2] । तें या उपदेशें देतसे ॥ ३५ ॥ शत्रु नाशावे कौरव । हे सारथ्यफलगौरव । परी हा अज्ञाननाशक देव । तें या उपदेशें नाशितों ॥ ३६ ॥ आत्मस्वरूप न कळणें । हें अज्ञान-आवरण । रज्जू न कळतां सर्पसत्यपण । तो विक्षेपें[3] जडभ्रांति ॥ ३७ ॥ अष्टमाध्यायीं मूलावरण । नाशील आणि जडभ्रांतिपण । नवमीं नाशील कैमलेक्षण[4] । या सारथ्यप्रसंगें ॥ ३८ ॥ हरावया तृषा मात्र । अमृत प्याला तृषार्त । तें अजरामर निश्चित । करी सहज गुण त्याचा ॥ ३९ ॥ पाकाकारणें नर । जरी पेटवी वैश्वानर[5] । तरी तो नाशीच सत्वर । शीत तम यां दोहींतें ॥२४०॥ कापावया तृण । परीस मानूनि सहज पाषाण । पाणी पाजितां विळा सुवर्ण । होय गुण हा परिसाचा ॥ ४१ ॥ ज्यांत जो महिमा पूर्ण । तो आपला दावीच गुण । आतां सारथि केला श्रीकृष्ण । तो केंवि महिमा न दावी ॥ ४२ ॥ प्रस्तुत गीता या मिसें । आह्मां दीनांच्या कृपारसें । प्रकट करूं पाहे ह्मणूनि ऐसें । हृषीकेश ह्मणे संजय ॥ ४३ ॥ ‘ हृषी ’ ‘ इंद्रियें ’ ह्मणावीं । त्यांचा ईश चाळक गोसांवी[6] । तो ‘ हृषीकेश ’ त्यातें बरवीं । हीं वचनें बोले अर्जुन ॥ ४४ ॥ संजय ह्मणे गा महीपति । ऐसा कृष्ण हृषीकपति । जो त्यास बोलवी त्याप्रति । हें वाक्य बोले अर्जुन ॥ ४५ ॥ कीं ‘ श्रीअच्युता स्वामी । या दों सैन्यांत जे भूमि । तेथें अजी अंतर्यामीं । उभा करीं रथ माझा ’ ॥ ४६ ॥ ‘ तेथें कोण काळवरी । रथ उभा करूं ’ ह्मणेल श्रीहरी । ह्मणूनि जो आशय अंतरीं । तो बोलतो अर्जुन ॥४७ (२१)॥ ‘ युद्धकामना मनीं । धरूनि उभे एथें येउनी । त्यांस जो मी पाहेन नयनीं । तोंवरी ॥ ४८ ॥ कीं या रणाच्या उद्यमीं । कोणकोणांशीं संग्रामीं । म्यां झगडावें जें हेंचि मी । पाहेन ’ ॥४९ (२२)॥ करावया युद्ध । भीष्मादि जे कुरुवृद्ध । इतर राजे तेही प्रसिद्ध । ठावके आहेत सर्वही ॥ २५० ॥ आतां ‘ पाहावें तें काय ’ । ऐसें ह्मणेल हा अव्यय । ह्मणोनि जो हृदयीं निश्चय । तो ह्मणे बोलों निजभाव ॥ ५१ ॥ कीं युद्ध करणें उचित । नव्हे यांशीं निश्चित । हें बोलों जातां चित्तांत । पुन्हा शंकला ॥ ५२ ॥ कृष्ण ह्मणेल जरी । ‘ तुज उचित न वाटे तरी । हे कां मिळाले समरीं । तुजशीं युद्ध करावया ’ ॥५३॥ तरी हे स्वयें नाहीं मिळाले । संकटेंकरूनि युद्धासि आले । स्वयें पाहतां भले । पाहेन ह्मणतो ॥ ५४ ॥ युद्ध करणार यांतें । पाहेन जे हे आले एथें । दुर्योधनाचें प्रिय इच्छिती चित्तें । जे या युद्धीं ॥ ५५ ॥ आतां ह्मणेल कीं ‘ हे भले । तरी यास कां न निषेधिते जाले ’ । ह्मणूनि अर्जुन बोले । कीं धार्तराष्ट्र दुर्बुद्धि ॥ ५६ ॥ हे तों निषेधिते जाले । निषेधितां नाहीं भ्याले । आतां अगत्यास आले । प्रिय इच्छूनि दुष्टबुद्धीचें ॥ ५७ ॥ परी यांस हें नव्हे प्रिय । हा भाव दावी धनंजय । हृदयामध्यें निश्चय । भीष्मवचनाचा ॥ ५८ ॥ भीष्म वदला धर्मास । कीं ‘ अर्थाचा पुरुष दास । बांधले दुर्योधनें आह्मांस । निजधनें ’ ॥ ५९ ॥ ॥ भीष्मोक्त श्लोक ॥ अर्थस्य पुरुषो दासो दासस्त्वर्थो न कस्यचित् । इति सत्यं महाराज बद्धोस्म्यर्थेन कौरवैः ॥ ॥ अर्जुन मनीं या श्लोका । स्मरूनि ह्मणे उत्तमश्लोका । दुर्बुद्धि दुर्योधना एका । युद्धापेक्षा न इतरांसि ॥ २६० ॥ संतापें ह्मणे

१ विश्वरूप दाखवून. २ मुक्ति. ३ विपरीत ज्ञान. ४ कमलनेत्र कृष्ण. ५ अग्नि. ६ इंद्रियांचा स्वामी.

अर्जुन । कीं दुष्टबुद्धि दुर्योधन । भाव कीं या प्रसंगें स्वजन । कैसें युद्धीं मारावे ॥ ६१ ॥ तथापि पाहों नयनीं । कीं देखतां काय वाटेल मनीं । ह्मणे कृष्णास ह्मणोनी । कीं या सकळांस पाहेन ॥ ६२ ॥ या दों श्लोकीं हा अर्थ । प्रकट भावार्थ यथार्थ । हा भाव काढिला व्यर्थ । पुनरुक्ति येथें बोलाची ॥ ६३ ॥ युद्धकामना मनीं । त्यांस मी पाहेन नयनीं । हें पूर्वश्लोकेंकरूनि । बोलिलाच कृष्णासि ॥ ६४ ॥ या युद्ध करणारांतें । पाहेन जे आले आहेत येथें । हे दुसऱ्या श्लोकें पार्थें । पुनरुक्ति कां हो वदावी ॥ ६५ ॥ यालागीं हाचि अर्थ । सिद्ध जाला समर्थ । हृषीकेशशब्दभावार्थ । जो पूर्वी एथें निरूपिला ॥ ६६ ॥ हे सकळ कृष्णकरणी । दया घातली अंतःकरणीं । ह्मणोनि पुन्हां हृषीकेशस्मरणी । वाणी योजी संजय ॥ ६७ ( २३ ) ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

याउपरि कौरव मिळाले । युद्धाकारणे उभा राहिले । तों कपिध्वजें पार्थें देखिलें । शस्त्रें पडतां ॥ ५६ ॥ मग धनुष्य घेतां जाला । घेवूनि कृष्णालागीं बोलिला । तें सांगेन मी वहिला । तें परिसा ॥ ५७ ॥ ' अगा हृषीकेशा अच्युता । दोहीं सेनेमाजी रथ आतां । ठेवी कौरवां समस्तां । मी पाहेन ॥ ५८ ॥ आतां एथें आशंका ऐसी । कायरे युद्ध पाहों आलासी । ऐसें जरी ह्मणसी हृषीकेशी । तेथें उत्तर ॥ ५९ ॥ ऐसें यांतें मी पाहों शके । युद्ध करूं आलें असकें । रणीं राहिले जे निकें । नाहीं तरी ॥ ६० ॥ कोणासि म्यां युद्ध करावें । ये रणसमुद्यमीं मी स्वभावें । ऐसें विचारुनि पाहावे श्रीकृष्णा जी ॥ ६१ ॥ युद्ध करी या वीरांतें । मी दृष्टीं पाहीन निरुतें । जे आले असती एथें । ते कैसे ॥ ६२ ॥ दुर्बद्धि दुर्योधनातें । युद्धीं बरवें करूं इच्छितें । याकारणें भगवंतें । रथू न्यावा ' ॥६३॥

## निवृत्तिदेव

ऐसी व्यवस्था कौरव देखोनि । कपिध्वजीं ह्मणिजे अर्जुनीं । बाण पडो लागले ह्मणऊनि । धनुष्य तुलिता जाला ॥ २० ॥ अर्जुन बोले ' हृषीकेशी । या दोन्ही दळांचां मध्यप्रदेशीं । उभे करावे मज रथेसीं । नेऊनि तेथे अच्युता ॥ २१ ॥ त्यांतें पाहीन बरवें । या रणाचां ठायीं स्वभावें । कोणासि म्यां युद्ध करावें । रणाचां ठायीं ॥ २२ ॥ ह्मणऊनि पाहिलें पाहिजे त्यांतें । धार्तराष्ट्राचे दुर्बुद्धि दुर्योधनादि ते । संग्रामु बरवे करूं इच्छिते । श्रीकृष्णा ॥ २३ ॥

## उद्धवचिद्घन

सवाईः–

युद्धव्यवस्थित पुत्र तुझे स्थिर पाहुनि कौरव सैनिक सारे ।
शस्त्रसयुक्त प्रयुक्त रणांगणिं हें अवलोकुनि दृष्टि उभारे ॥
अक्षयि गांडिव अक्षयि सारथि अक्षयि तो ध्वज मारुति धारे ।
घे उचलोनि करीं धनुबाणहि आइक बोलत अर्जुन सारे ॥ २० ॥
हे हृषिकेश विशेष विनंति तुलागुनि माझि अनन्यपणें ।
आहे तुला शरणागत केशव हे सखया शतशा नमनें ॥
सैन्यद्वया उभयामधि नेउनि स्यंदन सुस्थिर त्वां करणें ।
संजय सांगत ऐक कुरूपति अर्जुन बोलत सख्यपणें ॥ २१ ॥

युद्धविरुद्ध प्रबुद्ध समस्तहि आप्त मिळति जे भूप विदेशी ।
द्वेष धरोनि मनांत सुयोधन बंधुसमेत उभा रिपुवेशीं ॥
या इतुक्यांसह भांडुं कसा तरि संशय हा मनिं जी हृषिकेशी ।
ज्यांसि करूं नये युद्ध ते सन्मुख सिद्ध उभे रणिं होउनि द्वेषी ॥ २२ ॥
पाहिन सर्वचि आजि हरी मसिं जे करुं इच्छिति युद्ध सरी ।
या अठरा दिवसांत परी वद कोणहि तों उतरेल उरीं ॥
कौरव दुर्मद साह्य करी जय इच्छुनियां मनिं हर्षभरी ।
कोण कसे सहसैन्य तरी निज दृष्टिस पाहिन याहिवरी ॥ २३ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

उपरि संग्रामालागीं उदित । धार्तराष्ट्र जाले समस्त । ते देखिले कपिकेत । असे रथीं नित्य तया वीरें ॥ ५० ॥ तयांसी झुंज करावया भलें । निज धनुष्य जें कां आपुलें । तें पांडवें निजकरें उचलिलें । गुणीं सजिलें जें होतें ॥ ५१ ॥ मग हृषीकेशाप्रति । अर्जुन बोलिला येणें रीतीं । तें तूं परियेसी महीपति । संजय सुमति रायासि ह्मणे ॥ ५२ ॥ जो माझा रथ तूं श्रीकृष्णजी । उभय सेना मीनली झुंजी । त्यामध्यें उभा करी सहजीं । नेत्रपंकजीं पाहेन सर्वा ॥ ५३ ॥ हृषीकेशनामाचा भाव काये । ह्मणोनि श्रोत्यांचें कल्पित हृदये । तरि इंद्रियांचा जो ईश होये । इंद्रियसमुदाय वश ज्यासी ॥ ५४ ॥ ह्मणोनि हृषीकेश ह्मणिजेत । जयासि च्युति नाहीं निश्चित । यास्तव अच्युतनाम धरित । दोहींचा अर्थ येणें रीतीं ॥ ५५ ॥ ऐसिया नभाचा मेघसांवळा । अर्जुन स्यंदनीं विराजला । फांकती अळंकाराच्या कळा । कुंडलें मेखला मुकुटादिकीं ॥ ५६ ॥ कटकांगदें केयूरें सुंदर । कांसे कसिलासे पीतांबर । गळां रुळती रत्नहार । पदक भास्कर तयावरि ॥ ५७ ॥ दिव्य चंदनाची आंगीं उटी । सुमन माळा अनेक कंठीं । अंदू तोडराची चरणीं दाटी । कटितटीं क्षुद्र घंटा ॥ ५८ ॥ उपमेरहित रम्य वदन । मंदहास्ययुक्त सौख्यसदन । जो दुर्जनांचे कर्ता कंदन । पुत्र मदन पैं ज्याचा ॥ ५९ ॥ त्यासि पार्थ प्रथम उत्तर । बोलिला जं उभय सेनेंत स्थीर । करी माझा श्रीकृष्ण रहिंवर । पाहेन समग्र मी नेत्रीं ॥ ६० ॥ जोंवरि मी यांसि पाहेन । तोवरि स्थीर करी माझा स्यंदन । युद्धा आलेति कोण कोण । योग्य मजलागून कोण झुंजा ॥ ६१ ॥ जे जे मज संग्रामकर्ते । आले असती समोर पुर्ते । दुर्योधनाचे मानसधर्ते । प्रियकर्ते दुर्बुद्धीचे ॥ ६२ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

ऐसी अवस्था देखोनि नयनीं । धृतराष्ट्र कपिध्वज मिळोनि । नानाशस्त्रांतें करीं धरूनि । धनुष्यालागोनि चढविते जाले ॥ ४१ ॥ ऐसे जाणोनि पार्थ भावेकरून । भगवानाप्रति बोलिला जाण । दोन्हि सैन्यांमध्यें रथ नेऊन । स्वामी आपण ठेवावा ॥ ४२ ॥ कां जें मी सर्वांतें दृष्टि पाहेन । जे आले युद्धकामालागून । मजसिं युद्ध करावया ऐसा कोण । मजसमान त्यांच्या दळीं ॥ ४३ ॥ दुर्बुद्धि धार्तराष्ट्राचे पिष्ट इच्छोनि । आले ते मज योद्धे कामालागूनि । ते मी पाहेन आपुले नयनिं । जे उभे रणि महासुर ॥ ४४ ॥

१ युद्धासाठीं वांकडें—वैर मनांत वागवणारे. २ पृथ्वीवर.

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

वसंततिलका:— त्यानंतरें जर्थुनि कौरववीर राया । ठाले उभे सकळही [1]हिरिरी करोया ॥
देखोनिया कपिनिकेतन कौरवांतें । तो वाक्य काय वदला मग केशवातें ॥ २३ ॥

इंद्रवज्रा:— या दो दळांमाजि अगा अनंता । उभा करी मद्रथ शीघ्र आतां ॥
[3]प्रदीप जैसा गृहदेहलीचा । तैसा असो रोख तया रथाचा ॥ २४ ॥

उपेंद्रवज्रा:— झुंजावया वीर उभे रणीं हे । मी जोवरी स्वस्थ तयांसि पाहे ॥
कोणासवें संगर म्यां करावा । विचार हा ठीक मनीं पहावा ॥ २५ ॥
येथें मिळाले भट जे अपार । त्यांमाजि पाहो बहु झुंजणार ॥
दुर्बुद्धि दुर्योधन जो तयाचा । हितीं खरा भाव असे जयाचा ॥ २६ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

सिद्ध झाले दळभार । ते अवसरीं कपिध्वज वीर । देखोनि शस्त्रवैडिवार । धनुष्य घे हातीं वहिलें ॥ २० ॥ अगा राया भूपती । अर्जुन बोले अच्युताप्रती । दों सैन्यांत निगुतीं । रथ माझा नेइजे ॥ २१ ॥ मी पाहे सर्वांसी । युद्धोत्कंठा कवणांसी । मम हातें कां मारविसी । या रणामध्यें केशवा ॥२२॥ दुर्बुद्धि कौरवपती । इष्ट इच्छूं आले भूपती । कोण कोण ते निगुतीं । पाहेन दृष्टीं रणीं मी ॥२३॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंग:— आत व्यवस्थित सारे । पाहोनि स्वचमुकैवारें ॥
धार्तराष्ट्र कपिध्वज । घेऊं पाहे युद्धा आज ॥
उचलुनी धनु करी । हांसे कौतुकें अंतरीं ॥
आरंभावी खणखणी । तुका ह्मणे त्या निर्वाणीं ॥ १८ ॥
तेव्हां पार्थ हृषीकेशा । बोले कैसा हांसोनी ॥
मध्यभागीं नेई रथ । मनोरथ पुरवी ॥
उभय सैन्य पाहेन मी । ऐसा भूमीं करी उभा ॥
अच्युत ह्मणे बैसुनि पाहे । तुकया सोय दिसे बा ॥ १९ ॥
तो कीं जों यास मी पाहे । मन संदेह वाराया ॥
झुंजार जे उभे रथां । मोक्षग्रंथी बांधाया ॥
आह्मी तरी कोणा कोणा । नारायणा भांडावें ॥
तुका ह्मणे ऐसे देवा । अर्जुन तेव्हां बोलिला ॥ २० ॥
पाहेन मी युद्धीं वीर । वीर धीर प्रतापी ॥
मिळुनि आले आप्तवर्ग । किंवा स्वर्ग साक्षेपी ॥
मज भासते दुर्बुद्धी । नाहीं शुद्धी चोखट ॥
तुका ह्मणे पार्थ जीवा । लागी देवा खटपट ॥ २१ ॥

१ जमून. २ युद्ध करावयास. ३ घराच्या उंबऱ्यावरचा दिवा. ४ शस्त्रसाहित्य.

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्ः–धार्तराष्ट्रां रचिलें हें देखोनि कपिध्वजें । आरंभितां शस्त्रघात घेऊनि धनु पांडव ॥ ३४ ॥
तेव्हां पार्थ हृषीकेशा बोलिला हें महीपती। करीं माझा रथ उभा या दों सैन्यात अच्युता ॥३५॥
तों कीं जों यांस मी पाहें जे युद्धकारणें उभे । म्यां येथें कोणकोणाशीं झगडावें रणात या ॥३६॥
पाहेन युद्धकर्त्यांतें जे मिळाले रणांत या । दुर्बुद्धि धार्तराष्ट्राचें इच्छिती प्रिय जे रणीं ॥ ३७ ॥

## मोरोपंत

आर्याः–

वीर उभे अवघेही करावयालागिं शस्त्रसंपातें ।
पाहुनि अर्जुन तेव्हां हातीं घेवोन सज्जचापातें ॥ २० ॥
बोले श्रीकृष्णासी अर्जुन तेव्हां करावया आजी ।
दोहीं सेनेंमध्यें ने माझा रथहि अच्युता आजी ॥ २१ ॥
जोंवरि अवघां दृष्टीं युद्धोत्सुक हा उभा रिपुग्राम ।
पाहिन विचारुनीयां करुं मी कवणा झटोन संग्राम ॥ २२ ॥
पाहिन अवघे येथें आले युद्धासि वीर लवलाहे ।
दुर्मति सुयोधनाच्या युद्धीं जे इच्छिती प्रियाला हे ॥ २३ ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
तों धार्तराष्ट्र रचले हें पाहुनि वानरध्वज श्रीमान ।
आरंभतांच आयुधवृष्टि धरूनियां धनुष्य पांडव तो ॥ ३८ ॥
पार्थ हृषीकेशातें वचन असें बोलिला नृपा तेव्हां ।
दों सेनेमध्यें मम रथासि नेऊनि अच्युता स्थापीं ॥ ३९ ॥
तों कीं जों यांतें मी पाहें जे हे उभे रणासाठीं ।
कीं कोणाकोणासीं झगडावें म्या अशा रणोद्योगीं ॥ ४० ॥
जे या रणीं मिळाले मी त्यां पाहेन युद्धकर्त्यांतें ।
दुर्बुद्धि सुयोधन जो त्याचेंचि रणांत वांछिती प्रिय जे ॥ ४१ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

मग सन्नद्धातें देखुन । दुर्योधनादिकांतें अर्जुन । हातीं धनुष्य घेऊन । कृष्णासि बोलता जाला ॥२०॥ ह्मणे अगा स्वामी यादवराजा । दों सैन्यांमाजी रथ माझा । ठेवि जोंवरि मी वोजा । योद्धयांतें पाहीन ॥ २१ ॥ येथें दुर्योधनाचें हित । करावया मिळाले बहुत । म्यां कवणासि तयांत । युद्ध करावें ॥२२॥

**संजय उवाचः–एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥**
**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।**
**उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥**

१ युद्ध.

तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ॥
आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा २६
श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ॥
तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् २७
कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।

**अर्थः—संजय म्हणाला; हे धृतराष्ट्रा, अर्जुनानें याप्रमाणें सांगितल्यावर तो उत्तम रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं उभा करून भीष्म, द्रोण व इतर सर्व राजांच्या समोर " हे अर्जुना, या जमलेल्या सर्व कौरवांना पहा " असें श्रीकृष्ण म्हणाले; तेव्हां अर्जुन दोन्ही सैन्यांमध्यें उभे असलेले चुलते, आजे, गुरुजी, मामे, बंधू, पुत्र, नातू, मित्र, तसेंच सासरे व स्नेही इत्यादिकांना पाहतां झाला. समोर उभे असलेल्या त्या सर्व बांधवांना पाहून तो अर्जुन परम करुणेनें व्याकुळ होऊन खिन्नपणें बोलता झाला.**

**श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) "**

आइका अर्जुन इतुकें बोलिला । तंव श्रीकृष्णें रथु पेलिला । दोहीं सैन्यामाजी केला । उभा तेणें ॥ ७४ ॥ जेथ भीष्मद्रोणादिक । जैवळिकेचि सन्मुख । पृथिवीपति आणिक । बहुत आहाती ॥ ७५ ॥ तेथ स्थिर करूनियां रथु । अर्जुन असे पाहातु । तो दळभार समस्तु । संभ्रमेंसीं ॥ ७६ ॥ मग देवा ह्मणे देख देख । हे गोत्रगुरु अशेख । तंव कृष्ण मनीं नावेक । विस्मो जाहला ॥ ७७ ॥ तो आपणयां आपण ह्मणे । एथ कायी कवण जाणे । हें मनीं धरिलें येणें । परि कांहीं आश्चर्य असे ॥ ७८ ॥ ऐसी पुढील सूचना घेतु । तो सहज जाणे हृदयस्थु । परि उगा असे निवांतु । तिये वेळीं ॥ ७९ ॥ तंव तेथ पार्थ सकळ । पितृ पितामह केवळ । गुरु बंधु मातुळ । देखता जाहला ॥१८०॥ इष्ट मित्र आपुले । कुमरजन देखिले । हे सकळ असती आले । तयामाजी ॥ ८१ ॥ सुहृज्जन सासरे । आणीकही सखे सोइरे । कुमर पौत्र धनुर्धरें । देखिले तेथ ॥ ८२ ॥ जयां उपकार होते केले । कीं आपदीं जे रक्षिले । हे असो वडील धाकुले । आदिकरूनि ॥ ८३ ॥ ऐसें गोत्रचि दोहीं दळीं । उदित जालें असे कैळीं । हें अर्जुनें तिये वेळीं । अवलोकिलें ॥८४ ॥ तेथ मनीं गजबज जाहाली । आणि आपैसी कृपा आली । तेणें अपमानें निघाली । वीरवृत्ति ॥ ८५ ॥ जिया उत्तम कुळींचिया होती । आणि गुणलावण्य आथी । तिया आणिकीतें न साहती । सुतेजपणें ॥ ८६ ॥ नविये

१ नातेवाईक. २ आपल्या कुळांतील श्रेष्ठ. ३ आश्चर्यचकित. ४ सूचना. ५ युद्धाला. ६ आपोआप.

आवडीचेनि भेरें । कामुक निज वनिता विसरे । मग पाडेंवीण अनुसरे । भ्रमला जैसा ॥ ८७ ॥ कीं तपोबळें ऋद्धी । पातलिया भ्रंशे बुद्धी । मग तया विरक्तता सिद्धी । आठवेना ॥ ८८ ॥ तैसें अर्जुना तेथ जाहलें । असतें पुरुषत्व गेलें । जें अंतःकरण दिधलें । कारुण्यासी ॥ ८९ ॥ देखा मंत्रज्ञु बरळु जाय । मग तेथ का जैसा संचारु होय । तैसा तो धनुर्धर महामोहें । आकळिला ॥ १९० ॥ म्हणऊनि असतां धीर गेला । हृदया द्रावो आला । जैसा चंद्रकळीं शिवतला । सोमकांतु ॥ ९१ ॥ तयापरी पार्थु । अतिस्नेहें मोहितु । मग सखेद असे बोलतु । श्रीअच्युतेसीं ॥ ९२ ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

अगा धृतराष्ट्र राया । ऐसें अर्जुन बोललिया । श्रीकृष्णें त्वरें रथ नेऊनियां । दोही सैन्यांमाजी ठेविला ॥ २४ ॥ जेथें भीष्म-द्रोण-मुख्य-करुनी । अवघे पृथ्वीचे राजे जाणोनी । हे मिळाले कौरवांतें देखोनी । अर्जुन पाहों लागला ॥ २५ ॥ तों तेथें पार्थ सकळिकांसि देखे । पितृ पितामह विशेखें । आचार्य मातुळ भ्रातृ अनेकें । पुत्रपौत्र आणि सखे अवघे ॥ २६ ॥ श्वशुर सोइरे दोन्हीं सैन्यीं । आणि समस्त बंधुवर्गातें जाणोनि । हें विचारूनियां मनीं । अर्जुन बोलता झाला ॥ २७ ॥ पाहे परम कृपेकरून । विषाद पावलें त्याचें मन । युद्ध करूं इच्छित स्वजन । देखोन कृष्णाप्रति बोलता झाला ॥ २८ ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

संजय म्हणे गा भारता । ऐसें गुडाकेशें बोलिलें असतां । कृष्ण जाला अश्व प्रेरिता । वेत्रयष्टी संकेतें ॥ ४४ ॥ मग तो सारथी हृषीकेशी । उभय सैन्यांमाजीं परियेसी । नेऊनि त्या रथोत्तमासी । स्थापिता होय तात्काळ ॥ ४५ ॥ जैसी नभीं नक्षत्रमंडळीं । आच्छादून मिरवे अंशुमाळी । तैसा अर्जुन-रथ तात्काळीं । लोपोनि कौरवदळप्रभा ॥ ४६ ॥ एवं भीष्मद्रोणादि समस्तां । सन्मुख निकट नेऊनि रथा । अर्जुनेसी जाला बोलता । तो श्रीकृष्ण तें काळीं ॥ ४७ ॥ पार्था हे पैल कौरव पाहे । जे मिळाले असती समुदाये । यावरी कर्तव्य ते लवलाहे । करी बापा वीरजेठी ॥ ४८ ॥ ऐसे कृष्णजी बोलता । पार्थ कौरवदळ होय पाहता । तव तेथें जाला देखता । सैन्य तितुके स्वजन पैं ॥ ४९ ॥ पितृ स्वजन पितर । भीष्मादि पितामह साचार । द्रोणकृपाचार्यादि समग्र । विद्यादायक आचार्य ॥ १५० ॥ गांधारीचे बंधु तेचि मातुळ । भ्राते दुर्योधनादि सकळ । त्यांची संतति जे केवळ । तेचि पुत्र आणि पौत्र ॥ ५१ ॥ जे जे स्नेहभावें अगाधू । ज्यांसी परस्परें प्रीतिसंबंधू । जे मिनले सोइरे बंधू । त्या सखयांचे समूह ॥ ५२ ॥ दुर्योधनसंबंधी श्वशुर । आणि सुहृद जे कृतोपकार । एवं कौरवसैन्य समग्र । देखे अर्जुन स्वजनरूपें ॥ ५३ ॥ दोहीं सैन्यांमाजी राहत होत्साता । तो कुंतीसुत कौंतेय निरुता । युद्धां आले जे बंधु त्यां समस्तां । देखोनि होय सस्नेह ॥ ५४ ॥ होऊनि विषादयुक्त । जाला परम कृपेकरूनि व्याप्त । कृपाळुपणें सत्वरित । श्रीकृष्णासि बोलिला ॥ ५५ ॥

---

१ योग्यतेवांचून. २ ऐश्वर्य. ३ स्वाधीन केला. ४ स्पर्शिला.

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

संजय धृतराष्ट्रासि ह्मणे हे भारत । ययाचा भाव ऐसा बोलत । तूं भरतवंशीं उत्पन्न महंत । स्मरें वृत्त वडिलांचें तूं ॥ ९३ ॥ ते पूर्वज जैसे वर्तले असती । तैसाचि तूंही वर्ते गा महीपती । स्वज्ञातीच्या ठायीं द्रोह सर्वार्थी । टाकी हे व्युत्पत्ती संबोधनाची ॥ ९४ ॥ अगा गुडाकेश जो अर्जुन । तेणें ऐसा बोलिला हृषीकेश जाण । सांगों नामाचेंही व्याख्यान । सावधान परियेसीं ॥ ९५ ॥ तरि गुडाका ऐसें निद्रेसि ह्मणती । तियेचा ईश ह्मणिजे नियंता सर्वार्थी । निद्रा जिंकोनी सर्वत्र सावधान चित्तीं । तयातें ह्मणती गुडाकेश ॥ ९६ ॥ तेणें सर्वत्र सावधानें अर्जुनें । ऐसा बोलिला आदिपुरुष तेणे । तयाचा भक्तिप्रेमा तुज काय सांगणें । कोप कांहीं मनें न मानी च ॥ ९७ ॥ हा आपुला भृत्य होऊन । आपुलें सारथ्य करवी मजकडून । ऐसी दोषदृष्टि तेथु न करून । प्रीतीच जाण करिता जाला ॥ ९८ ॥ आणि युद्धापासूनि अर्जुनासी । न परतवीच तया हृषीकेशी । तरी काय करिता जाला ह्मणसी । तेणेंचि शब्देंसीं प्रेरिला रथु ॥ ९९ ॥ दोहीं सैन्यांमध्यें रथोत्तम । स्थापिता जाला तो पुरुषोत्तम । भीष्मद्रोणां सम्मुख उत्तमोत्तम । रथु परम ठेवी कृष्ण ॥ ५०० ॥ अर्जुनाचिया रथासी रथोत्तम । कासया ह्मणती तें सांगों वर्म । तरी अग्नीनें दिधला दिव्य उत्तम । ज्यावरी पुरुषोत्तम धुरेसि बैसे ॥ १ ॥ ह्मणोनि तो रथोत्तम ऐसें ह्मणती । ऐसा रथुचि नाहीं त्रिजगतीं । भीष्मद्रोणांसमीप होते थोर थोर भूपती । ठेवी श्रीपती त्यांपुढें रथु ॥ २ ॥ सकळां माण्डलिकांमाजि प्रधान । शूर वीर शस्त्रास्त्रीं अतिप्रवीण । ह्मणोनि भीष्मद्रोणांचें नामग्रहण । केलें जाण ययालागीं ॥ ३ ॥ एवं रथु ठेवूनि दोन्ही सैन्यां आंतु । सर्वोत्तम अर्जुनाप्रति असे बोलतु । हृषीकेशपदाचाही अर्थु । सांगों निश्चित परियेसीं ॥ ४ ॥ सर्व प्राणिमात्राचे गूढ आभिप्राय असती । ते सर्वही जाणे जो आपुलिया ज्ञप्तीं[1] । तयातें हृषीकेश ऐसें ह्मणती । जाण भूपती अर्थ ऐसा ॥५॥ अर्जुनाच्या अंतरीं शोक मोह अती । जाले ते जाणोनियां चित्तीं । उपहासें पार्थ ऐसें संबोधिती । तयाची व्युत्पत्ति सांगेन ॥ ६ ॥ पृथा हे स्त्रीस्वभाव असे जाण । स्त्रिया तरी शोकमोहांचें भाजन । तियेचा पुत्र तूं स्त्रीस्वभावपूर्ण । शोक मोह उत्पन्न सासतोती[2] ॥ ७ ॥ ऐसा विनोद करूनियां त्यासी । मागुता आश्वासीत असे हृषीकेशी । ह्मणे पृथा हे मत्पितृस्वसा आत आह्मांसी । पुत्र होसी तियेचा तूं ॥ ८ ॥ यालागीं तूं आमुचा संबंधी[3] होसी । आणि मी तुझा सारथि अतिलोभेंसी । असतां तूं दृढ होऊनि सर्वांशीं । पाहें ययांसी महावीरांतें ॥९॥ हे जे युद्धासि मिनले असती । सकळ कौरव जे कीं सुभद्रापती । ते योग्य पाहोनियां सर्वार्थी । धर्मप्रवृत्ती युद्ध करी ॥ ५१०(२४-२५) ॥ यया दोहींहि सैन्यांच्या ठायीं । अर्जुन पाहत असे वीरां सकळांही । श्रीभगवंतें आज्ञापिला पाहीं । देखे सर्वही समारंभु तो ॥ ११ ॥ तंव दोहींही सैन्यांचिया मध्यस्थिती । आपुलेचि युद्धार्थ उभे असती । कोण कोण ते सागों तुजप्रती । एकाग्रचित्तीं परियेसीं ॥१२॥ 'अथ' शब्दाचा पर्याय जाण । 'तथा' शब्दाचें करावें व्याख्यान । असो तैसें देखता जाला अर्जुन । तेही कोण कोण परियेसा ॥१३॥ तरी पितर आणि पितृव्य जाण । भूरिश्रवा मुख्य जो वीर जाण । तैसेचि पितामहांमाजी श्रेष्ठ पूर्ण । हा गंगानंदन आणि सोमदत्त ॥१४॥ हे आदिकरूनियां पितामह असती । आचार्यांमाजी कृपाचार्य द्रोण अती । मातुळ गांधार शकुनि महामती । अनंत असती दोहीं दळीं ॥ १५ ॥ बंधु युधिष्ठर दुर्योधनादिक । पुत्र अभिमन्यु

१ ज्ञानानें. २ स्थिरावतात. ३ जवळचा नातलग.

लक्ष्मणप्रमुख । पौत्रही उभे दळीं नायक । सखेहि देख सांगो आतां ॥१६॥ अश्वत्थामाआदि जयद्रथ । हे आदिकरूनियां सखे बहुत । एक ते समानवयस्क आले तेथ । आणिकही गोत सांगों राया ॥ १७ ॥ आणि श्वशुर जे कीं द्रुपदादिक । विराटादिक सुहृद सोइरे अनेक । आणिकही वीर मांडलिक । अर्जुन देख देखता जाला ॥ १८ ॥ कृतवर्मा भगदत्त आदिकरूनी । मित्र मिनले असती तिये रणीं । एकां उपकारें केले असती निर्वाणीं । व्यसनापासूनि सोडविलें एकां ॥ १९ ॥ असो ऐसे किती धाकुटे वडील । दोही दळीं मिळाले वीर सकळ । ऐसे देखोनि अर्जुना कळवळ । स्नेह प्रबळ उपजला तया ॥ ५२० ॥ ऐसे सर्वही देखिलियानंतरें । महाहिंसारूप कर्म देखोनि धनुर्धरें । हें हिंसारूप नव्हे परी महान्धकारें । मानी निर्धारें अधर्म ऐसा ॥ २१ ॥ तयातेंचि शास्त्रविहित धर्म मानितु । ऐसें ज्ञान प्रतिबद्धकें ममकार होतु । हे माझे यया चित्तवैकल्यें शोकयुक्त । स्वधर्मच्युतु स्वयें जाला ॥ २२ ॥ महा अनर्थाची निर्वाणीं । ते वृत्ति अर्जुनाची जाली तिये क्षणीं । तेंचि दाखवीत होत्साता बोले वचनीं । तेंचि आकर्णीं एकाग्र राया ॥ २३ ॥ तंव तो कुंतीचा पुत्र अर्जुन । संग्रामीं सर्वत्र देखोनि स्वजन । आकर्षिला परम कृपेन । विषाद संपूर्ण पावला ॥ २४ ॥ कौंतेय ह्मणावयाचें मुख्य लक्षण । याचा स्त्रीस्वभाव मूढता दिसे कृपेन । ययासी स्वतःसिद्ध कृपा असोन । व्यापिला दुसरीन अपर कृपया ॥२५॥ प्रथम स्वसैन्यावरी कृपा होती । ते समयीं अपर कृपा जाली कौरवांप्रती । तेणें अर्जुन व्यापिला सर्वार्थी । पडली भ्रांती विपरीतपणें ॥ २६ ॥ कृपा हा ब्राह्मणांचा धर्म जाण । तो उदेजतांचि वीरवृत्ति गेली पळोन । जैसी अन्य स्त्री प्रवेशतां घर रिघोन । जाय कुलीन निघोन जैसी ॥ २७ ॥ किंवा तापसासि सिद्धि जालिया प्राप्त । स्वतःसिद्ध योगसिद्धि विसरे तेथ । तैसें स्वपौरुष मोहें जालें हृत । होऊनि भ्रांत कृपेनें पार्थु ॥ २८ ॥ ना तरी परस्त्रियेसीं प्रीति उपजता । कामुक विसरे जैसा निजवनिता । मग तियेसि वश्य होय पांडु नसतां । तैसें पार्था कृपेन जालें ॥ २९ ॥ तेथ वीरधैर्याचा स्तंभु विराला । हृदयामाजी कृपाद्रवो लागला उपजला । जैसा सैंधवरवा उदकें सिंपिला । पात्रें द्रवत्वाला जयापरी ॥ ५३० ॥ तिये कृपेकरूनि संतप्त होऊनि । विषादरूप बोले गद्गदवचनीं । कंठ दाटला असे बाष्पेकरूनी । व्याकुळ मनीं कृपेस्तव ॥ ३१ ॥ श्रीकृष्णाप्रति अर्जुनाची युक्ति । असतां विषादाचीही असे प्राप्ति । एक समयीं दोन्ही सांगिजती । याचें चिन्ह सर्वार्थी अर्जुनवाक्य ॥ ३२ ॥ तेचि भगवंताप्रति अर्जुनोक्ति । संजय सांगे धृतराष्ट्राप्रति । 'अर्जुन उवाच' इत्यादि श्लोकसंगति । 'एवमुक्त्वा' प्रांतीं श्लोक जों पावे ॥ ३३ ॥ अहो तत्वज्ञानाचें प्रतिबंधक जाण । स्वदेहीं आत्मा ऐसा जो अभिमान । परदेहीं स्वकीयत्वें मोह दारुण । अनात्मवेत्ता अर्जुन जाला ऐसा ॥ ३४ ॥ युद्धें स्वदेहपरदेहाचा नाश देखतां । ऐसा मोह शोक त्यासि जाला सर्वथा । तयाचें चिन्ह प्रकटार्थ तत्वता । श्लोकत्रयें आतां निरूपिजेल ॥ ३५ ॥

## रमावल्लभदास—"चमत्कारी" टीका

संजयो ह्मणे गांधारीपति । ऐसें त्या हृदयस्थाप्रति । अर्जुन बोलिला मग श्रीपतीं । रथु घडघडा चालविला ॥ ८४ ॥ करीं वागोरे[३] असती । चाबुक शोभा दावी हातीं । वेत्रखुणा करी अश्वाप्रति । रथ घडघडा चालविला ॥ ८५ ॥ कानींची कुंडलें हालतीं । रविशशी हेलावती । गगनीं सुरवर देखती । रथ

१ साम्य. २ पाण्यानें. ३ लगाम.

घडघडा चालविला ॥ ८६ ॥ दोहीं दळांमाजी आला । वीरां हलकल्लोळ झाला । कौरव दळभार भ्याला । रथ स्थापिला उत्तम ॥ ८७ ॥ केला बुभुःकार हनुमंतें । तेणें सैन्य थोकलें सभोंवतें । धनुर्धरें बळवंतें । अवलोकन पैं केलें ॥ ८८ ( २४ ) ॥ भीष्म द्रोण प्रमुख वीर । सकळ महीपति रणधीर । त्यांच्या सन्मुख यदुवीर । रथ नेऊनि स्थापिला ॥ ८९ ॥ स्थापूनि ह्मणे बा पार्था । पाहे या कौरवां अपार्था। जे युद्धीं प्रवर्तले धरूनि स्वार्था । निज नाशार्थाकारणें ॥ ९० ( २५ ) ॥ तेथें पार्थे त्या समयासी । देखिलें पितरां पितामहांसी । देखिलें मामे बंधु पुत्र नातवांसी । देखिलें सखे मित्रही ॥ ९१ ( २६ ) ॥ तैसे श्वशुर सुहृद उभय दळांत । तिष्ठले असती युद्धार्थ । त्यां देखूनि ह्मणें निभ्रांत । कोणासीं आतां झुंजावें ॥ ९२ ( २७ ) ॥ पार्थ परम कृपेनें व्यापिला । मनीं कळवळा उपजला । उपरी काय तो बोलिला । धृतराष्ट्रा अवधारी तें ॥ ९३ ॥ संजयो ह्मणे श्रीवेदव्यास । उभे मजमाजी बोलावयास । चमत्कारी गावयास । श्रीरमावल्लभदासीं उभे ॥ ९४ ॥ इति श्रीगीता प्रथम अध्यावो । चमत्कारी टीकाभावो । वदविता श्रीकृष्णरावो । अर्जुनसैन्यावलोकन नाम प्रथम प्रकारः ॥ ९५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ १ ॥

## दासोपंत—'गीतार्णव'

इतुलें प्रवर्तलें असतां । मांडली पुढें कैसी कथा । संजयो जाला अनुवादता । राये धृतराष्ट्रेसि ॥१४६०॥ [ भारत ] संजयो बोले पवित्रा । राया भारतकुळप्रवरा । चित्त देईं धृतराष्ट्रा । माझां वचनीं ॥६१॥ [ गुडाकेशेन ] गुडाका निद्रा जे तत्वता । तिचा ईशु जो जिंकता । जितनिद्रु पार्थु सर्वथा । ऐसेनि तेणें ॥६२॥ [ एवमुक्तो हृषीकेशः ] येणें प्रकारें हृषीकेशु । विनविला जो द्वारकाधीशु । तो श्रीकृष्णु जगन्निवासु । काय करिता झाला ॥ ६३ ॥ [ उभयोः सेनयोर्मध्ये ] आपपरावीं दळें दोन्ही । केवळ ययांचां मध्यस्थानीं । भूमिका बरवी लक्षूनि । तये ठायीं ॥ ६४ ॥ [ भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षितां प्रमुखतः ] भीष्मा आणि द्रोणासि । सन्मुख सकळां रायांसि । शंका न धरितां पासीं । नेऊनि कौरवां ॥ ६५ ॥ [ रथोत्तमं स्थापयित्वा ] रथामाजी जो उत्तमु । अर्जुनरथु परमु । तयातें तो आत्मारामु । स्थापूनियां ॥ ६६ ॥ [ हे पार्थ एतान्समवेतान्कुरून्पश्येत्युवाच ] श्रीकृष्णु बोले सुभक्ता । 'अवधान देईं पार्था । कुंतीनंदना प्रतापवंता । सुभद्रापति ॥ ६७ ॥ वैरी कौरव मीनले । भीष्मद्रोण उभे राहिले । राजे पृथ्वीचे वेगळाले । यये रणीं ॥ ६८ ॥ ययां समग्रांतें तूं पाहें । जैसी जैसी वासना होये । तैसा तैसा अति लाहे । दृष्टीचेन ॥ ६९ ॥ ना परि ऐसें अर्जुना । नव्हे जाणा सुजाणा । भयें व्यापिलें मना । वरि जें पाहणें ॥१४७०॥ तुज ऐसा वीरु । प्रतापिया झुंझारु । करूं शकसी मेरु । उपरांठा[1] हा ॥ ७१ ॥ कायिसीं कौरवें बापुडीं । एसणी आंगीं असतां प्रौढी । भय ते देशू निवडी । पांडूनंदना ॥ ७२ ॥ आन एक परियसीं । सांगों काये तूं नेणसी । मी जो असे पासीं । तो पा कैसा ॥ ७३ ॥ आत्मा यया विश्वाचा । तो कैसा नव्हे कौरवांचा । भीष्मा आणि द्रोणाचा । पांडुपुत्रा ॥ ७४ ॥ सकळ पृथ्वीचे रायराणे । ययांचा आत्मा मीचि जाणें । यये अर्थी बोलणें । असे देवाचें ॥७५॥ ॥ प्राणस्य प्राण उत चक्षुषश्चक्षुः ॥ ॥ ऐसें हें वेदांचें वचन । वचना माझां यया प्राण । ह्मणौनि आतां सांगैन । तें मानीं सत्यत्वें ॥७६॥ प्राणपंचकाचा मी प्राणु ।

१ अयोग्य अज्ञांना. २ पालथा.

प्राणपंचकु मज अधीनु । प्राणां प्राणत्व मजपासूनु । सत्तारूपीं ॥ ७७ ॥ माझेनि अर्जुना आधारें । चेष्टे प्राणसमूह वारे । धरी सकळें शरीरें । ते माझी सत्ता ॥ ७८ ॥ डोळयां माझेनि डोळेपण । श्रवणत्व श्रवणांलागून । वाचा करी वचन । ते सत्ता माझी ॥७९॥ त्वचा जाणे स्पर्शातें । माझेनि चैतन्य तियेतें । परिमळु कळे घ्राणातें । आत्मेन म्यां ॥ १४८० ॥ चरण माझेन चालती । व्यापारीं कर प्रवर्तती । मनें संकल्प करिती । ते माझी सत्ता ॥ ८१ ॥ मी आत्मा अहंकारी । तरि अहंकारु स्फुरे बाहेरी । चित्त अनुसंधानातें करी । ते माझेन गा ॥ ८२ ॥ बुद्धि स्फुरे ते माझेन । माझेन प्रकाशे अंतःकरण । एवं सर्वात्मा मी, मज अधीन । सकळ दृश्य ॥ ८३ ॥ ते हे शस्त्रं पराजिती । आतां तीं कवणाचां हातीं । मजवांचूनि ते भ्रांति । नसे कांहीं ॥ ८४ ॥ बुद्धि ते कैसी स्फुरेल । माझेचि तीतें बल । करचरण वागतील । तयाचे कैसे ॥ ८५ ॥ ऐसें जाणोनि अंतःकरणीं । सर्वथा भय तें सांडूनि । वैरी कौरव नयनीं । सुखेंचि पाहे' ॥ ८६ ॥ ऐसें बोलोनियां वचन । श्रीकृष्णें धरिलें मौन । मग तो पार्थाचें वदन । पाहतु ठेला ॥ ८७ ॥ ऐसें संजय सांगतां । रायें धृतराष्ट्रें परिसतां । परमार्थी पावन कथा । इतुली हे कैसी ॥ ८८ ॥ निजमायेचें प्रावरण । तेणें अर्जुनातें आच्छादून । निज बोसिंगा[1] घेऊन । निद्रा करविली ॥ ८९ ॥ मग निद्रेमार्जूनि[2] अंतरीं । दिसे स्वप्न जणों बाहेरि । अर्जुना कौरव तयापरी । सन्मुख दाविले ॥ १४९० ॥ ना कीं अर्जुन येकला । तो एकपणें लपविला । कौरवभेदें दाविला । देखे दिसे ॥ ९१ ॥ शुद्धीं उपजवूनि गुण । अर्जुना केलें भूषण । तेणें मोहकें तो स्थान । विसरला काये ॥ ९२ ॥ सांडूनि आत्मधर्मातें । मागें घालूनि आत्मयोगातें । स्वभावलया सखयातें । दूरि धरूनि ॥ ९३ ॥ अन्वयबोधु राहविला । सत्प्रेत्नु मागें केला । विविक्तात्मबोधु वारिला । राहे ह्मणौनि ॥ ९४ ॥ द्वैताभावबोधातें । निद्रा लावूनि परहस्तें । स्ववृत्तिविकाशा तयातें । गुप्त केलें ॥ ९५ ॥ स्वरूपोपरमा न कळत । आत्मान्वया न पुसत । शुद्धता आपुली समस्त । तेथेंचि ठेवूनि ॥ ९६ ॥ धर्माधर्मविवेकु । दूरि केला तो लोकु । कर्मयोगु टणकु । तया दवडिलें ॥ ९७ ॥ भक्तियोगा भक्तिउत्सवा । भेटीचि नाहीं पांडवा । अभ्यासयोगा ठावा । न होत संचारु ॥ ९८ ॥ वैराग्ययोगें चुकविलें । सत्संगवेगळें केलें । निःकाम अक्रोध वारिले । डावेन हातें ॥ ९९ ॥ अदंभा नाहीं भेटि । आयोगु उठाउठी । स्वास्थायोगाची दृष्टि । पडोंचि नेदितां ॥ १५०० ॥ जहदजहल्लक्षणारथु । आच्छादूनि दाविला विपरीतु । ईश्वरानुग्रहो हनुमंतु । पालटिला तो ॥ १ ॥ आत्मविपर्यी जें होतें । अनात्मसाधनीं केलें तें । बहिर्मुख वारुवातें । लाविली गति ॥ २ ॥ ऐसा अर्जुनु निघाला । तो कृष्णा पाहों विसरला । विसरे सावधु जाला । कौरवां देखे ॥ ३ ॥ कृष्णाज्ञानाचें हें फळ । कीं आत्माज्ञानाचें केवळ । परंतु सारथियाचे बळ । तें पालटेना ॥ ४ ॥ मार्गी जातां दोघांतें । निद्रा आली येकातें । तैं आलें अरिष्ट निद्रितातें । तें जाग्रतेंचि वारावे ॥ ५ ॥ तैसा अर्जुनु पडला गुणीं । कृष्णु परमात्मा ज्ञानी । तेणेंचि अर्जुनालागूनि । सांभाळावें ॥ ६ ॥ यापरी आत्मभाववृत्तिग्रासें । अनात्मतत्वप्रकाशें । अर्जुना आणिलें ईशें । कौरवदर्शना ॥ ७ ॥ ऐसें बोलोनि अनंतु । उगाचि ठेला तटस्थु । आइके राया मातु । संजयो ह्मणे ॥ ८ ॥ ऐसें कृष्णाचें करणें । परमार्थवंतीं कैसें माने । तोंचि अनुभवाचेनि मानें । बोलिजैल ॥९॥ शुद्ध 'त्वं' पदार्थु अर्जुनु । तया अविद्यकु शुद्धसत्वगुणु । लावूनि केला जाणु । सकळीं गुणांचा ॥ १५१० ॥ शुद्धसत्वगुणें तेणें । कवण अवस्था भोगणें । कवण देहु काय जाणणें ।

१ मांडीवर. २ निद्रेमधून.

वर्तणें कैसें ॥ ११ ॥ शुद्धसत्वगुणापासून । शुद्ध जालें स्वानुसंधान । तेथेंचि स्वस्वाकारें ज्ञान । तें महाकारणदेह ॥ १२ ॥ महाकारणदेह तेणें । प्रपंचाभावदर्शनें । स्वरूपीं अनुसंधान करणें । ते तुरीयावस्था ॥ १३ ॥ नामरूपगुणाभान । आभासयोगा तेचि लक्षण । ऐसें स्वरूपस्फुरण । त्रिविध असतां ॥ १४ ॥ तया स्फुरणाचा अभिमानु । धरूनि आत्मा जो आपणु । असे तोचि सनातनु । प्रत्यगात्मा साक्षी ॥ १५ ॥ प्रत्यगात्मा तुरीया महाकारण । आणि गुणांचें अभावदर्शन । शुद्धसत्वगुणेंकरून । इतुकें जालें ॥ १६ ॥ ऐसा शुद्धसत्वें गुणें चेइला । कृष्णें अर्जुनु प्रबोधिला । तो अभावदृष्टी जाणों लागला । अहंदुर्योधनादिका ॥ १७ ॥ मग ऐसिया अर्जुनातें । भीष्मु दाविला मायामतें । तमोगुण ऐसें जयातें । ठेविलें अभिधान ॥१८॥ केवळ भीष्माचें दर्शन । तें तमोगुणाचें सन्निधान । तेंचि जालें आवरण । शुद्धसत्वा तया ॥ १९ ॥ तें शुद्धसत्व आच्छादलें । तेंचि तमी प्रकाशक जालें । प्रस्तें चंद्रें उमटलें । जैसें राहोबिंब ॥१५२०॥ आता तमोगुणें तेणेंकरून । कवण देहअवस्थाभान । तेंचि कीजैल कथन । यथामति ॥२१॥ स्वस्वरूपाचें ज्ञान । लोपु तयाचा तें अज्ञान । देहद्वयाचें कारण । कारणदेह म्हणिजे ॥२२॥ परविषयीं अभाववृत्ति । स्वविषयीं अनुसंधानस्फूर्ति । यया तुरीयालोपा ह्मणती । सुषुप्त्यवस्था ॥ २३ ॥ कारणदेह तें अज्ञान । सुषुप्ति स्वपरविस्मरण । येथें सुख असाधारण । तो आनंदु भोगु ॥२४॥ ऐसिया आनंदा अनुभविता । अज्ञाना सुषुप्ति पाळिता । आत्मा मानणें ह्मणता । तोचि प्राज्ञु ॥ २५ ॥ कारण सुषुप्ति आनंदु । प्राज्ञु आत्मा सिद्धु । तमोगुणु यथाविधु । अविद्येचा ॥२६॥ अविद्येचेचि तमोगुणें । सत्व आच्छादिलें तेणें । प्रकाशमय तें तमें घेणें । झाकलें न वचे ॥ २७ ॥ मग रिघालें तमापोटीं । तमपूर्वक सत्व उठी । तेणें प्रपंचु पडे दृष्टी । तोचि कैसा ॥ २८ ॥ अज्ञानपूर्वक ज्ञान । वृत्तिभेदें जालें भिन्न । तेंचि लिंगदेह ह्मणौन । बोलिजत असे ॥ २९ ॥ स्वपरविषयीं प्रवृत्ति । अज्ञानपूर्वक व्यापारवृत्ति । स्वप्नमनोरथु ह्मणती । ते तेथ अवस्था ॥१५३०॥ अन्यथा आभासें विषयज्ञान । ययां विषयां विलक्षण । प्रविविक्तु भोगु ह्मणौन । तोचि ह्मणिजे ॥ ३१ ॥ प्रविविक्तां विषयां भोक्ता । स्वप्ना लिंगातें पाळिता । आत्मा अन्यथा बोधें वर्तता । तो तैजसु ह्मणिजे ॥ ३२ ॥ लिंग स्वप्न तैजसु । विपरीतु विपयभामु । हा तमयुक्त प्रकाशु । पूर्वोक्त सत्वाचा ॥ ३३ ॥ भीष्मा तमाचें सन्निधान । इतुलें फळलें असोन । वरि द्रोणाचें दर्शन । दिधलें गोविंदें ॥ ३४ ॥ द्रोणु रजोगुणु अविद्येचा । अर्जुनु तमपूर्वका सत्वाचा । तो संगु लाहोनि तयाचा । कैसा जाला ॥ ३५ ॥ अज्ञानपूर्वक आंगीं ज्ञान । रज तें विषयाभिलाष लक्षण । तया दोघा एकपण । जालें असता ॥३६॥ लिंगाचि पांचभौतिक साकारलें । स्थूळदेह स्वयेंचि जालें । स्थूल विषय तेणेंबळें । भोगावया ॥ ३७ ॥ आत्माज्ञानें प्रवृत्ति अंतरीं । जे होती विषयावरि । तेचि जाली बाहिरि । स्थूळदेहद्वारा ॥ ३८ ॥ बाह्य विषयांचें ज्ञान । तेचि जागृति जालें स्वप्न । अंतरींचें कल्पित विषयभान । तेंचि बाह्य साकारलें ॥३९॥ अज्ञानसुषुप्तिसंस्कारें । मनोरथुचि होये स्वप्नाकारें । तेंचि या दृष्टी साचाकारें । गमे तो प्रपंचु ॥ १५४० ॥ तैसाचि प्रकल्पितु प्रपंचु । रजोगुणें बहिर्मुखत्वें साचु । त्रिपुटीचा अंतसंचु । बाहिरि पडला ॥ ४१ ॥ बाह्य विषयांतें भोक्ता । ज्ञाता साधकु कर्ता । आत्मा तोचि तत्वता । विश्व ह्मणिजे ॥ ४२ ॥ जागृतीचें प्रकाशी । मी जागृतु वृत्ति ऐसी । जया तया आश्रयासि । ह्मणिजे विश्वु ॥ ४३ ॥ स्वयमेव स्थूलाकारें । मी ह्मणौनि जो स्फुरे । तो स्थूलात्मा चतुरें । विश्व जाणावा ॥ ४४ ॥ आत्मत्वें मानितु स्थूलासि । आंगें प्रकाशीं

१ एकांतिक. २ साठा.

जागृतीसि । स्थूल होऊनि विषयांसि । भोगीं स्थूला ॥ ४५ ॥ भोक्ता भोग्य भोगणें । स्थूलचि अवघें माने । कार्य कर्तृत्व करणें । तैसेचि साकार ॥४६॥ चेष्ट्य चेष्टकत्व चेष्टणें । स्थूळ साकारचि मानणें । रजोगुणाचेनि संन्निधानें । ऐसें वर्ततां ॥ ४७ ॥ अभिमानांश कौरव । कृष्णें दाखविले सर्व । योगें तयांचेनि भाव । कैसे अर्जुनाचे ॥ ४८ ॥ मी जीवु मी देहो आपणु । मी कर्ता भोक्ता जाणु । मी आश्रमु मी वर्णु । याति कुल ॥ ४९ ॥ मी [१]जीं मीचि मरें । मी मारीं मी न मरें । मी येकला मी परिवारें । पांडव मी ॥ १५५० ॥ मी कृष्णसखा अपराधीनु । ऐसा विविधु देहाभिमानु । कार्याकार्यी अर्जुनु । पावता जाला ॥ ५१ ॥ अहंकारयुक्ता अर्जुनातें । कृष्णें दाविले वीर ते । अरिषड्वर्ग तयांतें । पाहोनि कैसा ॥ ५२ ॥ अहंबुद्धी विषयपरु । जाला कारणयोगें कामातुरु । कामापूर्ती अपारु । क्रोधीं संभवला ॥ ५३ ॥ कामपूर्णतेकरून । मदयुक्त तयाचें मन । तैसाचि दुसरा देखोन । मत्सरु होये ॥५४॥ तैसा न देखे दुसरा । तै दांभिकु प्रति इतरा । होय तेणें खरा । प्रपंचु अनुभवी ॥ ५५ ॥ प्रपंचाचेनि अनुभवें । तरंग उठती नवे नवे । तेहींयुक्त संभवे । कैसा अर्जुनु ॥ ५६ ॥ मायामोहपरायणु । जाला ममत्वा अधीनु । लोभाचा भरु दारुणु । प्रवर्तला आंगीं ॥ ५७ ॥ मोहें शोकु दुःख विषादु । चिंतायोगें असावधु । ऐसा प्रापंचिकांचा संबंधु । फळला तया ॥ ५८ ॥ देहत्व बाणलें खरें । मग इतुलयानंतरें । मग ऐसा तो देहाधारें । काये करी ॥ ५९ (२४-२५) ॥ संजयो ह्मणे धृतराष्ट्रा । आइकें कुरुकुळप्रवरा । कृष्णें कौरवां समग्रा । दाखविलें असतां ॥ १५६० ॥ [पार्थः] पार्थु पांडूचा नंदनु । अरिकुळगर्वहुताशनु । प्रतापदिनकरु आपणु । आपुलिया दृष्टी ॥ ६१ ॥ [तत्र स्थितानपश्यत्] तेथें जे वीर होतें । पाहोंचि लागला तयातें । मग पाहोनि तोचि ते । पालटता जाला ॥ ६२ ॥ आतां तत्रस्थ कवण । येणें पाहिले निर्धारून । तयांचें रूप अभिधान । सांगिजैल ॥ ६३ ॥ [पितॄन्] आपणु जयांतें मानी । ऐसे जे पितृस्थानीं । तयांतें अर्जुनु देखोनि । तटस्थु जाला ॥ ६४ ॥ [अथ पितामहान्] आणि येक तयावरि । भीष्मु आजा वरवयापरी । देखिला तेणें जिव्हारीं । खोंचला अर्जुनु ॥ ६५ ॥ येणेचि भीष्मेसीं समान । दिसते जाले मानें मान । आतां तयांचें मन । कैसें वैर न संडी ॥ ६६ ॥ [आचार्यान्] तंव तेथेंचि देखिला द्रोणु । विद्यादाता गुरु सर्वज्ञु । तेणेंचि मानें आनु । समुदाव दृष्टी पडला ॥६७॥ [मातुलान्] शैल्यु मामा देखोनि । क्षिती उपजली अर्जुना मनीं । तेणेंचिपाडें मागुतेनि । मामे कौरवाचे ॥ ६८ ॥ मातुल देखोनि समस्त । व्यग्र जालें चित्त । तंव आन येक विपरीत । तेथें आभासलें ॥ ६९ ॥ [भ्रातॄन्] दुर्योधनादिक सकळ । बंधुवर्ग दिसती केवळ । तयाचिपासीं अ[३]ळुमाळ । वेगळें पाहता ॥ १५७० ॥ [पुत्रान्] दुर्योधनाचे जे पुत्र । ते पुत्रस्थानीचि समग्र । तयासी भाविता वैर । मनाचि नेघे ॥ ७१ ॥ [पौत्रान्] दुर्योधनपुत्रपुत्र । ते आपुलेही पौत्र । अर्जुनें देखिले समग्र । संग्राममाजी ॥ ७२ ॥ [सखींस्तथा] जयांसीं क्रीडा निरंतर । ऐसे जे बाळमित्र । जयांचें आपणां उपकार । आपुले जयां ॥ ७३ ॥ जैसे कीं बंधु आपुले । तैसेचि ते मित्र देखिले । पुढती नवल प्रवर्तले । तये क्षणीं ॥ ७४ (२६) ॥ [श्वशुरान्] दुर्योधनादिकां श्वशुर । ते तैसेचि आपणां समग्र । कौरव न होतां इतर । ह्मणौनियां ॥ ७५ ॥ [सुहृदश्चैव] शरीरसंबंधीं कौरवातें । आपणाही तेणेचि मतें । आपुलेही तयां सांगातें । सखे सोइरे ॥ ७६ ॥ अद्यापि संबंध चालती । सोइरिकेची महाप्रीति । ऐसे हे कौरवांप्रति । मीनले

१ जिवंत राहतों. २ पक्षाभिमानानें. ३ थोडेसें, किंचित्.

राजे ॥ ७७ ॥ [ सेनयोरुभयोरपि ] पुढें पाहतां स्वजन । मग अर्जुनु पाहे पःतोन । तंव आपुलांही सैन्यी समान । तेचि लोक ॥ ७८ ॥ मागें पुढें सासुरे । तैसेचि अवघे सोइरे । आपपरावे दुसरे । ते भाऊचि सकळ ॥ ७९ ॥ मागें पुत्र पुढें पुत्र । मागें पौत्र पुढें पौत्र । सखे सुहृद समग्र । सारिखेचि ॥ १५८० ॥ [ सर्वान्बंधूनवस्थितान् ] आपपरावीं सैन्यें दोन्ही । अवघे बंधुचि रणीं । राहिले त्यांमाजी कव्हणी । पारिखा नसे ॥ ८१ ॥ [ तान्समीक्ष्य ] तयांतें दृष्टी देखोनि । तयांची क्रीडा आठवूनि । केवळ स्वकीय मानूनि । जीवप्राण ॥ ८२ ॥ [ स कौंतेयः ] तो देवी कुंतीचा नंदनु । पावला सीतां सीणु । कैसा जाला आपणु । आइके राजा ॥ ८३ (२७) ॥ [ कृपया परयाविष्टः ] कौरवमोहें मोहिला । अनिवारा कृपा व्यापला । ममत्वाचा पूरु चालिला । सांटेचिना ॥ ८४ ॥ [ विषीदन् ] मग विषादातें पावोन । परम दुःख मानून । श्रीकृष्णाचें वदन । पाहोनियां ॥८५॥ [ इदमब्रवीत् ] बोलिला कष्टाचें वचन । तें हें ऐसें जाण । राजा तुजप्रति सांगेन । संजयो ह्मणे ॥ ८६ ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

इतुलें जाले वर्तमान । तव संजयो बोले वचन । भारत आइके ह्मणोन । संबोधूनि ॥ ४६ ॥ गुडाकेशु जो अर्जुनु । तेणें ऐसा विनविला श्रीकृष्णु । मग तो लक्ष्मीरमणु । काय करिता जाला ॥ ४७ ॥ मागां सैन्य आपुलें । पुढें कौरवांचें मांडलें । ऐसे उभय सैन्य रचलें । तया मध्यदेशीं ॥ ४८ ॥ सन्मुख भीष्मद्रोणांसि । आणि सकळां महीपाळांसी । भूमिका पाहोनि ऐसी । गोपिनाथु तो ॥ ४९ ॥ संस्थापूनि रथातें । काये करिता जाला तेथें । तें मी सांगेन निरुतें । राया अवधारीं ॥ १५० ॥ कृष्ण ह्मणे ' पांडुसुता । कुंतीनंदना पार्था । यया कौरवांसी संमीलिता । वैरियांतें ॥ ५१ ॥ पाहे आपुलिया दृष्टी । सोडूनि वासनेची गाटी । मग काय उपजैल पोटीं । ते तूं करीं ' ॥ ५२ ॥ ऐसें साक्षेपें सांगोनि । वैरी दृष्टी घालोनि । पार्थु पाहवता करूनि । कृष्ण ठेला ॥ ५३ ॥ तव तितुलियानंतरें । पाहत असतां आदरें । अर्जुनु तेणे अवसरें । काथि देखतां जाला ॥ ५४ ॥ एक ते केवळ पितर । एक आजे साचार । एक गुरु एक इतर । मामेजन ॥ ५५ ॥ एक ते आपले बंधूचि । पुतणे ते जाणो पुत्राचि । एक संतति तयांची । [illegible] नातू ॥ ५६ ॥ तयांही वेगळे आन । इष्टमित्र सखे स्वजन । येहींचि ते अवघे रण । पांगले दिसे ॥ ५७ ॥ मग तया अवघियातें । पार्थु पाहोनि तत्रस्थातें । विचारी तंव मागुतें । आन एक देखे ॥ ५८ ॥ उभय सैन्य वेगळा । आपणु तिसरा निवडला । मग दोहीं दळें लागला । तेथूनि पाहो ॥ ५९ ॥ क्षत्रियामाजी मेरु । करुणेचा पूर्ण सागरु । धर्ममित्रु धनुर्धरु । अर्जुनु तो ॥ १६० ॥ मागें देखे स्वकीय । पुढें कौरवदळ प्रत्यक्ष ज्ञेय । तयां दोहीमाजीं ध्येय-।-रूपें वैरियाचेनि ॥ ६१ ॥ ते मागेपुढे सासुरेचि । दोहीं दळीं देख सोयरेचि । उभारले मागां पुढां बंधूचि । वैराचेनि आकारें ॥ ६२ ॥ तया अवस्थिता देखोन । वैरांचें जालें विस्मरण । मग अर्जुन तो तेथून । काय करिता जाला ॥ ६३ ॥ परया कृपया व्यापला । मग विषादातें पावला । वचन हें बोलता जाला । गोविंदेसी ॥ ६४ ॥ तें हें वचन अर्जुनाचें । आतां सांगिजैल साचें । संजयो ह्मणे ममत्वाचें । आइके राया ॥ ६५ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

संजय ह्मणे हृषीकेश । त्याप्रति ऐसा गुडाकेश । दाखवी भावलेश । तो तुज राया वदलोंचि ॥ ६८ ॥

१ परका. २ अतिशय श्रम.

त्यांचीं हृषीकें इंद्रियें । त्यांस प्रेरी कृष्ण स्वयें । ह्मणोनि ऐसें वदला निश्चयें । स्वबुद्धि नव्हे अर्जुनाची ॥ ६९ ॥ ही अर्जुनाची नव्हे बुद्धि । या अर्थाची घडे सिद्धि । ह्मणोनि अर्जुनाची लोकप्रसिद्धि । त्याच्या नांवेंचि सुचवितो ॥ २७० ॥ कीं तो अर्जुन गुडाकेश । गुडाका निद्रा तिचा ईश । निद्रा भ्रांति तिचा प्रवेश । न घडे बुद्धींत अर्जुनाच्या ॥ ७१ ॥ तोन भ्रांतीचा ईश । ज्याच्या मनीं ते न करी प्रवेश । या भावें ह्मणे ' गुडाकेश ' । अर्जुनातें ॥७२॥ हीं कृष्णार्जुनांचीं नांवें । द्वितीयाध्यायीं याचि भावें । संजय बोलेल एथें पहावें । रहस्य हेंच ॥ ७३ ॥ ' ॥ एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतपः । न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूर्णीं बभूव ह ॥ ' [ गीता अ. २ श्लो. ९. ] ॥ ॥ एवं गुडाका निद्रा जे भ्रांती । ती नसे जयाच्या चित्तीं । तो ' गुडाकेश ' परी हे मती । प्रेरिली श्रीहृषीकेशें ॥ ७४ ॥ ऐसे समयीं दया मनीं । धरूनि परतणें युद्धापासुनी । यात अपकीर्ति परलोकहानी । हें काय न कळे अर्जुना ॥ ७५ ॥ ज्याणें जिंकिली भ्रांति निद्रा । त्या गुडाकेशा बुद्धिसमुद्रा । भ्रांति न ह्मणवे धृतराष्ट्रा नरेंद्रा । हा भाव सुचवी या नांवें ॥ ७६ ॥ एवं हृषीकेशकरणी । दया घातली अंतःकरणीं । त्याप्रति पूर्वोक्त वाणी । अर्जुन ऐशी बोलिला ॥ ७७ ॥ ऐसा अर्जुन गुडाकेशें । प्रार्थिला त्यानें हृषीकेशें । जगदुद्धार कृपालेशें । केलें तैसेंचि ॥ ७८ ॥ परम उत्तम तो रथ । जणूं हरिभक्ताचा मनोरथ । ज्यांत रथी जीवात्मा अतिरथ । सारथी स्वयें हृषीकेश ॥ ७९ ॥ दोहींकडे उभय दळ । मध्यें जें रिकामें स्थळ । तेथें तो रथोत्तम अचळ । उभा केला ॥ २८० ॥ स्थापूनि तेथें रथोत्तम । काय बोलेल सर्वोत्तम । तें वचन उत्तमोत्तम । ऐक सांगतो ॥ ८१ ( २४ ) ॥ हरिमुखचंद्रचकोर । भीष्म द्रोण राजे थोर थोर । त्यां सकळांही समोर । तो श्रीहृषीकेश बोलिला ॥ ८२ ॥ ' पार्था मिळाले जे जे हे । आणि या कुरूंतें पाहे ' । ऐसें बोलोनि उगा राहे । गहन भाव दाखवूनी ॥ ८३ ॥ दुष्टबुद्धि दुर्योधन । त्याकारणें मिळाले स्वजन । ह्मणोनि मागें ह्मणे अर्जुन । त्यास तैसेंचि दाखवी ॥ ७४ ॥ कीं पाहे या कुरूंतें । आणि भीष्मद्रोणादि गुरूंतें । दया उपजवूनि जगद्गुरूतें । असे गीता उपदेशणें ॥ ८५ ॥ आणि अर्जुनास ह्मणे पार्था । यातही सूचवी भावार्था । कीं कुंतीचें नांव पृथा । पार्थ ह्मणजे पृथापुत्र ॥ ८६ ॥ कीं राजपुरुषाचें क्रूर कर्म । दया स्वजनीं स्त्रियांचा धर्म । मातृगुण तेथें सगुणब्रह्म । स्वसामर्थ्यें उपजवी ॥ ८७ ॥ ' पार्था ' ह्मणोनि घननीळ । ह्मणे तो फिरे बुद्धीची कळ । ते या अडिचां श्लोकीं निखिल । संजय सांगतो ॥ ८८ ( २५ ) ॥ तो पृथेचा पुत्र पार्थ । ज्यास मातृगुणीं योजी समर्थ । जे तेथें मिळाले युद्धार्थ । त्यांतें पाहे ॥ ८९ ॥ तों चुलते पित्यासमान । आजे भीष्मादि गौरवनिधान । गुरु द्रोणादि जिहीं ज्ञान । दिधलें क्षात्रविद्येचें ॥ २९० ॥ शल्यादिक मातुळ । भाऊ पुतणे पुत्रचि केवळ । नातु कोंवळे किरळ[1] । सखे अश्वत्थामादिक ॥ ९१ ( २६ ) ॥ ऐसेच सासरे सोयरे । दोहीं सैन्यांत मरणार सारे । इतर राजे तेही बरे । हितकर्ते बंधुत्वें ॥ ९२ ॥ त्यांस देखोनि तो कौंतेय । कुंतीचा पुत्र जयास अव्ययि[2] । मातृगुणीं उपजवी निश्चय । होता जाला कृपाविष्ट ॥ ९३ ॥ युद्ध न करावे ह्मणुनि । विषाद उपजला मनीं । तो कृष्णास या वचनीं । विनवूं पाहे ॥ ९४ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

ऐसें बोलिलें अर्जुनें । मग काय केलें श्रीकृष्णें । दोही सैन्यांमध्यें ठेऊन । रथोत्तमातें ॥ ६४ ॥ भीष्म-

१ अंकुर. २ ईश्वर-कृष्ण.

द्रोणाचार्यां पाहतां । सर्व वीरांही देखतां । पार्थाप्रति कृष्ण बोलता । जाला ॥ ६५ ॥ समवेत ह्मणिजे मिळाले । मिळोनि जे कौरव आले । त्यांतें पाहिजे देखिले । पार्था ॥ ६६ ॥ मग तेथें राहिलेयांतें । पार्थ पाहाता जाला कौरवातें । पितरां आणि पितामहाते । पैं आचार्यांतें ॥ ६७ ॥ मातुळा आणि बंधूंतें । पुत्रां आणि त्या पितृव्यांतें । सखया आणि त्या श्वशुरांतें । आणि सुहृदांतें ॥ ६८ ॥ यांचां नामाचा अर्थु सांगतो । पितर ह्मणजे चुलते । पितामह भीष्मादिक ते । आचार्य द्रोणादिक ॥ ६९ ॥ मातुळ ते मातेचे भ्रातर । भ्रातर ते धार्तराष्ट्राचे पुत्र । पुत्र ते भावांचे पुत्र । आणि ॥ ७० ॥ पौत्र ते पुतण्यांचे लेक । सखे ते समानवयस्क । श्वशुर ह्मणिजे सम्यक । स्त्रीचे पितर ॥ ७१ ॥ सुहृद ह्मणिजे उपकार । नापेक्षित जे सोयरे । हे दोन्हीं सैन्यांमध्यें बरे । देखता जाला ॥ ७२ ॥ मग तो कुंतीनंदन । सर्वां बंधूंतें पाहोन । थोर व्यापला कृपेंकरून । विषाद करित ॥ ७३ ॥ होत्साता बोलता जाला । कंठु गहिवरें दाटला । तें मी सांगेन सकळां । श्रोतयां ॥ ७४ ॥

## निवृत्तिदेव

ऐसें बोलिला हृषीकेशाप्रति । गुडाकेश ह्मणिजे सुदार्पति । उभय सैन्यांमध्यें श्रीपति । स्थापिता जाहला रथु ॥ २४ ॥ भीष्म आणि द्रोणादेखत । सर्वही राजे असतां पाहात । पार्थाप्रति कृष्ण बोलता । जाला 'यांतें पाहे' ऐसा ॥ २५ ॥ पार्थें तया पितृव्या पितामहातें । आचार्या मातुलांतें । बंधु पुतणे नातुवांतें । अवघे सखे देखे ॥ २६ ॥ सुहृद आणि सासरे । दोन्ही दळीं असती सोइरे । सकळ बंधुवर्ग देख एकसरें । कौंतियासमान ॥२७॥ अर्जुन कृपाविष्ट होऊनि । खेदखिन्न झाला अंतःकरणीं । मग बोलतसे अभिवंदनी । श्रीकृष्णाप्रति ॥ २८ ॥

## उद्धवचिद्धन

सवाई:–

संजय सांगत यापरि श्रीहरि जो हृषिकेशि गुडारि वंदे ।
भारतिं पांडव वीर धनंजय वंदित प्रार्थितसे विशदें ॥
तो पुरुषोत्तम पार्थ नरोत्तम आणि रथोत्तम सैन्यमधें ।
स्थापुनि आपण पाहत अर्जुन दोन्हि दळीं अपुलीं सुहृदें ॥ २४ ॥
भीष्म अणी गुरु द्रोण प्रमूखहि भूप कितीक स्वदेशि विदेशी ।
साह्य करोनि सुयोधन सम्मुख पाहुनि कौरव ते निकरेशीं ॥
बोलत विस्मयमानस अर्जुन त्या दाळिं या दाळिं पाहे विशेषीं ।
तो अपुले अपणासाचि पाहत आपण होतिच आपण द्वेषी ॥ २५ ॥
पाहत पार्थ द्वयीं रणक्षेत्रिंहि कौरव पितृव्य गोत्रज ते ।
भीष्म पितामह द्रोण गुरू आणि मातुल शल्य सबांधव ते ॥
पुत्र सपौत्र सखे निजमित्र विरोध विचित्र असा दिसतो ।
आणिक पाहत दृष्टि उभारुनि सैनिक वारुनियां पर तो ॥ २६ ॥
तो सश्वेरा नृप द्रौपद सर्वहि आप्त समस्त उभे दिसताहे ।
कुंतिसुतें अवलोकुनि सर्वहि मोहितमानस सद्गदताहे ॥

१ आळसाला जिंकलेला. २ वंदन करून. ३ श्वशुर.

कोणि दुजें न दिसेचि तयाप्रति सूहृद या दळिं त्या दळिं पाहे ।
बंधुसमे दिनबंधुसि वंदुनि शंकित रंकपरी वदताहे ॥ २७ ॥
घात कुळाप्रति होत अशी मनिं ये करुणा कृपयापर जाला ।
सद्गद कंठहि कुंठित बोलत झेंडुच त्याप्रति दाटुनि आला ॥

## माधव—( तंजावर प्रत )

संजय ह्मणे राया भारता । हृषीकेश जो नाम धरिता । त्यासीं गुडाकेश बोलिला तत्वता । ने मध्यें रथा स्थीर माझ्या ॥ ६३ ॥ तो तयाची मानूनि वैखरी । उभय वाहिनींमाझारी । रथोत्तमें देवें तें अवसरीं । इच्छिल्यापरी स्थिर केला ॥ ६४ ॥ भीष्मद्रोण आणि प्रमुख । राजे लक्षीत असतां सकळिक । देव पार्थासी बोलिला वाक्य । 'कौरव निष्टंक मिळाले पाहे' ॥ ६५ ॥ येणें प्रकारें वाक्य बोलोनि । लक्षिता जाला परवाहिनी । आप्तचि देखिले दळीं दोनी । कोण कोण ते वाणी बोलावे आतां ॥ ६६ ॥ तेथें पार्थें लोचनीं निरखिले । पितृ आणि पितामहासी देखिले । गुरु मातुळ बंधूतें पाहिले । पुत्रपौत्रमेळे सखयांसी ॥ ६७ ॥ श्वशुर आणि सुहृद अति । उभय सेनेमाजी असती । त्यांतें कौंतेयें पाहिले निरुती । उभे असती स्वजन सर्व ॥ ६८ ॥ मग कृपेनें व्यापला पार्थ । विषादातें पावला अत्यंत । जाणोनि सर्वही निज आप्त । वदता मात्र तो जाहला ॥ ६९ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी. "

ऐसे हृषीकेशी आपण । गुडाकेशाचें वचन ऐकोन । दोन्ही सैन्यांमध्ये उत्तम रथ नेऊन । त्वरेनें जाण ठेविला ॥ ४५ ॥ भीष्मद्रोण मुख्यकरूनि । सर्व पृथ्वीचे राजे जाणोनि । हे मिळालेति कौरवांलागोनि । अर्जुन नयनीं पाहों लागला ॥ ४६ ॥ तेथें पार्थ सर्वांसि देखे । पितृ पितामह विशेखें । आचार्या मातुळ भ्रातृव्य अनेके । पुत्र पौत्र सखे देखिले ॥ ४७ ॥ श्वशुर सुहृद सर्वही । मिळालेति दोन्ही सैन्याचे ठायीं । कौंतेय देखता जाला पाही । इतर कोणि नाहीं सर्व बंधुवर्ग ॥ ४८ ॥ परम कृपावेष्टित अर्जुन । विशद बोलता जाला आपण ।

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

भुजंगप्रयातः— जितालस्य जो पार्थ तद्वाक्य ऐसें । रमानायके इंद्रियाच्या अधीशे ॥
नृपा ऐकुनी दों दळांमाजि तेणें । रथ स्थापिला अर्जुनाचा सुजाणें ॥ २७ ॥
इंद्रवज्राः— भीष्मादिकां सन्मुख त्या रथातें । करूनियां कृष्ण वदे नरातें ॥
पार्था विलोकीं मिनॅल्या कुरूंतें । पाहीं करी युद्ध निवांतचित्तें ॥ २८ ॥
रथोद्धताः— ते दळीं तंव विलोकिले नरें । सर्वही निजशरीर सोदरे ॥
बाप बंधु गुरु इष्टमित्रही । पुत्र पौत्र अणि तातताँतही ॥ २९ ॥
मालिनीः— मामे भाचे माउसे आणि साडू । गोडी ज्यांची जेंवि अन्नांत लाडू ॥
ऐशी जेव्हां दों दळीं दीठ घाली । मानी मांदी सोयऱ्याची मिळाली ॥ ३० ॥

१ मूर्च्छा. २ सैन्यांमध्यें. ३ जमलेल्या. ४ आजे. ५ मंडळी.

वसंततिलका:- लोणी जसें विघरतें अनळप्रसंगें । तैसें नृपा विघरलें मन बंधुयोगें ॥
तो जाहला परम खिन्न दया उदेली । कृष्णासि काय वदला तव पार्थ बोली ॥ ३१ ॥

## मुक्तेश्वर—"मुक्तेश्वरी"

अगा ये धृतराष्ट्राराया । ऐसें अर्जुन बोलोनियां । कृष्णें रथ नेऊनियां । दों सैन्यांत स्थापिला ॥ २४ ॥
भीष्ममुख्यकरूनी । पृथ्वीचे राजे मिळोनी । कौरव मिळाले देखोनी । अर्जुन पाहे तयांतें ॥ २५ ॥
पार्थ सकळही देखे । पितृव्य पितामह विशेखें । आचार्य भ्रातृपुत्र अनेकें । पुत्र सखे अवघेचि ॥२६॥
श्वशुर सोयरे दों सैन्यीं । बंधुवर्गांतें जाणोनी । कृपा उपजली मनीं । कौंतेय बोलों लागला ॥ २७ ॥

## तुकाराम--( पांडुरंगदास )

अभंगः- हृषीकेश गुडाकेशा । बोले ऐसें प्रार्थुनी ॥
भारतराया संजय बोले । प्रेमें डोले अंतरीं ॥
त्या दों सैन्यामध्यभागीं । रथ शारंगी करी उभा ॥
तुका ह्मणे विजयी रथ । विजयी पार्थ सांभाळी ॥ २२ ॥
समोर भीष्मद्रोणांच्या । भूपाळांच्या सन्मुख ॥
पार्थ पाहे ह्मणे यातें । मिळाले ते कुरुपति ॥
तेव्हां विभो कृष्णें मनीं । विचार ध्यानीं आणिला ॥
काहीं कौतुक दिसताहे । तुकया साह्य दीनबंधु ॥ २३ ॥
तो पार्थ पाहे चुलते । क्रोधें पित्त खवळले ॥
आजे त्यात तयाप्रती । नाहीं क्षिती उपमा ॥
गुरु मामे आणि भाऊ । आपुले जीऊ प्रत्यक्ष ॥
पुत्र पौत्र तयासही । तुका पाही त्यांपाठीं ॥ २४ ॥
सासरे सोयरे तेही । निःसंदेही जे उभे ॥
त्या दोहीं फौजेआत । युद्धख्यात लाविते ॥
कौंतेय देखोनियां । जीवा माया झळंबे ॥
बंधूंतेही रणांगणीं । तुका वाणी ज्यालागीं ॥ २५ ॥
कृपेकरूनि आविष्ट । परनिष्ठ भावार्थी ॥
ऐसा विषादें बोलिला । कृष्णा भला प्रार्थित ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्:-हृषीकेशा गुडाकेश प्रार्थिला जो असा नृपा । तों दों सैन्यमध्यभागीं तो स्थापूनि रथोत्तम ॥३८॥
समोर भीष्मद्रोणाच्या सर्व भूपाळसन्मुख । पार्था पाहे ह्मणे यांतें मिळाले जे कुरुप्रती ॥३९॥
तों पार्थ पाहे चुलते आजे जे त्यांत त्यांप्रती । गुरु मामे आणि भाऊ पुत्र पौत्र सख्यांसही ॥४०॥
सासऱ्या सोयऱ्यांतेही त्या दोन्ही सैन्यसागरीं । देखोनि पुत्र कुंतीचा बंधूंतें त्या रणांगणीं ॥४१॥
कृपेंकरूनि आविष्ट विषादें बोलिला असें ।

## मोरोपंत

आर्या:–

ऐकुनि ऐशा वचना युद्धीं जें बोलिला गुडाकेश ।
दोहीं सेनेमध्यें स्थापी नेऊन रथ हृषीकेश ॥ २४ ॥
भीष्मद्रोणासंनिध सर्व नृपांच्या समीप विश्वगुरू ।
बोले ऐसें पार्था आजि मिळाले पहाच सर्व कुरू ॥ २५ ॥
पाहे अर्जुन तेथें मातुल–आचार्य–पुत्र–पौत्रांतें ।
त्या पितृ–पितामहांतें बंधूंतें आणि इष्टमित्रांतें ॥ २६ ॥
श्वशुरांतें सुहृदांतें तेव्हां दोन्हीही सैन्यसिंधूंतें ।
कुंतीचा तो नंदन पाहुनियां सिद्ध सर्व बंधूंतें ॥ २७ ॥
मानुनि विषाद चित्तीं बोले होवोनियां कृपाव्याप्त ।
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
जोंचि हृषीकेश गुडाकेशें संप्रार्थिला असा भूपा ।
तों दों सेनांमध्यें स्थापुनियां त्या रथोत्तमा त्वरित ॥ ४२ ॥
त्या भीष्मद्रोणांच्या समोर सर्वां नृपांचियाहि पुढें ।
पार्था ह्मणे विलोकी तूं यांतें जे कुरूंप्रति मिळाले ॥ ४३ ॥
तों पार्थ ते विलोकी चुलते आजे तयांत जे त्यांतें ।
जे गुरु मामे भाऊ लेकां नाता सख्यांस आप्तांस ॥ ४४ ॥
श्वशुरांस सोयऱ्यासहि त्या दोन्ही सैन्यसागराआत ।
पाहुनि सुत कुंतीचा बंधूते त्या रणांगणीं नयनें ॥ ४५ ॥
साविष्टाचि करुणेनें झाला वदला असें विषादानें ।

## वामन—( द्विजोत्तम )

अगा धृतराष्ट्र राया । अर्जुनाचें वचन ऐकोनियां । दोनीं सैन्यांमाजि रथ ठेऊनियां । कृष्ण अर्जुनासि बोलता जाहला ॥२४॥ ' अगा ये वीरा अर्जुना । पाहे वो आतां भीष्मद्रोणा । आणिकही राजनंदना । येथें मिळालियातें ' ॥ २५ ॥ तंव दोन्ही सैन्याभीतरीं । अर्जुन देखता जाहला सोयरी । चुलते आणि श्वशुरि । मामे गुरु आणि बंधु ॥ २७ ॥ पुत्र पुतणे आणि नातु । सखे आप्त जे सोयरियाआंतु । देखोनि करि सिणतु । अर्जुन बोलता जाहला ॥ २७ ॥

**अर्जुन उवाचः–दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥२८॥**
**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।**
**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥**
**गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।**
**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥३०॥**

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥
न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।
किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥३२॥

अर्थः—"हे कृष्णा, युद्ध करण्याच्या उद्देशानें प्राप्त झालेल्या आपल्या बंधुसमुदायास पाहून माझी गात्रें गलित होतात; तोंड कोरडें पडतें; आणि माझ्या शरीराला कंप सुटून अंगावर रोमांच उभे राहतात. हातांतून गांडीव धनुष्य गळून पडतें; व सर्व अंगाचा दाह होतो; माझ्यानें उभें राहवत नाहीं; माझें मन जणूं काय भ्रमण करीत आहे; तसेंच, हे केशवा, मी विपरीत चिन्हें पहात आहे; म्हणून लढाईत स्वजनांना मारून कल्याण होईल असें मला दिसत नाहीं. हे कृष्णा, मला विजयाची इच्छा नाहीं; राज्याची अगर सुखाचीही पण इच्छा नाहीं. हे गोविंदा, आम्हांला राज्य घेऊन काय करावयाचें आहे? आणि सुखोपभोग अथवा जीवित तरी आमच्या काय उपयोगी?

**श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी )"**

तो ह्मणे अवधारी देवा । म्यां पाहिला हा मेळावा । तंव गोत्रवर्गु आघवा । देखिला एथ ॥ ९३ ॥ हे संग्रामीं उदित । जाहले असती कीर[१] समस्त । पण आपणपेया[२] उचित । केवीं होय ॥ ९४ ॥ येणें नांवेंचि नेणों कायी । मज आपणपें सर्वथा नाहीं । मन बुद्धि टायी । स्थिर नोहे ॥ ९५ ॥ देखे देह कापत । तोंड कसें कोरडें होत । विकळता उपजत । गात्रांसीही ॥ ९६ ॥ सर्वांगा कांटाळा[४] आला । अति संतापु उपनला । तेथ बेंबळ[५] हातु गेला । गांडिवाचा ॥ ९७ ॥ तें न धरतचि निष्ठिलें[६] । परि नेणोंचि हातोनि पडिलें । ऐसें हृदय अंस व्यापिलें । मोहें येणें ॥ ९८ ॥ जें वज्रापासोनि कठिण । दुर्धर अतिदारुण । तयाहून असाधारण । हें स्नेह नवल ॥ ९९ ॥ जेणें संग्रामीं हरु जिंकिला । निवात-कवचांचा[७] ठावो फेडिला । तो अर्जुन मोहें कवळिला । रणामाजी ॥ २०० ॥ जैसा भ्रमर भेदी कोडें । भलतैसें काष्ट कोरडें । परि कळिकेमाजी सांपडे । कोंवळिये ॥ १ ॥ तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परि तें कमळदळ चिरूं नेणें । तैसें कठिण कोवळेंपणें । स्नेह देखा ॥ २ ॥ हे आदिपुरुषाचि माया । ब्रह्मेयाही नयेचि आर्या[८] । ह्मणवूनि भुलविला ऐके राया । संजयो ह्मणे ॥ ३ ॥ अवधारी मग तो

१ समुदाय. २ खरें. ३ आपणाला. ४ कांटा. ५ अशक्त. ६ निसटलें. ७ निवात व कवच नांवाचे राक्षस. ८ स्वाधीन.

अर्जुनु । देखोनि सकळ स्वजनु । विसरला अभिमानु । संग्रामींचा ॥ ४ ॥ कैसी नेणों सदयता । उपनली तेथें चित्ता । मग ह्मणे कृष्णा आतां । नसिजे एथ ॥ ५ ॥ माझें अतिशय मन व्याकुळ । होतसे वाचा बरेंळ । जे वधावे हे सकळ । येणें नांवें ॥ ६ ॥ या कौरवां जरी वधावें । तरी युधिष्ठिरादिकां कां न वधावे । हे येरयेर आघवे । गोत्रज आमुचे ॥ ७ ॥ ह्मणोनि जळो हें झुंज । प्रत्यया न ये मज । एणें काय काज । महापापें ॥ ८ ॥ देवा बहुतापरी पाहतां । एथ वोखटें होईल झुंजतां । वर कांहीं चुकवितां । लाभु आथी ॥ ९ ॥ तया विजयवृत्ती कांहीं । मज सर्वथा काज नाहीं । एथ राज्य तरी कायी । हें पाहुनियां ॥ २१० ॥ या सकळातें वधावे । मग जे भोग भोगावे । ते जळोत आघवे । पार्थु ह्मणे ॥ ११ ॥ तेणें सुखेंविण होईल । तें भलतैसें साहिजेल । वरी जीवितही वेंचिजेल । याचिलागीं ॥ १२ ॥ परी यांसी घातु कीजे । मग आपण राज्यसुख भोगिजे । हें स्वप्नींही मन माझें । करूं न शके ॥ १३ ॥ तरी आह्मीं कां जन्मावे । कवणालागीं जियावे । जरी वडिलां या चिंतावे । विरुद्ध मनें ॥ १४ ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

दुःख होतसे माझिया गात्रांसी । मुख शोषते जी हृषिकेशी । कंप रोमांच आले आंगासी । ऐसी स्थिती जाली माझी ॥ २९ ॥ धनुष्य पडतें हातींहुनी । त्वचा धडधडी दीप्तिकरूनी । मी शक्त नव्हे राहावयालागुनी । मन माझें भ्रमतसे ॥ ३० ॥ आपुले स्वजन म्यां मारूनी । मज सुख व्हावें ऐसें नुपजे मनीं । विपरीत चिन्हें दिसतीं नयनीं । केशवराया मजप्रति ॥ ३१ ॥ कृष्णा मज विजयाची चाड नाहीं । आणि राज्यसुखाची गोडी कांहीं । राज्य आणि भोग सकळही । नलगे मज ॥ ३२ ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

अगा श्रीकृष्णा अवधारी वचन । युद्धीं उपस्थित हे स्वजन । देखोन मी खेदखिन्न । होतसे तो यापरी ॥ ५६ ( २८ ) ॥ विषादयोगें विकळता । विकळतायोगें गा भगवंता । पावताति विशीर्णतो । माझीं शरीराचीं गात्रें ॥ ५७ ॥ स्नेहयोगें शोक ममता । शोकयोगें उपजे संतापता । संतापयोगें सर्वथा । शुष्क होय मुख माझें ॥ ५८ ॥ स्वजनवध पाप भाविता । भय पावते होय चित्ता । भययोगें होय उपजता । कंपु माझे शरीरीं ॥ ५९ ॥ स्वजनवधक्रिया कश्मल । भावितांचि वाटे अमंगल । अमंगलत्वें येती प्रबळ । माझें शरीरीं रोमांच ॥ १६० ( २९ ) ॥ पूर्वोक्त विकळतायोगें पाहे । करींचें गांडीव धनुष्य गळताहे । त्वचा दह्यमान होये । पूर्वोक्त संतापयोगें ॥ ६१ ॥ एवं संताप भय विकळता । ये तिण्हीं येके ठायीं असतां । भ्रमभाव जाला उपजता । भ्रमें भ्रमलें माझें मन ॥ ६२ ॥ आतां ये संग्रामभूमीचे ठायीं । देवा मी राहो न शके कांहीं । मी वाहोनि तृष्णा–प्रवाहीं । वाउगाचि येथें आलों ॥ ६३ ( ३० ) ॥ अनिष्ट–सूचकें चिन्हें जरी । मी देखतु असे गा श्रीहरी । अतेव स्वजनातें मारून समरीं । सुख दृष्टीही देखेना ॥ ६४ ॥ राज्य आणि विषयभोग पाही । हा अभिलाष मज दाविसी कायी । तरी याची मज चाड नाहीं । हेंही पुढें बोलतसे ॥ ६५ ( ३१ ) ॥ अगा आइक कृष्णनाथा । मी जयातें नापेक्षी सर्वथा । राज्यातें वांछी ना सर्वथा । विषयसुखांत तोषीनों

१ बोबडी. २ अशक्तता. ३ मनस्ताप. ४ संतोष पावेना.

॥ ६६ ॥ गोविंदा तूं सत्य मानी वचन । मज राज्य काय प्रयोजन । अनेक विषयभोगेंकरून । काय कारण मज असे ॥ ६७ ॥ मज जीवितेंहीकरून कोण । काय चाड असे जाण । त्यालागीं असो हें युद्धाचें वेडेपण । येथूनि निघिजे हेंचि भलें ॥ ६८ ( ३२ ) ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

मग जो कुरुकुळविभूषण । काय बोलता जाला तो अर्जुन । ह्मणे कृष्णा म्यां देखिला स्वजन । युद्धालागून उदित असे ॥ ३६ (२८) ॥ स्वजनाचि देखोनियां श्रीपति । सर्व गात्रांसीचि खेदु होतसे अति । मुख कोरडें होत असे पुढतपुढती । श्रम अती मानूनियां ॥ ३७ ॥ आणिकेंही चिन्हें जीं कीं होती । तींही सागेन तुजप्रती । काहीं संतोष नुपजे चित्तीं । परिसे श्रीपती कथा माझी ॥ ३८ ॥ माझ्या सर्वांगासि कंपु सुटला । सर्वांग रोमांचित जाला । सर्व अवयवसमूह विव्हळितु ठेला । धैर्यमेळा विराला माझा ॥ ३९ (२९) ॥ हस्तांपासाव गाण्डीव गळालें । तेंही परि मज नाहीं कळलें । त्वचा दह्यमान अंतस्तापमेळें । संताप जळे शरीर माझें ॥ ५४० ॥ तंव अर्जुन ह्मणे श्रीकेशवा । मज सामर्थ्य नाहीं शरीर स्थिर करावया । मूर्च्छा येतसे देखोनि हा मेळावा । सांगे भावा कारणासी ॥४१॥ तरी माझें मन हें असे भ्रमत । काहीं विकारविशेष असे पावत । स्थिर करणें तरी शरीर मूर्च्छाभिभूत । ह्मणोनि निश्चित स्थिर नव्हे ॥ ४२(३०) ॥ मागुतें स्वस्थ करावया सामर्थ्य नाहीं । तयाचींही कारणें सांगों हीं जी कांहीं । दुःखसूचकें निमित्तें जवळीच पाहीं । उपजती सर्वही सर्वत्र ॥ ४३ ॥ जीं हीं विपरीत तीचि जी श्रीपती । वामनेत्रभुजादिक स्फुरताती । मी अनात्मवेत्ता शोक-निबंधन अती । क्लेश सर्वार्थी अनुभवितु ॥ ४४ ॥ तूं तरी कृष्णनामेंकरून । सदानंदस्वरूप ब्रह्म निर्गुण । यालागीं शोकमोह नाहींत तुजलागून । निखळ चैतन्य शुद्धबुद्ध तूं ॥ ४५ ॥ स्वजन सुहृद तरि तुज मज दोघांसी । समानाचि आहेती जी हृषीकेशी । परि तूं शोकमोहातें न स्पर्शिसी । सामर्थ्य धरिसी कृष्णनामें ॥ ४६ ॥ ह्मणोनि मजही तैसेंचि करावें । शोक मोह मज हो नेदावे । एवढें सामर्थ्यही तुज गांवें । असे स्वभावें केशवनामें ॥ ४७ ॥ ॥ व्युत्पत्ति ॥ को ब्रह्मा सृष्टिकर्ता ईशोरुद्रः संहर्ता तौ वात्यनुकंपतया गच्छतीति तद्व्युत्पत्तेः ॥ ॥ क ह्मणिजे ब्रह्मा सृष्टिकर्त्ता । ईशशब्दें महारुद्र सृष्टिसंहर्ता । दोहोंसि कृपेकरूनि जो प्रवेष्टिता । केशव सर्वथा त्यातें ह्मणिजेती ॥ ४८ ॥ ऐसयासि तुज सामर्थ्य असे । ह्मणोनि प्रार्थी मी सर्वांशें । दोही नामें व्याख्यान अनारिखें । तेंही परियसे सर्वेश्वरा ॥ ४९ ॥ भक्तांच्या दुःखातें तूं कर्षितु । ह्मणोनि कृष्णनामें बोलिजतु । केशिमुख्य दैत्य निर्दळितु । केशव ह्मणिजतु ययालागीं ॥ ५५० ॥ एवं सर्वप्रकारें भक्तांतें पाळिसी । नाना संकटांपासूनि रक्षिसी । तैसाचि माझाही शोक निवारिसी । दावी नामेंसिं संबोधनें ॥५१॥ एवं नाना बुद्धि दुश्चिन्हीं करूनियां देख । तत्वज्ञानाचा हा दावी प्रतिबंधक । श्रीकृष्णाप्रती निवेदिला स्वशोक । तेणें सम्यक विपरीत बोले ॥ ५२ ॥ ह्मणे जी श्रीकृष्णा परियेसीं । युद्धीं स्वजन संहारितां श्रेयासी । सर्वथा न देखे जी हृषीकेशी । सांगों तुझांसी विवंचूनी ॥ ५३ ॥ तरी श्रेय ह्मणिजे दृष्टादृष्ट पुरुषार्थ । दृष्ट ते इहलोकीं जगद्वंदित । तेणें जें कीं सुख अनुभवित । जें कीं प्राप्त स्वधर्माचरणें ॥ ५४ ॥ अदृष्ट तों स्वर्गादिसुखप्राप्ति । किंवा वैकुंठादिक लोक कां

१ संपूर्ण. २ भिन्न.

होय मुक्ति । तरी ये दोन्ही नसती । विचाराअंतीं पाहों जातां ॥ ५५ ॥ अनु ह्मणिजे विचारानंतरें । पाहों जातां श्रेय नाहींच निर्धारें । ह्मणोनि सुहृदवध हें पाप खरें । पाहे विचारें कृपानिधि ॥ ५६ ॥ अहो परावे वीर जे कीं असती । तेही संग्रामीं वधिजती । तरी पुरुषार्थ नाहींच जी सर्वार्थी । तेथ कोण गती स्वजनवधें ॥ ५७ ॥ ना तूं ऐसें ह्मणसी जी जरि कृष्णनाथा । जे परमगति असे युद्धीं मरतां । ऐसें शास्त्रही बोलत असे सर्वथा । वचन तत्वता परियेसी ॥ ५८ ॥ ॥ वाक्य ॥ द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमंडलभेदिनौ । परिव्राड्योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः ॥ ॥ यया लोकांचे ठायीं उत्तम जाण । दोघे पुरुष जाती सूर्यमंडळ भेदून । येकु तो योगयुक्त परिव्राजक[1] पूर्ण । संग्रामीं मरे तो दुसरा ॥ ५९ ॥ संग्रामीं सम्मुखा घायीं पडतां । तो तंव सूर्यमंडळ भेदूनि जातां । असो हे मरे तयासि गति ऐशी होतां । परी मारितां निश्चित सुकृत न पवे ॥ ५६० ॥ ऐसे परावे वधितां गति न पविजे । तेथ स्वजनवधें काय फळ पाविजे । हें मनींच श्रीकृष्णा विचारिजे । म्यां हें कीजे कर्म कैसें ॥ ६१ ॥ जैसें या कौरवांसीं युद्ध करावें । तैसेंचि पांडवांसीं कां न करावें । हे उभयतां सारखेचि स्वभावें । पाप जाणावे विचारितां ॥ ६२ ॥ येथ दृष्टादृष्टफळें न दिसती । ह्मणोनि युद्ध करावें जी सर्वार्थी । ना तूं ऐसें ह्मणसी त्रैलोक्यपती । न दिसे तुजप्रती अदृष्टफळ ॥ ६३ ॥ परि दृष्टफळें तरी बहुतें असती । तुज त्रैलोक्यांत होईल विजयप्राप्ति । आणि समुद्रवलयांकित राज्यसंपत्ति । सुखोन्नति पावसी तूं ॥६४॥ तरि हेंहि परियेसा जी जनार्दना । मज राज्याभिलाष नाहीं जाणा । देखोनि यया पापा उल्बणा[2] । शोकचि मना उपजतसे ॥ ६५ (३१) ॥ अर्जुन ह्मणे जी परियेसी गोविंदा । विजयराज्यादि न लगती संपदा । ययांचें कारण सांगेन मुकुंदा । मी तंव सर्वदा उदासीन ॥ ६६ ॥ तरी फळाकांक्षा हें प्रवृत्तीचें कारण । तरि फळाकांक्षाचि ही निर्वेटून[3] । ह्मणोनि फळाचे उपाय युद्ध जें जाण । तेथ मी उदासीन प्रवृत्ति नाहीं ॥ ६७ ॥ जैसें भोजनाची इच्छाचि नाहीं जयासी । तो काय प्रवर्तेल स्वयंपाकासी । कीं ग्रामांतरा न जाय तो मार्गासी । कासया लोकांसी पुसेल ॥ ६८ ॥ तैसें राज्यादिफळापेक्षा मज नाहीं । तरि तयाचा उपाय युद्धादि पाहीं । कासया करूं मी हिंसादि सर्वही । चाडचि नाहीं कासयाची ॥ ६९ ॥ यया कौरवांतें जिंतोनि । विजय इच्छावा आपणालागूनी । तरि विजयाचीच इच्छा भवेंसेनी । शार्ङ्गपाणी नाहींच मज ॥५७०॥ यया कौरवांतें जिंतोनि राज्य भोगूं । तो वाटत असे क्षयरोगु । भोगजनित सुख तें दुःखविभागु । मज उद्वेगु[4] तयाचाही ॥ ७१ ॥ अहो ययां सर्वांतेंही वधावें । मग हे राज्यभोग भोगावे । ते जळतु जी कृष्णा आघवे । मज स्वभावें नावडती ॥ ७२ ॥ मग तेणें राज्यभोगेंविण जें होईल । तें जीवितहि जरी माझें जाईल । तरी तें सर्वथा साहिजेल । परि हें अमंगळ नको कृष्णा ॥ ७३ ॥ अहो राज्यभोग आणि विजय जाण । हे नसतां आह्मीं सेविलें होतें अरण्य । जगांत श्लाघ्यचि होतो तेणेंचिकरून । ह्मणती धन्य सकाळिक ॥ ७४ ॥ आणि निरंतर करितां तुझें स्मरण । सर्वदा सुखामाजी होतो जी निमग्न । तेथ राज्यादिकीं कोण प्रयोजन । अनन्यशरण तुज आह्मी ॥ ७५ ॥ आणि तुझिया स्मरणाहूनियां जाण । राज्यविजय हे तृणासमान । तुझें स्मरण तें स्वाराज्य[5] पूर्ण । संसार जिंतोन विजय तोचि ॥ ७६ ॥ इतर राज्य विजय जे ह्मणती । ते सर्व तुच्छ स्वप्नतुल्य असती । हा माझा मनोभाव लक्ष्मीपती । तुज सर्वार्थी विदित असे ॥ ७७ ॥ तेंचि गोविंदा ऐसें तुझें संबोधन । करावया तरी हेंचि असें कारण । तरी गोशब्दें सर्व इंद्रियें जाण ।

१ संन्यासी. २ दळदळित. ३ नाहून. ४ कंटाळा. ५ स्वर्गाचें राज्य.

त्यांचें तूं अधिष्ठान जाणताही तूं ॥ ७८ ॥ सर्वही इंद्रियांचा प्रकाशिता । साक्षी होऊनियां जो अधिष्ठाता । अधिष्ठानत्वें नित्य प्राप्त असतां । जाणसी अनंता अंतर माझें ॥७९॥ या ऐहिक फळाची मज विरक्ति । आहे कीं नाहीं तुज लक्ष्मीपति । विदितचि आहे सर्व तुजप्रति । ह्मणोनि सर्वार्थी गोविंद ह्मणे ॥ ५८०॥ आतां राज्यादिकांच्या ठायीं तुच्छता । अतिवैराग्य कां उपजले चित्ता । तेंही कारण सांगेन कृष्णनाथा । देईं चित्ता मद्वचनासी ॥ ८१ ( ३२ ) ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

( अथ द्वितीय प्रकारः ) श्रीलक्ष्मीधराय नमः ॥ श्रीरमावल्लभाय नमः ॥ ॥ अर्जुन तो भगवद्भक्त । धर्मार्जुन धर्मरत । सैन्य देखूनि कृष्णाप्रत । बोलिला तें ऐकावें ॥ १ ( २८ ) ॥ अर्जुन ह्मणे देखिले स्वजन । युद्धास उदित त्याचें मन । परी मज बाणीं तर्जन[१] । करावेसे न वाटे ॥२॥ चकपक[२] गेली गा देहाची । गात्रें ढिलीं झालीं साची । कोरडी जाहली मुखाची । विचाराची वाढ खुंटली ॥ ३ ॥ शरीरास नव्हे धीर । हंरीख नये हाणाया तीरें[३] । का करूं यादववीर । कोण अकर्म ओढवलें ॥ ४ ( २९ ) ॥ धनुष्य हातीं गा बैसेना । त्वचा तापली निवेना । बाण कोणा हालवेना । मन भ्रमित जाहलें ॥ ५ ( ३० ) ॥ केशवा मज विपरीत चिन्हे दिसती । हर्ष नुपजे मनाप्रती । युद्धीं स्वजनां मारितां रति–।–मात्र श्रेय न दिसे मज ॥ ६ ॥ ये प्रथमाध्यायीं परमार्थ । नाहीं ह्मणाल यथार्थ । तरी तो साच श्लोकार्थ । सज्जनीं बरा विवरावा ॥ ७ ॥ राज्यभोगाचा सोहळा । मनीं नुपजे ज्या डोहळा । तोचि परमार्थी आगळा । अधिकारी जाणावा ॥ ८ ॥ जो विषयाचा स्वार्थ धरी । आणि स्वजनाचा घात करी । तो मुक्त नव्हे नरकाभीतरी । पडेल ऐसें सूचवी ॥ ९ ॥ गोत्रजांवरी हात न वाहे । कर्णव[४] अर्जुना येत आहे । तो प्रपंचस्वार्थ त्यजित पाहे । काय बोले कृष्णासी ॥ १० ( ३१ ) ॥ ह्मणे मी धनुर्विद्याविलासें । पावेन विजया अनायासें । परी कांक्षा[५] नाहीं विश्वासें[६] । मनांतून सर्वथा ॥ ११ ॥ नाहीं राज्याचें मज सुख । राज्याभिलाष धरी तो मूर्ख । राज्यांती परम दुःख । साच असे दयाळा ॥ १२ ॥ काय सुख विषयभोगाचें । भोगें प्राबल्य रोगाचें । रोगें विस्मरण योगाचें । जीव विसरले अधःपात ॥ १३ ॥ तूं गोविंद अंतरींचा । जाणता भाव चराचरींचा । असो अनुवाद वैखरीचा । मज चाड नाहीं जीविताची ॥ १४ ( ३२ ) ॥

## दासोपंत—" गीतार्णव "

[ हे कृष्ण ] अर्जुनु बोले श्रीकृष्णा । सकळश्रमनिवारणा । आत्मया रामा सनातना । आनंदरूपा ॥८७॥ संदेहसागरींचें तूं तारूं । अज्ञानां ज्ञानदिवाकरु । बुडतियांप्रति आधारु । तो दुजा नाहीं ॥ ८८ ॥ तरि हृदयस्थ सुख दुःख । कवणें विचारावे आइक । तूंचि तत्वतारक । तूंतेंचि सांगणें ॥ ८९ ॥ [ इमं स्वजनम् ] वैरभावें जे पाहिले । तुवां प्रत्यक्ष दाखविले । ते पाहतांचि वोळखिले । पारिखे नव्हे ॥ १५९० ॥ माझे बंधु माझे मित्र । माझे गुरु माझे गोत्र । माझे सुहृद समग्र । माझे जन ॥ ९१ ॥ [ युयुत्सुं समुपस्थितम् ] मजसीचि युद्धाकारणें । अपेक्षा करूनि मनें । उभे राहिले ते मी ह्मणें । माझे सर्व ॥ ९२ ॥ येक पुत्र येक पौत्र । येक बंधु येक मित्र । आर्य गुरु अपार । सुहृद सखे

---

१ मारणें; नाश. २ चपलता. ३ बाण. ४ कृपा; करुणा. ५ इच्छा. ६ खरोखर; निश्चयानें.

॥ ९३ ॥ दोहीं सैन्यीं पाहतां । माझे न लगे ममता । ऐसा येक निवडितां । नसे कोण्ही ॥ ९४ ॥ [ दृष्ट्वा ] आतां हे देखोनि दृष्टी । कवणु भाव माते उठी । तो श्रीरंगा जगजेठी । सांगैन मी ॥ ९५ ॥ कौरवांचां सम्यग्दर्शनीं । हा भाव उपजला अर्जुनीं । तो जाणतां सर्वज्ञीं । कैसा जाणावा ॥९६॥ अर्जुनु 'त्वं' पदार्थु निर्मळु । तो अविद्यागुणीं जाला शबळु । स्थूळदेहीं अभिमानशीळु । बाह्यार्थभोक्ता ॥ ९७ ॥ स्थूळीं जोडली अहंता । तीचेनि योगें तत्वता । उपजती जाली ममता । देहसंबंधिकां ठाईं ॥ ९८ ॥ देह होती देहापासूनि । देहीं आत्मबुद्धीतें कवळूनि । ते माझे पिते ह्मणौनि । ममत्वें मानी ॥ ९९ ॥ तया देहा जनक । ते आजे मानी लोक । तयांतेही पिते आणिक । ते पणजे कल्पी ॥ १६०० ॥ ऐसी वंशाची परंपरा । सृष्टि देखे सृष्टिद्वारा । भूतेंचि भूतां समग्रा-।-कारणें ॥१ ॥ माझा वंशु पवित्रु । पणजा आजा पितरु । अमुकें गोत्र प्रवरु । अमुका माझा ॥२॥ मग उदरपूर्ती लागूनि । जे विद्याभ्यासी जयांपासूनि । ते ते गुरूचि मानी । तारक आपुले ॥ ३ ॥ शुक्तिशकलाचां ठाईं । रजतबुद्धि जैसी कांहीं । तैसी असद्गुरूंचां ठाईं । भावना सद्गुरूची ॥ ४ ॥ देहाभिमानेकरून । ममत्वें मानिजे हेंचि भजन । माझे गुरु माझे पितृगण । इतुलेंचि मात्र ॥ ५ ॥ जीचां जन्मला उदरीं । देहो कर्मयोगें संसारीं । तेचि माता ययापरी । जाणे परंपरा ॥ ६ ॥ देहीं आत्मत्व मानी । ह्मणे हे माझी जननी । तिचेनि संबंधेंकरूनि । तीचि जनकें ॥७॥ अवघींचि ममत्वें सोषी । माझीं माझीं ह्मणे तयांसि । पराचें सुखदुःख आपणासि । लागे तेणें ॥ ८ ॥ माझी माता माझी आजी । मातुळादि अवघीं माझीं । आपणु तयांचां काजीं । विसरे स्वहित ॥ ९ ॥ बंधु मानी येकोदर । आणि पितृव्यांचे कुमर । मातृभगिनींचे समग्र । तैसेचि ते ॥ १६१० ॥ स्वशरीरापासाव जाले । ते पुत्र मानी आपुले । बंधूंपासाव जन्मले । ते पुतणे ह्मणे ॥ ११ ॥ पुत्रपुत्र ते पौत्र । ऐसे वंशींचे सान थोर । देहात्मभावें अनितर । माझे ह्मणे ॥ १२ ॥ देहा देहे प्रीतिकर्ता । तो प्रियु मित्रु तत्वता । ऐसियां बहुतांवरि ममता । योगें पसरे ॥ १३ ॥ हा माझा बाळमित्रु । मातें येणें केला उपकारु । तैसाचि म्यां या अपारु । पैला केला ॥१४॥ शरीरसंबंधें वनिता । तीचां ठाईं महा ममता । संबंधी तीकरितां । ते आपुले ह्मणे ॥ १५ ॥ स्त्रीचा पिता तो श्वशुरु । तैसाचि तद्बंधु इतरु । स्त्रीचा भाऊ येकोदरु । शाळा मानी ॥ १६ ॥ जेथ जेथ संबंधु करी । ते ते ममत्वेंचि सुहृद धरी । आत्मा देहसंगें बाहेरि । बांधला ममत्वें ॥१७॥ माझें क्षेत्र माझा ग्रामु । माझा देशु माझा आश्रमु । पशु पदार्थ द्रव्य धर्मु । सर्व माझें ह्मणे ॥ १८ ॥ देहीं अहंत्वें शिरकला । तो जनीं ममत्वें बांधला । स्वतंत्रु आपणु आपला । कैसा होईल ॥ १९ ॥ बांधला ममत्वें आथी । सांपडला बहुतां हातीं । तीं इच्छा आपुलिया नाचविती । करविती कर्में ॥१६२०॥ येकांचा जाला व्याही । येकांवरि करी साइं । येकांकारणें परि कांहीं । आपुलें नेणें ॥ २१ ॥ वारुवांपुढें धांवावें । उच्छिष्ट येकांचें खावें । हें येकांलागीं परि अघवें । आत्मार्थ नव्हे ॥ २२ ॥ येकांपुढें तिष्ठतु । मुखाची वास पाहतु । येकांचा ह्मणवी सुतु । येकांलागीं ॥२३॥ येकांतें वोपी प्राण । येकांचे साहे दंडण । येकांलागीं अन्न । प्राप्त करी ॥ २४ ॥ परिग्रहो तंव तंव हव्यासु । करूंचि पाहे आयासु। आयासु तंव तंव संतोषु । ममताबद्ध ॥२५॥ विदेशीं करी गमन । करी नीचाचें सेवन । तें कव्हणा येकांचिलागून । परि आत्मार्थ नव्हे ॥ २६ ॥ येकांचें द्रव्य चोरी । येकांचें सर्वस्व हरी । येकांचा वधु करी । पातेजौनी ॥ २७ ॥ विश्वासघातु प्रत्यक्षघातु । इतरार्थ करी समस्तु । येणें येकु आत्मघातु । तोचि जोडी ॥ २८ ॥ ममतेचा विषयो कायी । अहंता वैरिणी देहीं । ते करूं नये तें सर्वही । करवी कर्म ॥ २९ ॥ मित्रु होता तोचि वैरी । आपणु आपला संसारीं । हें अहं-ममत्व शरीरीं । येणें केला

॥ १६३० ॥ अहंत्वें बंधु शरीरीं । ममत्वें मोटका संसारीं । या दोहींपासाव सुटे तरि । आपणु मुक्तु ॥ ३१ ॥ ऐसा अहंत्वें कवळला । ममत्वें जनीं बांधला । जी अर्जुनु जाला । परातें वशु ॥ ३२ ॥ मग परकृपया व्याप्तु । परदुःखें दुःखवंतु । परचि जाला समस्तु । संगें संगीं ॥३३॥ पर देखोनियां कौरव । उपजले विषादस्वभाव । तेथिंचे इतर भाव । आत्मत्वेंचि स्फुरले ॥३४॥ कौरव सांगितले गुण । तयां-चेंचि व्यक्तपण । तें होऊनि इतर भान । आपण आभासलें ॥ ३५ ॥ कामुचि जाला पदार्थाकारें । क्रोधुचि वैरी होऊनि स्फुरे । ममता तेचि स्वजनाकारें । व्यक्त जाली ॥ ३६ ॥ तमोगुण रजोगुण । आणि देहींचें जी मीपण । तेंचि आत्मइतरभान । होऊनि आभासलें ॥ ३७ ॥ गुणु तोचि तेथींची अवस्था । अवस्थाचि प्रपंचु सर्वथा । जेथे जागृत होये भोक्ता । तेथें मान उठी ॥३८॥ ह्मणौनि कौरव तेचि असद्गुण । कौरव तेचि गोचरमान । आपुलें येक मीपण । सकळ विश्व ॥३९ ॥ मीपणाचेनि विलयें । द्वैतभान उरे काये । अहंता ममता जें होये । तें अविद्यक मीपण ॥ १६४० ॥ प्रापंचिका भेदनिरासा । सांडावी मीपणाची आशा । मग द्वैताभाव आपैसा । करणेंचि नलगे ॥४१॥ यापरी इतर भावें देखिले । ते कौरव गुण आपुले । मोहें हृदय व्यापिलें । जीवा अर्जुनाचें ॥ ४२ ॥ मग तो विषादातें पावोन । बोलता जाला वचन । अगा ये कृष्णा ह्मणौन । तेंचि कैसें ॥४३ (२८)॥ [ सीदंति मम गात्राणि ] अर्जुन ह्मणे श्रीकृष्णा । वैरभावें आलों रणा । तंव पाहतां येथ स्वजना । माझीं गात्रें ॥ ४४ ॥ विशीर्ण होत असती । कर पाद विकळ जाती । यया आंगांचें श्रीपति । पाणी जालें ॥ ४५ ॥ [ मुखं च परिशुष्यति] शोषोनि गेलें वदन । आलें रसने रुक्षपण । बोलतां नये वचन । ऐसें होतसे ॥४६॥ टव-टवी होती ते गेली । प्रेतकळा येती जाली । तूं बापु माझी माउली । आइकें कृष्णा ॥ ४७ ॥ [ मे शरीरे वेपथुश्च ] माझां शरीरीं उपजला । कंपु तो काहीं केला । न संवरेचि लागला । गात्रांतें बांधूं ॥ ४८ ॥ चळचळां कांपती हातपाये । हृदये तें स्पंदत आहे । चातुर्थक तरि नोहे । परि तैसें जालें ॥ ४९ ॥ [ रोमहर्षश्च जायते ] कांटाळे येती कणकणा । उठिती रोमांच सणसणा । मातें माझें आंगवेना । शरीर हें ॥ १६५० (२९) ॥ [ हस्ताद्गांडीवं स्रंसते ] सांवरूं किती देहभाव । धनुष्य हातींचें गांडीव । पाहें पां हस्तापासाव । पडत आहे ॥ ५१ ॥ कंपवातें हालया । काडी नुचले हस्तीं तयां । तेंवि गांडीव हें कृष्णराया । नागवे मातें ॥५२॥ [ त्वक्चैव परिदह्यते ] भाते लागले शरीरीं । त्वचा तापली लोहापरी । दाहो उपजला अंतरीं । बाहेरी अवघा ॥ ५३ ॥ [ न च शक्नोम्यवस्थातुम् ] पाहतां हिमाची हुडहुडी । कदळीं कापे थोडी । पवनु लागे आडी पाडी । ऐसें असतां ॥५४॥ शेवटीं शैत्य नाहीं शरीरीं । आगी जळे बाहिरी अंतरीं । गात्रें निवती जयापरी । तो उपाव नसे ॥ ५५ ॥ सर्वांग डव-डवीत स्वेदें जलें । आणि मुख तें कोरडे पडलें । व्याधीवीण ऐसें जालें । येणेंकरितां ॥ ५६ ॥ उभा राहावया मी असमर्थु । बैसोंही न शके नेटस्थु । मग ध्वजास्तंभीं टेंकतु । पाहे मुख ॥ ५७ ॥ तंव टेंकोनिही मातें न सवे । शरीर रथावरि पाडावे । तेंही परंतु जीवें । विचारिले ॥ ५८ ॥ बाह्यांतर जेथ विकळ । तेथ पडोनही नसवे केवळ । अपार लागली तळमळ । तीणेंकरितां ॥ ५९ ॥ प्राणुचि नेणें जाईल । स्थूळाचि माझें पडैल । मांडलें मरणमूळ । व्याधीवीण ॥ १६६० ॥ रण सांडूनि पळणें । कां येथेंचि प्राणु देणें । परंतु श्रीकृष्ण देहें येणें । न शके राहों ॥६१॥ [ भ्रमतीव च मे मनः ] भ्रमु उपजला मानसीं । विसरलों जी मी क्रियेसि । सुख नवटे जीवासि । विश्रांति नाहीं ॥ ६२ ॥ विचारु हरपला देहीं । मन न बैसे येके ठाईं । खान पडलें हृदयीं । धैर्य गेलें ॥ ६३ ॥ शूरत्वचि पडलें रणीं । तेजप्रतापु फुटला बाणीं । स्वजन देखोनि नयनीं । ऐसें जालें ॥ ६४ ॥ धृति धृति सांवडली ।

क्षात्रविद्या हारपली । क्षात्रव्रतें जळालीं । उरलें पळणें ॥ ६५ ॥ कठिणता उपजे शरीरीं । मोहाची उकळी ये भारी । स्वजन हे देखिलियावरी । ऐसें जालें ॥ ६६ ॥ वैरभावे वैरें मेले । भेदाचे थारे मोडले । कौरव हे बंधु आपुले । देखोनियां ॥ ६७ ॥ देखोनि तयां कौरवां । विषादु उपजला पांडवा । तेचि कथा अनुभवा । आणितां कैसी ॥ ६८ ॥ अहंता होती स्वस्थानीं । तेचि ममता विस्तारली जनीं । 'अहंमम' योगेंकरूनि । बंधन आत्मया ॥ ६९ ॥ भयाचेनि विच्छेदें । आत्मा स्वस्थु निजानंदें । सर्वत्रु येकु स्वयंबोधें । नित्यमुक्त ॥ १६७० ॥ ह्मणौनि ययाचा उच्छेदु । करणें हा मुख्य वादु । हेचि निष्ठा सिद्धु । साधकु साधी ॥ ७१ ॥ तरि अहं-दुर्योधनु येकला । तोचि कार्यभेदें भेदला । संघातु ह्मणौनि कल्पिला । कौरवाचा ॥७२॥ तेचि अहंत्व ममतारूपें । तैं तीं व्यक्तें कौरवस्वरूपें । इतरत्वें नामरूपें । धरूनि वर्तती ॥७३॥ काम, क्रोध, मद, मत्सर । दंभ, प्रापंचिक वीर । हे संबंधीचि समग्र । तयां कौरवाचे ॥७४॥ आतां हे अवघेचि मारावे । मग स्वस्थिता राज्य करावे । संग्रामीं यश पावावे । ऐसें अपेक्षूनि ॥ ७५ ॥ शुद्ध जीवु तो अर्जुन । आला संग्रामु अपेक्षून । वैरी अवलोकितां स्वजन । ऐसा आभासला ॥ ७६ ॥ आता तयाचा नाशु करणें । परम दुःख तेणें गुणें । पांडुनंदनातें माने । मग तो ह्मणे काये ॥७७॥ 'देवा मुरारी भवहरणा । मातें मारिता यया स्वजना । अहंममतारूपा आणि आना । कामक्रोधादिका ॥ ७८ ॥ गात्रें हीं पडती विकळें । युद्ध करणें कवणें बळें । करपाद येणें काळें । विशीर्ण होती ॥ ७९ ॥ ममता होतां निर्मूळ । उपेक्षणें पडैल स्थूल । मग जागृतीचें केवळ । कार्यचि नाहीं ॥ १६८० ॥ स्थूळें आणि जागरणेंवीण । व्यक्त नाहीं लिंग स्वप्न । यापरी देहद्वय गळोन । अवघेंचि जाये ॥८१॥ अभिमानातें नाशु करणें । तरि अभिमाननाशें तेणें । त्रिपुटीचा लोपु जाणणें । मग काये उरे ॥ ८२ ॥ ज्ञेय ज्ञान ना ज्ञातेपण । कर्ता ना कार्य कारण । देहद्वय अभावेन । अज्ञान उरे ॥ ८३ ॥ तैसाचि सांडावा कामु । तैं दंडावा करणधर्मु । कार्याचा नोहे उपक्रमु । कर्तृत्वनाशें ॥ ८४ ॥ कामहीना नाहीं ज्ञान । ज्ञानहीना ज्ञातेपण । तैं देहद्वयाभावें अज्ञान । तें बसवावें ॥ ८५ ॥ क्रोधाचा छेदु करितां । देहातें कवणु रक्षिता । भय काम क्रोध तत्त्वता । पालक स्थूळाचे ॥८६॥ मद मत्सर मारावे । ते तेजिती अभिमान जीवें । आतां अभिमाना पाडावे । याचिया वधा ॥८७॥ अभिमानु येता रणा । देहद्वयचि उरेना । आता वधावे रजोगुणा । द्रोणाचार्यातें ॥ ८८ ॥ तैं रजोगुणाचेनि मारें । इंद्रियां विषयो न स्फुरे । स्थूळ जागृती संहारे । प्रपंचज्ञान ॥ ८९ ॥ बाह्यप्रपंचज्ञानावीण । न उमटे लिंग स्वप्न । तें अज्ञानी होऊनि लीन । उगेचि असावे ॥ १६९० ॥ भीष्माचार्या तमोगुणा । केवळ मारावे आंगणा । तैं देहत्रयाची अभावना । सिद्ध होये ॥९१॥ आत्मज्ञानें येकेवीण । ययां कौरवांचें नाहीं दर्शन । मग अदर्शनें हनन । तें फावेचिना ॥९२॥ रज्जुस्थानीं सर्पु भासे । अदर्शनें तो नसे । तेथें देखतांचि असे । भाव तयाचा ॥ ९३ ॥ देखतां मृगजळ वाव । अदर्शनीं त्याचा भाव । शुक्तिखंडीं रजतभाव । तोही तैसाचि ॥९४॥ ज्ञानें नाशु तो नाशु । अज्ञानें ध्वंसही आभासु । यालागीं आपुला अप्रकाशु । जो प्रकाशु कौरवा ॥ ९५ ॥ आतां प्रापंचिकातें मारावे । तैं ते देहचि पाडावे । देहरक्षणीं अघवे । दक्ष ह्मणौनि ॥ ९६ ॥ यापरी हाणावा वैरी । तो घाव पडे देहद्वयावरी । आतां देहद्वयांचां संहारीं । होये कैसें ॥ ९७ ॥ कर्मयोगु जो कीं विराटु । तो प्राणाचा धरील वीटु । भक्तियोगु निकटु । तो दूरि पडैल ॥ ९८ ॥ भक्तियोगाचेनि हर्षें । कोठें वसावे परियसें । सत्संगा संतोषु नसे । देहद्वयेवीण ॥ ९९ ॥ अभ्यासयोगु रुसैल । वैराग्ययोगु भंगैल । सत्प्रेत्नु पळैल । आह्मांपासूनि ॥ १७०० ॥ धर्माधर्मविचारु । मग तो कैंचा वीरु । गुरु हा तूं सारंगधरु । दुरावसील ॥१॥

सेवा नमस्कार परिप्रश्न । करावे कैसें वाक्यश्रवण । साधन नानादर्शन । तेंचि दुर्लभ होईल ॥ २ ॥ तैं विविक्तात्मबोधु तो कैंचा । अभाव नव्हे प्रपंचाचा । स्वरूपसद्भाव आमुचा । तुझेनि तो ॥ ३ ॥ उपरमें कैसें जी होआवे । अन्वये पळोनि जावे । गुरूतें प्रसन्न करावें । हें जें नसे ॥ ४ ॥ तैं आत्मधर्मु ना आत्मयोगु । आत्मशुद्धतेचा न लभिजे भागु । आत्मविश्रामु ना अन्वयप्रसंगु । ऐसें होईल ॥ ५ ॥ यापरी कौरवांचेनि मारें । हित आह्मां न दिसे विचारें । आणि आह्मां ययां दुसरें । शरीर नाहीं ॥६ ॥ दुर्योधनु तो अभिमानु । आतां मजवेगळा मी मानू । तैं धिग्य हा प्राणु । राखोनि काये ॥ ७ ॥ अभिमानांश हे कौरव । माझे मीचि असे सर्व । दोघांचें विचारतां पूर्व । भेदु नाहीं ॥ ८ ॥ ययांचीं वृत्तिसंतानें । तीं माझीं कीं मज आनें । आतां ययाचेनि हननें । स्वयेंचि दुखविजे ॥ ९ ॥ गात्रें विकळें पडती । करणभाव माझे गळती । माझेनि कौरव दुखवती । ऐसें जाणोनियां ॥ १७१० ॥ माझें मी खातां मीपण । मग काये दावूं वदन । बोलतांचि नये वचन । येणें रीती ॥ ११ ॥ आपुला अभिमानु खाईजे । मग मुख कासया दाविजे । वदनकळा सहजें । शोषली यापरी ॥ १२ ॥ मातें मी जालों वैरी । उपजला कंपु शरीरीं । प्रकृति-गुणांचां संहारीं । चंचळ झाली ॥ १३ ॥ नाशु देखोनि साधनाचा । कांटाळे काया त्वचा । स्फुरण जालें रोमांचां । आंग तेणें ॥ १४ ॥ योगसंग्रामु जेणें करावा । तो आविद्युचि गुपे जीवा । कारणभावें यादवा । धनुष्य सुटे ॥ १५ ॥ अभिमाना करितां दहन । आगीं चढलें दीपन । आता त्याचेनि मरणे मरण । नये कैसं ॥ १६ ॥ आत्माभिमानहरासें । मातें राहवे येथ कैसें । योगयुद्ध अनायासें । पुरे झालें ॥ १७ ॥ माझें मीपण मज नाहीं । तैं उरोनि येर कायि । प्रमितु मी सर्वांविषयीं । येणें कार्याकार्य ॥ १८ ॥ संसारु ना परमार्थु । स्वस्वार्थु ना परस्वार्थु । रोकडा होये आत्मघातु । आपुलेन हातें ' ॥१९ ॥ गुणयुक्ता शबलातें । न छेदवे गुणबुद्धि-गुणांतें । तो पुटती अर्जुनु तेथें । काय ह्मणे ॥ १७२० (३०)॥ [ केशव ] 'चतुराननजन्म-स्थाना । लक्ष्मीनिवासिया नारायणा । अवधारी केशवा कृष्णा ' । अर्जुनु ह्मणे ॥ २१ ॥ [ आहवे ] 'हा संग्रामु अति दुस्तरु । वोढवला अति भयंकरु । काळरूप महाउग्रु । ययाचां ठाईं ॥ २२ ॥ [ स्वजनम् ] वैरभावातें आश्रयून । युद्धा आले हे माझेचि जन । पूर्वज आणि संतान । ऐसियां ययातें ॥ २३ ॥ [ हत्वा ] मारावे आपुलेनि हातें । यया राज्याचेनि स्वार्थें । परंतु मारूनि तेथें । यया सर्वा ॥ २४ ॥ [ न च श्रेयोऽनुपश्यामि ] श्रेय कांहीं दृष्टी न पडे । जेणें आपुलें हित जोडे । परंतु आन येक निवाडें । वधें ययाचेनि ॥ २५ ॥ [ विपरीतानि निमित्तानि च पश्यामि ] उपराटीं गा लक्ष्मीपति । निमित्यें तेंचि दृष्टीं पडती । इहपरलोकीं अपकीर्ति । तेचि जोडे ॥ २६ ॥ अर्जुनें गोत्रवधु केला । हा बोलु नव्हे धाकुला । वंशीं दोषु आरोपला । फिटे कैसेनि ॥ २७ ॥ गुरुहत्यारा हा अर्जुनु । जाणता नेणता ह्मणैल जनु । तेणें काळें देणें प्राणु । ऐसें वाटैल ॥ २८ ॥ आजा अर्जुनें वधिला । जन्में हा कळंकु लागला । चिरकाळ पुढें उरला । हाचि बोलु ॥ २९ ॥ अर्जुनें मारिलें पुत्र । राज्याभिलाषें पौत्र । ऐसिये अकीर्तीचे डोंगर । किती निस्तरावे ॥ १७३० ॥ इतुलें सांडोनि कांहीं । जोडिलें ह्मणों तरि तें नाहीं । जेणें आपुलें कांहीं । बरवें दिसे ॥ ३१ ॥ परलोकविरुद्ध कर्म । इहलोकदूषित धर्म । मातें घडलें कुकर्म । महापाप ॥ ३२ ॥ यापरी स्वजन मारूनि रणीं । उपराटीं निमित्यांचिया चूनि । दाविजे मिरविजे ऐसी करणी । कांहींचि न जोडे ॥ ३३ ॥ पापसंग्रहो जोडिला । थोरु पुरुषार्थु केला । लोक ह्मणती भला । कुळघातकी मातें ' ॥३४॥ ऐसें अर्जुनाचें बोलणें । परमार्थें कैसें घेणें । तें साहित्य आइकणें । जाणतां जनीं ॥ ३५ ॥ शुद्ध जीवात्मा केवळु । तोचि

अविद्यागुणीं शबळु । खेळतु असतां खेळु । अहंममतेचा ॥ ३६ ॥ विषयीं आसक्ति अतिमानें । स्वपरदेहीं बहुगुणें । वर्ततां प्रीति मनें । सुटेचिना ॥ ३७ ॥ काम क्रोध मद मत्सर । दंभ प्रापंचिक अपार । भावनाशक समग्र । ते आंगीं जया ॥ ३८ ॥ ऐसा कर्मबद्धु देहबद्धु । वासनाबद्धु गुणबद्धु । संसारभ्रमीं ममताबद्धु । अर्जुनु तो ॥ ३९ ॥ गुरूचें सान्निध्य पावला । तोचि कृष्णु सारथी भला । तोंचि कौरवभारु देखिला । स्वरूपलोभकु ॥ १७४० ॥ तो संग्रामु योगसंग्रामु । अर्जुना तया मानें दुर्गमु । भावी बाधक शमु दमु । जो गुणांचा ॥ ४१ ॥ मग गुणदृष्टी चेतला । गुरु सारथी कृष्णु भला । तेणेंसी बोलता जाला । 'केशवा' ह्मणौनि ॥४२॥ 'योगसंग्रामु हा दारुणु । येथ योद्धा मी आपणु । मातें वैरी तो स्वजनु । माझेंचि कुळ ॥४३ ॥ माझा अभिमानु प्रतापु । कामु क्रोधु आटोपु । माझा प्रपंचु सुखरूपु । विषयाकारत्वें ॥ ४४ ॥ कार्याकार्यी प्रवर्ततां । माझें अभिमान मीचि सर्वथा । प्रतिष्ठा पदवी मान्यता । माझा डंबु[1] ॥ ४५ ॥ मी करितां माझा मत्सरु । मीं करितो मदु मत्परु । मीं करितों समग्रु । भाव माझा ॥ ४६ ॥ रज सत्व आणि तम । माझिये प्रकृतीचे धर्म । कर्ता मी कार्य क्रमण । वर्म सकल माझें ॥ ४७ ॥ ऐसे माझे प्रकृत भाव । तेचि मातें वैरी कौरव । ये योग-संग्रामीं सर्व । मारावे हे ॥ ४८ ॥ तरी रणीं मारूनि ययांतें । श्रेय काहीं न दिसे मातें । उपराटीं निमित्तें बहुतें । तींचि आभासती ॥ ४९ ॥ मारिले म्यां या रजोगुणा । इतुलेनि मीचि पडलों उणा । परंतु तेणें लाभु मना । नये दिसों ॥ १७५० ॥ रजोगुणाचेनि अभावें । विषय कैसें म्यां भोगावे । प्रपंच मान जाणावे । हेंचि न घडे ॥ ५१ ॥ इंद्रिया आली जडता । प्राण पागुळले वाहतां । ऐसेनि येणें चित्ता । कवणु संतोषु ॥ ५२ ॥ देहचि कैसें सांवरावे । जागृती भुलिजे स्वभावें । इतुलेन अहि-तचि जाणवे । परि हित तें नाहीं ॥ ५३ ॥ आपुला अभिमानु सांडितां । मग उरलें जिणें तें वृथा । पांच पांच टोले भलयता । नेघे कां मग ॥ ५४ ॥ मारितेन सुखें मारावे । विटंबितेन विटंबावे । येणें अहंत्यागें वरवे । माझें कायें ॥५५॥ यश कीर्ति जयो जोडी । कवणें भोगावी आवडी । कर्माकर्मीं वरपडी । कैंची मग ॥ ५६ ॥ आपुला आपुणु राखावा । कीं अभिमानु धुळी मेळवावा । हांसावया ठाव करावा । माणुसांतें ॥ ५७ ॥ क्रोधु वैरियांचा वैरी । तया तें मारणहारु मारी । मग अरिकुळांचां घरीं । पाणी तावावें ॥ ५८ ॥ क्रोधहीना नाहीं जाण । नव्हे देहाचें लक्षण । बाधा दुसरेयांपासून । नित्य होये ॥ ५९ ॥ क्रोधें सुटला नरु । व्याघ्रु तोही मांजरु । ना चित्रींचा विखारु । चढे ना उतरे ॥ १७६० ॥ आत्मकाम पूर्ण करावे । आपणा ऐसेंचि बरें । तैं व्यर्थ करूनि मारावे । वैरियें कीं ॥ ६१ ॥ आतां कामातें मी करिता । आपुला वैरी तत्वता । सर्व काळ निराशता । स्वभावें होये ॥ ६२ ॥ सकळ काम पुरती । तैं देखिजे जे महंती । ते न साहे आपणांप्रति । आपुली जे ॥ ६३ ॥ तैं आपुलिया इष्टा नाशु । अरिष्टकर्ता पुरुषु । आपणुचि मानहरासु[2] । आपुला करी ॥ ६४ ॥ ऐसे जे आपुले गुणभाव । ते पोषावे आपणाचि सर्व । जयांचेनि स्वमेव । आपणु सुखी ॥ ६५ ॥ ना ते आपु-लिये जननें । आपणा लाविले नारायणें । ऐसियां तयांतें होणे । तो आत्मघातकी खरा ॥ ६६ ॥ केतकीदळ सकुमार । तयातें रक्षक पदर । न लगावे वैरियांचे कर । सहसा ह्मणौनि ॥ ६७ ॥ परिमलु तो आंतुलैकडे । आच्छादूनि केवडे । हातु लावितांचि वोरखडे । ऐसे वाढती ॥ ६८ ॥ तें सकंटक वासहीन । बाहेरि नसतें आवरण । तैं कोमळ दळ तें कवण । सोडूनि जाते ॥ ६९ ॥

---

१ मोठेपणा. २ माननाश.

भक्षण करिते पशु । गोवळां होता उल्लासु । तैसा आत्मगुणु विशेषु । आपणा रक्षी ॥ १७७० ॥ नारिकेलांचीं आवरणें । तींचि तेणें न साहणें । तरि रासभा मुखीं चूर्णें । आपुलीं करावीं ॥ ७१ ॥ फणसाबाहेरि आवरण । तें हो स्वादहीन विवर्ण । तरिचि अंतरीं जतन । गोडियेची ॥ ७२ ॥ असो आपुलिया गुणां । मारूं योगयुद्धें कृष्णा । तरि मीचि पडलों उणा । श्रेय न देखें ॥ ७३ ॥ अरिष्टें तींचि दिसती । ऐसा विचारु आथी । ह्मणौनि आपुली याति । मारीना मी ॥ ७४ (३१) ॥

[ हे कृष्ण ] अवधारी गा श्रीकृष्णा ' । अर्जुनु ह्मणे ' नारायणा । आतां ह्याचि निर्धारु मना । माझारि माझया ॥ ७५ ॥ [ विजयं न काक्षे ] गुरुगोत्रांचा करूनि क्षयो । जाला जो मातें विजयो । नाहीं मज तयाचा विषयो । नापेक्षीं तो ॥ ७६ ॥ येणें विजयेवीण तुह्मासि । राज्य नाहीं ऐसें ह्मणसी । तरि विनंति माझी परियसीं । वासुदेवा ॥ ७७ ॥ [ न च राज्यम् ] तरि मारूनि स्वजनातें । आणि पावोनि जयातें । राज्य जोडावें तरि तें । राज्यही नापेक्षी ॥ ७८ ॥ राज्याचिये उपलब्धीवीण । सुखांचें नाहीं जनन । ऐसें तूं जें वचन । बोलसी कृष्णा ॥ ७९ ॥ [ सुखानि च ] तरि आपुलै स्वजन मारावे । मारूनि राज्य पावावें । मग राज्यद्वारा भोगावे । विविध सुख ॥ १७८० ॥ तीं सुखेंही मी नाना । नापेक्षीं गा जनार्दना । न मारूनि आपुलिया जनां । असेन सुखाभावें ॥ ८१ ॥ [ हे गोविंद ] अवधारी गोवर्धनधरा । गोविंदा अजा ईश्वरा । तूं हृदयस्थु दातारा । आत्मा सर्वां ॥८२॥ मनादिइंद्रियसाक्षी । देवा तूं विश्वकुक्षी । तुजप्रति सांगणें प्रत्यक्षी । हेचि काथि ॥८३॥ आह्मीं मनोगत सांगावें । ते पूर्वीचि तूंतें ठावें । आतां मनाचां स्वभावें । तरि बोलिजैल ॥ ८४ ॥

(१) [ नः ] गुरुघातकी गोत्रघातकी । ये येसणे पुरत्रयीं पातकी । राज्य करून तऱ्ही कीं । ऐसिया आमुतें ॥८५॥ [ राज्येन किम् ] राज्यें तेणें कवण हित । परलोकीं काय प्राप्त । सांगा तें नये वित्त । जोडिलें हें॥८६॥ प्राचीन तेंचि भोगावे । हें न चुके जैं स्वभावें । तैं राज्यें अपार करावे । आतां काये ॥८७॥ येकलें उपजणें मरणें । जी जे तंव देहें येणें । आपुलाचि आहारु घेणें । ऐसें असता ॥ ८८ ॥ अपारें राज्यें कवणु । आमुतें आता प्रयोजनु । प्राचीन सारावें भोगूनु । इतुलेंचि मात्र ॥ ८९ ॥ अपार मीनती जीव । ते आपुलेन प्राचीनें सर्व । त्यांमाजी राजा स्वमेव । माणुस येक ॥१७९०॥ अवघियां सारिखेंचि अन्नपान । निद्रा जागृति जिणें मरण । राज्य भोगिती बहुत जण । आपुलालेन प्राचीनें ॥ ९१ ॥ अश्वभागु अश्वीं नेणें । गजभागु गजा देणें । नरभागु नराकारणें । वाटवांचि तो ॥ ९२ ॥ चोरभागु तो चोराचा । मृत्तिकेतें भागु मृत्तिकेचा । देवभागु देवांचा । तयामाजि ॥ ९३ ॥ मुखक मक्षिका मत्कुण । विभागू नेती सकळ जण । राजाआदि समान । भोग सारिखे ॥ ९४ ॥ द्रव्यादि पदार्थ देखणें । सारिखेंचि सर्वाकारणें । स्पर्शे अनुभव घेणें । सारिखाचि तो ॥ ९५ ॥ नाद आइकती अपूर्व । तेही सारिखेचि सर्व । स्त्रीसुखाचे अनुभव । समान तेही ॥ ९६ ॥ रस सारिखेचि जाणणें । तैसेंचि गंध अनुभवणें । प्राचीन भोग सारणें । सारिखेंचि ॥ ९७ ॥ अनिवार साही विकार । अंतीं नाशे शरीर । व्याधि आधि निरंतर । सारिखींचि भोगणें ॥ ९८ ॥ राजा तो कासेन आगळा । विचारीं पा गोपाळा । राज्यभोगु सकळा । सारिखा जैं ॥ ९९ ॥ तरि अहंता आणि ममता । यिया दोहींची परिपुष्टता । इतुलेनीचि सर्वथा । राजा श्रेष्ठ ॥ १८०० ॥ मी राजा हें सर्व माझें । ऐसें अहंतेममतेचें वोझें । जयाचां ग्यांदीं साजे । तोचि राजा ॥ १ ॥ तरि आगळी असोनि अहंता । ते पुरवी कवणा स्वार्था । कल्पनाचि मात्र कीं अनंता । आणिक कांहीं ॥ २ ॥ कव्हणी ऐक दुर्बळु जनु । तैसाचि

धरि अभिमानु । तैं तो आणि तो समानु । कसेन होती ॥३॥ राजवेषें नटे नटिया । जितुला फुगारा अनुभवु तया । तितुलाचि तया राया । परि आगळा नसे ॥ ४ ॥ तयातें नाहीं नित्यता । ऐसें बोलसील अनंता । तरि ययाचियाही नित्यता । अभिमाना कैंची ॥ ५ ॥ राज्याचा भ्रंशु होये ; तैं तो अभिमानु काये राहे । स्वप्नीं सुषुप्ति नये । सर्वथैव.॥ ६ ॥ जागृतीही नाहीं नित्यपण । जेणें कल्पूनि धरावें तें मन । अति चंचळ ह्मणौन । अभिमानु न थारे ॥ ७ ॥ निमिषोन्मेषीं असे कां नसे । अभिमाना नित्यपण ऐसें । आतां मरणीं केवळ विनाशे । नाहीं पुढती ॥८॥ आतां ममतेचेनि आंगें । अभिमानु सुखाचा लागे । ते खोटी प्रसंगें । तरि मायिक ममता ॥ ९ ॥ द्रव्याचिया राशी । तेथें ममता रायासि । परि तें सर्वथा तयासि । भोगा नये ॥ १८१० ॥ भोगीचि तैं तें बहुतांचें । विभाग समस्तां जीवाचे । ठेवी तैं आणिकाचें । देहपातानंतरें ॥ ११ ॥ जयाचे तया देखतां । तें द्रव्य होये आणिकु भोगिता । तेथें हा धरी ममता । तैं नाशु पावे ॥ १२ ॥ द्रव्य सर्वथा बलवंताचें । तैं तें कैसें येकाचें । महा ममत्व तेथीचें । तें काये करी ॥१३॥ भय उपजवी पिसें लावी । समयीं हांसवी रडवी । चिंताचि पुरुष अनुभवी । परि तें पराचें ॥१४॥ भोगितां ठेविता परावें । देतां कां आपुलें नव्हे । तरि भलतया नेदवे । काये ह्मणौनि ॥१५॥ स्वभृत्यातेंचि देणें । तरि विभागीचि तो मानणें । धर्मु येका करणें । तो विभागु तयाचा ॥१६॥ विभागी तोचि मागैल । विभागी तोचि लाहील । विभागी नव्हे तया देईल । राजा कवणाचें ॥ १७ ॥ ह्मणौन द्रव्य अव्यय ईश्वराचें । पाळण करी भूताचें । तेथें ममत्व येकाचें । ते कल्पना खोटी ॥१८॥ परद्रव्यीं ममता धरणें । कवणा नटकें हें येसणें । राजाचि आगळा कवणें । प्रकारें येकु ॥ १९ ॥ राज्यलेणें जायाचें । मरणापुढें हें कैंचें । मरणापूर्वी येकाचें । नव्हे सर्वथा ॥ १८२० ॥ द्रव्य तैसीचि दारा । बळवंतें नेलिया घरा । माझी ह्मणता शिरा । छेदु पावे ॥ २१ ॥ पुत्रादिपदार्थ सकळ । परावें जाणता केवळ । 'अहंममता' हें मायाजाल । ईश्वरें प्रेरिलें ॥२२ तरि राज्य कवणाचें । येणें हित काये आमुचें । वोझें अहंममतेचें । वाहवे व्यर्थ ॥ २३ ॥ समस्तांवरि माझी सत्ता । हेंही न घडे सर्वथा । माझां राज्यीं मीचि कर्ता । हें साच जैं ॥ २४ ॥ तैं न पिकती पिकवावी मेदिनी । पर्वताचें करावे पाणी । आगि जाळावी इंधनीं । करावी भस्म ॥ २५ ॥ लावावा व्योमातें अनळु । करावा जळाहूनि शीतळु । सूर्यो जळचरां काळु । तो कां तपो ॥२६॥ कवणाचे निवारी मरण । चुकवी कवणाचें पतन । मुक्ता करी बंधन । कीं बद्धा मुक्ति दे ॥ २७ ॥ आधिव्याधिपरिहारु । माझा मी शके करूं । तो सकळां भूतांचा ईश्वरु । कैसेनि होईना ॥२८॥ पुरत्रयींची राणीव । भगवंता तुझी सर्व । आह्मी पराधीन स्वमेव । स्वतंत्र नहों ॥ २९ ॥ आतां कल्पनाचि वाढवणें । ममताचि पुष्ट करणें । तरि अकीर्तिकरें राज्यें येणें । लाभु कवणु ॥ १८३० ॥ येणें मोक्ष कीं आत्महित । इष्टप्राप्ति अरिष्टच्छेदन मत । यालागीं राज्यकरूनि स्वहित । काये असे ॥ ३१ ॥ तूं ह्मणसी देवा वचन । विषयभोग येणेंकरून । ते यथेष्ट आपण । अनुभवा आणावे ॥ ३२ ॥ [ भोगैः किम् ] विषयभोग अपार । ययांतें पावलें शरीर । तथापि तेहां भोगीं साचार । काये आमुतें ॥ ३३ ॥ वासु घेऊनि पुष्प टाकिलें । तेथें घ्राणीं काये उरलें । भूतीं भूत परीक्षिलें । लाभु कवणु ॥ ३४ ॥ साही रसांतें जाणोनि । उरली रसना स्वस्थानीं । तेथें नित्य उरलें तेणेंकरूनि । तेंचि काये ॥३५॥ उर्वशी ऐसिया भोगितां । तो भोगु सेवटा जातां । उरला लाभु कवणु तत्वता । आपुलां आंगीं ॥ ३६ ॥ उत्तमें वस्त्रें लेइला । मग तीं फेडूनि लाभु पाहिला । तंव दाविजे मिरविजेसा उरला । नाहीं अर्थु ॥ ३७ ॥ उत्तम गंधविलेपन । सुमनमाळांचें भूषण । अंतीं लाभु तेणेंकरून । तो कायी जाला ॥ ३८ ॥ उत्तम आइ-

किलीं गायनें । वाद्यें चतुर्विधें आणि तानें । अंतीं लाभु तेणें । तो काये उरला ॥ ३९ ॥ द्दष्टीं देखोनि पुरिलें । तें पोटांतु नाहीं गेले । मेलियां तेणें द्रव्यें आपुलें । हित कवण ॥ १८४० ॥ गज रथ नर वारु । येरही पदार्थु अपारु । पशु वस्त्रें धान्यप्रकारु । ययाही वेगळा ॥४१॥ ययांचेनि दर्शनें स्पर्शनें । लाभु काये आपणाकारणें । मरतां येकलेनि जाणें । मग तें कवणाचे ॥ ४२ ॥ उपजला तैसाचि मेला । वाउगाचि मध्यें गलबला । ममत्वें अहंत्वें कैला । तो लाभेवीण ॥ ४३ ॥ पाषाणाची प्रतिमा केली । षोडशोपचारित्वें पूजिली । तीतें निश्चित जोडी जाली । कवणा अर्थाची ॥ ४४ ॥ सुकोनि गेलीं तीं सुमनें । वाहोनि गेलीं जीवनें । वाळोनि उडालीं चंदनें । राहातीचिना ॥ ४५ ॥ ठेविले नेले नैवेद्य । नमस्कारीं काये साध्य । दीप लागले साध्य बोध्य । काये तेणें ॥४६॥ कांहींचि न भोगे पाषाणा । तैसेचि ना भोगीं आपणा । ज्ञानक्रिया वासना । तोचि आगळी ॥४७॥ ज्ञान कर्म वासना तीन्ही । मनुजा असती नसती पाषाणीं । परंतु संप्राप्ति निर्वाणीं । सारिखीचि ते ॥ १८५० ॥ आला भोगु तो जाणोनि । वासना धरावी मागुतेनि । मग ते पुरवावयालागुनि । करणी करावी ॥ ५१ ॥ जाणोनि काये आलें । भूतीं भूतां वोळखिलें । स्थूळ सूक्ष्म मीनलें । आपुलाले याती ॥५२॥ उरली भोगाची केवळ । वासना तीचें काये फळ । उगीचि लागे तळमळ । हानिलाभाची ॥ ५३ ॥ तिये वासनेचेचि आंगें । क्रियाचि दाढो लागे । श्रमु तो क्रिये आंगें । वाउगाचि ॥ ५४ ॥ तेणें श्रमें सुख दुःख । तयाचें पाहवे मात्र मुख । परि तेणें आपणा आणिक । काय जोडे ॥ ५५ ॥ यापरी विषय भोगितां । आत्म स्वार्थु नाहीं अनंता । देहरक्षणमात्र समस्तां । साध्य येक ॥ ५६ ॥ या देहरक्षणाकारणें । इतुलें राज्य काये करणें । आयासें ग्रासु मेळवणें । तेंचि उदंड ॥ ५७ ॥ पाप कासया आचरावे । यश कासया इच्छावें । राज्य काये करावें । अल्पासाठीं ॥ ५८ ॥ आतां तें देहरक्षण । तयाचें ह्मणसी हें साधन । तैं ऐसेनि देहरक्षणें । करूं वासुदेवा ॥ ५९ ॥ [ जीवितेनवा ] जिणें तेंही मी नापेक्षीं । मरण वरि बरें लक्षीं । पापें जिणें प्रत्यक्षीं । तें काये नित्य ॥ १८६० ॥ तये पुढती न चुके मरण । मेलिया पापफळ दारुण । तया अनिवाराचें निवारण । कवणें करावे ॥ ६१ ॥ सदन्नें पोसलें मांस । तें इंधन जालें अग्नीस । व्याघ्रां श्वानां जंबुकांस । काजा आलें ॥ ६२ ॥ कीं कृमिकीट आंतलें । मांस वायसीं भक्षिलें । घारीं गीधीं नेलें । सेवटीं मृत्तिके मिळे ॥ ६३ ॥ सकुमारता काय जाली । लावण्या आगि लागली । स्वरूपता ते उरली । काये तेथें ॥ ६४ ॥ राज्यें येणें आगळें । मांस जोडावें हेंचि उरलें । वांचूनि देहरक्षण घडलें । तें येरां समानचि ॥ ६५ ॥ आतां मांसालागीं राज्य करूं । तरि मांस तोही येकु मास । वाहतां आधी श्रमु थोरु । सेवटीं ऐसें ॥ ६६ ॥ वर्णु सुंदरता लावण्य । मांसें शोभे तारुण्य । तें मांस सेवितां पुण्य । नाशों लागे ॥ ६७ ॥ स्त्रीरूपें मांस भोगावें । आत्मरूपें मांसाचि पाहवें । केवळ मांसकर सेवावे । तेंही मांस ॥६८॥ मांस तें देहपाती । सांगा तें नये होय माती । तरि तेणें मांसें श्रीपति । कवणु प्रयोजनु ॥ ६९ ॥ ह्मणौनि तैसें जिणें । तें नापेक्षिजे माझेनि मनें । अथवा देह पडो अन्नें-।-वांचूनि जन्हि तन्हि ॥ १८७० ॥ तेंही परंतु जीवित । नापेक्षीं माझें चित्त । जिणेनि लाभु हें मत । तया मूर्खाचें ॥ ७१ ॥ जिणें तैसें मरणें । लाभालाभु नाहीं येणें । सुकृत कांहीं करणें । तेणें लाभु ॥ ७२ ॥ ह्मणोनि न वधि स्वजनातें । नापेक्षीं येथ जयातें । हें राज्य न पाहिजे मातें । अहितकर ॥७३॥ राज्यजनितें सुखें । नापेक्षीं मी तीं दुःखें । जिणें तैसेनि कौतुकें । तें मज न पाहिजे ' ॥७४॥ ऐसें बोलिलें अर्जुनें । परमार्थसाहित्यें घेणें । अंगें योगें कवणें । अवधारा पां ॥ ७५ ॥ अर्जुन ह्मणे ' श्रीकृष्णा । गुरू तूं योगी नारायणा । यया योगयुद्धाची वासना । नाहीं मातें ॥ ७६ ॥ येथिंचा जयो

मी नापेक्षीं । यशायश तेंहीं न लक्षीं । साहतां बरें अकीर्तीसीं । संग्रामु न करितां ॥ ७७ ॥ आतां योगसंग्रामीं यये । जालेनि केवळेनि केवळें जयें । स्वस्थिति साम्राज्य आहे । तें भोगावें कीं ॥ ७८ ॥ स्वरूपस्थितीचिये राणिवे । इंद्रु तोही सरि न पवे । मा भौमराज्य अघवे । तें काय तेथ ॥ ७९ ॥ ऐकोनि जयाचे महिमान । देव कांपती तिघेजण । सामर्थ्य परम गहन । गुणातीताचें ॥ १८८० ॥ अनंतें ब्रह्मांडें हा देशु । चराचरें प्रजा विशेषु । दुसरा नाहीं देव ना दासु । शिष्यु ना गुरु ॥ ८१ ॥ येसणेंही राज्य परी । तयाची वासना मी न करीं । अभिलाषु मोडला अंतरीं । स्वसाम्राज्याचा ॥८२॥ पावोनि यया सुखातें । अंतर्भावीं सुखें अनंतें । तीं भोगावीं कीं समस्तें । साम्राज्यद्वारा ॥ ८३ ॥ ब्रह्मऐक्यें ब्रह्मसुख । इंद्रऐक्यें इंद्रसुख । विष्णुऐक्यें विष्णुसुख । जीवन्मुक्तां तया ॥ ८४ ॥ रुद्रऐक्यें रुद्राचें । तैसेंचि सकळां देवांचें । सुख पार्थिवां राजयांचें । आत्मान्वयें असे ॥ ८५ ॥ ना कीं आत्मसुखा अंतर्भावीं । क्षुद्रें सुखें आलीं अघवीं । ह्मणौनि ना सुखें अनुभवी । राजयोगी राजा ॥ ८६ ॥ ऐसें सुखभोग अनंत । नापेक्षी तयांतेंही चित्त । ह्मणौनि विजयो आणि हें समस्त । नलगे राज्य ॥८७॥ ऐसें कां ह्मणसील जालें । तरि सांगैन आतां बोलें । इंद्रियद्रष्ट्रेण गोपाळें । जाणावें तुवां ॥ ८८ ॥

( २ ) [ नः राज्येन किम् ] जालेंही राज्य येसणें । आमुते काये येणें । स्वप्नींचें जैसें भोगणें । मानसिक सुख ॥ ८९ ॥ आत्मान्वयें जाला भूपाळु । देहीं मागे भिक्षाकवळु । तेणें राज्यें सुकाळु । कल्पनेचा ॥ १८९० ॥ आत्मत्वें मी विश्वकर्ता । देहीं न मिळती पांच अक्षता । ऐसेनि थोरपणें अनंता । कवणु लाभु ॥ ९१ ॥ विवेकें जाला श्रीविष्णु । आणि शरीरीं जो पराधीनु । लौकिकीं नाहीं मानु । तें काये करणें ॥ ९२ ॥ ज्ञाने शूळधरु मी आत्मा । आणि देहीं दुःखी मेघश्यामा । ऐसी वासनामय महिमा । ते काये करावी जी ॥ ९३ ॥ ब्रह्मांडमंडळां अनंता । आत्मा, ईशु, मी नियंता । पाळिता प्रळयकर्ता । इच्छामात्रें ॥ ९४ ॥ ऐसी भावना अंतरीं । आणि सुडका न मिळे बाहेरि । पोष्या उपवास उदरीं । पाळा बाधें । ९५ ॥ आत्मत्वें राज्य माजणें । मातें नसे पश्चादिकां अंगेंजणें । आपण काये अनुभवणें । तेथिचें कांहीं ॥ ९६ ॥ [ भोगैः किं ] ब्रह्मानंदाचां पोटीं । क्षुद्रानंदाचिया कोटि । योगमार्गें ज्ञानदृष्टीं । भोगिजत असतां ॥ ९७ ॥ तेणें भोगें शरीरीं । काय फिटे गा मुरारी । देहो दुःखी परोपरी । तो जैसा तैसाचि ॥ ९८ ॥ लागली क्षुधा तेणें न सरे । कोरडेन कोंडेन जें सरे । तृषा पुरेना विचारें । तया सुखाचेनि ॥ ९९ ॥ पायां लागला पाथरु । तेणें दुःखी होये नरु । आतां व्यथेचा परिहारु । करावया ॥ १९०० ॥ भिल्लीफळ जैसें गुणाचें । तैसें काज न करी तें सुख तयाचें । अमृतपानाहूनि अन्नाचें । कवण महिमान ॥ १ ॥ ब्रह्मानंदें निवाला । अमृतपानें जो धाला । तो क्षुधार्थी पीडिला । तरि तें काय ॥ २ ॥ अनंतें सुखें समरसलीं । ययाचां हृदयीं भरलीं । तरि सुख दुःख बाह्य स्थळीं । नेणेंचि तें ॥ ३ ॥ चहोटा पडला उताणा । इंद्रपद भोगी वासना । तयाची वृथा कल्पना । ते काय करावी ॥ ४ ॥ [ जीवितेन वा ] आत्मविनाशपणें । कल्पकोटि जे जिणें । आतां मातें काय तेणें । ह्मणौनि नापेक्षी ॥ ५ ॥ आत्मत्वें अविनाशपण । न चुकवी देहाचें मरण । मग तया योगाचें थोरपण । तें काये करावे ॥ ६ ॥ विश्वेसीं अविनाशता । आपण भोगिजत असतां । तेणें अमरत्व समस्तां । नये जैसें ॥ ७ ॥ तैसेंचि आपुलांही शरीरीं । न येतें उपेगावारीं । जिणें जयांचें मुरारी । मरणें सत्य ॥ ८ ॥ स्वस्थितीचेनि राज्यें तेणें । गुणांचा ठायीं काये पावणें । राज्य वासनिकमनें । भोगिजे जयापरी ॥ ९ ॥ तेणें राज्यें जे जे भोग । ते भोगितां नलगे तया आंग ।

मृगजळींचें जैसें गांग । कोरडेंचि ॥ १९१० ॥ तेथिंचें जें अविनाशपण । न शके चुकवूं मरण । आतां तेणेंकरूनि कल्याण । काये पहावें ॥ ११ ॥ काये तें राज्य वाखाणूं । काये तीं सुखें वानूं । अमरपणाचा गुणु । तो तयाचि ऐसा ॥ १२ ॥ तें कव्हणी येक स्वप्न । लाभु काये तेणेंकरून । मुठि येकि तृण । तें तन्हीं मिळतें कां ॥ १३ ॥ मानसिक वरि चित्र । नाना गंधर्वनगर । उगेंचि भासे अपार । नये भोगा ॥ १४ ( ३२ ) ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

अर्जुनु ह्मणे 'श्रीकृष्णा । पाहतां या दोहीं सेना । पारिखें कवणीचि दिसेना । वैरी मातें ॥६६॥ युद्धाकारणें मीनले । मिळोनि येथ आले । येऊनि रणीं राहिले । स्वजनचि ते ॥६७॥ एकएक पाचारिती । आतां ना मग ह्राणिती । ते माझेचि अवघे होती । इष्टमित्र॥६८॥इष्टमित्र समग्र । आजे गुरु पितर । नातू मामे कुमर । साक्षाद्बंधू ॥६९॥ ऐसया ययातें देखोन । वैर विसरलें माझें मन । आता कैसें वाटे येथोन । अवधारावे ॥१७०(२८)॥ यया देखोनि स्वजनांतें । गात्रें माझीं समस्तें । पावतीं आकुंचित भावातें । यये कालीं ॥७१॥ मुखींची सद्रवता गेली । जिव्हा ती कोरडी पडली । बोलती वाचा राहिली । विव्हळतेनें ॥ ७२ ॥ अवधारी गा गोपाळा । माझां शरीरीं चळचळां । कांपु होये जैसा डाहाळा । तिवाना वातें ॥ ७३ ॥ देवा माझां शरीरीं । स्वेदरोमांच उठिले भारी । सुख न वाटे क्षणभरी । भ्रमास्तव ॥ ७४ (२९) ॥ गांडीव धनुष्य पाहे । हस्तापासाव सुटत आहे । कृष्णा तूं पाहतां होये । माझी अवस्था ॥७५॥ त्वचेवरी आले उष्ण । आंगीं न साहे प्रावरण । नवज्वराहूनि कठिण । लागली चटपटी ॥ ७६ ॥ उभे रहावयाकारणें । धैर्य कैसें तें मी नेणें । केवळ असावयाहिकारणें । येथें नव्हे शक्त ॥ ७७ ॥ माझें हें मन देवा । भ्रमोंचि लागलें यादवा । कृष्णा श्रीहरि माधवा । उमजून घे ॥ ७८ ॥ ऐसें कां जालें ह्मणसी । काये कारण ऐसियासी । तरी चित्त देऊनि परियेसी । सांगिजैल ॥ ७९ (३०) ॥ केशवा संग्रामाचीं कारणें । उपराठीं दिसतीं जाणें । आतां तीं कैसीं हें नारायणें । विचारावे ॥ १८० ॥ संग्रामु आपुला धर्मु । हा संपादितां परमु । धर्मु अर्थु मोक्षु कामु । पुरुषार्थु लाहिजे ॥ ८१ ॥ तीं या युद्धाचीं कारणें । विपरीतें दिसतीं युद्धें तेणें । गोत्रवध दारुणें । करूनियां ॥ ८२ ॥ धर्मु नाशे जोडे अधर्मु । पुण्यक्षये पापागमु । स्वर्गीं भोगिजे नरककामु । अनर्थु ऐसा ॥ ८३ ॥ अकीर्ति होये लोकत्रयीं । मोक्षु तो कधींचि नाहीं । अर्थ-भोग सुखद तेही । दुःखचि देतीं ॥ ८४ ॥ एवं संग्राम धर्मे येणें । मरणें पावतां स्वजनें । उपराठींचि कारणें । क्रियेचीं दिसतीं ॥८५॥ यया संग्रामाचां ठायीं । केशवा कृष्णा आइक यी । स्वजन मारूनि ठायीं । आपुलेनि हस्तें ॥ ८६ ॥ परंतु अणुमात्र तेंही । श्रेय न दिसें यये ठायीं । जाणत जाणत देहीं । पापचि करावें ॥ ८७ (३१) ॥ अवधारीं गा गोविंदा । श्रीकृष्णा परमानंदा । स्वहित देखोनि अंधा -।- सारिखे न व्हावे ॥ ८८ ॥ ह्मणौनि विजयो जो येथें । मी नापेक्षी तयातें । पराजयोचि येथ होये तें । भाग्य परम ॥ ८९ ॥ यया संग्राम जयाचें कारण । तया राज्यातेंही नापेक्षी जाण । पापरूप दुःखदर्शन । तयाचें जालें ॥ १९० ॥ राज्यापासाव जीं सुखें । तींही नापेक्षीं मी अनेकें । तीं उत्तरकालीं दुःखें । अवघींचि होतीं ॥ ९१ ॥ परमार्थींचि ठेवितां मन । येणें राज्यें प्रयोजन । तें आह्मालागीं कवण । विचारा पां ॥ ९२ ॥ प्रारब्धें जीणें प्रारब्धें मरणें । जी जें प्रारब्धेंचि भोगणें । तें यया देहाकारणें । न सुटे सर्वथा ॥ ९३ ॥ तें प्राचीन भोक्तया आह्मां । अवधारा जी मेघःशामा । हें राज्य हा महिमा । येणें कवणु प्रयोजनु ॥ ९४ ॥ राज्यापासाव विषयभोग । भोगावे जे कीं सांग ।

तेंहीकरूनि मग । कवणु अर्थु ॥ ९५ ॥ प्राचीन जेथ भोगमूळ । अनिवार तयाचें बळ । तें प्राप्तु अर्थु भोगु देईल । हें काय घडे ॥ ९६ ॥ आतां विषयभोगें कृष्णा । पूर्णत्व पावे तृष्णा । आपुलें बंधन वासना । तेंचि दृढावें ॥ ९७ ॥ ना ते विषय पापार्जित । तज्जनित भोग समस्त । तेही कवणु प्रयोजनु येथ । हितांचा साधनीं ॥ ९८ ॥ ऐसें जीणेंही जाऊन । आमुतें कायें येणेंकरून । पाप न लगे तें मरण । चोख वाटे ॥ ९९ (३२) ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

अर्जुन ह्मणे ' जी कृष्णनाथा । देखोनि या स्वजनांतें व्यथा । मज अत्यंत होते सर्वथा । जे उभे युद्धा-कारणें ॥ ९५ ॥ सर्वांग माझें पिळतें । आंत बाहेर मुख वाळतें । शरीर कांपे चळतें । कांटे येती देहासी ॥ ९६ ॥ हातींचें गांडीव गळे । संतापें त्वचा जळे । शोकाग्नि ऐसा पाजळे । हृदयांत ॥९७॥ रथीं उभें राहवेना । भ्रम जाला वाटे मना । केशवा विपरीत नयनां । होणारीं निमित्तें दिसतीं ॥९८॥ कल्याण न दिसे कांहीं । युद्धीं स्वजन मारूनिही । विजयाची चाड नाहीं । राज्यसुखेंही न लगती ॥ ९९ ॥ यांस राज्यार्थ मारावें । तें राज्य घेऊनि काय करावें । भोगांसि कोणीं भोगावें । जीवित्व नलगे जी आह्मां ॥ २०० ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

आहा जी यदुनंदना । देखोनियां बंधुजना । जो राहिला युद्धाकारणा । जवळिकें ॥ ७५ ॥ वेगळे जाले करचरण । युद्ध नावडे माझ्या मना । बुद्धीसी जालें विस्मरण । मुख वाळलें ॥ ७६ ॥ आणि शरीरीं कांप सुटला । देहो रोमांचयुक्त जाला । धनुष्य हातींचें पडिलें । त्वचा जळते ॥ ७७ ॥ उभा राहों न शके कृष्णा । भ्रमत आहे माझें मन । अरिष्टसूचक अपशकून । देखें केशवा ॥ ७८ ॥ युद्धीं या स्वजनां मारितां । श्रेय न देखें भगवंता । राज्याची इच्छा नाहीं आतां । जया आणि सुखाची ॥ ७९ ॥ येथें असे ऐसी आशंका । जयादिक फळातें देखसी का । ऐसें तरी उत्तर ऐका । बोलेन तें ॥ ८० ॥ आह्मां राज्ये चाड नाहीं । भोगें आणि जीवितेंही ।

## निवृत्तिदेव

गात्रें होताती शीतळें । मुख व्याकुळपणें सोखलें । शरीरीं येताति कांटाळें । रोमाचही उठले ॥ २९ ॥ हातींहूनि गेलें शरधनुष । त्वचा जळत असे अशेष । न साहवे अवस्था दुःख । मन भ्रमतें जालें ॥ ३० ॥ निमित्त देखिजे कांहीं । विपरीत वाटतसे केशवा पाहीं । श्रेय न पविजे हत्यें तो स्वजनही । मजलागीं ॥ ३१ ॥ आह्मां राज्ये चाड काय गोविंदा । भोगें आणि जीवितेंही कदा ।

## उद्धवचिद्घन

सवाईः— कृष्ण कृपाघन श्रीमधुसूदन स्वोजन सर्वहि सैन्यद्वयाला ।
युद्धमिषें समसिद्ध रणीं तरि कारण श्रीहरि कूळक्षयाला ॥ २८ ॥

गात्र बहू शिणलें शरिरीं मम होति कळा पडताति पिळे ।
वाळत तोंड खडा रसनेप्रति शुष्क न पाणि तयासि मिळे ॥
पाहे किं हें अंग थर्थर कांपत इंद्रिय दाहतसे अनळें ।
रोम उभारत कंठहि या तनुताप तिन्ही दिसती खलिले ॥ २९ ॥
शक्ति अशी क्षिण झालि हरी करिं गांडिव हें उचलों न शकें ।
देहिं धडाडित अग्नि तयापरि दाह अधीकचि हो भडके ॥
जीव सले कढवे न उठावत पाय गळोनि गती वसके ।
भ्रामत हें मन मोहित होउन भ्रांतिभ्रमें करुं काय कसें ॥ ३० ॥
हे जगदीश निमित्त दिसें मज हें विपरीत किं केशवराया ।
काय ययातुनि श्रेय निघे तरि व्यर्थचि द्वेष धरूं मनिं वाया ॥
फार कठोर असा मग होउनि सांडुन लौकिक सूहृदमाया ।
मारुं यया स्वजनांसि जनार्दन हे मुरमर्दन वंदित पाया ॥ ३१ ॥
इच्छिच ना जय राज्यसुखादिक भोग भवीं विभवा न मनीं ।
जीवितही क्षणभंगुर जाणुनि कां विपरीत करूं करणी ॥
वैभव हें बहु मेळवुनी सुहृदास विभागुनि देति जनीं ।
त्यांप्रति मारुनि वैभव मेळवुं काय अधीक वदों वदनीं ॥ ३२ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

अर्जुन म्हणे ' कृष्णनाथा । स्वजन देखिलें म्यां भगवंता । संकल्प मजसीं संग्रामार्था । जेहीं तत्वतां धरिला जिवीं ॥ ७० ॥ यांसि देखोनि समरंगणीं । ममता झळंबतें माझे मनीं । तेणें पात्र जालों दुःखालागुनी । ऐसी करणी होतसे देहीं ॥ ७१ ॥ पिळिल्यापरी गात्रें होताती । मुख शोषूनि जातसे अति । शरीरीं कंपाची घडते वस्ती । उभे ठाकती रोमांच ॥ ७२ ॥ गांडीव हातींचें गळतें । त्वचा पावलीसें तापातें । शक्य नव्हे मी उभा टाकायातें । मन भ्रमतें पैं माझें ॥ ७३ ॥ पाहतां निमित्ताचिया भावा । विपरीत दिसतें केशवा । स्वजनांचा नाश केल्यां आघवा । श्रेय ओलावा न दिसे कांहीं ॥ ७४ ॥ विजयाची कृष्णा नाहीं चाड । राज्याचें सुख नलगे वाड । राज्यभोग जीवित्व कोड । त्यांचाही पडिपाड गोविंदा कां ॥ ७५ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

श्रीकृष्णा सर्वजनांतें देखोन । माझें मन व्याकुळ जालें ॥ ४९ ॥ दुःख होतें माझ्या गात्रांसी । मुख शोषतें हृषीकेशी । कंप रोमांच आले अंगांसी । स्थिति ऐसी माजी जाली ॥ ५० ॥ गांडिव हातिंचें पडिलें गळूनी । त्वचेचा दाह होतो चक्रपाणि । राहावया सामर्थ्य नाहीं या ठायालागोनि । कां जें मनिं भ्रांत जाली असे ॥ ५१ ॥ हे निमित्यानिमित्य देखतो आपण । विपरीत तूं केशव जाण । श्रीयें भोगावें स्वजन वधोन । तें मजलागून न भावेचि ॥ ५२ ॥ हे श्रीकृष्णा विजयाची इच्छा नाहीं । राज्यसुख तें भावेचि कांहिं । कां जे अपाय दिसतो यांच्या ठायीं । म्हणोनि पाहे न करिच ॥ ५३ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

वसंततिलका:— युद्धार्थ हा स्वजन सिद्ध असे मुरारे। यातें विलोकुनि न धैर्य मनांत थारे॥
हस्तादि बेंबळति रे चळकांप आंगीं। रोमांच कोरडि मुखें मज या प्रसंगीं॥३२॥
हातोनि गांडिव पहा पडतें गळोनि। देहत्वचेसि भडका उठतो जळोनि॥
राहो न मी शकतसें तरि येथ आतां। चिंतेसह भ्रमण होत असे अनंता॥३३॥

इंद्रवज्रा:— या क्षत्रनाशासि जिये निदानें। देखो असीं गा विपरीत चिन्हें॥
मारोनियां या निजगोत्रजातें। सर्वात्मना पुण्य नसेचि मातें॥ ३४॥

स्वागता:— चाड तो मज नसे विजयाची। आणि आवडि न राज्यसुखाची॥
काय राणिव जिणें तरि काय। माधवा विषयभोगहि काय॥ ३५॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

पाहे परमकृपेंकरून। विषाद पावलेंसे मन। युद्ध करूं इच्छिती स्वजन। पाहें पां कृष्णदेवा॥ २८॥ दुःख होतसे गात्रांसी। मुख शोषते हृषीकेशी। कंप रोमांच अंगासीं। अशी स्थिती जाहली॥ २९॥ धनुष्य पडे हातींहुन। त्वचा जळे संतापान। भ्रमतसें माझें मन। उभें राहूं शकेना॥ ३०॥ आपले स्वजन म्यां मारूनी। मज सुख व्हावें नुपजे मनीं। विपरीत चिन्हें दिसतीं नयनीं। केशवराया पैं मज॥ ३१॥ कृष्णा विजयाची चाड नाहीं। राज्यसुखाची गोडी नाहीं। राज्यभोग सकळही। नलगे मज स्वामिया॥ ३२॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंग:— देखियेलें स्वजनांस। आपणांस जे वंद्य॥
युद्धार्थीं ते उभे सिद्ध। जे निषिद्ध तुकयासीं॥ २६॥
पिळिति सर्वही गात्रें। कळा वक्त्रें त्या काळीं॥
शरीरीं सुटतो काप। रोम रोम कांपती॥
तुका विनवी नारायणा। क्लेश मना पार्थाच्या॥ २७॥
हातापासूनि गांडीव। गळतें जीव दग्धला॥
उभा राहोंहि न शकें। चित्त शोकें भ्रमिष्ट॥
तुका ह्मणे करुणानिधि। हे उपाधि निवारा॥ २८॥
देखतों मी निमित्तांस। विपरीतांस केशव॥
न कल्याणही मी देखें। युद्धीं सखे मारूनी॥
तुका ह्मणे जैसें भयें। तैसें स्वयें निवेदी॥ २९॥

न इच्छी मन माझें। कांहीं राज्यादिक ओझें। जयकांक्षेविशीं तुझे। पाय दिव्य आहेती॥
कृष्णा गोपाळा माधवा। नित्य प्राणांचा विसांवा। आह्मां कासयासी व्हावा। हा संसार पातकी॥
राज्यभोगें जिवित हें। या सुखाचां संदेहें। आतां माझी पाहे। लाज रक्षीं दयाळा॥
गोविंदा काय आम्हुतें। चाळवणीं वोपा भातें। तुका दास कुशब्दातें। त्रास मानी बोखटीया॥ ३०॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्:— । देखोनि कृष्णा स्वजन युद्धार्थी सिद्ध जे उभे ॥४२॥
पिळती सर्वही गात्रें दुःखें मुखहि वाळतें । शरीरीं कांप सुटतो आंगीं रोमांच ऊठती ॥४३॥
हातापासूनि गांडीव गळते जळते त्वचा । उभा राहोंहि न शके वाटे भोंवतसे मन ॥४४॥
देखतों मी निमित्तेंही विपरीतेंचि केशवा । न कल्याणहि मी देखें युद्धीं स्वजन मारुनी ॥४५॥
न इच्छीं जयही कृष्णा न राज्य अथवा सुखें । राज्यभोगें जीवितेंही गोविंदा काय आमुतें ॥४६॥

## मोरोपंत

आर्याः— कृष्णा पाहुनि यांतें जे युद्धोद्युक्त सर्वही आप्त ॥ २८ ॥
गात्रें खिन्न समस्तें मुख शुष्कहि आणि सर्व तनु कंपा ।
पाहें रोमांचित तनु उपजलि चित्तांत तीव्र अनुकंपा ॥ २९ ॥
हस्तापासुनि गळतें गांडिव आला तनूसि हिंव-जाळ ।
बैसाया शक्ति नसे भ्रमवी चित्तास मोहजंजाळ ॥ ३० ॥
युद्धीं विपरीतांसच पाहतसें केशवा निमित्तांतें ।
वधुनि स्वजना न दिसे मातें कल्याण राज्यमंतातें ॥ ३१ ॥
इच्छीना मी कृष्णा गोविंदा राज्य-भोग-विजयांशीं ।
नलगे स्वजनवधें मज जीवित आणि राज्यभोग विजयाशी ॥ ३२ ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
देखुनि कृष्णा स्वजनां युद्धार्थी सिद्ध जे रणांत उभे ॥ ४६ ॥
पिळती सारीं गात्रें दुःखानें मुखहि वाळतें माझें ।
सुटला कांप शरीरीं आंगीं रोमांच ऊठती भारी ॥ ४७ ॥
गांडीव करापासुनि गळतें जळती त्वचाहि हे सारी ।
न शकें उभाहि राहों मन भोंवतसे असें मला वाटे ॥ ४८ ॥
विपरीतेंचि निमित्तें देखतसे केशवा उदंडें मी ।
कल्याणही न देखे युद्धीं स्वजनांस मारुनि स्वकरें ॥ ४९ ॥
कृष्णा विजय न इच्छीं न राज्य अथवा सुखेंहि मी कांहीं ।
आह्माला गोविंदा राज्यें भोगेंहि जीवितें काय ॥ ५० ॥

## वामन—( द्विजोत्तम )

अगा स्वामी श्रीकृष्णा । युद्धालागीं सावधाना । देखोनियां स्वजना । सिणती माझि सर्वांगें ॥ २८ ॥ कोरडे होतसे मुख । कंपु उपजतसे देख । शरीरीं रोमांच असंख्य । उठताति माझे ॥ २९ ॥ धनुष्य पडतसें हातीहूनि । ताप धरिले शरीरांनीं । भ्रांत पडतसे माझे मनीं । युद्धिं उभा राहु न शके ॥३०॥ ऐसीं सकळ निमित्तें । देखतसे मी विपरीतें । युद्धिं मारुनि सोयरियांतें । पुण्यातेंहि न देखों ॥३१॥ चाड नाहीं जिंकावयाची । अगा कृष्णा राज्यसुखाची । अथवा भोगा जीवित्वाची । चाड नाहीं गोविंदा ॥३२॥

**येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।**
**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥**
**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।**
**मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबधिनस्तथा ॥ ३४ ॥**
**एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।**
**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥**
**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।**
**पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥**

**अर्थः-** "ज्यांच्यासाठीं आम्हीं राज्य, भोग व सुखें हीं इच्छितों तेच हे जीवाची व संपत्तीची आशा सोडून युद्धाला उभे आहेत. गुरु, वडील, पुत्र, तसेच आजे, मामे, सासरे, नातू, मेव्हणे व संबंधी हे जरी मला मारावयास उठले आहेत तरी, हे मधुसूदना, मी त्यांना त्रैलोक्यराज्याच्या प्राप्तीकरितांही मारूं इच्छित नाहीं; तेव्हां मी पृथ्वीच्या राज्यासाठीं त्यांचा प्राण कसा घेईन ? हे जनार्दना, धृतराष्ट्रपुत्रांना मारून आमचें काय प्रिय होणार आहे ? जरी हे आततायी आहेत तरी यांना मारून आम्हांला पापच लागेल.

**श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी )"**

पुत्रांतें इच्छी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ । जे निर्दळिजे[1] केवळ । गोत्र आपुलें ॥ १५ ॥ हें मनींचि केविं धरिजे । आपण वज्राचेंया होईजे । वरी घडे तरी कीजे । भलें ईयां[2] ॥ १६ ॥ आम्हीं जें जें जोडावें । तें समस्तीं इहीं भोगावें । हें जीवितही उपकारावें[3] । काजीं यांच्या ॥ १७ ॥ आम्हीं दिगंतीचे भूपाळ । विभांडूनि[4] सकळ । मग संतोषविजे कुळ । आपुलें जें ॥ १८ ॥ तेचि हे समस्त । परी कैसें कर्म विपरीत । जे जाहले असती उद्यत । झुंजावया ॥ १९ ॥ अंतोरिया[5] कुमरें । सांडोनियां भांडारें । शस्त्राग्रीं जिव्हारें । आरोपुनी[6] ॥ २२० ॥ ऐसियांतें कैसेचि मारूं । कवणावरी शस्त्र धरूं । निजहृदया करूं । घातु केवीं ॥ २१ ॥ हें नेणसी तूं कवण । परी पैल भीष्मद्रोण । जयांचे उपकार असाधारण । आह्मां बहुत ॥ २२ ॥ एथ शालक सासरे मातुळ । आणि बंधु कीं हे सकळ । पुत्र नातू केवळ । इष्टही असती ॥२३॥ अवधारी अति जवळिकेचे । हे सकळही सोयरे आमुचे । म्हणोनि

१ नाश करावें. २ यांना. ३ उपयोगीं लावावें. ४ जिंकून. ५ अंतःपुरांतील स्त्रिया. ६ ठेवून.

दोष आंथी वाचे । बोलतांचि ॥ २४ ॥ हे वैरी भलतें करितु । आतांचि येथें मारितु । परि आपण मनें घातु । न चिंतावा ॥ २५ ॥ त्रैलोक्यींचें अनकळित । जरी राज्य होईल प्राप्त । तरी हें अनुचित । नाचरें मी ॥ २६ ॥ जरी आजि एथ ऐसें कीजे । तरी कवणाच्या मनीं उरिजे । सांगे मुख केवीं पाहिजे । तुझें कृष्णा ॥ २७ ॥ जरी वधु करोनि गोत्रजांचा । तरी वसौटी होऊनि दोषांचा । मज जोडिलासि तूं हातींचा । दूरी होसी ॥ २८ ॥ कुळहरणीं पातकें । तियें आंगीं जडती अशेखें । तये वेळीं तूं कवण कें । देखावासी ॥ २९ ॥ जैसा उद्यानामाजीं अनळु । संचरला देखोनि प्रबळु । मग क्षणभरी कोकिळु । स्थिर नोहे ॥ २३० ॥ का सकर्दम सरोवरु । अवलोकूनि चकोरु । न सेवितु अव्हेरु । करूनि निघे ॥३१॥ तयापरी तूं देवा । मज झकेऊं न येसी भावा । जरी पुण्याचा ओलावा । नाशिजेल ॥ ३२ ॥

## सोपानदेव—"सोपानदेवी"

ज्याकारणें राज्याभोग बहुत । आपण होतों जी इच्छित । ते हे प्राणधन टाकूनि समस्त । युद्धा आले असती ॥ ३३ ॥ पितृमातृपक्षींचे वडिल आजे । भीष्मद्रोण मुख्य बोलिजे । तयांचे पुत्रपौत्र जे । माझे बंधुवर्ग ॥ ३४ ॥ जरि ते मज मारिती तरि । मी त्यांतें न मारी गा मुरारि । त्रैलोक्य राज्याचि प्राप्ति जाली जरि । तेथ पृथ्वीचा कोण केवा ॥ ३५ ॥ आपुल्या बंधुवर्गातें मारिलिया । सुख नुपजे जी कृष्णराया । या आप्तांतें मारिलिया । पापसंग्रह होईल ॥ ३६ ॥

## माधव नारायणदास—"नारायणकीर्ति"

राज्य आणि नानाविध भोग । आणि नानाविध सुखें चांग । या तीहींचा समागम सांग । ज्यालागीं अपेक्षावा ॥ ६९ ॥ तेही या युद्धाचें ठायीं । पैल उभे असती पाही । जे टाकूनि दाराधनें सर्वही । प्राणासी उदासीन ॥ १७० ॥ ऐसेयांतेंही वधावे । आणि राज्यसुख भोगावे । अर्जुनि ते कोणासि समर्पावे । हें विचारी भगवंता ॥ ७१ ॥ आपणांतें क्लेशी करावे । आणि स्वजनांतें सुख पाववावे । हें सज्जनाचें मत बरवें । यशकीर्तिचें कारण ॥ ७२ ॥ ह्मणोनि या स्वजनालागुनी । मज आन सारखे न धरावें मनीं । ज्यालागीं राज्य आर्जवावे मारुनी । राज्य करणें तें किमर्थ ॥ ७३ ॥ जैसें बुबुळ काढूनि उगाळिजे । आणि नेत्राचें औषध सिद्ध कीजे । कीं कुटुंब विकोन योजिजे । मंदिर रचना-प्रसंगें ॥ ७४ ॥ तैसे या स्वजनासि आह्मी वधावें । आणि राज्यभोग सुख साधावें । साधूनि गोमटें कवणा करावें । हें विचारी सर्वोत्तमा ॥ ७५ ॥ ये वीरमंडळीमाजि कोण । तुझे आहेति सोइरे सज्जन । ऐसें ह्मणसी तरी सावधान । ऐक देवा सांगेन ॥ ७६ ( ३३ ) ॥ पैल आचार्य द्रोणादिक । पितृ-स्वरूपीं पितर देख । पैल पुत्रतुल्य कुमारक । दुर्योधनादिकांचे ॥७७॥ पैल भीष्मादि पितामह साचे । पैल मातुल दुर्योधनसंबंधाचें । तेचि संबंध परिपाठीचे । श्वशुर पौत्र शालक ॥ ७८ ॥ मित्रत्व सख्यत्व प्रकारें । आणिकही संबंधी सोइरे । बहुत असती विस्तारें । किती ह्मणोन सांगणें ॥ ७९ ( ३४ ) ॥ ऐसे स्वजन यांतें सर्वात्मना । मी घातु मनें इच्छीना । जरी हे गा मधुसुदना । मज मारोत दुर्जन ॥ १८० ॥ हे समस्त स्वलाभासाठीं । मज सुखें मारोत गा जगजेठी । परंतु मी थोर लाभाचे दृष्टी ।

१ आहे. २ उलटपक्षीं. ३ शत्रूरहित. ४ आश्रयस्थान. ५ फसवूं. ६ मिळवून.

त्यांसी न चिंती अकल्याण ॥ ८१ ॥ त्रैलोक्यीच्या राज्याकारणें । मी ऐसें न राहाटे सर्व प्रयत्नें । तेथें काइसे हे केसणें । महीमंडळाचें राज्य पैं ॥ ८२ ( ३५ ) ॥ अगा जनार्दना स्वामी जाण । वधुनि हे धृतराष्ट्राचे नंदन । आमुतें सुख होईल कवण । काय कल्याण पाविजेल ॥ ८३ ॥ यांतें मारल्यानंतर आमुतें । आततायीपण येईल निरुतें । मारितां ह्या आस आततायियांतें । आमुतें महत्पाप आश्रयील ॥ ८४ ॥ आणि आमुतें युद्धीं न मारितां । हे जरी प्रवर्तती घाता । तरी हेंचि पावती पापाश्रयता । आततायीपणें पैं ॥ ८५ ( ३६ ) ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

इतुकिया आपुलिया वैराग्येंकरून । आपुलियाहीलागीं करावा प्रयत्न । तेंही न घडे हें दावी अर्जुन । श्लोकानुसंधान परियेसा ॥ ८२ ॥ ' अहो जयांकारणें आह्मीं राज्य इच्छावें । ते सकळही उभे असती आघवे । परी प्राणधनादि टाकूनि स्वभावें । युद्धाविर्भावें आले असती ॥ ८३ ॥ आजी आह्मीं जें जें कांहीं जोडावें । तें सकळही येंहीं सर्वी भोगावें । आह्मीं आपुलें जीवितही वेंचावें । परी सर्वभावें पूजावे हे ॥ ८४ ॥ आह्मीं सर्वही दिगंतींचे भूपति । विभांडूनियां आणावी संपत्ति । तेणे संतोषवावी आपुली ज्ञाति । तरीच श्रीपति संतोषसी तूं ॥ ८५ ॥ तेंचि विचित्र कर्म कैसें वोढवलें । तेचि हे युद्धार्थ असती उभे राहिले । स्त्रीपुत्रधनसंपत्त्यादि सर्व टाकिलें । आणि उपेक्षिले प्राणही स्वयें ॥ ८६ ॥ कृष्णा एकलियासि तरी राज्यसंपत्ती । भोगादिक हे कांहींच न लगती । आपुलियालागीं करावें ते युद्धाप्रती । उभे असती प्राणादित्यागें ॥ ८७ ॥ प्राणधनादिकांची जे आशा टाकणें । त्याचेंचि नाम टाकिलें ऐसें जाणणें । सुखशब्दें सुखाचीं साधनें । विषय टाकणें तो सुखत्यागु ॥ ८८ ॥ तरी ऐसियांतें कैसें मारावें । ययांवरी शस्त्रचि कैसें धरावें । निजहृदयासि कैसें भेदावे । हें मनींच केशवें विचारिजे ॥ ८९ ॥ ना तूं ऐसें ह्मणसी हृषीकेशी । ज्यांसि भजावें ते ये रणभूमीसी । आले नाहींत हे दुष्टचि सर्वांशीं । युद्ध ययांसीं करावेंची ॥ ५९० ॥ तरी जयांची पूजा करावी जाण । तेचि येथ उभे असती युद्धालागून । तयांचीं पृथक नामेंही सांगेन । आइके श्रीकृष्णा' पार्थु ह्मणे ॥ ९१ (३३)॥ ' तरी आचार्या ते कृपाचार्य द्रोण । हे पूज्यत्वें मज ईश्वरासमान । पितर जे पितृव्य आणि पितयासमान । हे पूर्वीच जाण सांगितले ॥ ९२ ॥ भूरिश्रवा वीर मुख्य दारुण । तेचि चुलते अतिविख्यात पूर्ण । पुत्र दोहीं दळीं आदिलक्ष्मण । जो कीं नंदन दुर्योधनाचा ॥ ९३ ॥ भीष्मादिक पितामह महाथोर । ययांचे असाधारण आह्मां उपकार । मातुळ श्वशुर पौत्र श्यालक वीर । सोयरे थोर व्याही जामात ॥ ९४ ॥ आतां पाहें हे कैसे वधावे । आणि आपण राज्य कैसें करावें । हें सर्वही विचारोनि माधवें । मज सांगावें विचारातें ॥ ९५ ॥ ना तूं ऐसें ह्मणसी जी श्रीपति । जरि तुवां कृपेकरूनि केली युद्धनिवृत्ति । तरी हे राज्यलोभेंकरूनि मारिती । तरि कां क्षति[1] करितोसी ॥ ९६ ॥ यालागीं तुवांचि यांतें मारूनि । राज्य भोगावें गा कार्मुकपाणी । तरी परियेसीं जी सुरशिरोमणी । माझिया वचनीं चित्त देईं ॥ ९७ (३४) ॥ तरि परियेसीं जी लक्ष्मीपति । जरी मज त्रैलोक्याची जाली प्राप्ती । आणि हेचि होऊनि जरी मारिती । तऱ्ही मी चित्तीं धरींना कांहीं ॥ ९८ ॥ जेथ यांसि मारावया संकल्प न करीं । तेथ कैंचा यांचा घात करीं । त्रैलोक्यप्राप्तीलागीं जेथ न मारी । तेथ

१ हानी.

राज्यार्थ श्रीहरी काय करणें ॥ ९९ ॥ अहो अनायासें जो स्वर्गसुख नेघे । तो हिंसा करूनि एक ग्राम तों न मागे । हें तंव सकळ जाणिजेतें असे श्रीरंगें । मी तंव नेघे धनुष्य हातीं ॥ ६०० ॥ आणि तूं रागादि दुष्ट दैत्य मारूनी । धर्मप्रवृत्तिमार्ग प्रवर्तविसी वेदवचनीं । यालागीं मधुसूदन इये संबोधनीं । तुजलागूनी पाचारितु ॥ १ ॥ ऐसेनि अनुचित जरी आचरावे । तरी कवणाचे मनीं उरावे । तुझेंचि मुख कृष्णा कैंवी पहावे । देखोनि लाजावे तुजलागीं ॥ २ ॥ ना तूं ऐसें ह्मणसी जी श्रीपती । पापभयें टाकूनि सर्व भूपती । धृतराष्ट्राचेचि जे पुत्र असती । तेचि सर्वार्थीं वधावे ॥३॥ हे दुःखाचे देते सर्व मारूनियां । राज्यप्राप्तीन सुखें राहें धनंजया । ऐसें ह्मणसी तरी आइक स्वामिया । स्वाभिप्राया सांगेन ॥ ४ (३५) ॥ अहो जी जनार्दना हृषीकेशी । धार्तराष्ट्र दुर्योधनादिक परियेसीं । मारूनि वांचलिया आह्मांसी । कोण सुखासी पाविजेल ॥ ५ ॥ जैसे मूर्खजन अल्पसुखाकारणें । आचरती महापातकें दारुणें । तैसें उचित नव्हे आह्मांकारणें । बंधुवधें पावणें नरक थोर ॥ ६ ॥ ना तूं जगत्संहर्ता ह्मणोन । नामें बोलती तुज जनार्दन । प्रळयीं करिसी विश्वसंहरण । तैसें यांलागूनी वधीं सुखें ॥ ७ ॥ जरी अगत्य वध्याचि असती । तरी तूंचि वधीं गा लक्ष्मीपती । तूं प्रळयी हिंसा अंगीकारिसी । बाधु सर्वांशीं नाहीं तुज ॥८॥ परी आह्मीं जरी हें पाप आचरों न । तरी कुलदहन नरक पावो न । मग थिते[1] तुजही अंतरों न । पापेंकरून कृष्णनाथा ॥ ९ ॥ अगा पुत्रही जऱ्ही पाप आचरतु । तरी तो पितृधनासि असे मुकतु । किंबहुना पितरांसिही अंतरतु । होय बहिर्भूतु सर्वस्वें ॥ ६१० ॥ नानावनीं पेटतां जैसा दावाग्नी । वनौकें[2] जाती सर्व पळोनी । तैसें पुण्यें पळती पाप देखोनी । तेथ तुजलागूनी कोण देखे ॥ ११ ॥ ना हे आततायी ह्मणसी विश्वपती । आततायी हे अवश्य वधिजती । वधितां नाहीं पाप सर्वार्थीं । आततायी किती हेंही सांगूं ॥ १२ ॥ ॥ संमति ॥ अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः । क्षेत्रदारहरश्चैव षडेते ह्याततायिनः ॥१॥ आततायिनमायांतं हन्यादेवाऽविचारयन् । नाततायिवधे दोषो हंतुर्भवति कश्चन ॥ २ ॥ इति स्मृतयः ॥ ॥ तरी दुसरियाच्या गृहक्षेत्रासी । अग्नि लावी जो कीं परियेसी । कां विष देतसे दुसरियासी । नग्नशस्त्रासी धरिता जो कीं ॥ १३ ॥ किंवा दुसरियाचें जो धनहर्ता । आणि स्त्री कां क्षेत्राचा हरणकर्ता । हे साही आततायी जी अनंता । यांतें वधितां पाप नाहीं ॥ १४ ॥ ऐसा आततायी देखिजे येतां । तरी वधू करावा कांहीं न विचारितां । तेणें पापें न लिंपे जो वधकर्ता । शास्त्र अनंता ऐसें असे ॥ १५ ॥ यालागीं षड्विध आततायिपण । या धृतराष्ट्रपुत्रांसि असे जाण । त्यालागीं ययांच्या वधेंकरून । पाप तुजलागूनी असेचिना ॥ १६ ॥ तरी परियेसीं जी लक्ष्मीपती । तथापि पाप तों होईल आह्मां सर्वार्थीं । आणि दृष्टादृष्ट फळ नाहीं विश्वमूर्ती । परिस विनंती आणिक एक ॥ १७ ॥ तरी धर्मशास्त्र तरी ऐसें असे । जें कीं श्रुतिवाक्यें निर्णिलें सर्वांशें । एथें जें 'न हिंस्यात्सर्वभूतानि' ऐसें । वाक्य असे अतिप्रबळ ॥ १८ ॥ 'आततायिनमायांतं' हें स्मृतिवचन । हें श्रुतीपरीस दुर्बळ जाण । ऐसें याज्ञवल्क्यही बोले प्रमाण । परिसा श्रीकृष्ण नेणोंचे[3] बोला ॥१९॥ ॥ वाक्य ॥ स्मृत्योर्विरोधे न्यायस्तु बलवान्व्यवहारतः । अर्थशास्त्रात्तु बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः ॥ या० स्मृ० ॥३॥ ॥ परस्परें स्मृतींसी विरोध असतां । न्यायशास्त्र प्रबल व्यवहारता। अर्थशास्त्रापरिस सर्वथा । धर्मशास्त्र प्रबळ असे ॥ ६२० ॥ यालागीं भूतमात्राची हिंसा न करणें । हें धर्मशास्त्र मुख्य स्मृतिवचनें । आततायी मारावे हें अर्थशास्त्रपणें । सर्वगुणें दुर्बळ असे ॥ २१ ॥

---

१ व्यर्थ. २ अरण्यवासी. ३ अज्ञानाचे.

अथवा दुसरें व्याख्यान ऐसें । कौरवां मारितां आह्मां प्रीति नसे । परी आह्मांसि मारितां तयां प्रीति असे । ह्मणोनि सर्वांशें मारिती ते ॥ २२ ॥ जरी ते आततायी पूर्वींच पापी असती । आतांहि आह्मांसि मारितां पापीच होती । परी आणिक नव्हे त्यासि सुखप्राप्ती । जाण सर्वार्थी जगद्गुरो ॥ २३ ॥ आह्मी युद्ध न करूनि बैसतां । आणि तेहींच होऊनि आह्मांसि वधितां । तरी तेचि पापी होती जगन्नाथा । आह्मांसि तत्वता क्षति नाहीं ' ॥ २४ ॥ ' नच श्रेयोऽनुपश्यामि ' या श्लोकापासून । हिंसा न करावीच बोले अर्जुन । कौरव मारितां नाहीं फळ ना पुण्य । अनर्थ दारुण उफराटा होय ॥ २५ ॥ यालागीं सर्वथा न करावी हिंसा । हेंचि बोलता जाला परियेसा । पुनरपि उपसंहारही करी ऐसा । बोले कैसा अर्जुन तो ॥ २६ (३६) ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

ज्यांस्तव अर्थकांक्षा धरावी । राज्यभोगसंपत्ति जोडावी । आणि आलीं संकटें निवारावीं । ऐसे हे सकळ स्वजन ॥ १५ ॥ ते सोडौनि प्राणआशा । तेवीं सांडुनि धनाशा । तेथें उभे असती सुखाशा । कैंची यांसी मारितां ॥ १६ ॥ त्या जयाचें कोण प्रयोजन । आपुले मारून स्वजन । धनाशा धरी तो दुर्जन । साधुसंतांत मिळेना[1] ॥ १७ ( ३३ ) ॥ मिळेना भल्यात तो कदा । जो गुरुपित्रद्रोही सदा । आणि पुत्रांस वधी मदा । धनाचिया धरूनि ॥ १८ ॥ पितामह माम्यांस । मारी देखोनि धनास । नातू शालक संबंधियांस । वधितां परम पातक ॥ १९ ( ३४ ) ॥ इत्यादिकांचा वध । करावया मी सन्नद्धबद्ध[2] । नव्हे भोगीन तम अंध । राज्यस्वार्थ धरितां कीं ॥ २० ॥ तुवां मधुदैत्यासि मारिलें । ह्मणून नाम मधुसूदन पडिलें । आतां काय हें त्वां आरंभिलें । कोण्या अर्थाकारणे ॥ २१ ॥ ह्मणसी तुह्मांस येहीं कष्टविलें । द्वादश वर्षें वनीं भ्रमविलें । तेरावें नष्टचर्य भोगविलें । परी कौरवां नाहीं कळवळा ॥ २२ ॥ कळवळा नाहीं नसो परी । मी हत्यार नेघें श्रीहरी । त्रैलोक्य राज्य देतां न धरी । मानस माझें परघाता ॥ २३ ॥ तेथें महीराज्य तें किती । मा त्याची धरीन प्रीति । जळो जळो हे राज्यनीति । परपीडा घडत जेथ ॥ २४ ( ३५ ) ॥ मारिल्या धृतराष्ट्रनंदना । कोण गोडी जनार्दना । पापचि दिसे न श्रेय मना । आणि लोकही नव्हे ह्मणतील ॥ २५ ॥ ह्मणसी आततायी नर । जे आगी लाविती सत्वर । आणि विष घालिती पामर । कां शस्त्रें मारिती ठकूनि ॥ २६ ॥ कां परधनापहरण करिती । कां परक्षेत्र परदारा हरिती । हे साही मारिल्यावरती । पाप नाहीं सर्वथा ॥२७॥ ( संमति ) अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः । क्षेत्रदारापहर्ता च षडेते ह्याततायिनः ॥ १ ॥ आततायिनमायांतं हन्यादेवाऽविचारयन् । नाततायिवधे दोषो हंतुर्भवति कश्चन ॥ २ ॥ ॥ असो सर्वथा आपुलें कर्में आपण । आततायी पावतील मरण । परी आपण मारितां कवण । साच साधे परमार्थ ॥ २८ ॥

## दासोपंत—" गीतार्णव "

( राज्यं भोगाः सुखानि च ) वासुदेवा अवधारी । वचन एक बरवयापरी । येणें चाड नाहीं संसारीं । मातें येकल्या ॥१३॥ आतां हें राज्य अभंग । आणि ययापासाव जे भोग । ते भोगावया अमोघ ।

१ गणला जाणार नाहीं. २ कंबर बांधून तयार.

चिरकाळ जिणें ॥ १४ ॥ राज्य भोग वय तिन्ही । ययांचा कीरु नित्यपणीं । जीं जीं सुखुं चक्रपाणी । तीं तीं सकळें ॥१५॥ ( येषामर्थे कांक्षितं नः ) काया वाचा आणि मनें । करूनि तपें अनुष्ठानें । आह्मीं इच्छूं जयांकारणें । भोगावया ॥ १६ ॥ देवा राज्य दे कां मातें । आणि मी पोषीन या स्वजनातें । माझीं यीं ह्मणें आणिकांतें । हातु पसरितील ॥१७॥ षड्रस अन्न वोगरिलें । परंतु जयांवीण विष जालें । तीं वाडें धाकुलीं मुलें । कैसीं सांडावीं ॥ १८ ॥ जयांचिया तृप्ती आपणा । न खातां तृप्ति होये मना । जयांतें न देखत अन्ना । हातु न घालवे ॥ १९ ॥ संभवतां बैसे पाला । तें अन्न मृताचा गळाला । जयांवीण हलाहला । सारिखें रुचे ॥ १९२० ॥ मुखें मुखीं ग्रासु घालिजे । मुखींचा मुखें काढूनि घेइजे । ऐसी महाप्रीति उपजे । जयां देखोनि ॥ २१ ॥ जयांचेनि अंवमानें । मानी जो आपणाकारणें । तो वैरी होये अतिमानें । मित्रही परि ॥ २२ ॥ आपुलें ऐसें ह्मणिजे । तें राज्य जयां देइजे । गेलें ऐसें जिवा नुपजे । निश्चिती होये ॥२३॥ सेजे केलें शयन । जयाची न करितां आठवण । होये मग दाटून । सादु घालिजे ॥ २४ ॥ जयांचिया पादधूळी । सुखरूप सेज जाली । जयांवीण वनमाळी । विरस ते ॥ २५ ॥ आसनीं नाहीं पैसुं । परि जयांकरितां संतोषु । जयांचा कठिणु स्पर्शु । मृदु वाटे ॥ २६ ॥ आयुष्य बहुसाल मागावें । तें जयांतें हो ह्मणावे । परंतु आपणा न इच्छावें । जयांचे आयुष्य ॥ २७ ॥ सुख मागोनि शंकरा । देइजे वांटून कुमरां । यीं सुखी असतु ईश्वरा । येणें अंगें ॥ २८ ॥ जयांकारणें आयास । जयांकारणे राज्य बव्हंश । स्तेय करूनि आयास । पोषिति जन ॥ २९ ॥ जयांकारणें मिराशी । जयाकारणें श्रमती तापसी । जयांकारणें द्रव्यासि । जतन कीजे ॥१९३०॥ जयांकारणें आत्मसुख । जयाकारणें भोगिजें दुःख । जयांकारणें मूर्ख । शहाणें होइजे ॥३१॥ जयांचेनि वियोगें । हातीं पायीं राख लागे । आपुलें नव्हे अवघें । ऐसें होये ॥ ३२ ॥ तात्पर्यें जयांचेनि । विकिजे आपणालागूनि । प्राण वेची परि मनीं । त्यागु नुपजे ॥३३॥ ऐसीं जीं पोटिचीं बाळें । नाना आंतडीं उदरातुलें । मुलें मुलाचीं मुले । भावडेही ॥ ३४ ॥ समान वाड धाकुले । परि काळजाचे तुकडे आपुले । ययां जीवावेगळे । कैसें करावें ॥ ३५ ॥ गुरु पितर पुजावे । ये अर्थी भाग्य मागावे । पिते पितामह तोषवावे । दैव आलया ॥३६॥ [त इमे] ते हेचि कीं बापा कृष्णा । कौरव जाण सर्वज्ञा । आणि बाळमित्र आपणा । आवडीचे ॥ ३७ ॥ ते हे पुत्र ते हे पौत्र । ते हे मित्र ते हे गोत्र । ते हे बंधु समग्र । सर्वथा कीं ॥ ३८ ॥ ते हे पितर प्रपिते । ते हे गुरु विद्यादाते । राज्यसुख हें जयांतें । आपुलें भोगवावें ॥ ३९ ॥ [युद्धे अवस्थिताः] तेचि हे वैरी होऊनि । उभे असती रणीं । यया संग्रामालागूनि । पुढती कसे ॥ १९४० ॥ [प्राणांस्त्यक्त्वा धनानि च] सांडूनि स्वराज्य स्वस्थान । सांडूनि स्वजन आणि धन । सांडूनि आपुलाले प्राण । रणा आले ॥४१॥ आतां हे माझे प्राण । आतां हेचि माझें धन । धनविभागी स्वजन । मीचि सकळ ॥ ४२ ॥ माझे हे कौरव सकळ । काळजाचे भोग केवळ । ममत्वाचे पूर कल्लोळ । ते जयांकारणें ॥ ४३ ॥ जे तरि गोड जिणें । जे तरि सुख येसणें । राज्य हें जयांकारणें । साधावें आह्मीं ' ॥ ४४ ॥ ऐसें अर्जुनाचें बोलणे । परमार्थें जाणतां जाणणें । जगीं मग संतोषणे । मनामाझारी ॥ ४५ ॥ अर्जुनु ह्मणे ' जी कृष्णा । आन येकि येथें विचारणा । तें सांगिजैल अंतःकरणा । आणावी सर्वज्ञें ॥ ४६ ॥ स्वरामीं रमण जें सहजें । स्वस्थिति साम्राज्य तें बोलिजे । जेथें आपणावेगळें दुजे । तें आथीचिना ॥ ४७ ॥ आपुलिया सत्ता सर्व भान । आपुलेन प्रकाशें प्रकाशमान । आपुलेन सुखेकरून । सुखमय सर्व ॥ ४८ ॥ कीं सर्वत्रु आपणु नियंता । साक्षी ईश्वरु विश्वभर्ता । आत्मा ब्रह्म तत्वता । ऐसी जे

स्थिति ॥ ४९ ॥ तेंचि राज्य ह्मणितलें । परंतु मातें येक आठवलें । हें स्वतांसिद्ध कीं साधिलें । आत्मयाचें ॥१९५०॥ आत्मा सन्मात्रुचि तत्वता । कीं असंता आली सत्ता । सहज ययाची चिन्मयता । कीं साधावी लागे ॥ ५१ ॥ आत्मा सुखमयु सनातनु । कीं दुःखी होता आपणु । तया आनंदु हा गुणु । उपायें लाविला ॥ ५२ ॥ साक्षी व्यापकु जैसा तैसा । की साधनें करावा ऐसा । हे स्वामित्व या निराभासा । कैचें आलें ॥ ५३ ॥ उत्पत्ति स्थिति लय तीन्ही । आभासोनि जयांचां साचपणीं । मायामात्र ह्मणौनि । कांहींचि नसे ॥ ५४ ॥ हे ऐसेंचि ययाचें संचलें । स्वरूप मायें अविद्ये वेगळें । कीं उपाय ते फळले । यये अर्थी ॥ ५५ ॥ आतां आत्मा ब्रह्म सहजाचि । येथें संदेहो तो नाहींचि । ययातें पदवी ययाची । कवणें द्यावी ॥ ५६ ॥ कवण करावा मुक्तु । कवणें करावा शाश्वतु । कवणें ह्मणावा अद्वैतु । अखंडु हा ॥ ५७ ॥ ऐसा जैं आत्मा यादवा । तैं योगसंग्रामु कां करावा । संग्रामीं जयो अपेक्षावा । साधकीं जनीं ॥ ५८ ॥ योगसंग्रामजयें येणें । स्वस्थितिराज्य अपेक्षणें । आतां तें कवणाकारणें । ययावांचूनि ॥ ५९ ॥ स्वविश्राम राज्यपदवी । तेथ सुखमय पूर्णता अघवी । तिचांचि अंतर्भावीं । सुखें नाना ॥१९६०॥ तीं कवणाकारणें अपेक्षावीं । आत्मया काय करावी । पद तें प्राप्त पदवी । ऐसें न घडे ॥६१॥ कवणा पाहिजे गुरु । कवणा पाहिजे साक्षात्कारु । कवणें कवणु ईश्वरु । आराधावा ॥ ६२ ॥ कवणा योगु कवणा ज्ञान । कवणा साध्य साधन । कवणु साधकु सिद्धपण । कवणु अपेक्षी ॥६३॥ तुह्मीं ह्मणाल गोपाळा । नलगे हें शुद्धा निर्मळा । परंतु प्रकृतियुक्ता शबला । सर्व पाहिजे ॥६४॥ तरि शुद्ध शबळेसीं आन । शबळशुद्धा विलक्षण । की उपाधिसंगेंकरून । शुद्धचि शबळ ॥६५॥ वेगळा-लींचि दोन्ही असती । तैं शुद्धता नये शबळाप्रति । साधनाची केली प्रवृत्ति । वायां जाये ॥ ६६ ॥ शुद्धा नये शबळपण । तेणें का करावें साधन । ऐसें जाणता ते वचन । माडेचिना ॥ ६७ ॥ आतां प्रकृतीचेनि योगबळें । शुद्धचि शबळ जालें । मन ज्ञानें योगें आपुलें । महिमान पावे ॥ ६८ ॥ ऐसिया निरोपणा आशंका । असती जी देवा आइका । शुद्धचि शबळ अविद्यका । गुणीं जालें ॥६९॥ तरि जें शुद्ध विनिर्मळ । तें सत्यचि जालें शबळ । तें मागुतें अति विमळ । शुद्ध न व्हावें ॥१९७०॥ पयचि दधि जालें । तें पुढती पयदशे आलें । उपायें ऐसें देखिलें । कव्हणी काये ॥ ७१ ॥ तांदु-ळाची जाली घारी । गोधूमाची जैसी पुरी । तैसी ते पुढती प्रकारी । गोधूमु नव्हे ॥ ७२ ॥ तैसें सत्य शुद्ध परिणामलें । सत्यचि शबळ जालें । तैं उपायें योगें पहिलें । ऐसें न व्हावें ॥ ७३ ॥ तरि आतां तें अपेक्षीं कवण । स्वराज्य कवणालागून । येथें आन एक वचन । परिहाराचें ॥ ७४ ॥ आत्मा संतु जो निर्मळु । आणि असंतु प्रकृतिभाव केवळु । तया दोघां मेळु । येकत्र होतां ॥ ७५ ॥ तेथें औपा-धिक शबळता । शुद्धा आत्मया भासे संता । विवेकें झाडा घेतां । शुद्धचि तें ॥ ७६ ॥ उदक जैसें निर्मळ । तेथें उपजती कल्लोळ । तरंग फेन सकळ । आवर्तादिक ॥ ७७ ॥ नामरूपचिमात्र दुसरें । परंतु पाणी पाणी खरें । पाहतां शुद्धकारें । तैसें शुद्ध ॥ ७८ ॥ नामरूप हा विवर्तु । आत्मा शुद्धु तद्रहितु । मग तेणेंसीं सहितु । अवघा स्फुरे ॥ ७९ ॥ सागरु असतां निजस्थिति । उठी कल्लोळाचि आकृति । तैचि तयातें प्रकृति । ऐसे जाणावें ॥ १९८० ॥ तियेचि प्रकृतीचेनि आंगें । नामें रूपें धर्म-वेगें । कल्लोळु ऐसा प्रसंग । सागरुचि जाला ॥ ८१ ॥ प्रकृती नाहीं स्वतंत्रता । भासे सागरसत्ता । उपाधिमात्रचि ते तत्वता । ह्मणौनियां ॥ ८२ ॥ नाम रूप आणि वेगु । विचारें असंतु हा योगु । तेथें शुद्धा उदका डागु । नसे भेदाचा ॥ ८३ ॥ ह्मणौनि शबळत्वाचेन आकारें । शुद्ध तेंचि विकारे । शबळ मिथ्या विचारें । शुद्ध तें सत्य ॥ ८४ ॥ ऐसा परिहारु सूचिला । तेथेंही संदेहो उपजला ।

आत्मा शुद्धु तो केला । विकारवंतु जैं ॥ ८५ ॥ तरि आत्मयाचेनि नित्यपणें । विकारा पाहिजे नित्य असणें । विकार नित्य तैं अनुभवणें । निर्विकारता कैसी ॥ ८६ ॥ यालागीं नित्याचे स्वभावं विकार । ते जैं अनित्य क्षर । तैं नित्याचे ते समग्र । कैसे बोलावे ॥ ८७ ॥ संत विकार संतांचे । नित्य नित्या आत्मयाचें । असंत अनित्य ते तैं साचे । इतरांचे जाणावे ॥ ८८ ॥ ऐसिया आक्षेपाकारणें । जळ-दृष्टांतु तोचि दावणें । जळचि जैसें स्वगुणें । होये तरंग कल्लोळ ॥ ८९ ॥ उदकाचिये सर्वत्र स्थिती । दुजें कवण कारण आथी । तेथ लहरिया तरग उठिती । आपेआप जैसे ॥१९९०॥ तैसेचि शुद्ध सनातन । आत्मतत्व निर्गुण । तेंचि शबळ सगुण । जाणावें दृष्टातें ॥ ९१ ॥ ऐसा परिहारु केला । तेथेंही संदेहो जाला । जळीं कल्लोळु उपजला । आणि तरगादि विकारु ॥ ९२ ॥ तो केवळें उदकें येकलेनि । विकारु उपजे कैसेनि । पवनाजीवनाचिये मिळणी । होतील हरिया ॥ ९३ ॥ उदका वायो झगटे । तैं तें तरंगाकार उठे । लहरिया वेगु प्रकटे । ते चेष्टा पवनाची ॥ ९४ ॥ तरंगाकार साकारलें । तें राहो पवनावेगळें । न शके ह्मणोनि अंतराळें । तरंगीं वायो ॥ ९५ ॥ पवनु पाणियें आंवरला । तो बाहेरि पडों चुकला । मग जळाधीनु राहिला । तरंगाकृति ॥ ९६ ॥ तरंगी सिरकलेनि पवनें । तरंगाकारें जळ धरणें । यापरी न सुधे न जीवनें । तरंग न होती ॥९७॥ तैसेचि कल्लोळ धांवती । लहरिया जळीं क्रिडती । तेथेंही पवनु आथी । आधारु तयां ॥ ९८ ॥ पवनु हाणे पाणिया । मग तें होय लहरिया । पवनाधारेंचि तिया । होती भासती ॥ ९९ ॥ पवनाधारें होणें । पवनाधारें आभासणें । पवनाधारें चेष्टणें । लहरियांचें ॥२०००॥ पवनु सोडी संगति । तैं लहरिया तरंग तुठिती । जळ निर्विकार स्वस्थिति । जैसे तैसेंचि ॥१॥ ह्मणौनि केवळ जळचि सविकार । ऐसें निश्चयें उत्तर । न बोलावें तरि शुद्ध निरंतर । शबळ कैसे ॥२॥ येथें सूचला परिहारु । स्वस्थिति असतां सागरु । उगाचि भरितें ये पूरु । वेग धांवती ॥३॥ आणि वातरहितेही जळीं । तरंग होती येके काळी । ह्मणौनि पवनावेगळी । जळाक्रियाही मानिजे ॥४॥ ऐसें वचन बोलतां । आक्षेपु उपजला मागुता । पवनेवीण सर्वथा । वेगुचि न संभवे ॥५॥ आणि दुजेनवीण जीवन । सविकार होईल आपण । ऐसे न घडे ह्मणौन । बोलिजत असे ॥६॥ सागरु संपूर्ण सर्वथा । परंतु वरिता पैसु रीता । ह्मणौनि आकाशाचा मागुता । संगुचि तो ॥७॥ सूक्ष्म पवनु वसे गगनीं । ते गगन मिळे जीवनीं । तरीचि निर्वातीं तयापासूनि । तरंग होती ॥ ८ ॥ पोकळी आधारें कल्लोळ । पवनाचेंचि तेथें बळ । नातरि पाणिया पोटीं केवळ । विकार नुपजती ॥ ९ ॥ वरिवरि तोय चंचळ । अंतरीं निस्तरंग निश्चळ । येणें प्रकारें केवळ जळ । तेंचि न विकारे ॥२०१०॥ कव्हणी करिती परिहारु । अंतरीं वाहे सागरु । ना तरि भरितें पूरु । तो कैसा येता ॥ ११ ॥ अंवसे पुनिवेचें भरितें । पूर्ण करी सरितातें । अंतरीं उदक न वाहतें । तैं न घडतें हें ॥ १२ ॥ वरि वरि नित्य लहरिया । धांवतचि असती तिया । भरितें न होती ह्मणौनियां । ऐसें घडे ॥ १३ ॥ एवं उदक अंतरीं वाहे । हें खरें मत आहे । परंतु येथेंही होये । येकि आशंका ॥ १४ ॥ अंतरीं पाणी वाहे । तें रीतियाची ठाया जाये । ना तरि कोरडिया काये । नदिया भरतिया ॥ १५ ॥ ह्मणौनि व्योमाचेनि वाहे पैसें । वाहे अंतरीं तें व्योम असे । पवनु व्योमावेगळा नसे । ह्मणौनि बळ तें त्याचें ॥ १६ ॥ आकाशीं वाहे जीवन । तें पवनवेगेंचिकरून । तैं अंतरीं वायो गगन । नित्य असतां ॥ १७ ॥ सार्वकाळ भरितेंचि असावें । ह्मणानि तें ऐसें नव्हे । स्वभावचि सहज भावें । तया सागराचा ॥ १८ ॥ ऐसा परिहारु केला । सागरीं स्वभाव लाविला । येथेंही आथी उपजला । संदेहो येकु ॥१९॥ स्वभाव तो जैं पाणियाचा । तरंगादि विवर्तु जयाचा । पूरु येणें पोर्णिमेचा । आंपआपु जो ॥२०२०॥ तरि षद्ध

मरूनि जळ आणावें । मग तें पौर्णिमे पाहावें । भरितें आलें तैं न बोलावें । आह्मीं वचन ॥ २१ ॥ आतां घटोदका नये भरितें । तरि धर्मु नारोपावा जळातें । जळीं जळावेगळें येथें । निमित्य कल्पावें ॥ २२ ॥ पृथ्वी आकाश वायो चंद्रु । अथवा देवतारूपें सागरू । परंतु पाणियाचा विकारू । ऐसें तंव नव्हे ॥ २३ ॥ जळविकारची हे होते । तैं सैंधव वाटवे फोडितें । घराबाहेरि न येतें । लवण काये ॥ २४ ॥ ह्मणौनि जळ तें निर्विकार । अन्य धर्मी तेथें विकार । आतां अद्वय अज अक्षर । आत्मतत्व जे ॥ २५ ॥ तेथें शबळदशेचे विकार । तया धर्म न होती समग्र । तेथें निमित्य तदितर । कवण कल्पावें ॥ २६ ॥ प्रकृति मानावी तें असंत । हें विकारवादियाचेंचि मत । आतां तीचें आंग संत । कैसें साहे ॥ २७ ॥ जीवन हाले पवनें । तैसें ब्रह्म मायेनें । मग सविकार पडलें होणें । केवला तया ॥ २८ ॥ तरि असंता संत बाध्य । वंध्यजा माणूस वध्य । लटिकें सत्य साध्य । ऐसें दिसे ॥ २९ ॥ एवं शुद्ध ते केवळ निर्विकार । दुजें असंत तदितर । तरि भवभानचि समग्र । असावेंना ॥ २०३० ॥ आता हें काये आभासे । कवणा बाधक असे । याचिये निवृत्तीचें पिसें । तेंचि कवणा ॥ ३१ ॥ ऐसें या आक्षेपा निवारण । बोलती जाणते वचन । अहो शुद्ध निर्विकार सनातन । तें जैसें तैसेंचि ॥३२॥ तें विकारलें ना पालटले । जैसें तैसेचि असे संचलें । प्रपंचु हें अज्ञान आपुलें । आपणा भासे ॥३३॥ आत्मज्ञानें शबळता । शुद्धाभासे प्रपंचता । आत्मज्ञानें पाहतां । मिथ्या सर्व ॥ ३४ ॥ ह्मणौनि नामरूप ज्ञानाज्ञान । अवघेंचि हें आत्माज्ञान । तरि आत्माज्ञाना अधिष्ठान । पाहिजे कीं ॥ ३५ ॥ आपुलें अज्ञान कवणातें । शुद्धा न घडे शुद्धमतें । आणि शुद्धावेगळें येर तें । अज्ञानकार्य ॥ ३६ ॥ विण आश्रयें अज्ञान । कवणा भासे भान । आता शुद्धावेगळें स्थान । कैचें यया ॥ ३७ ॥ अज्ञाना न दिसे स्थान । तरी बोलणंचि अप्रमाण । आता गुरुमार्गें योगसेवन । ते कवणा पाहिजे ॥ ३८ ॥ कव्हणी देतील उत्तर । शुद्ध ब्रह्म तें अक्षर । ते पालटोनि प्रपंचाकार । जालें हें न घडे ॥३९॥ प्रपंचु विकारु ब्रह्मीचा । शबळु भाव शुद्धाचा । ऐसाही निश्चयो तयाचा । केला नवचे ॥ २०४० ॥ पालटुचि जया नाहीं । विकारु तरंगु नुपजे काहीं । तरि अज्ञान जें आत्मविषयीं । तेंचि भासे ॥ ४१ ॥ बोलतां ऐसे वचन । शुद्धा आत्मया कें अज्ञान । यालागीं तेंहीं प्रळपन । सांडिलें सर्व ॥ ४२ ॥ आतां अधिष्ठानीं नाहीं परिणामु । विकारु अज्ञान न तद्धर्मु । रज्जुसर्पन्यायें भ्रमु । उगाचि भासे ॥ ४३ ॥ दोरु तो काहीं पालटला । किंवा सर्पत्वें विकारु तेथे उठिला । पाहे तो केवळु आंधळा । ऐसेंही नव्हे ॥४४॥ तेथें पाहतियाची दृष्टी । दोरु सर्पाकारत्वें उठी । तयाचिया दोरपणा तुटि । काये तेणें ॥ ४५ ॥ ऐसेनि विचारें येणें । शुद्धीं प्रपंचु स्थापणें । तरि ऐसेंही हें बोलणे । सदोष दिसे ॥४६॥ दोरु दोरपणें खरा । देखणा तो सत्य दुसरा । पूर्वद्रष्टु तिसरा । सपु साचारु ॥ ४७ ॥ तिघां न साहे एकपण । साहे तैं नुठी अन्यथा भान । ह्मणौनि त्रैविध्य कारण । यया आरोपा ॥ ४८ ॥ तींमाजी एक खोटें । तैं अन्यथाभानचि तें नुठे । ऐसें शुद्धीं काये घटे । मा घडे हे ॥ ४९ ॥ दोरु दोरा आपणपयां । भुजंगु नव्हे कांहीं यैकलिया । आता सर्पु सर्पस्थानी तया । दोरत्व नकळे ॥२०५०॥ द्रष्टा दोहींचा जो नरु । तो नेणे सर्पु अथवा दोरु । तैं रज्जुस्थानीं विखारु । कैसा भासे ॥ ५१ ॥ दोहींवेगळा द्रष्टा पुरुषु । नेणे दोरीं भुजंगाभासु । ह्मणौनि येथें बव्हशु । योगु पाहिजे ॥ ५२ ॥ जाणता असावा नरु । ज्ञानसहित दृश्यपरु । तया सर्पाचा साक्षात्कारु । पूर्वीं पाहिजे ॥५३॥ तदाकृतीचि दोरु असावा । प्रकाशु निर्मळु नसावा । दुजेतेपणाचिया भावा । मग तो दिसे ॥ ५४ ॥ तारि ब्रह्माचें कवणा दर्शन । ब्रह्मापूर्वीं प्रपंचज्ञान । मग ज्ञानाचें मंदपण । वर्तत असतां ॥५५॥ प्रपंचाचिसारिखें तें व्यक्त । मा प्रपंचु मानिजे

तेथ । हें अप्रमाण मत । नाना प्रकारीं ॥५६॥ ब्रह्मापूर्वीं प्रपंचु कैंचा । आणि प्रपंचद्रष्टा अज्ञु येथिंचा । ययाही वेगळा तयाचा । सारिखे वादु कांहीं ॥ ५७ ॥ तरि ब्रह्म अव्यक्त अगोचर । व्यक्त प्रपंचभान गोचर । तयातें सारिखे हें उत्तर । घडेचिना ॥ ५८ ॥ ब्रह्मातें कवणु जाणु । जेथें आत्मभाव अकिंचनु । होये मग निर्गुणु । बोधु स्फुरे ॥ ५९ ॥ सच्चिदानंदमय सर्वदा । अप्रकाशु नाहीं तेथ कदा । ह्मणौनियां आरोपवादा । घालावें पाणी ॥२०६०॥ तरि आतां प्रपंचु तो किंलक्षणु । विचारें घेतां सगुणु । तरि इतुलेही दोष सांडूनु । रूप करावें ॥ ६१ ॥ ब्रह्मचि पालटोन जालें ऐसें । हें न घडे सर्वथा विवेकांशें । मागुतें होणें जैसें तैसें । आहे ह्मणौनि ॥ ६२ ॥ ब्रह्म शुद्ध निर्विकार । तेथें उठिती गुणादि प्रपंचविकार । तरि निमित्येंवीण साचार । ऐसें न घडे ॥ ६३ ॥ निर्निमित्य निर्विकार । संचलेंचि असतां निराकार । अज्ञानें अन्यथा गोचर । भासलें तेथें ॥ ६४ ॥ ऐसें बोलावें वचन । तरी शुद्धा नलगे अज्ञान । रज्जुसर्पन्यायें विपरीत भान । नाथिलें आरोपिजे ॥ ६५ ॥ हेंही वचन खंडलें । तरि आतां कैसें उरलें । विवर्तरूप भान भासलें । तये ब्रह्मप्रकाशीं ॥ ६६ ॥ सूर्याचे जैसे किरण । अच्छिद्र निरंतर पूर्ण । तयांमाजी जीवन । ऐसें आभासे ॥ ६७ ॥ पालटूनि आपुलिये दशे । किरण काय जाले तैसे । अथवा सत्य तरंग सागरीं तैसें । किरणीं मृगजळ ॥ ६८ ॥ किरणाज्ञानें हें दिसे । तरि किरणाज्ञानेंही काये नभसे । तें आतांही जैसें तैसें । किरणचि सर्व ॥ ६९ ॥ रज्जु सर्पापरी भासलें । ऐसें मृगजल कैं जालें । ते आभासोनि आपुलें । आपणचि वाव ॥२०७०॥ किरणाचिये स्थिती । पालटून संता प्रतीती । भेदेंविण भासे भ्रांती । परि प्रत्यया नये ॥ ७१ ॥ ऐसें ब्रह्म पूर्ण सनातन । नित्य संत निर्गुण । अद्वय अखंड स्थिर पूर्ण । जैसे तैसें ॥ ७२ ॥ तेथें आभासे प्रपंचु तो विवर्तु । अव्यक्तीं व्यक्तु मूर्तिमंतु । ज्ञाता ज्ञेय ज्ञान समस्तु । गुणांशु जो ॥ ७३ ॥ भासे तंव संशयो नाहीं । धरिजे तंव सत्यता नसे कांहीं । प्रतीति वाटे परि तेही । तया अधिष्ठानाची ॥ ७४ ॥ येणें भासावेंचि मात्र । परि नसावें सर्वत्र । शुद्ध आत्मतत्व निर्विकार । तें पालटावेना ॥ ७५ ॥ ऐसा निश्चयो ययाचा जाला । तरि प्रश्नु येकु आथी उरला । येणे पुरुषु जाजावला । साडूं कां पाहे ॥ ७६ ॥ याचिये निवृत्तीकारणें सद्गुरूचे पाये सेवणें । अभ्यासु दुर्गमु सोषणें । आंगोआंगीं ॥ ७७ ॥ कर्म भक्ति आणि ज्ञान । याचिये निवृत्ती साधन । वेदु तो हेंचि आचरण । मुक्तीचें स्थापी ॥ ७८ ॥ तरि जें नाहीं कांहीं । प्रतीती नये आणितांही । तयाचिये निवृत्तीचे कायी । येसणें दुःख ॥ ७९ ॥ सर्वज्ञ ऐसें ह्मणती । हा भ्रमु आत्मया नाथी । गुणागुणकृत प्रतीती । येत असतां ॥ २०८० ॥ तेथिंचें ज्ञाता ज्ञेय ज्ञान । कर्ता कार्य कारण । साध्य साधकु साधन । येणे आकारें ॥ ८१ ॥ जो जो भाव आभासे । तो गुणातेंचि गुणाचा असे । येणें त्रासोल्लासु दिसे । तो गुणातेंचि गुणीं ॥८२॥ तरि योगु तोही गुणातें । परि न घडे आत्मया शुद्धातें । ऐसें नाना सिद्धांतें । सिद्ध केलें ॥ ८३ ॥ तरि योगु हा आत्मा नेणे । इच्छावा गुणाचिकारणें । स्वस्थिति गुणींचि भोगणें । रमणें सुखीं ॥ ८४ ॥ निर्विकल्पें समाधि । प्रपंचु न स्फुरावा कधीं । ऐसी विशुद्धा बुद्धि । नव्हे आत्मयाची ॥ ८५ ॥ सविकल्पनें मनें । निर्विकल्प हों इच्छिणें । समाधि प्रपंचु विसरणें । हे तयाची इच्छा ॥ ८६ ॥ स्वरूप मातें कळावें । योगाभ्यासें तेथ राहवें । अद्वितीय राज्य करावें । भोगावें सुख ॥ ८७ ॥ ऐसें शुद्धा आत्मया सिद्धा । केवळ इच्छावें कदा । नलगे तो सर्वदा । जैसा तैसाचि ॥ ८८ ॥ अविद्येपासाव उठी । तया अहंभावाची हे गोष्टी । प्रपंचें जयाची दृष्टि । पावली भ्रमातें ॥ ८९ ॥ आत्मसुख म्यां भोगावें । आपुलाचि ठाईं असावें । संसारापासाव सुटावें । हे इच्छा गुणा ॥ २०९० ॥ स्वरूपीं नित्य रमण । विसरों करी मीपण । अपेक्षी योगु

सान । तें मनचि येक ॥ ९१ ॥ ह्मणौनि जयांकारणें । स्वस्थितिसाम्राज्य इच्छिणें । आपुलें सुख भोगवणें । जयां गुणां ॥ ९२ ॥ विषयांपासाव सोडवावें । स्वानंदीं मन क्रीडवावें । आपुलें पद भोगवावें । तयाकरवीं ॥ ९३ ॥ योगु सांगु अभ्यासवूनि । मग तो सिद्धी पाववूनि । सुख आपुलें जयांलागूनि । वांटूनि द्यावें ॥ ९४ ॥ कर्मयोगें सत्वशोधन । सत्वशोधनें आत्मज्ञान । आत्मज्ञानें समाधान । सुखाचि प्राप्ति ॥ ९५ ॥ भक्ती आराधूनि ईश्वरा । तदनुग्रहें गुरुद्वारा । आत्मबोधु खरा । अपेक्षावा ॥ ९६ ॥ तो तंव नलगे आत्मयातें । आत्मबोधु गुणातें । अहं-दुर्योधनादिकांतें । प्राप्त करावा ॥ ९७ ॥ अभ्यासयोग सोसूनि । स्वरूपीं निश्चलता साधूनि । आत्मसुख हें गुणीं । प्रकट करावें ॥ ९८ ॥ प्रपंचु जयांतें अरिष्ट । तयांतेंचि इच्छावें इष्ट । आत्मतत्व प्रकट । करूनियां ॥ ९९ ॥ अप्रकटु आपणु जयां । आत्मबोधु इच्छावा तयां । मग तो जनीं दावावया । समर्थे करावी ॥२१००॥ मना करवीं भोगवावें । तें स्वरूप बोलवावें । आणिकांप्रति प्रकाशवावें । इंद्रियद्वारा ॥ १ ॥ नयनांचा भागु नयनां । श्रवणांचा देइंजे श्रवणां । ज्ञानकरणां कर्मकरणां । यथायोग्यत्वें ॥२॥ बुद्धी भागु बुद्धीचा । मना देइंजे मनाचा । अभिमाना अभिमानाचा । विभागु आहे ॥३॥ सर्वज्ञत्व सर्वसाक्षित्व । सर्व भोक्तृत्व कर्तृत्व । अन्वयें सर्वरूपत्व । सर्वदा जें ॥ ४ ॥ विविक्तात्मता गुणीं । सच्चिदानंदमयता स्वस्थानीं । हे आत्मपदवी राज्यस्थानीं । कल्पिली जे ॥ ५ ॥ ते सर्वथा देइंजे अभिमाना । तया कौरवा दुर्योधना । मग इतरु भागु इतरां गुणां । सुखादिकु ॥ ६ ॥ कोण्हा हर्षु उल्लासु । कव्हणा सुखसंतोषु । कव्हणा क्रीडाविशेषु । निजानंदीं ॥ ७ ॥ ह्मणौनि जयांकारणें । आत्मराज्य आपण इच्छिणें । सुखें भोग सर्व वांटणें । आपुले जयां ॥ ८ ॥ तेचि गुणभाव हे कौरव । संग्रामीं उभे सर्व । आश्रयूनि वैरभाव । कैसे पुढती ॥ ९ ॥ सांडूनि संगु प्राणाचा । आणि देहा अधिष्ठानाचा । स्वस्वविषया धनाचा । त्यागु करूनि ॥२११०॥ शमदमयोगसंग्रामीं । जाणोनियां हे मरणभूमि । आले कालाचां आश्रमीं । वसों काये ॥ ११ ॥ त्रिपुटीचा आश्रयो सोडूनि । निरावलंबी करूनि मांडणी । विवेकव्याघ्रांचां वदनीं । उभे ठाले ॥ १२ ॥ सांडूनि संकल्पनाधन । प्राण आंगाचें चंचळपण । येकनिष्ट मरणालागून । मानस आलें ॥ १३ ॥ देहसंगु प्राणसंगु । सांडूनि ममत्व धनविभागु । बाहेरि होता तो अंतरंगु । अभिमानु आला ॥ १४ ॥ सांडूनि स्थूळ आणि जागरण । जो गुणें विषयस्फूर्ति धन । वर्जूनि बाह्य क्रीडण । विवेका आला ॥ १५ ॥ सांडूनि अज्ञान जडता । विसरु प्रमादु धन सर्वथा । तमोगुणु हा उजेडतां । समयीं आला ॥ १६ ॥ जे जें जयाचे स्थान । ते तें राज्य तेणें सांडून । निरावलंबीं येऊन । मांडणी केली ॥ १७ ॥ जे जे जयाची प्रवृत्ति । तें तें धन भोगवृत्ति । तीतें सांडूनि स्थिति । निरावलंबीं केली ॥ १८ ॥ जें जें कार्य जयांलागून । तें तें भोग्यरूपधन । असो तें सर्व सांडून । अंतरा आली ॥ १९ ॥ आतां तीं कवणें कवणें । श्रीकृष्णा माझीं स्वजनें । तयांचीं रूपें अभिधानें । सांगैन मी ॥२१२०(३३)॥ [ आचार्याः ] माझें अज्ञान बालदशेचें । तें हरिलें तेहीं साचें । मृदु वचन मर्यादेचें । सिकविलें बोलों ॥ २१ ॥ आंगोळी धरूनि चालविलें । हनुवटी धरूनि बोलविलें । पशूचें मनुष्य केलें । माझें देह ॥ २२ ॥ अन्नचि कैसें खाणें । तेंही परंतु मी नेणें । फळलें जयांचें शिकवणें । ते येक गुरु ॥ २३ ॥ नामें रूपें पदार्थीचीं । संज्ञा जाणाविली तयांची । ते संसारमार्गी गुरुचि । कैसे न मानावे ॥ २४ ॥ वाचणें पढणें बोलणें । आइकणें घेणें देणें । हें जेंही आज्ञांकारणें । शिकविलें असतां ॥ २५ ॥ आजि ते वैरी जाले । संग्रामा उभे राहिले । तयांचें मातें आठवलें । तें कैसें विसरों ॥ २६ ॥ द्रोणाचार्यो विद्यागुरु । स्वधर्मी केला मी चतुरु । आतां तयाचा उपकारु । काये ऐसा

निस्तरणें ॥ २७ ॥ शिरकमळीं पादपूजा । अझुनी तैसाचि भाव माझा । तेणें द्रोणाचार्येंसीं झुंझा । कैसें प्रवर्तणें ॥ २८ ॥ [पितरः] येक ते माझे पितर । येक ते बंधु साचार । गोत्रज साने थोर । मजहूनि कृष्णा ॥ २९ ॥ ययांचीं मुखें पाहतां । कैसी उपजे कठीणता । हे गोत्रवत्सलु व्यथा । तोचि जाणे ॥ २१३० ॥ [पुत्राः] येक ते कुमर धाकुले । मजदेखतां उपजले । कडीये खांदीं घेतले । मायामोहें ॥ ३१ ॥ येकपात्रीं भोजन । ग्रासा पसरिती वदन । जैसीं पक्षिणीचीं जाण । सानीं पिलीं ॥ ३२ ॥ घालूनि पदरीं पिळा । आळि करिती जे गोपाळा । आजिवरी पाळिला । ळळा जयांचा आह्मीं ॥ ३३ ॥ तयांतें आह्मीं मारावें । तेहीं कवणाप्रति सागावें । मग पडे बुझावावें । आपणातेंचि ॥ ३४ ॥ उपजलाही तमोगुणु । हातु नलगे कठिणु । जयाचेनि दुःखें प्राणु । जाऊं पाहे ॥ ३५ ॥ तयां कव्हणी बाधा करी । तो पिताही माने वैरी । बाणु लागे शरीरीं । तेणें दुःखें ॥ ३६ ॥ कानीं पडतां रुदन । नव्हे स्थिर आपुलें मन । जाजावती पंचप्राण । ध्यान भंगे ॥ ३७ ॥ नाम घेऊनि आळविती । तोचि विश्रांति होये चित्तीं । धांवोनि गळयां झोंबती । ते कैसी मारावीं ॥ ३८ ॥ दुखवलीं घालिती सादु । तैं तयां आर्तांचा शब्दु । आइकोनि उपजे खेदु । घालिजे उडी ॥ ३९ ॥ आतांचि पासीं आलीं । गळया झोंबों लागलीं । तरि कैसीं न ह्मणों आपुलीं । सांवरूं मोहें ॥२१४०॥ पशूतें काये पान्हा । अवधारीं गा नारायणा । वांजां न कळे वेदना । पुत्रवंताची ॥ ४१ ॥ पाडसें सांडूनि न पळवे । मृगें गुपोनि जाती जीवें । माया तैसीचि देवें । लाविली हे ॥४२॥ पक्षिणी आंडीं घातलीं । अच्छादूनि तयां बैसली । वरि मांजरें कत्र घातली । परि सांडूनि नवचे ॥ ४३ ॥ गा आह्मी तरि माणुसें । आप पर नेणों कैसें । यया ममत्वाचे फासे । बहुसाल आह्मां ॥ ४४ ॥ आठवे क्रीडा ययांची । बाळभाषा बाळकांची । अझुनी मातें धाकुटीचि । ऐसीं वाटता ॥ ४५ ॥ आपुला मोहो पुत्रावरी । तैसाचि पितरांचा आपणावरि । येणें अनुभवें श्रीहरी । जाणावा तो ॥ ४६ ॥ पुत्रु होतांचि यादवा । कैसा संतोषु जीवा । आतां अविघ्न वाढावा । हेचि वासना ॥ ४७ ॥ कैं शिकेल हा चालों । कैं पां शिकैल बोलों । कैं शिकैल खेळों । लेकुरांमाजी ॥ ४८ ॥ कैं हा आचि करील । भाणाचें अन्न कैं नासील । धुळी भरला कैं येईल । खेळोनि हा ॥ ४९ ॥ ऐसीचि घोकणी करितां । पावे ते ते अवस्था । तें तें सुख अनंता । किती वडिलांच ॥२१५०॥ आतां हो पां हा जाणता । आह्मां समग्रांतें पोषिता । आपुला संसारु ह्मणता । ऐसें चिंतिती ॥ ५१ ॥ अज्ञानावरि ममत्वचि । परि आशा बहुसाल प्रबुद्धांची । ते आह्मी ययांची । ऐसी पुरवावी ॥ ५२ ॥ हा काळुवरि आशावंतें । मी जाणें देवा ययांतें । मी भेटी जातुसें ययांतें । शस्त्रें घेऊनि ॥ ५३ ॥ आला ह्मणौनि वाट पाहती । मातें देखोनि उल्लासती । आतां म्यां तयां श्रीपति । कैसें मारावें ॥५४॥ येकं वाडें येकें धाकुलीं । स्वजनें संग्रामा आलीं । दूरि होतों तीं वोळखिलीं । पासीं येऊनि ॥ ५५ ॥ कवणावरि घाव घालूं । सांग पां मातें येकु बोलु । गोविंदा तूं निर्मळु । ह्मणौनि पुसें ॥५६॥ [तथैव च पितामहाः] जैसेचि गुरु द्रोणादिक । तैसेचि आजे भीष्मादिक । युद्ध करावया सन्मुख । मांडले जे ॥ ५७ ॥ जयां देखतां उपजलों । जयां देखतां वाढलों । जयां देखतां जालों । धर्म जाणते ॥ ५८ ॥ नमस्कारूनि जयांतें । आरंभु केला धनुर्विद्येतें । आशीर्वाद हे आमुतें । फळले जयांचे ॥ ५९ ॥ तयांप्रति आह्मीं जातां । श्रीचरणींचि ठेवावा माथा । कीं बाणु हा गोपीनाथा । प्रेरावा तयांवरि ॥२१६०॥ तयांचा दंडु साहणें । किं आह्मी तयां दंडु करणें । वासुदेवेंचि निरोपणें । धर्मु आह्मां ॥६१॥ स्वर्गी पूर्वज पाहती । आमुतें ते काये ह्मणती । देवऋषिगण नेदिती । आमुतें स्थान ॥ ६२ ॥ तयांचें देखणें कृपेचें । आमुचें तें

वैरबुद्धीचें । आतां पवित्रपण दोघांचें । विचारिजो देवें ॥६३॥ [ मातुलाः ] शैल्यादिक मातुळ । हे पितरांसमान केवळ । तयांसीं करणें बळ । तैं भक्ति काइसी ॥ ६४ ॥ माता काये ह्मणैल । तीर्ते कैसें वाटैल । कष्ट जननीचे विफळ । वाटती जननीतें ॥ ६५ ॥ घरा आलिया मानु । भेटि जालिया सन्मानु । प्रीतियोगु असाधारणु । अश्रुणीवरि तो ॥६६॥ ऐसें असोनि येणें क्षणें । उगेंचि शस्त्र घेऊनि पुढें होणें । तैं भिडेतें लोटणें । कासेन पां ॥ ६७ ॥ [ श्वशुराः ] माझे तैसेचि श्वशुर । पितरस्थानीचि समग्र । आणि जयांकरितां संसार । शोभताति ॥ ६८ ॥ येहीं आमुचें काये केलें । आह्मीं याचें काये नाशिलें । ययां आह्मां वैर लागले । कासयानें ॥ ६९ ॥ यशाची सांगावी गुढी । पितर मारिले हे प्रौढी । आणि श्वशुरांचां धडीं । बाण रोविले ॥ २१७० ॥ खोंचले पडती रणीं । तैं तें श्रीकृष्णा चक्रपाणी । आमुतें देखोनि मनीं । कैसें वाटैल ॥ ७१ ॥ हातीं शस्त्र डोळां पाणी । काये चालैल तेथ करणी । अर्थस्वार्थु तो मनीं । उमटेचिना ॥ ७२ ॥ मेलया घरवरि जाणें । तेथ रडतियां काये संबोखणें । मसीचीं घडलीं वदनें । ऐसीं होतील ॥ ७३ ॥ मातेचें मुख पाहवे । कीं पंडूचें मन धरावें । स्त्रियातें बुझवावें । कवणें बोलें ॥ ७४ ॥ सांभाळावया श्रीधरा । सोइरे येती आह्मां घरा । तैं तयां देखोनि समग्रा । काये बोलावे ॥ ७५ ॥ कवण कैसे मारिले । काय पुरुषार्थ सांगावे आपुले । आणि तेचि शंकूं लागले । तैं काये कीजे ॥ ७६ ॥ मग तयांतेंही मारणें । मरिजे तंव ऐसेचि करणें । पुढें सोइरिकेकारणें । कवण येती ॥ ७७ ॥ [ पौत्राः ] बंधुपुत्रांचे माधवा । पुत्र ते पौत्र आह्मां पाडवां । आता तयाचिया जीवा । वाईट होती ॥ ७८ ॥ धाकुलालिया घरीं स्त्रिया । प्राणचि देती तिया । आह्मीं बुझाविजे तयां । तंव तोंड नाथी ॥ ७९ ॥ मरतां कवणातें बोबाती । आमुचीं मुखें अवलोकिती । तंव आपुलेंचि मांस दांतीं । आह्मीं धरिलें ॥ २१८० ॥ भेऊं नका रे ह्मणावया । कवणु आहे कृष्णा तया । सर्वां व्याघ्रां आह्मा तयां । बाळेंचि आहारु ॥८१॥ [ श्यालाः ] शालका हे भली रळी । जीवावरि आह्मीं आरंभिली । सोइरीक फळा आली । रोकडीचि ॥ ८२ ॥ माजलया न कळे माउसी । तोचि न्याय जाला आह्मासि । सिद्ध असतिया मनुष्यपणासि । आह्मी साडिलें ॥ ८३ ॥ बहिणी सांभाळावया जाणें । तैं प्रीतियोगें कवणें । काळें घेऊनि परतणें । आपुलें वदन ॥ ८४ ॥ परतोनि घरा येता । स्त्रियाचें दुःख देखतां । काये ह्मणावे अनंता । मुखचि नाहीं ॥ ८५ ॥ बाहेरीचि बैसतां भले । ऐसें मानसीं विचारिलें । तंव आह्मी सांभाळूं आले । सोइरे तत्संबंधी ॥ ८६ ॥ तयासी बोलतां मातु । मुखाचिवरि असावा हातु । निर्नासिकाचा वृत्तांतु । आह्मां घडला ॥ ८७ ॥ [ संबंधिनस्तथा ] तैसेचि पैल ते येक । विवाही जांवाई लोक । शरीरसंबंधी अनेक । अनेकापरींचे ॥ ८८ ॥ जयाचे उपकार आह्मांसि । आंगावरि जालिया राशी । हे प्रत्युपकार तयांपासीं । आह्मीं योजिले ॥ ८९ ॥ एकमेकाचा घरीं । लेकुरें घातलीं असती उदरीं । आतां तयां बाळकां गळयां सुरी । घातली कीं ॥ २१९० ॥ कन्या पुसों येती क्षेम । तयां काय सांगावें कर्म । पापी बोबाई अधम । दुराचारी ॥ ९१ ॥ सुना आलिया द्वारा । शब्दु न निघे मुखाबाहेरा । आतां निज मस्तकावरि चिरा । घालावा काये ॥ ९२ ॥ भगिनी पुसती काये जालें । तयांचीं सानीं मुलें । तयांप्रति आतां बोलें । काये सांगावें ॥ ९३ ॥ ऐसीं जीवलगें अपारें । उरलेनि आमुचेनि शरीरें । जीणें ना मरणें पुरे । ऐसे करितील ' ॥९४॥ ऐसें अर्जुनु बोलिला । तो परमार्थें अर्थु कैसा आला । तो पाहिजैल सांगितला । साहित्यप्रकारें ॥ ९५ ॥ अर्जुनु ह्मणे ' गोपीनाथा । आपुलेन गुणमार्गें वर्ततां । सहित स्वजनां समस्तां । यये संसारीं ॥ ९६ ॥ तेथें रजोगुण अविद्येचा । द्रोणु गुरु जो आमुचा ।

पुढती तयाचि मानाचा । आणीकुही जनु ॥ ९७ ॥ धर्मी प्रवृत्ति जयाचेनि । जाणते जालों करणीं । मानु महत्व जनीं । भोगिलें मग ॥ ९८ ॥ तया रजोगुणातें मारावें । तैं धर्म लोपती अघवे । कार्याकार्य नेणवे । ऐस होईल ॥९९॥ रजोगुणु हा शरीरीं । असोनि आह्मां काये वैरी । जेणेंविण संसारीं । न कळे चातुर्यता ॥ २२०० ॥ अन्यथाबोध हे पितर । रणा आले समग्र । जयांकरितां आचार । नामरूप भेद ॥ १ ॥ पदार्थभेदाचें ज्ञान । फेडूनी बालदशेचें अज्ञान । प्रत्यक्ष आह्मांलागून । संपादिलें यहीं ॥ २ ॥ जेहीं दाविला संसारु । नामरूपबोधु केला स्थिरु । जयांचेनि आंगें द्रोणु गुरु । रजोगुणु देखिला ॥ ३ ॥ अन्यथाबोधें उपजले । अभिमानबंधु आपुले । दुर्योधनादिक आले । रणासि जे ॥ ४ ॥ कार्याकार्यी प्रवर्तावे । तै जयांसंगें जावें यावें । येकें देहें प्राणें जीवें । वर्तावें संसारीं ॥ ५ ॥ तयांचा नाशु गरुडध्वजा । तो भुजाछेदु सत्य माझा । कार्याकार्य मग वोजा । निपजे कैसें ॥ ६ ॥ अभिमानापासाव अपार । वेगें उठिती ते कुमर । आह्मींचि तयांतें थोर । केलें असतां ॥ ७ ॥ वाईट कैसें चिंतावें । चिंतिलिया उणेंचि पडावें । मग कवणालागीं सोषावें । हिताचें साधन ॥ ८ ॥ आत्मबोधु तमोगुणु । आजा भीष्मु कैसा कवणु । तरि अन्यथाबोधु जयापासूनु । पुत्रस्थानीं जाला ॥ ९ ॥ येणें येकलेनवीण । आह्मी मग कवणाचे कवण । कौरव पांडव ह्मणौन । नामचि नसतें ॥ २२१० ॥ अनात्मरतीचे सहोदर । अर्थ स्वार्थ माये समग्र । जयांकरितां थोर । जालों आह्मी ॥ ११ ॥ आशीर्वादें जयांचेन । आमुतें राज्य सुख धन । जालों पदार्थ संपूर्ण । वासुदेवा ॥ १२ ॥ विद्ये कुंतीचा भाऊ । आत्मस्वार्थु बळिया बहु । तो कौरवाचा जाला आउऊ । सांडूनियां ॥ १३ ॥ मग देहात्मस्वार्थु ह्मणवी । यातीचा मोहो जीवीं । तयातें वोखटी चिंतावी । कैसेनि गति ॥ १४ ॥ अभिमानप्रकृतीचे जनक । आपुले जे जे अविवेक । ते ते सासुरे सकळैक । आह्मां कौरवां ॥ १५ ॥ अभिमानवेगां आंगें । करणवेग उठिती प्रसंगें । ते पौत्रस्थानीं अवघे । कौरवपौत्र ॥ १६ ॥ अभिमानप्रकृतिसहोदर । मोह शालक अगर । अविवेकाचें उदर । फोडूनि निघाले ॥ १७ ॥ अविद्यागुणसंबंधी । न होती आमुचे ददी । प्रकृति प्रकृतिविरोधी । दुसरी नसे ॥ १८ ॥ अविद्या विद्ये नव्हे दुसरी । कवण कुंती कवणि गांधारी । धृतराष्ट्र काये दूरी । असे पंडूतें ॥ १९ ॥ पाहतां कौरवां आह्मां । येकु जीऊ येकु आत्मा । येकु देहो पुरुषोत्तमा । अनुभवें बोलें ॥ २२२० ॥ आह्मांवेगळे ते कायी । त्यांवीण आह्मां संसार नाहीं । दिशा उद्वसा दहादी । ऐसें होय ॥ २१ ॥ मग तें कवणाचें वन भुवन । देहसुख अन्न पान । व्यवहारीं थोरपण । स्वजनांकरितां ' ॥ २२ (३४) ॥ [ हे मधुसूदन ] अर्जुन ह्मणे ' जी कृष्णा । अवधारीं मधुमर्दना । विचारें आणितां मना । पारिके कवण ॥ २३ ॥ आपुली रसना आपुले दशन । आपुले कर आपुले चरण । येक स्वरूप जाण । आमुचें ययांचे ॥ २४ ॥ [ घ्नतोऽपि ] आतां जन्ही ऐसें जालें । हे मातें मारूं आले । वैर दृष्टी पाहिलें । नोळखतीची ॥ २५ ॥ [ एतान्न हन्तुमिच्छामि ] तन्ही ययांतें मारणें । ऐसिये इच्छेतें जें करणें । तें मी नावलंबीं मनें । कदाकाळीं ॥ २६ ॥ जैं मी विसरेन आपणपयां । तरीचि मारिता होईन ययां । कां नेत्र असोनि तयां । जैं रूप न कळे ॥ २७ ॥ सांडीन अभिमानु कुळाचा । शरीरा आणि यातीचा । तरिचि वधु ययांचा । माझेनि हातें ॥ २८ ॥ तूं मातें ना मी तूतें । ऐसें जैं होईल निरुतें । तैंचि अहंदुर्योधनातें । वधीन मी ॥२९॥ अकाळीं प्रळयो मांडैल । शशिसूर्य तमीं हारपतील । ब्रह्मांड विलया जाईल । तैं घडैल हें ॥ २२३० ॥ वेद शास्त्रें पुराणें । हें जैं मातें अप्रमाणें । तैंचि अकार्य हें येसणें । आंगें घडैल ॥ ३१ ॥ सकळां भूतांचें भान । पृथ्वी आप तेज वायो गगन । ययांचें मातें ज्ञान । विपरित जैं ॥ ३२ ॥ ऐसें अनुचित

जैं घडे । स्वहिताची चाड पुढें । मातें नाहीं कीं निवाडें । ऐसें जालें ॥ ३३ ॥ तैं मी जालों धर्महीनु । विसरलों आपुला गुणु । यया जीवाचा कवणु । अर्थु पुढां ॥ ३४ ॥ मुखचि न दावावें जनां । पुढती भक्तु ह्मणवावें ना । न मिळवें माजी कव्हणा । ऐसें होईल ॥ ३५ ॥ एवं मारिलाही परी । मी ययांतें न मारी । आतां स्वार्थबुद्धि शरीरीं । का ही ह्मणसी ॥ ३६ ॥ [ त्रैलोक्यराज्यस्यापि हेतोः ] लोकत्रयीचें राज्य पावणें । ऐसियाही अर्थाकारणें । झोबोनिया ते मारणें । ऐसें न घडे ॥ ३७ ॥ [ किं नु महीकृते ] त्रैलोक्यराज्य पावणें । एतणग्राही स्वार्थाकारणें । ययातें नाहीं मारणें । ऐसें असतां ॥ ३८ ॥ पृथ्वीचें राज्य तें किती । सार्वभौम गा श्रीपती । तें मातें तारक अंतीं । ऐसें नव्हे ॥ ३९ ॥ आतां तेचि विवंचना । सांगैन हृदयस्थ कल्पना । राज्यें येणें श्रीकृष्णा । होईल दुःख ॥ २२४० ॥ छेदूनि स्वजन हातियेरीं । पुरत्रयीचें राज्य जऱ्ही । म्यां केलें श्रीहरी । येकलेन ॥ ४१ ॥ तऱ्ही तयाचें मज कारण । सांग पां श्रीकृष्णा कवण । जेणें भोगावें तें जन । रणीं हारपलें ॥ ४२ ॥ मी कवणाचा मग काई । माझें तें कोठें कव्हणी नाहीं । मागें पुढें देहीं । येकलाचि मी ॥ ४३ ॥ येका शरीररक्षणातें । भिक्षेनें काय अपुरतें । मा त्रैलोक्यराज्यस्वार्थें । भ्रांत होआवें ॥ ४४ ॥ मरावें तें न चुके मरण । भोगावें तें खरें प्राचीन । वाढवावें दुष्ट क्रियमाण । वाऊगेंचि ॥ ४५ ॥ दैवाधीनता चुकली । कीं आधिव्याधि निमाली । येणें राज्यें सिद्धि जाली । ते पैं कवण ॥ ४६ ॥ राज्यें चुकलें पतन । कीं राज्य हें ज्ञानधन । मोक्षस्वरूप निधान । आंगणींचें हें ॥ ४७ ॥ येणें देहबुद्धि चुकली । ज्ञानकळा उदैजली । यातायाति चुकली । संसारयात्रा ॥ ४८ ॥ ईश्वरु ह्मणतील मातें । मोक्षु देईन मी भूतांतें । उत्पत्तिस्थितिप्रळयांतें । करीन सामर्थ्यें ॥ ४९ ॥ होईन काये जगद्गुरु । मागुता नरु तो नरु । आपुलाचि घालीन भारु । दुसरेयावरी ॥ २२५० ॥ देवा कैसा राखिसील । देवा काये देसील । देवा अरिष्ट निरसिसील । कवणेपरी ॥ ५१ ॥ देवा देवा ह्मणतां । न चुके माझी पराधीनता । येणें राज्यें मी आतां । करूं काये ॥ ५२ ॥ प्राचीन तेचि भोगणें । तैं राज्यें हित काये येणें । कांहीं आत्महित करणें । तें येक वांचूनि ॥ ५३ ॥ आणिक येक अनंता । पुरत्रयीचें राज्य करितां । गेला द्रोणु तो मागुता । देखैन कैं ॥ ५४ ॥ पडिला जो भीष्मु रणीं । न संपडे तो मागुतेनि । तैं मी ऐसा ह्मणौनि । कवणु पाहिल ॥ ५५ ॥ दुर्योधना सादु देईं । तंव तो कवणे ठाईं । पडलेया बंधूंची नाहीं । भेटी पुनः ॥ ५६ ॥ अवघेन राज्यें जोडती । पुत्र पौत्र तेचि येती । नाना भलयति येकिं प्राप्ति । सांग तेणें ॥ ५७ ॥ अवघे स्वजन मारावे । मग तें कोणाकारणें करावें । पुरत्रयीचें अघवें । भौपत्य जें कां ॥ ५८ ॥ समूळ कर्ण छेदूनि । कुंडलें घालावीं कवणे स्थानीं । जडितें मोलाचीं पाहोनि । काये काज ॥ ५९ ॥ अंगुलिका छेदूनि सकळा । मुद्रिका घेतलिया गोपाळा । आतां ते माळ गळां । करूनि घालावी ॥ २२६० ॥ नासिकेवीण मुक्ताफळ । कामिणी घालिती केवळ । तैसें माझें राज्य विकळ । स्वजनेवीण ॥ ६१ ॥ बोडिकें डोकें सिरीं खोपा । तैसें मज झालें बापा । शिरेवीण पाहें पां । भारणाचि नये ॥ ६२ ॥ दृष्टीवीण सुलोचन । प्राणहीनाचें भूषण । तैसें कौरवहीन जाण । माझें राज्य ॥ ६३ ॥ थोटीं घातलिया वेळा । मरोनि भोगणें सोहोळा । असो तें राज्याचें गोपाळा । काये करावें ॥ ६४ ॥ राख लावूनि जाणें । मागें परतोनि न पाहणें । ऐसें उचित वरि करणें । कौरवांपाठीं ' ॥ ६५ ॥ ऐसें अर्जुनु बोलिला । तो अर्थु परमार्थें घेतला । कैसा तो भाव कथिला । पाहिजे कीं ॥ ६६ ॥ अर्जुनु बोले ' मधुसुदना । राया सद्गुरु सर्वेशा । न मारीं मी यया स्वजनां । स्वभावांतें ॥ ६७ ॥ इहीं जऱ्ही मातें आच्छादिलें । सत्यात्मत्वें मारिलें । आत्मअभावा दाविलें । सर्वत्र जऱ्ही तऱ्ही ॥ ६८ ॥ हे माझे

माझिये प्रकृतीचे । गुणस्वभाव आंगींचे । सर्वथा मारणें ययांचें । न इच्छीं मी ॥ ६९ ॥ आपुले स्वभाव मारावे । मारें आपणचि मरावें । मरोनि जीवें जियावें । तें काये जीणें ॥ २२७० ॥ सार्द्रता सांडूनि पाणी । तें काये उरे स्वस्थानीं । चंचळता पडे रणीं । तैं वायेचि कैंचा ॥ ७१ ॥ सच्छिद्रभाव आपुला । तो जैं गगनें ग्रासिला । तैं सद्भाव उरला । तयाचा काये ॥७२॥ तैसी जे माझी स्वस्थिति । तेचि मातें आत्मप्रकृति । तीचे गुण ते तीप्रति । आपुले भाव ॥ ७३ ॥ ते पाववितां नाशातें । अभाव होये प्रकृतीतें । प्रकृति अभावली तेथें । कैसें होय ॥ ७४ ॥ मीपणेसी मीचि नाहीं । सत्व रज तम तेथ कायी । स्वपरवृत्तिविलयीं । काय पाहणें ॥७५॥ यालागी मारावयाकारणें । इच्छा न कीजे माझेनि मनें । ययाहीवरि येक जाणें । गोपीनाथा ॥७६॥ मारिलेही म्या हे स्वभाव । अहंदुर्योधनादिक कौरव । रजतमआदि सर्व । जे आचार्य गुरु ॥ ७७ ॥ आतां मारूनि ययातें । आह्मी आपुलेनि हातें । सकळे ये पुरत्रयीचें तें । राज्यही केलें ॥ ७८ ॥ आत्मसत्तया सर्व भान । आत्माच सर्वांचें अधिष्ठान । आत्म-इतर अकिंचन । नामरूप हें ॥ ७९ ॥ अद्वितीय ब्रह्म निर्मळ । तेथ सर्व माया हें मृगजळ । ऐसें स्वरूपस्थिति केवळ । शोभन जें ॥ २२८० ॥ तें राज्य म्यां केलें । मा तेणेंकरूनि काये जालें । आपु-लांही मनीं गोपाळें । विचारावे ॥ ८१ ॥ ऐसें हें माझें वचन । मानाल तुह्मी अप्रमाण । तरि यये अर्थी बोलैन । चित्त देइंजे ॥ ८२ ॥ दावूं मिरवूं मी हें जनीं । ऐसा मी येकु ह्मणौनि । तरि तो दंभुचि नयनीं । दिसे सर्वा ॥ ८३ ॥ दंभु दिसे परि हें न दिसे । दावूं ह्मणतां राज्य ऐसें । आतां नदवूनि माणुसें । जाणतीं करूं ॥ ८४ ॥ तरि जयाची प्रगुप्त कळा । जनांतें न दिसे डोळां । लोक देखती स्थूळा । शरीरातें ॥ ८५ ॥ मित्राप्रति मित्रुचि कळे । शत्रूतें शत्रु तत्काळें । परंतु माझें राज्य कव्हणें काळें । नये उजेडा ॥ ८६ ॥ दिसे स्त्रीते भर्त्तारु । पुत्रां पिता पितया पुत्रु । एवं माद्वषयींचा अंधकारु । चराचरातें ॥ ८७ ॥ दावितां इतरा न दिसे । आतां असो हें ऐसें । आणिक येक घडेसें । काये विचारूं ॥ ८८ ॥ मत्सत्तया विश्व असे । माझेनि चैतन्यें प्रकाशे । माझेनि सुखें उल्लासे । जेथिचें तेथें ॥ ८९ ॥ आतां येणें राज्येंकरून । आपुला वैरी मी मारीन । सत्ता चैतन्य हरीन । सकळ सुख ॥ २२९० ॥ तरि मातें माझिया दृष्टी । वेरी न दिसे जगजेठी । तें तिये दृष्टीचेचि पोटीं । लपोनि जाये ॥ ९१ ॥ भानचि न कळे दुसरें । कवण मारी कवण मरे । ऐसेनि मी वैराकारें । लागलोंचि जैं ॥ ९२ ॥ तैं वैरी मारूं अपेक्षितां । मीचि मातें वैरी दिसें तत्वता । आतां आपणा मारूं कीं मारकता । तेचि मारूं ॥ ९३ ॥ येर देहभावें वैरी । असताचि असतां संसारीं । येणें राज्यें ते श्रीहरि । मारिले न वचति ॥ ९४ ॥ असो वैरी आतां मारणें । मित्रांतें कांही देणें । आपणा राज्य येसणे । पुरत्रयींचें ॥ ९५ ॥ तरि मित्रु आणि तया देइंजे । हें नामरूपभान जें जें । तेंचि उफराटें विसरिजे । तेणें राज्यें ॥ ९६ ॥ नसतें उरलें देणें घेणें । आतां तें काये करणें । सांडावें परंतु येणें । मनोरथु न पुरे ॥९७॥ न संडिजे जैं तो मनोधर्मु । तें राज्यभ्रंशु होये हा नियमु । अद्वैतु निर्विकारु आत्मारामु । ह्मणौनियां ॥ ९८ ॥ मारितां हरितां वैरियातें । रक्षितां देतां मित्रातें । नये येणें अमितें । महाराज्यें ॥ ९९ ॥ असो हें दुजयाजोगें नव्हे । आपुले आपणाचि भोगावें । तरी अनुभवा आणितां देहभावें । न फळे देहीं ॥ २३०० ॥ आयुष्य करूं अपार । तरि देहेसींच यया वैर । पहिलेंचि आधीं शून्याकार । शरीर करी ॥ १ ॥ आतां दुःखाचिया काकुळती । तयांची पाहे निवृत्ति । नाना सुखें प्रतीती । आणूं ह्मणे ॥ २ ॥ तैं राज्यें तेणें अपारें । अणुमात्रही दुःख न हरे । सुख अंशांशेंही न स्फुरे । कव्हणा विषयाचें ॥ ३ ॥ येणें हे क्षुधा हरैल । तृषा नावेक राहील । आली निद्रा वारेल । ऐसें न घडे ॥ ४ ॥ शमैल

तापु खोकला । हरैल वातु अवलिळा । पित्त नाशील गोपाळा । ऐसें न घडे ॥ ५ ॥ मोडला तिडके कंटकु । न मिळे तया तेण भिल्लकु । प्रपंचु स्वाधीनु सकळैकु । तो कैसा मी नेणें ॥ ६ ॥ न हरे दुःख अंशांशें । न स्फुरे विषयसुख राज्यमिसें । कव्हणी हे वचन अनारिसें । ह्मणैल जरि ॥ ७ ॥ तरि सुख-दुःख शरीरभान । ययाचें केवळ असंतपण । तेचि स्वराज्य ह्मणौन । कैसें असे ॥ ८ ॥ कांहीं येक दुःख हरी । तैं असंता संत करी । तेण संत वैरी । आपुलें होये ॥ ९ ॥ विषयसुख करी उत्पन्न । तैं आणी विषया संतपण । विषय संत तेथ आपण । उडोनि जाये ॥ २३१० ॥ कांहीं चिन्ह शरीरीं । राज्य हें जैं प्रकट करी । तैं शरीरेंसीं मरोवरी । जाली यया ॥ ११ ॥ आपणास त्या अद्वयातें । शरीर संत दुजें वर्ते । ऐसें जाले तेणें मतें । जाण तयासी ॥ १२ ॥ मग देहाचां संतपणीं । अभाव होये पद-स्थानीं । राज्यभ्रंशु निर्वाणी । तोचि जाणावा ॥ १३ ॥ ह्मणौनि देहीं कांहीं उमटे । प्रयोजनाप्रयोजनु येणें घटे । तैं राज्य ह्मणणें तेंचि खोटें । ऐसें असतां ॥ १४ ॥ शरीरें काये भोगावें । प्राचीनचि प्रतीती ये अघवें । मा येरां काय न सभवे । प्राचीन भोगमूळ ॥ १५ ॥ डोळां पहावे तैं अदृश्य । आइकों तैं वाचे अप्रकाश्य । चाखों तैं ते अरस्य । तेथिंचे सर्व ॥ १६ ॥ गंधही न येणें मतें । नये प्रतीती घ्राणातें । स्पर्शावें तैं तें व्योमातें । लागो नेदी ॥१७॥ मनेंचि मानावें समस्त । तैं तें संकल्पा-अतीत । बुद्धि मालवे मग तेथ । उदयो जयाचा ॥ १८ ॥ मनें कल्पे ना बुद्धी कळे । मनबुद्धींद्रियां-वेगळें । समस्तां गुणा नातळे । प्रकृतीचिया ॥१९॥ आत्मत्वेंचि आता भोगणें । ऐसें मानूं निजमनें । तरि मीतूंपणें नुरणें । राज्यीं जये ॥ २३२० ॥ मी आपणुचि जेथ नाहीं । तेथ राज्य तें कवणाचें कायी । आतां स्वार्थबुद्धि वाई । तेचि सांडिली ॥ २१ ॥ माझी सत्ता माझें ज्ञान । सर्वत्र माझें सुख पूर्ण । त्रैलोक्य माझें अधीन । हे काये कल्पना ॥ २२ ॥ मीचि नाहीं तेथ माझें । कवणा माने हें सहजें । आंगेवीण वोझें । कवणें उचलावें ॥२३॥ ग्रामेवीण सीमा जैसी । पाणियेवीण उकळी कैसी । मीचि नाहीं तेथ परियसीं । राज्य कवणाचें ॥ २४ ॥ तेणें सुख तें कवणाचें । पूर्णत्व काये होये या जीवाचें । ज्ञानमयत्व नव्हे आगाचें । तैं तेण काये ॥ २५ ॥ आपणा न भोगे कांहीं । तरि असो आतां ऐसेंही । कव्हणें अंगें कव्हणा कांहीं । उपेगाचें ॥ २६ ॥ असंत ते संत न करी । संता संत हें काय करी । संताचे असंत करी । तऱ्ही होये ॥ २७ ॥ नित्य तें नित्य नित्याकारें । अनित्य अनित्य प्राकारें । येणें राज्यें तिसरें । काय केलें ॥ २८ ॥ अनित्या असतां नाहीं करणें । मा न करितां काये असिजे तेणें । वंध्यापुत्र मारणें । लागेचिना ॥ २९ ॥ नित्या संताची नित्यस्थिति । ते येणें काये करावी श्रीपती । अनित्यता आणि तयाप्रति । तरी वरि होये ॥ २३३० ॥ सहज जें जैसें आहे । तें जैं अनारिसें नोहे । तैं स्वराज्यें येणें काये । वासुदेवा ॥ ३१ ॥ सर्वत्र संत गुणातीत । सर्वत्र सर्वदा तें मुक्त । गुण मिथ्या समस्त । भासतांही ॥ ३२ ॥ तेथें येणें काये कराव । मुक्त तें जैं बद्ध नव्हे । बद्धा मोक्षु न संभवे । कदाकाळीं ॥ ३३ ॥ जालेनही राज्य जेणें । जैसें तैसेंचि असणें । जयापरी पारणें । मानसिक ॥ ३४ ॥ जेथिंचीं करणें तेथें । विषय तैसींचि महाभूतें । उणें पुरें प्रपंचातें । होये-चिना ॥ ३५ ॥ जैसी तैसीचि त्रिपुटी । त्रिधा कर्मा नाहीं तुटी । ब्रह्मरूप अवघी सृष्टि । जाणीतली असतां ॥ ३६ ॥ गुणातें सहज वेगळेपण । तेथ कासयातें साधन । आत्मयाचें असंगपण । सहज सर्वत्र ॥ ३७ ॥ तरि पशुस्थानीं बद्धु कवणु । मुक्तु मुक्तस्थानीं सनातनु । अखंडु सद्भाव समानु । सारिखा वस्तूचा ॥३८॥ बद्ध मुक्त सारिखेचि । बद्धचि अथवा मुक्तचि । आतां प्राप्ति ऐसिया राज्याची । असोनि काये ॥ ३९ ॥ कासया योगु हा सग्रामु । कासया जयो उपरमु । कासया हा करणग्रामु । वोसु पाडावा

॥ २३४० ॥ स्वसाम्राज्यें येणें काये । कल्पनामात्रचि सर्व आहे । आतां जयो करितां उपाये । नाहीं सुख ' ॥ ४१ ( ३५ ) ॥

( १ ) [ हे जनार्दन ] अर्जुन ह्मणे ' जनार्दना । अवधारीं श्रीहरि कृष्णा । माझया ये अर्थी मना । येक आलें ॥ ४२ ॥ [ धार्तराष्ट्रान्निहत्य ] राया धृतराष्ट्राचे कुमर । दुर्योधनादिक समग्र । ययांतें मारूनि वैर । साधिलें असतां ॥४३॥ [ नः का प्रीतिः स्यात् ] काये बरं वाटैल आमुतें । भोगून कवणा संतोषातें । आठव आठवू ययातें । प्राणु देऊन ॥ ४४ ॥ पाणी पाणी ह्मणौनि । येकें पडलीं रणीं । आतां तें आह्मी पाणी । कैसें प्राशावें ॥ ४५ ॥ अन्नाची करूनि आठवण । बालकीं दिधले असतील प्राण । आता तें मुखीं अन्न । कैसें घालावें ॥ ४६ ॥ बैसोन बंधुहीन आसनीं । तैं काये सुख वाटैल मनीं । नको नको चक्रपाणी । तैंचें दुःख ॥४७॥ भोजनीं बैसलो पंक्ती । पुत्र पौत्र ना संतति । आपुली मारूनि याति । तें अन्न खाणें ॥ ४८ ॥ स्वजन वधून राज्य भोगणें । तें तयांचें मांस खाणें । जिव्हा भक्षूनि पारणें । गोपीनाथा ॥ ४९ ॥ कवणा येका विसरावें । आपणचि मरतां बरवें । जळो तैं जीणें दैवें । सांडवलयाचे ॥ २३५० ॥ आता ययाचे जे आश्रम । दृष्टी पाहता मनोरम । उद्वस अवघे परम । कैसे पहावे ॥ ५१ ॥ बैसले ते ठाये आठवती । ययांचिया स्त्रिया वागती । तिया देखोनि लागती । हृदयीं बाण ॥ ५२ ॥ सुखदुःख कवणा पुसावें । आपुलें कवणा सांगावे । गेलें बंधुधन तें नवें । आणितां नये ॥ ५३ ॥ न मिळे पिता न मिळे जननी । न मिळे आजा मागतेनि । न मिळे बंधु भगिनी । येर सर्व मिळे ॥ ५४ ॥ येणें प्रकारें ययातें । मारूनि सुख नाहीं आमुतें । आठवण देईल दुःखातें । नारायणा ॥ ५५ ॥ तूं ह्मणसील ऐसे वचन । सकोमळ पार्था तुझें मन । परंतु ययांचं आचरण । ते तंव महादुष्ट ॥ ५६ ॥ तरि हें मातें मधुमर्दना । सांगावें नलगे नारायणा । हे कौरव वसुदेवनंदना । केवळ कैसे ॥५७॥ [ आततायिनः ] आततायी अति उग्र । जयांचें कर्म घोर । परपीडक भयंकर । घातरूप ॥ ५८ ॥ येहीं लाक्षाजोहर रचिलें । आम्हिमाजी जाळूं आदारिलें । तये वेळे रक्षिलें । वासुदेवें तुवां ॥ ५९ ॥ भीमसेना दिधलें विष । विकळ पाडिलें तयास । चुकले नाहींत हे वधास । परि तूं सारथी ॥ २३६० ॥ शस्त्रें घेऊनि वरि आले । आतां मारावया काये उरलें । आइकें श्रीकृष्णा परजिले । आह्मावरि ॥ ६१ ॥ राज्य हारिलें सकळ । तें नव्हे संग्रामबळ । द्यूतकर्म अविमळ । खेळोनियां ॥ ६२ ॥ आमुतें नाहीं धरणी । ऐसें केलें दुर्जनी । ते मी ययांची करणी । विसरलों काये ॥ ६३ ॥ क्षेत्रहर राज्यहर । द्रव्यहर स्त्रीहर । ऐसे ययाचे आचार । ते आततायी हे ॥ ६४ ॥ आततायी यांचीं लक्षणें । जाणीवलींचि असति सर्वज्ञें । परंतु हेचि सांगैन । संक्षेपें मी ॥ ६५ ॥ आगि लावूनि ग्राम जाळी । गायींचे ग्रास पोळी । अग्नि दे वनमाळी । आततायी तो ॥६६॥ विषदे तैसाचि तोही । आततायी संशयो नाहीं । हातीं हातियेर हाणे तयीं । तोही तो घडे ॥ ६७ ॥ आततायी द्रव्यचोरु । स्त्रीक्षेत्रराज्यहरु । परद्रोही हत्यापरु । आततायी ॥६८॥ बळात्कारें धर्मु लोपी । आश्रयें पाळी पापी । साधूंतें पीडी पररूपी । द्वेषें पाहे ॥६९॥ ऐसें ते आततायी सर्व । येक येक आश्रयूनि आसुरभाव । आतां आततायी कौरव । ते सकळां गुणीं ॥ २३७० ॥ आतां आततायी हे मारितां । दोषु नपवे वधु कर्ता । तयां रक्षी तो सर्वथा । महापापी ॥७१॥ आततायियां कौरवांतें । मारावे संशयो नाहीं येथें । परंतु नारायणा तेथें । येक आहे ॥७२॥ हे गुरु आणि पितर । पितामह बंधु समग्र । पुत्र पौत्र इष्ट मित्र । साले श्वशुर कीं ॥ ७३ ॥ पितेन सर्वस्व हारिलें । प्राणावरि दुःख दिधलें । तया आततायित्व लाविलें ।

शास्त्रें कवणें ॥ ७४ ॥ शस्त्रें ह्मणों आला गुरु। पिता प्रपिता वृद्ध पितरु। आतां तयांचाचि देहो साकारु। ऐसें असतां ॥७५॥ मारी तो आततायी मानावा। कीं मारूं नेदी तो कल्पावा। विचारें पाहें यादवा। उत्तर देईं ॥७६॥ श्वशुरें हरिली स्त्री। तैसीचि शालकें अवधारीं। तो आततायी कवणेपरी। मानावा पां ॥७७॥ आपुलें सर्वस्व नेलें। बंधूनें राज्य घेतलें। तें तयाचेंचि कीं आलें। आततायीपण ॥ ७८ ॥ पुत्र पौत्र पितर। पितामह बंधु समग्र। सासुरे शालक अपार। शरीरसंबंधी ॥७९॥ येहीं आमुतें मारिलें। आगी लाविली विष दिधलें। शस्त्र काढूनि हाणिलें। ऐसेंही असता ॥ २३८० ॥ क्षेत्रदाराराज्यहरण। येहीं घेतलेही प्राण। हे आततायी ह्मणौन। कैसे मारावे ॥ ८१ ॥ [ एतान्हत्वा ] ययांतें वैराकारें अनंता। पाहोनि मारिलें आह्मीं नेणतां। तरि येणें गोत्रवध सर्वथा। संदेहो नाहीं ॥ ८२ ॥ [ पापमेवाश्रयेद-स्मात् ] आमुचां शरीरीं संचरती। महापापें प्रवेशती। वाव नाहीं गिळिती। आमुचियां रूपां ॥८३॥ मग आमुचिया ज्या व्यक्ति। त्या पापाचियाचि मूर्ति। पापा नाहीं मिति। तें सर्वत्र होईल ॥ ८४ ॥ ब्रह्महत्त्या रिघालिया। वीरहत्त्या प्रवेशलिया। गोत्रहत्त्या संक्रमलिया। शरीरामाजी ॥ ८५ ॥ गुरुहत्त्या पितृहत्त्या। पुत्रहत्त्या पौत्रहत्त्या। सुहृदहत्त्या मित्रहत्त्या। आह्मां पोटाळिती ॥ ८६ ॥ सायंकाळ प्रवर्ततां। गुरां गोपाळा समस्तां। ग्रामामाजी प्रवेशतां। जैसा पैसु नाथी ॥ ८७ ॥ दिशांतरगत पक्षी जैसे। सायंकाळीं आपैसें। वृक्षु टाकूनि आकाशें। येवोंचि लागती ॥ ८८ ॥ आगोठी मेघ वर्षले। तैं मुंगिया अथवा मुगळे। साडूनि येकें बिळें। बिळीं प्रवेशती ॥ ८९ ॥ तैसें आमुचां शरीरीं। पापें रिघती अंतरीं। तीं पुढती काढावया बाहेरी। कवणु समर्थु ॥ २३९० ॥ भूतांचां गोंदळीं पडिले। तें माणुस नव्हे आपुलें। तैसें पापाअधीन जालें। जीणें होईल ॥ ९१ ॥ बाहेर अंतरीं पाप सर्व। आह्मी पापी पापावैव। पापचि दृष्टी सावैव। दिसों येईल ॥ ९२ ॥ येणेंही आंग पाहता। अवधारीं गा गोपीनाथा। ययां कौरवां मारितां। गोत्रजांतें ॥९३॥ आमुतें बरवें तें नाहीं। परि अनर्थ पाहिजे तितुकाही। यालागीं निश्चयो हृदयीं। जे संग्रामु न करणें ' ॥९४॥ अथवा आन येके प्रकारें। श्लोकाचा भाव स्फुरे। तोही अर्थु चतुरें। विचारावा ॥९५॥

( २ ) [ हे जनार्दन ] अर्जुनु ह्मणे ' जनार्दना। जनाकारें तुझी ईक्षणा। जगत्स्रष्ट्यां श्रीकृष्णा। वचनें अवधारीं ॥ ९६ ॥ [ धार्तराष्ट्रान्निहत्य ] राया धृतराष्ट्राचे नंदन। दुर्योधनादिक सकळ-जण। आतां स्वजनां ययातें मारून। इतुलयावरि ॥ ९७ ॥ [ नः का प्रीतिः स्यात् ] काये सुख अवधारीं। होईल आमुचां शरीरीं। दुःखाची अत्यंत सामग्री। विस्तारैल ॥ ९८ ॥ मग किती भोगावें। देह गेलियाही दूरी नव्हे। यालागीं ययां न मारावें। हेंचि सुख ॥ ९९ ॥ [ अस्मान्हत्वा ] आह्मीं सांडिले युद्धभाव। ऐसें असतां हे कौरव। आमुतें मारितील स्वमेव। तरि मारूनियां ॥ २४०० ॥ [ आततायिनः ] आततायी हे निरुते। जाणावे येणें मतें। गोत्रघातकी ययांतें। लोक ह्मणतील ॥१॥ मागां लाखांजोहर केलें। तेणें काये भलेपण आलें। भीमसेना विष दिधलें। केली अकीर्ति ॥ २ ॥ राज्य हरिलें आमुचें। तें कारण नव्हेचि साधुत्वाचें। कपटें द्यूतें आमुचें। सर्वस्व नेलें ॥ ३ ॥ द्रुपदी हरिली पतिव्रता। आमुची आह्माचिदेखतां। येणें कर्में अनंता। कौरव ते ॥ ४ ॥ परलोकाप्रति अंतरले। देवांचे द्रोही जाले। इहलोकीं मिरवले। आततायीपणें ॥ ५ ॥ आतां येणें काळें यये रणीं। आले असतां शस्त्रें घेऊनि। तरि इतुलेचि कीं आह्मांलागूनि। पुरे करिती ॥ ६ ॥ तरि मारिलीया आह्मांतें। काये होईल तयांतें। तेंचि वचन गोपीनाथें। अवधारावें ॥ ७ ॥ [ एतान्पाप-

मेवाश्रयेत् ] पापें आश्रयिती ययांतें । मग तो बोलु काये आमुतें । मारवले आपुलेन हातें । ऐसें होईल ॥ ८ ॥ ययांचीं शरीरें सकळें । महापापा होती स्थळें । गोत्रवधा आगळें । कवणें दुरित ॥९॥ आतां आततायी गोत्रघ्न । हे न पडे ययां अभिधान । परलोकप्राप्ति ना वदन । इहलोकीं दावावया ॥ १० ॥ तें आमुचें सर्व चुकलें । अयश ययांतें लागलें । ऐसें होईल येणें काळें । भर्वसेन ' ॥११॥ ऐसें अर्जुनाचे बोलणें । परमार्थत्वें कैसें घेणें । तेंचि आतां सांगणे । येथूनि असे ॥ १२ ॥ अर्जुनु ह्मणे ' गा जनार्दना । गोपीपते रमारमणा । सद्गुरो स्वामी सर्वज्ञा । ज्ञानमूर्ति ॥ १३ ॥ राया धृतराष्ट्राचे नंदन । अन्यथाबोधाचे गुण । अहंदुर्योधनादिक जाण । येर सकळ ॥ १४ ॥ माझिये प्रकृतीचे सर्व । गुणागुणकृत स्वभाव । मजसीं वेगळे सर्वथैव । न वर्तती ते ॥ १५ ॥ आतां तया स्वजनां । स्वगुणां आइकें कृष्णा । मारूनि आह्मां गोत्रघ्नां । कवण सुख ॥ १६ ॥ झाडितां आंगींचा रजोगुणु । आणि तयाचि ऐसा तमोगुणु । अत्यंतु असे सत्वगुणु । तरिचि बरें ॥ १७ ॥ नातरि कष्ट बहुसाल । नचले योगाभ्यासाचें बल । अत्यंत मन चंचळ । न सोडी विषयसंगा ॥ १८ ॥ आतां रजोगुणाचें हनन । तेंचि शमदमादि साधन । निरोधितां इंद्रियगण । कैसें होये ॥ १९ ॥ मौनें दाटली वैखरी । ते तिहींतें प्रवृत्ति करी । मग मौनें तेणें अंतरीं । कवण सुख ॥ २४२० ॥ बाह्य वाचेचें मौन । अंतरीं न राहे अंतःकरण । तैं वाङ्नियमालागून । कवणु आधारु ॥ २१ ॥ आधारेंविण तें धरितां । दुःख बहुसाल अनंता । तेथें संयमुचि तो वृथा । अवघा जाये ॥ २२ ॥ करांचा नियमु केला । तेणें स्थूळाचा घातु जाला । मग मन दुःखरूपा तयाला । आश्रयीचिना ॥ २३ ॥ हटु किजे जंव जंव । दुःखचि आगळें होय तंव तंव । शरीरनिर्वाह सर्व । छेदती जैं ॥ २४ ॥ चरणा सोपान चालणे । परंतु नटके आसनीं बैसणें । अंतरी रजोगुण तेणें । अधिकु होये ॥ २५ ॥ आसननियमु बाहेरि । गमनशीळ अंतरीं । तें मुद्रा जोडी नानापरी । आसनाची ॥ २६ ॥ शिश्न दमियलें संयमें । न नियमे मन तेणें दमें । मग अंतर अवघें कामें । नाशोनि जाये ॥ २७ ॥ अंतरीं असतां स्त्रीकामु । बाहेरि दमु तो श्रमु । मग नानावर्णी मनोधर्मु । तो लागे विचरों ॥ २८ ॥ हटें धरितां कर्मकरण । कर्मत्यागा तयालागून । तंव तें दशगुणा मन । प्रवर्ते कर्मीं ॥ २९ ॥ शब्दु सांडिलें आइकणें । तो व्यापारु अंतःकरणें । बहुसालचि करणें । ऐसा नियमु असे ॥ २४३० ॥ नयन लाविले बाहेरि । बुद्धि उताबीळ रूपावरि । ते हात पाये नेत्र करी । ऐसी पाहें ॥ ३१ ॥ वनितादिस्पर्शसंन्यासें । मन मोकळें धांवे आपैसें । तें नाना यातींचीं माणुसें । कवळून ये ॥ ३२ ॥ रसना पीडिली रसाज्ञानें । तो दमुचि तें तेणें । सांडूनि सेवीन ह्मणे । नाना रस ॥ ३३ ॥ मग तें प्रवर्तलें तेथूनि । सेव्या असेव्यातें नमनी । इच्छा ते रस भोगूनि । शरीरा ये ॥ ३४ ॥ घ्राणें सुगंधा नेघावें । तैं अंतरी सर्व आश्रयावें । ज्ञानेंद्रिय दमावे । तैं ऐसें होये ॥ ३५ ॥ रोगियां अपथ्य नियमांचे । तैसें कर्मज्ञानइंद्रियांचें । प्रमाण सुटतां तयाचें । मात्रा भंगे ॥३६॥ मग काये किती करावे । काये जाणावें भोगावें । अंतःकरण शांत नव्हे । बाह्यभोगेंवांचूनि ॥ ३७ ॥ प्रस्थें येकें धाइजे । तें तितुलें क्षुधे नेदिजे । मग ते माथां वाजे । तया मना ॥ ३८ ॥ मन क्षुधित प्रवर्तलें । तैं वोदनाचे पर्वत आटले । कोरडें तळें पाडिलें । तिये कथिकेचें ॥ ३९ ॥ दुःखाचे वेंचले सागर । पारी क्षुधा तयाची अनिवार । कधींचि नव्हे क्षर । अक्षयी ते ॥ २४४० ॥ स्त्रीकामीं अनिवारपण । तया मनाचें जाणोन । परम पुरुषें जाणें । काये केलें ॥ ४१ ॥ अव्यक्त मन आंकाळिलें । स्थूल शरीरीं कोंडिलें । शिश्न एक द्वार केलें । मात्रा येकि स्त्री ॥ ४२ ॥ ईश्वरें दमु केला । तोचि मूर्खपणें सोडिला । करणव्यापारु सोडिला । पाहिजे ह्मणौनि ॥ ४३ ॥ तेणें

तें मनचि सुटलें । ज्ञानाग्नीं विचरतें जालें । आतां तें भोगितां कल्पें काळें । तृप्तिचि नाहीं ॥ ४४ ॥ यापरी इंद्रियधर्म । तेचि मनोव्यापारां नियम । प्रसित होय कर्म । तेणेंकरूनि ॥ ४५ ॥ तें इंद्रियकर्म खांडितां । मनाचिया वृत्ति बहुता । नित्यातृप्त तें सर्वथा । असंवर सुटे ॥ ४६ ॥ तत्वता दमु तो अद्रमु । आणि साधितां महाश्रमु । व्यापारेंचि रजोगुणु सुगमु । तो मारिता नव्हे ॥ ४७ ॥ आतां तमोगुणु मारावा । आत्माबोधु पाडावा । तरि पाडूनि खरा करावा । हेंचि होये ॥ ४८ ॥ निद्राचि लोकि मारावी । केवळ जैं न करावी । तैं न करून आणावी । तीतेंचि पुष्टता ॥ ४९ ॥ प्रहरों दोंचें विस्मरण । इतुलेन खरें ज्ञान ध्यान । तेंचि करावें मारून । प्रहरां आठांचें ॥ २४५० ॥ आलया वेगा मातु देतां । नलगे घटिका सर्वथा । तेंचि अवमानें दंडितां । विळें लागे ॥ ५१ ॥ आपुलया अज्ञानातें । मारावया जो प्रवर्ते । तेंचि अज्ञान ज्ञानरूपते । तयाचिये मारी ॥ ५२ ॥ रजें रजचि बळिकट । तसें तमचि उत्कृष्ट । होये निरसितां कष्ट । ययालागीं ते ॥ ५३ ॥ अभिमानु आपुला मारणें । तो खराचि तेणें यत्नें । लागावयाकारणें । समर्थु होये ॥ ५४ ॥ अनभिमानरूप केवळ । तयातें कायिसी तळमळ । आतां करितां तो निर्मूळ । मूळ योगे ॥ ५५ ॥ आणि आपुलिया आत्म-भावा । अभाव कवणें ह्मणावा । आपुला आपण न करावा । तरिन्चि नव्हे ॥५६॥ आतां न करणें तो अप्रकाशु । करणें आपुला प्रकाशु । तयाचा करितां नाशु । अज्ञान उरे ॥ ५७ ॥ अज्ञान अन्यथा बोधा । करूनि लागे सर्वदा । वरि मांडलें अहंवादा । न संडी तें ॥ ५८ ॥ अभिमानत्यागें अज्ञान । अनभिमानेंचि तें वर्तमान । न निरसे ऐसें कारण । अनंतां अभिमानां ॥ ५९ ॥ अभिमानकारण तें छेदावे । तैं अभिमानेवीण काज नव्हे । जागृतावारि न धांवे । निद्रा जैसी ॥२४६०॥ अभिमानें गेली सावधानता । तीणें आली अज्ञानता । मग ते अभिमानां अनंतां । प्रसवों न शके ॥६१॥ अभिमानु धरणें धरूं जाणणें । तें अभिमानबीज करपवणें । ज्ञाता साधकु तो जाणें । येरु मूर्खु ॥ ६२ ॥ अभि-मानु स्वभावनिर्मळु । निर्ममत्वाचा करी सुकाळु । तयाचा ध्वंसु केवळु । अभिमान करी ॥ ६३ ॥ यापरी स्वगुण मारितां । गुण बाधक होती अनंता । ह्मणोनि नाशें ययांचेनि सत्यता । न दिसे सुख ॥ ६४ ॥ आणि गुण तंव हे आततायी । स्वरूपप्रकाशु येहीं नाहीं । गुण घालिती कर्मडोहीं । ते कैसे गुण ॥ ६५ ॥ तापत्रयदावानळें । येहीं आमुतें जाळिलें । लाखाजोहर रचिलें । पापरूपी ॥ ६६ ॥ विषय विषाचा गळाला । आत्मयोगाभिमान निमाला । गुणींचि येहीं गोपाळा । पाजिला कीं ॥ ६७ ॥ आत्मविवेकलक्षण । गुणीं सर्वस्व हरिलें धन । आमुचेंचि आह्मां अधिष्ठान । पारिखें केलें ॥ ६८ ॥ उपरति मावरी । शस्त्रें घेऊनि आह्मांवरि । आले अभाव परोपरि । आमुचा करावया ॥ ६९ ॥ ऐसे हे गुण आततायी । ययां मारितां दोषु नाहीं । परंतु श्रीकृष्णा आइकईं । येक आहे ॥ २४७० ॥ मारितां ययां गुणांतें । मारिलें होये साधनातें । साधनमारें आमुतें । पाप आश्रयील ॥ ७१ ॥ गुणांचां केवळ मरणीं । कार्य कर्तृत्व करण तिन्ही । लोपती तेणेंकरूनि । कर्मा करणें ॥ ७२ ॥ संध्यावंदनें बुडालीं । स्नानें समूळ हारपलीं । यज्ञादिकें लोपलीं । कर्म सकळें ॥ ७३ ॥ कुंठलें यजन याजन । अध्ययन आणि अध्यापन । प्रतिग्रह आणि दान । मालवलें तें ॥ ७४ ॥ वर्णाश्रमांची मर्यादा । मोडिलिचि कीं सर्वदा । आश्रयो नाहीं भक्तिवादा । भंगला तो ॥ ७५ ॥ ईशाचें गुणश्रवण । कैसें करावें संकीर्तन । त्रिकाळ प्रतिमापूजन । सुटलें तें ॥ ७६ ॥ स्मरण नाहीं गुणध्वंसें । वंदन सेवन न प्रकाशे । दासत्व अभावें आपैसें । करणीवीण ॥ ७७ ॥ भाव कैसा समर्पणें । सर्वस्वें देवाचें होणें । तत्कर्मवांचूनि न करणें । तें भंगलें व्रत ॥ ७८ ॥ श्रवण मनन निदिध्यासन । साक्षात्कारु ना शब्दज्ञान । नित्यानित्य-

तत्वदर्शन । शून्य जालें ॥ ७९ ॥ गुणमारें प्रेत्नु मेला । प्रेत्नमारें योगु हारपला । योगाभावें घडला । संग्रहो पापांचा ॥ २४८० ॥ कर्मा करणें दोष दारुण । आह्मी होऊन तयां स्थान । सेवटीं सत्वशुद्धि ना ज्ञान । साधन नव्हे ॥८१॥ विहितेविण जें कीजे । तें पापचि देहां आपजे । कर्माकर्मे दोषु उपजे । सारिखाचि ॥ ८२ ॥ करितां कर्मा करणें । करितां अविहित करणें । दोषु गुणमारें येणें । जोडतु असे' ॥ ८३ ॥ अथवा आन येकें मतें । अर्जुनु ह्मणे कृष्णातें । 'आइकें जनार्दना निरुतें । ह्मणौनियां ॥ ८४ ॥ अन्यथाबोधाचे हे गुण । धृतराष्ट्राचे नंदन । दुर्योधनु श्रेष्ठ करून । येर सकळ ॥ ८५ ॥ ययांतें मारूनि आमुतें । काये सुख होईल योगमतें । अभ्यासदुःखें अनंतें । आंगीं वाजती ॥ ८६ ॥ दुःखरूपु सोसूनि अभ्यासु । आत्माज्ञानें गुणनाशु । तेणें गुणांचाचि विकासु । आगळा होये ॥ ८७ ॥ अभ्यासाचें दुःख खरें । वरि हेंही जालें दुसरें । तरि ज्ञानयोगें विचारें । मारूं गुण ॥ ८८ ॥ तरि आत्मज्ञानाचिया दृष्टी । असतचि गुण अद्वैत उठी । ते गुण मारावे हे गोष्टी । थारेचिना ॥ ८९ ॥ गुण ऐसें जाणावें । तें आत्माज्ञानेंचि बरवें । विरुद्ध मानूनि मारावे । ते अज्ञानकृतें अभ्यासें ॥२४९०॥ अज्ञानकृतें योगाभ्यासें । गुण मारितां सुख न दिसे । अस्तु आतां ते जैसे तैसे । ह्मणौनि सोडिले ॥ ९१ ॥ तरि हे आमुतें मारितील । मारून काये करितील । केलें आपुलें भोगितील । आपणचि हे ॥ ९२ ॥ तापत्रयलाखाजोहरीं । आमुतें जाळिलें जऱ्ही । तऱ्ही ते यांचे वैरी । ययांतेंचि जाले ॥९३॥ विषयविष आत्मयोगातें । दिधलें गुणीं भीमसेनातें । सेवटीं तें ययांतें । अपेशचि उरलें ॥ ९४ ॥ आमुचें हरिलें ज्ञानधन । तें ययांचेंचि वाढलें आख्यान । गुण आततायी ह्मणोन । ठसा जाला ॥९५॥ अधिष्ठानापासाव दवाडिलें । तेणें आमुचे काये गेलें । तेचि सर्वस्वें वंचले । जाले गोत्रद्रोही ॥९६॥ स्वरती हारिलें येहीं । मग हरूनि केलें कांहीं । पतिव्रते दूषण नाहीं । लागलें कीं ॥ ९७ ॥ गुणाननुभवेंचि स्वरती । दोषी ते दोषी श्रीपति । आपुलीचि अकीर्ति । वाढविली येहीं ॥९८॥ आतां शस्त्रें घेऊनि आले । आह्मी जाऊं न वधले । इतुलेन आततायी भले । जाले पुरत्रयीं ॥ ९९ ॥ आमुतें मारिलियावरी । उरलां ययांचा शरीरीं । पापेचि श्रीहरि । प्रवेशतील ॥ २५००॥ आत्मधर्मु येहीं हाला । तैं अनात्मधर्मु गुणीं रिघाला । तोचि मग प्रसवला । अनंतां पापां ॥ १ ॥ आत्मयोगु नाशिला येहीं । तेथ आत्मयोगु ययांचां ठाईं । नित्य राहिला जाणयीं । वासुदेवा ॥ २ ॥ कर्मभ्रष्ट भक्तिहीन । कहींचि नुपजे या ज्ञान । आत्मलाभाचें स्वप्न । गुणां न लभे ॥ ३ ॥ विकर्म अकर्म काम्य कर्म । करितां पाप दुर्गम । योगाभावें वर्म । आपणचि चुकलें ॥ ४ ॥ स्वभावालया हाणतील । तैं पाषाणचि होतील । पापसागरीं बुडतील । प्रांतहीनीं ॥५॥ अन्वयबोधातें हाणती । आपुलींचि खंडें पाडिती । मानें मारूनि दाविती । कैसें मुख ॥ ६ ॥ ह्मणौनि ययांकारणें । आमुतें मारूनि आततायीपणें । पापाचि तयाकारणें । पात्र होईजैल ॥ ७ ॥ आमुतें आच्छादूनि श्रीहरि । आपणा दाविती हे जऱ्ही । तथापि आह्मीचि ते त्यांचां आकारीं । ऐसें कां नव्हे ॥ ८ ॥ आत्मलोपें भान । तें आत्मसत्तया भासमान । तरि तेहीं भोगिलें आह्मां मारून । तें भोगिलें आह्मीं ॥ ९ ( ३६ ) ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

केवळ राज्य पृथ्वीचें । आणि नाना भोग विषयांचें । जें जें सुख देहांचें । तें तें सर्व ॥ २०० ॥ आह्मीं जयांकारणें इच्छिजे । प्राप्त जयांकरवीं भोगविजे । शेवटीं अवघेंचि समर्पिजे । जयांलागून

.॥ १ ॥ तेचि हे गा श्रीपती । युद्धीं राहिले असती । काये करूं जी गोपीपती । वचन अवधारा ॥ २ ॥ शरीरा–अंतरीचे प्राण । आणि बाहेरील सकळ धन । ऐसिया सर्वांतें सांडून । येणें काळें ॥ ३ ॥ एवं सर्वत्यागें आराइले । मरणांलागिं येथें आले । आतां यांतें ते आपुले । काय होआवे ॥ ४ ( ३३ ) ॥ एक गुरु एक पितर । एक ते पुतणे ह्मणिजे पुत्र । एक ते आजे थोर । मानाचे लोक ॥ ५ ॥ एक मातुल एक श्वशुर । एक ते बालक पौत्र । एक मेहुणे एक अपर । तैसेचि संबंधी ॥ ६ ( ३४ ) ॥ मधुमर्दना मुरारी । श्रीकृष्णा अवधारी । इष्टमित्रचि ययापरी । यये रणीं ॥ ७ ॥ ययांतें मी न इच्छी मारूं । हा माझा दृढ निर्धारु । आतां धैर्याचा विचारू । प्रकट करीन ॥ ८ ॥ हे मारावया आले । आणि येहीं जरी घाये केले । जऱ्ही प्राण घेतले । ऐसेहीं हो ॥ ९ ॥ तऱ्ही मी न मारी ययांतें । हें दृढ धरिलें माझेनि चित्तें । आतां मारीन मी स्वार्थें । ऐसें ह्मणाल ॥ २१० ॥ पुरत्रयींचें राज्य करणें । येसणियांहीं स्वार्थाकारणें । ययांतें नाहीं मारणें । गोपीनाथा ॥ ११ ॥ गा हे पृथ्वीचें राज्य कितुलें । ययांकारणें येणें काळें । मी मारीन स्वजन आपुलें । ऐसें न घडे ॥ १२ ( ३५ ) ॥ जनार्दनाचिया उपादाना । अवधारी गा जनार्दना । गोपीनाथा श्रीकृष्णा । वचन माझें ॥ १३ ॥ धृतराष्ट्राचे पुत्र । बंधु हे कौरववीर । रणीं हे मारूनि समग्र । आपुलां हातीं ॥ १४ ॥ आमुतें काये बरें वाटैल । आणि तो धर्मु प्रिय होईल । शरीर हे राखवैल । नारायणा ॥ १५ ॥ हे आततायी हें खरें । परंतु बंधु येणें आकारें । गुरु आजे सोयरे । मानाचे लोक ॥ १६ ॥ ययांतें मारितां केवळ । पापचि आमुतें आश्रयील । यालागिं अनुचित हें समूळ । नये करूं ' ॥ १७ ॥ यये श्लोकीं भावार्थु । अन सारिखा गमतु । तोचि कैसा परमार्थु । बोलिजैल ॥ १८ ॥ ' कृष्णा अवधारी बोलणें ' । कपिध्वजु ऐसें ह्मणे । ' आजिचेनि संग्रामें येणें । ययें रणीं ॥ १९ ॥ राया धृतराष्ट्राचे नंदन । आमुतें जे बंधुजन । ययांतें केवळ मारून । तयावरी ॥ २२० ॥ आमुतें काये सुख वाटैल । कैसें केलें जाईल । आतां ते वैरी केवळ । न सोडिती आह्मां ॥ २१ ॥ तरि आह्मां अवधियां मारितील । आततायी हे पूर्वील । पुढेंहि तेचि होतील । साक्षात्कारें ॥ २२ ॥ मग ऐसिया हिंसकांतें । आततायियां ययांतें । पापचि आश्रयील येथें । नसो संशयो ॥ २३ ॥ येथिचें यश जो अभिलाषी । तोचि आततायी दोषी । येरवी मरे तयासी । स्वर्गु मोकळा ॥ २४ ( ३६ ) ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

राज्य भोग सुख संपदा । यांचकारणें कीं गोविंदा । मारूनि त्या त्या स्वजनवृंदा । कोण वांचूं पाहतो ॥१॥ राज्य करावें ज्यांकारणे । ते हे त्यजूनि धनें प्राणें । अंगीकारूनि मरणें । युद्धीं उभे ॥२ (३३) ॥ गुरु आणि चुलते ते ऐसे । कीं सखा पिता पांडु तैसे । पुतणे कीं तैसेही पुत्र जैसे । आणि पितामह ॥ ३ ॥ मामे आणि सासरे । तैसेच नातु शालक सोयरे । प्राणांसमान आप्त सारे । कैसे मारूं मधुसूधना ॥ ४ ( ३४ ) ॥ देवा तूं मधुसूदन । ह्मणीं देसी अनुमोदन । कीं तुज दैत्यारिकदन । करणें अगत्य ॥ ५ ॥ आतां ह्मणसी हरी । कीं तूं न मारिसी यांतें परी । हे तुज मारिती ते अवसरीं । अगत्य तुवां मारावें ॥ ६ ॥ ह्मणोनि ह्मणतों यांतें । मारावें हे इच्छा चित्तें । मी जरी न धरीं हे मातें । मारिती ' ॥ ७ ॥ आतां ह्मणेल अच्युत । कीं ' हें सहज भल्यातें वृत्त[२] । परंतु राज्य साधायाचें

१ आप्तजनांच्या समुदायाला. २ वर्तन.

निमित्त । प्राप्त झालें ॥ ८ ॥ या राज्याकारणें । अगत्य लागे मारणें '। ऐसें हा अंतःकरणें । शंकोनि बोलितो अर्जुन ॥ ९ ॥ ' न घडे यांतें मारणें । त्रैलोक्यराज्याहीकारणें । भूमिनिमित्त हें करणें । काय घडे ' ॥ ३१० ( ३५ ) ॥ हें बोलूनि शंकला पुन्हा । श्रीकृष्ण ह्मणे ' अरे अर्जुना । मारितां आततायी जना । पाप नाहीं ॥ ११ ॥ ॥ अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः । क्षेत्रदारहरश्चैव षडेते आततायिनः ॥ [ शुक्रनीति ] ॥ ॥ या स्मृतीचा अर्थविचार । कीं आततायी ह्मणजे सहा प्रकार । अग्नि लावणार विष देणार । शस्त्रही घे जो मारावया ॥ १२ ॥ आणि जो करी धनापहार । स्वक्षेत्र स्वस्त्री हरणार । या सहा आततायींचा मारणार । पापी नव्हे स्मृति ह्मणे ॥ १३ ॥ ॥ आततायिनमायांतं हन्यादेवाविचारयन् । नाततायिवधे दोषो हंतुर्भवति कश्चन ॥ [ मनुस्मृति ] ॥ ॥ ॥ स्मृतीचा अर्थ ऐसा । कीं आततायी वर्णिले जे सा । त्यांस मारितांही सहसा । दोष नाहीं ॥१४॥ लाक्षागृहीं अग्नि लाविला । विषप्रयोग भीमास केला । शस्त्रें धरूनि सिद्ध आला । भोर तुमच्या वधासि ॥ १५ ॥ कपटें धनादि संपत्ती । हरिली आणि या प्रस्तुतीं । तेरा वर्षे जालीं तरी क्षिती । न देती क्षेत्रापहारक ॥ १६ ॥ दारापहारी ये रीती । कीं सभेस आणिली द्रौपदी सती । वधायोग्य आततायी होती । साहीपरी ' ॥ १७ ॥ ऐसें शास्त्राधारें ह्मणी । झगडेल ह्मणे चक्रपाणी । ह्मणोनि शंकोनि अंतःकरणीं । हा श्लोकार्ध बोलतों ॥ १८ ॥ ' याचें पापचि यांतें । मारूनियां आततायीयांतें । येऊनि आमुच्या आशयातें । आश्रय करील आमचा ॥ १९ ॥ आततायी पापी । आह्मीं न मारावे तथापि । कीं यांचें सर्व पाप कदापि । न सोडी आह्मां ॥ ३२० ॥ यांचाच जो पापसंचय । हा यांस मारील निश्चय । परी आह्मीं मारितां आश्रय । तें पाप करील आमुचा ' ॥२१॥ भाव अर्जुनाचे चित्तीं । ऐसा कीं ' देवा या स्मृती । आततायी मारावा ह्मणती । हें अर्थशास्त्र ॥२२ ॥ दृष्टि ज्याची अर्थावरी । तो जरी आततायीवध करी । तरी त्यास पाप पात्र नाहीं परी । न साधे धर्म ॥ २३ ॥ ज्यांस जोडणें धर्म । तिहीं न करावें हिंसाकर्म । हें मुख्य धर्माचें वर्म । अजी देवा ॥ २४ ॥ विचारितां वेदवचनीं ' न हिंस्यात्सर्वभूतानि ' । पाहतां हिंसेंकरूनी । जोडे अधर्म ॥ २५ ॥ अतएव अर्थशास्त्रविहित । तो दुर्बल पक्ष निश्चित । प्रबल त्याहूनि बहुत । धर्मशास्त्र स्मृति ह्मणे ॥ २६ ॥ ॥ स्मृत्योर्विरोधे न्यायस्तु बलवान्व्यवहारतः । अर्थशास्त्राच्च बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः ॥ [ याज्ञवल्क्यस्मृति ] ॥ ॥ हे याज्ञवल्क्य ऋषीची उक्ति । याची ऐशी अर्थस्थिति । का दों स्मृतींस विरोधप्राप्ति । तेथें युक्ति बलवंत ॥ २७ ॥ आणि अर्थशास्त्राहून । धर्मशास्त्र बलवंत ह्मणोन । याज्ञवल्क्य ह्मणतो यावरून । हे न मारावे सर्वथा ॥ २८ ॥ गुरु आजे बाप । यांस मारितां कैसें नव्हे पाप । जों युद्धीं भीष्मद्रोणप्रताप । तो केंवि मरतो दुर्योधन ॥ २९ ॥ तोही चुलत्याचा सुत । त्याचा वधही नव्हे उचित । लोकविरुद्ध तें निश्चित । नरकांतेंचि पाववी ॥ ३३० ॥ ॥ अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्ममप्याचरेन्न तु ॥ [ स्मृति ] ॥ ॥ जरी धर्म शुद्ध । आणि दिसे लोकविरुद्ध । तो नरकदायक हें सिद्ध । नरक कौरव मारितां ॥ ३१ ॥ यांचा जो पापसंचय । तोच यांस वधी हा निश्चय । परी तें पाप करील आश्रय । आमुचा आह्मी मारितां ॥ ३२ ॥ ह्मणूनि हें क्रूर कर्म । आह्मीं न करावे हाचि धर्म । ऐसें सिद्ध करूनि परम । हेंचि बोलतों ॥ ३३ ( ३६ ) ॥

१ सहा. २ सैन्यभार. ३ पृथ्वी. ४ भार्यापहार करणारे. ५ स्मृतींची वचनें.

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

ज्यालागिं राज्यादिकही । ते कैसें मारूं ॥ ८१ ॥ ते युद्धीं उभे राहिले असती । प्राणधनें सांडूनि श्रीपति । आचार्य पिता जगतीं । वरि राहिले ॥ ८२ ॥ पितामह आणि पुत्र । मातुळ आणि श्वशुर । शालक संबंधी श्रीधरा । इतुके ॥ ८३ ॥ तूं कृपेकरूनि यांतें । मारिसी ना वैरियांतें । परि हे मारितील तूंतें । राज्यलोभें ॥ ८४ ॥ यालागिं तूं यांतें मारी । मग राज्य अवघे करी । ऐसें ह्मणसी श्रीहरि । तरी ऐक ॥ ८५ ॥ यांतें मारूं मी इच्छीना । येहिं जरी मारिलों श्रीकृष्णा । या त्रैलोक्यराज्याकारणें । तेथें पृथ्वी किती ॥८६॥ हे अवघे कौरव मारून । आह्मां काय प्राप्ति हो श्रीकृष्णा । पाप होईल तत्क्षणें । निश्चित देवा ॥ ८७ ॥ आतां ह्मणसील अनंता । पाप नाहीं आततायी मारितां । ते आततायी सांगेन आतां ।साहीजण ॥ ८८ ॥ आगि-लावा आणि विष-देता । शस्त्रपाणि धनहर्ता । क्षेत्र आणि स्त्रीहर्ता । साहवा ॥ ८९ ॥ सन्मुख येत्या आततायातें । मारितां पाप नाहीं तयातें । अर्थ बोले अर्थशास्त्रातें । ऐसें जरी ह्मणसी ॥९०॥ तरि स्मृतिविरोध असतां । तेथें न्यायशास्त्र बळवंत । अर्थशास्त्रापासाव समर्थ । धर्मशास्त्र ॥ ९१ ॥ या आततायांतें मारितां । आह्मां पाप लागेल निश्चित ।

## निवृत्तिदेव

ज्यालागीं राज्यादि इच्छा सदा । तेचि कैसें मारावे ॥ ३२ ॥ हे अर्ध राज्याची प्राप्ति । भोग सुखातें इच्छिती । ते मजसी युद्धीं उभा राहिले असती । प्राण सोडिती धनालागी ॥ ३३ ॥ आचार्य पितर पुत्र । पितामह मातुल श्वशुर । पौत्र श्याल संबंधी उभे असत । सकळिक सगोत्र ॥ ३४ ॥ यांतें मी मारूं इच्छी ना । येहीं जरी मज मारिलें श्रीकृष्णा । न धरी त्रैलोराज्याची वासना । तेथें पृथ्वी किती ॥ ३५ ॥ वधुनि धार्तराष्ट्रसुतां । कोण प्रीति अनंता । आतां इहीं मारितां । हे पापासि श्रेये ॥ ३६ ॥

## उद्धवचिद्घन

सवाई:—

ज्याकरितां बहु राज्यसुखादिक मेळवुनी व्यय सर्व करी ।
तेचि उभे धन प्राण विसर्जुनि दुष्ट सुयोधन साह्य करी ॥
त्यांप्रति मारुनि राज्य कसें करुं पाहिल कोण सुदृष्टिभरी ।
जे इकडे तिकडे विर दीसत आप्तच भासति प्राणपरी ॥ ३३ ॥
दोंहिं दळीं विर लक्षित अर्जुन तों चुलते गुरु आणिक आजा ।
वैर परस्पर घेउं जयी विर विरश्रिनें परिणीतचि माजा ॥
मातुल सासुर पुत्र सपौत्रहि गोत्रज हे मिनले रणकाजा ।
होइल निश्चय निक्षय सर्वहि जे मिनले नृप युद्धसमाजा ॥ ३४ ॥
कौरव मारुनि राज्य मिळे अणि मारिन हे मनिं नाहिंच इच्छा ।
कीं मरतों मिच त्यांजकरें जरि श्रीहरि होय तुझी अशि इच्छा ॥
हे धरणी तरि काय किती मग त्रीभुवनांत भुमींत स्वइच्छा ।
हेतु उरे कवणाप्रति माधव भोगिल कोण त्रिलोकचिकित्सा ॥ ३५ ॥

मारुनियां धृतराष्ट्रसुताप्रति काय जनार्दन लाभ असे ।
जातिल हे करतील तसें फळ पावति अपुले दैवदशे ॥
श्रेय नसे अति पापच दारुण मी तरि हें करुं कर्म कसें ।
सिद्धि नसे हरि युद्धिं कदापिहि बुद्धि विशारद होत नसे ॥ ३६ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

ज्यांलागीं राज्य अपेक्षावे । भोगें सुख आह्मी ज्यांसि द्यावें । तेहीं युद्धापेक्षा धरूनि जिवें । उभे स्वभावें पैं असिजे ॥ ७६ ॥ प्राणधन आशा त्यागूनियां । उभे असती देवराया । ते कोण कोण ह्मणसील गुणालया । निवेदितों पायांपासीं आतां ॥ ७७ ॥ आचार्य आणि पितर सुत । तैसेचि पितामह मामे आप्त । श्वशुर पौत्र मेहुणे निश्चित । संबंधी बहुत नानापरी ॥ ७८ ॥ ऐसियांतें मारावया जाणा । मी संकल्प न धरी मधुसूदना । येहीं केल्याही माझ्या हनना । राज्य व्यसनातेंही न धरीं ॥ ७९ ॥ त्रैलोक्यीचें राज्य जऱ्ही आलें । तऱ्ही यांसि न करीं देहावेगळें । तेथें भूमीचें राज्य किती काढिलें । मन कंटाळलें राज्यार्थासी ॥ ८० ॥ वधूनि धृतराष्ट्राचे सुत । कोण प्रीति पावो सको अत्यंत । पापाश्रयचि लाभेल सत्य । आततायीयांचा अंत पुरविल्यां ॥ ८१ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

ज्यांकारणें राज्यभोगहित । आपण मनीं होतों इच्छित । तें प्राणधनातें टाकूनि त्वरित । युद्धांत आले असती ॥५४॥ आचारिया पित्रु पुत्र जाण । आणि भीष्म पितामह आपण । मातुळ श्वशुर भगवान । शाला संबंधी सर्व संगे ॥ ५५ ॥ ते मज जरी येथें मारिती । तरि मी त्यांसी न मारी श्रीपति । त्रैलोक्याची जरी राज्यप्राप्ति । तरी महिचा किती पाडाव स्वामी ॥ ५६ ॥ राज्य घ्यावें बंधुवर्ग मारोन । हें मज न भावेचि भगवान । येणें होईल पापाचें अधिष्ठान । ऐसें जाण कळों येतें ॥ ५७ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

भुजंगप्रयातः— महीराज्य साधूनि शौर्यें अचाट । सुखी गोत्रजातें किजे लोटपोटें[1] ॥
मरायासि ते गोत्रिचे सिद्ध झाले । धन-प्राण- लोभासि सोडूनि ठेले ॥ ३६ ॥

वसंततिलकाः— आचार्य बाप आणि मातुळ पुत्र पौत्र । आजे तसे श्वशुर शालक इष्टमित्र ॥
मारोत हे मज न त्यांवरि शस्त्र वाहें । त्रैलोक्यराज्यहि नको धरणी किती हे ॥ ३७ ॥
दुर्योधनादिक तयांसि रणीं वधावें । सांगे हरी मज कसें सुख होय पावें ॥
घालूनियां खळजनावरि जीव-घाला । होईन पात्र तरि मी नच कां अघाला ॥ ३८ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

ज्यांकारणें भोग बहुत । आपण होतों जी इच्छित । प्राणधन टाकूनि समस्त । युद्धां आले सर्वही ॥३३॥ पितृपुत्रपक्षींचे । वडील भीष्म आमुचे । द्रोणगुरु बोलिजे वाचे । मामे मेहुणे अवघेचि ॥ ३४ ॥ हे मज मारिती जरी । परी मी यांतें न मारी । त्रैलोक्यराज्य झालें जरी । पृथ्वीचा कोण केंवा ॥३५॥ धृतराष्ट्रपुत्र मारूनी । सुख न वाटे माझें मनीं । शस्त्रें मारितां पाप जाऊनी । हें केंवी घडे श्रीहरि ॥ ३६ ॥

---

१ भरपूर.

## तुकाराम--( पांडुरंगदास )

अभंगः-

राज्य भोगूं सुखें आह्मीं । काय दिसतें दुर्नामीं । तूं तंव काय नेणें स्वामी । जें प्रार्थावें हळुहळू ॥
अपेक्षितों ज्यांनिमित्त । तें तंव वाव जालें सत्य । पदरीं माप हें असत्य । आज घालीं रोकडें ॥
सोडोनि ते प्राणधना । आणि संसारीं वासना । आणि कल्पना कामना । मेली काय ममतेची ॥
उभे युद्धांत राहिले । निःसंदेही वीर भले । यांत सुख चालूनि आलें । तुका ह्मणे कोणतें ॥ ३१ ॥
गुरु पाहे श्रेष्ठ मातें । द्रोण नामें जो आमुतें । तैसें भीष्माचेंही नातें । काय आजी बुडालें ॥
तातबापांचा जो आजा । चुलते पाहे अधोक्षजा । किती पुत्र महाराजा । मरों आजी टेंकले ॥
मायबंधु तोचि मामा । सासऱ्याची हे प्रतिमा । लेंक पुत्राचे जी आह्मां । अंगें दिसें मारणें ॥
स्त्रीचे भाऊ हे शालक । तैसे सोयरे आणिक । तुका ह्मणे जी कौतुक । वाटे मज देखोनि ॥ ३२ ॥
मी यांसि हो जनार्दना । सहसा मारूं इच्छीना । नसे दुष्ट वासना । जन्मपणापासूनी ॥
हे जरी एकवेळें । मज मारितील बळें । तें मी नमनीं वोळें । ऐसा हेत उदास ॥
स्वर्गलोक मृत्युलोक । पाताळीचे निवासक । झालों हीन आह्मी रंक । तेंच सुख आवडे ॥
तेथें भूमि हे थोडकी । किती ईचा हो पाड कीं । तुका वदेल द्वाड कीं । लोकीं ऐसें दिसेना ॥ ३३ ॥
वधोनि हे धार्तराष्ट्र । राया धृतराष्ट्राचे पुत्र । जनार्दना सिद्धिसूत्र । काय दिसे मी नेणें ॥
आप्तालागुनी पाहतां । पाप-वांटाची आईता । भला नेमिला अनंता । लोकामाजी निंद्य जो ॥
आततायीहीकरून । आलों मारूनि स्वजन । तुका वदेल भजन । कोण्या तोंडें आयकूं मी ॥ ३४ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्ः—राज्यभोगसुखें आह्मी ज्यांनिमित्त अपेक्षितों । टाकोनि प्राणधन ते उभे युद्धास राहिले ॥४७॥
गुरुद्रोणादि भीष्मादि हे आजे चुलते सुत । मामे श्वशुर नातू हे मेहुणे सोयिरे तसे ॥ ४८ ॥
मी यांतें मारुं इच्छी ना हे जरी मज मारिती । त्रैलोक्यराज्याहिलागी तेथें हे भूमि ते किती ॥४९॥
मारूनि धार्तराष्ट्रांसी सिद्धी काय जनार्दना । आह्मां पापचि लागे हे आततायीहि मारितां ॥५०॥

## मोरोपंत

आर्याः-

जोडावें ज्यांसाठीं राज्य-सुखा-भोग तेचि हे निधना ।
झाले सिद्ध[1] मराया त्यागूनियां प्राण-मित्र-गेह-धना ॥ ३३ ॥
आचार्य आणि मातुल पौत्र पितामहहि पुत्रही पितर ।
शालक आणि श्वशुरहि संबंधी इष्टमित्र आणि इतर ॥ ३४ ॥
मारोत मला अवघे परि मी यांलागि मारिना देवा ।
त्रिभुवनराज्यास्तवही पृथ्वीचा तेथ कासया केवा ॥ ३५ ॥
या धार्तराष्ट्रघातें होइल कैसा जनार्दना तोष ।
असतांहि आततायी वधितां यांतें घडेल मज दोष ॥ ३६ ॥

: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :

१ तयार, सिद्ध.

आह्मीं अपेक्षितों ज्यांनिमित्त हें राज्य भोग सर्व सुखें ।
टाकुनियां प्राणधना तेचि उभे राहिले स्वयें युद्धीं ॥ ५१ ॥
द्रोणादिक गुरु भीष्मादिक आजे पुत्र आणखी चुलते ।
मामे श्वशुरहि नातू स्यालक आणीक सोयरेहि तसे ॥ ५२ ॥
मी माराया यांतें इच्छी ना मारिती जरि मला हे ।
लोकत्रयराज्यार्थहि तेथें हे भूमि ते किती कृष्णा ॥ ५३ ॥
मारूनि धार्तराष्ट्रां जनार्दना सिद्धि काय आह्मांला ।
आह्मां पापचि लागे वधिता हे शस्त्रपाणिहि असोत ॥ ५४ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

ज्यांकारणें मी असंख्यें । चिंतिलीं राज्यभोगसुखें । ते युद्धिं जी विशेषें । उभे राहिले आहाति ॥ ३३ ॥ गुरु पुतणे आणि पितर । नातु मामे साले सासरे । पुत्र आणि आजे सोयरे । बहुत मिळाले आहेति ॥ ३४ ॥ हे जर्‍हि मज मारिती गा कृष्णा । तर्‍हि मी यांसि मारूं इच्छीना । त्रिलोकीचियाहीकारणा । तेथें पृथ्वि काय असे ॥ ३५ ॥ मारूनियां दुर्योधनादिक । कोणतें सुख होईल अधिक । आह्मां जोडेल पाप एक । आततायी मारलिया ॥ ३६ ॥

**तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्स्वबान्धवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥**

**अर्थः—" ह्मणून आपले बांधव जे धृतराष्ट्राचे पुत्र त्यांना आह्मीं मारणें योग्य नव्हे; कारण, हे माधवा, स्वजनांस मारून आह्मीं कसे बरें सुखी होऊं ?**

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी )"

ह्मणोनि मी हें न करीं । इये संग्रामीं शस्त्र न धरीं । हें किडाळ[1] बहुतीं परी । दिसतसे ॥ ३३ ॥ तुजसीं अंतराय[2] होईल । मग सांगें आमचें काय उरेल । तेणें दुःखें हियें[3] फुटेल । तुजवीण कृष्णा ॥ ३४ ॥ ह्मणऊनि कौरव हे वधिजती । मग आह्मी भोग भोगिजती । हे असो मात आघडती[4] । अर्जुन ह्मणे ॥ ३५ ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

ह्मणोनि जी नारायणा । न मारी मी कौरवबंधुजना । यांतें आपण वधिलिया मना । हें सुख न साहवे मज ॥ ३७ ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

तस्मात् माधवा मालागिं निश्चित । स्वबांधव धृतराष्ट्रसुत । वधावया आह्मी समर्थ । नव्हो नव्हो त्रिवाचा ॥ ८६ ॥ मारून स्वजनांते वारे । सुखें राहो कोण्याप्रकारें । ह्मणोन हें कृत्य निर्धारें ।

१ निंद्यकर्म. २ वियोग. ३ हृदय. ४ न घडणारी.

न मिळे न मिळे उचितातें ॥ ८७ ॥ पापाचें फळ तंव दुःख । येथें संदेह नाहीं देख । अतेव कैंवी पाविजेत आह्मी सुख । येवढें पाप आचरितां ॥ ८८ ॥ कटकटा केवढें मूढपण । पाप करून इच्छिती कल्याण । जैसें निंबबीजाचें करूनि प्रेरण । आम्रफळप्राप्ति कल्पावी ॥ ८९ ॥ कीं जैसें वणवेयाचें जाळीं । सुखनिद्रेची इच्छा केली । तैसी या पापाचरणमेळीं । आह्मी इच्छिली सुखप्राप्ति ॥ १९० ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

अहो जी परियेसा लक्ष्मीपती । हे धार्तराष्ट्र आमुचे बंधु होती । ते वधावया योग्य आह्मी सर्वार्थी । कैसिये रीति होऊं कृष्णा ॥ २७ ॥ अहो जी हें ऐसें करावें । आपुले बंधु आपण कैसे वधावे । आपुलियाचि हृदयासि कैसें भेदावें । जाणतां सेवावें काळकूट कैसें ॥२८॥ एथ प्रत्यक्ष सुखहि न दिसे हरी । हे स्वजनचि वधावे कैसियापरी । आणि तूं लक्ष्मीपति होऊनि कोणेपरी । अमंगळ श्रीहरी करविसी ॥ २९ ॥ ना तूं ऐसें ह्मणसी जी श्रीपति । ययांसि कैसी स्वजनवधाची प्रवृत्ति । आपुला कैसा कुळक्षय करिती । तरी विज्ञप्ति परीस माझी ॥ ६३० ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

त्याकारणें कौरवांसी। मारावें हें नये मनांसी। ते आपुले बंधु तयांसी। मारिता आह्मी सुखी नव्हों ॥२९॥ स्वजन कैसे मारावे। माधवा हें काय तुज भावे। असो माझ्या शब्दाचे यावें। आणावे किंचित मनासी ॥३०॥

## दासोपंत—" गीतार्णव "

[ हे माधव ] अर्जुनु ह्मणे ' श्रीकृष्णा। महामायेचिया अधिष्ठाना। मुररिपु जनार्दना। वचनं अवधारीं ॥ २५१० ॥ [ तस्मात् ] ऐसीं पापभयें दारुणें। ह्मणौनि तयाकारणें। निश्चयो आमुचेनि मनें। येकु केला ॥ ११ ॥ [ धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ] राया धृतराष्ट्राचे कुमर। मित्रांसीं सहितत्वें समग्र। तत्पुत्र आणि पौत्र। ऐसियां यातें ॥ १२ ॥ [ हन्तुं नार्हा वयम् ] मारावया सत्य आह्मी। योग्य न हों संग्रामीं। पुढती आन येक मी। बोलों पाहतुसें ॥ १३ ॥ [ स्वजनं हत्वा ] भलयती गा श्रीपति। आत्मसुखार्थ करावी प्रवृत्ति। दुःखसाधनीं मनोवृत्ति। ते लागेचिना ॥१४॥ तरि हे आमचे स्वजन। बंधु आणि संतान। आतां ययांतें मारून। यये संग्रामीं ॥१५॥ [ कथं सुखिनः स्याम ] पुढें कैसें सुखी असोन। सुखें राज्य कैसें करून। जीऊन अथवा मरोन। सुखी कैसे ॥ १६ ॥ मेलियावरि गोत्रघ्नांतें। स्वर्गु नाहीं हें निरुतें। परंतु रौरव नरक रोकडे। भोग न चुकती ॥१७॥ बहु काळ सुख नाहीं। यातना दुःख तें अक्षयी। मेलियावरि ऐसें जयीं। जीतां कैसें ॥१८॥ कीर्ति ते नाशली। मुखातें मसि लागली। गुरुगोत्रहत्त्या घडली। ह्मणौनियां ॥ १९ ॥ सोयरियां मुख न दावावें। आतां बाहेरि न यावें। घराचिमाजी पडावें। तरि एक सुख ॥ २५२० ॥ तंव मृतभर्तृका बंधुस्त्रिया। आणि तत्पुत्रदारा तिया। नातिसुना अवघिया। मंदिरामाजी ॥ २१ ॥ सौभाग्यहीना दिसती। तियांची सेज पडली रिती। दिवारात्रौ दुःख करिती। तें देखोनियां ॥ २२ ॥ काये पां सुख वाटैल। मुख कैसें पाहवैल। हृदय दों ठायीं होईल। ऐसियावरि ॥ २३ ॥ काये तयां संबोधावें। काये मुख दावावें।

१ आवडतें. २ हेतु.

आतां स्त्रियांमाजी नच जावें । हेंचि बरें ॥ २४ ॥ तरि दुर्योधनाचें सिंहासन । बैसतांचि होईल आठ-वण । तेंचि भद्र तेंचि स्थान । परिवारु तोचि ॥ २५ ॥ अंतरींचें दुःख सांवरावें । कीं लोकांचें मुख पाहावें । काय ह्मणतील अघवे । मनामाझारी ॥ २६ ॥ धर्मकथा निरोपण । सांगों येती ब्राह्मण । तेंचि आह्मीं आइकोन । काय करावें ॥ २७ ॥ वेद शास्त्रें पुराणें । राहिलें इतिहास बोलणें । घरोघरीं आख्यानें । आमुचींचि होतील ॥ २८ ॥ बैसोनि उगें नसवे । तें साधूंसि काये बोलावें । कवण धर्म स्थापावे । श्रेष्ठ ह्मणौनि ॥ २९ ॥ गुरुहत्यावधु जयांतें । ब्रह्महत्या कर्म निरुते । गोत्रहत्या ह्मणिजेतें । परम उचित ॥२५३०॥ इष्टवध आचार जयां । कवणु श्रेष्ठु धर्मु तयां । आतां मुखन्चि नाहीं पापयां । जेणें बोलिजे ॥ ३१ ॥ पाहों नये बोलों नये । आइकों नये भोगूं नये । मागों नये सांगों नये । ऐसें जालें ॥ ३२ ॥ आतां निद्राचि करूनि असावें । तरि मानसीं तेंचि आठवे । डोळा लागतां पावे । स्वप्न तैसेंचि ॥ ३३ ॥ जीजे तंव ऐसें । मेलिया दुःख तैसें । सुख तें कोठें असे । आह्मांलागीं ॥३४॥ [ हि ] सत्य सत्य हें निर्धारें । माझ्या मानसीं निश्चयो स्फुरे । अनुमानाचीं उत्तरें । नव्हती देवा ' ॥ ३५ ॥ ऐसें बोलिजे अर्जुनें । तें परमार्थदृष्टी कैसें घेणें । यये अर्थी बोलणें । विचारावें ॥ ३६ ॥ अर्जुनु ह्मणे ' मायाश्रया । अवधारीं सद्गुरुराया । परब्रह्मा परमात्मया । माझें वचन ॥ ३७ ॥ योगा स्वधर्माचें उच्छेदन । आत्मलोपक पाप गहन । लागैल आह्मांलागून । गुण हे मारितां ॥ ३८ ॥ तया-कारणें मुरारि । आह्मीं आपुलां अंतरीं । येकि युक्ति बरवी थोरी । विचारिली असे ॥ ३९ ॥ राया धृतराष्ट्राचे कुमर । आमुचे बंधुवर्ग समग्र । ते स्वगुण साचार । संगत जे ॥ २५४० ॥ आपणुचि आपुली प्रकृति । तीपासाव गुणां उत्पत्ति । ते आपणाचिपासाव तिया युक्ती । कैसें न मनावें ॥ ४१ ॥ आपणाचपासाव जाले । आत्मांशचि जे संचले । स्वयमेव जन ते कल्पिले । भावें स्वजनाचेनि ॥४२॥ ह्मणौनि ते स्वभावगुण । अभिमानादिक स्वजन । योगसंग्रामीं मारून । ययां सर्वांतें ॥ ४३ ॥ पापी होणें काये उचित । ह्मणौनि योग्य न हो येथ । मारावया गुणगोत । नारायणा ॥ ४४ ॥ मारूनियां हे गुण । काये सुखी आह्मीं होऊन । निश्चयात्मक माझें मन । ऐसें कल्पी ॥ ४५ ॥ गुणीं कर्म आच-रावा । गुणीं भक्तियोगु साधावा । अभ्यास तोही करावा । हा रे गुणाचेनि ॥ ४६ ॥ गुण तरि आत्म-श्रवण । निदिध्यास आणि मनन । गुणापासाव ध्यान । मनाचा जयो ॥४७॥ गुणातें आत्माकारता । तोचि समाधि गा अनंता । अनुभवूं गुणांकरितां । स्थिति ही गुणां ॥ ४८ ॥ गुणसहित सगुणत्व । गुणसहित निर्गुणत्व । गुणसहित गुणातीतत्व । ऐसें असावें ॥ ४९ ॥ कां हीं सांडणें कां विसरणें । ऐसें करणें मातें न मने । जैसें तैसेंचि असणें । एथिंचे तेथें ॥ २५५० ॥ ऐसें असतां जें घडैल । तेंचि सुखरूप केवळ । सांडी मांडी हें सकळ । कारण दुःख ॥५१॥ ह्मणौनि ययाकारणें । स्वजनां स्वगुणां कीरु मारणें । नाहीं आतां जे भोगणें । तें येहींसहित ॥ ५२ ॥ चालतांचि चालणें । नाहीं बोलतांचि बोलणें । करितां सकळ करणें । केलें न व्हावें ॥ ५३ ॥ आहार घेऊनि निराहारता । ऐसी असो अनंता । परंतु न प्रवर्तें घाता । क्षुधेचिया ॥ ५४ ॥ जागृती निद्रे स्वप्नेसीं । भोगावें जी तुरियेसीं । तुरिया असतां उन्मनीसि न भोगणें म्यां ॥ ५५ ॥ अवस्थासीं अवस्थातीतु । गुणासी असैन गुणमुक्तु । देहेसीं विदेहवंतु । नारायणा ॥ ५६ ॥ जडमूढपिशाचता । मातें नलगे दशा प्राप्ता । यया गुणसंगा सर्वथा । सोडीना मी ॥ ५७ ॥ प्रपंचुचि होईल । तरीचि बोधु तो सेविजैल । यापरी पद भोगिजैल । तरि सकळां गुणांसीं ॥ ५८ ॥ ऐसें स्वस्थिती राज्य करितां । सुख सर्वोत्तम तत्वता । त्यागें निग्रहें लयें खलुता । महादुःख ॥५९॥ सुखेंचि जाणें येणें । व्यवहारीं सुखें वर्तणें । योगुअभ्यासु करणें । सुखेंचि तोही

॥२५६०॥ शयनीं आसनीं भोजनीं । सुखेंचि असणें स्वगुणीं । संसारु परमार्थु या मिळोनि । तोचि बरवा ॥ ६१ ॥ ऐसें अर्जुनु बोलिला । न मारीं मी स्वजनु आपुला । पुढें काय बोलता जाला । श्रीकृष्णेसीं ॥ ६२ ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

सकळ मायेचा नियंता । अवधारी गोपीनाथा । येथें संग्रामु करितां । ऐसें आहे ॥ २५ ॥ तया कारणास्तव येथें । मित्रसहिता धार्तराष्ट्रांतें । मारावया आह्मी तंव ते । न हों योग्य ॥ २६ ॥ देवा आपुलेचि हे स्वजन । आपुलेनि हातें मारून । मग कैसें सुखी होऊन । तेणें कर्में ॥ २७ ॥ ममत्वाचे बाण साहावे । कीं पातकाघात भोगावे । कवणीकडे पळावे । अरिष्टाभीर्णें ॥ २८ ॥ अवघें असो श्रीपती । माझे हात न वाहाती । पुढें दुःख कोण जाणे किती । भोगावें तें ॥ २९ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

यालागीं धृतराष्ट्राचे सुत । तदर्थ मरणार बहुत । यांस मारावें हें उचित । सर्वथा नव्हे ॥ ३४ ॥ बरें जरी शास्त्रविरुद्ध । यांच्या वधें सुख तों सिद्ध । ह्मणुनि ह्मणसी तरी हें प्रसिद्ध । स्वजनवधें सुख कैंचें ॥ ३५ ॥ स्वजन मारूनि माधवा । सुखी कैसें होऊं देवा । माधवा मायेच्या धवा । सर्वज्ञ सर्व जाणसी ॥ ३६ ॥ आतां ह्मणसी हा विचार । तिहींही करावाच सादर । ते उगे आणि वारंवार । तूंचि कां हे विचार करिसी ॥ ३७ ॥ ह्मणूनि तूंहि अर्जुना । नको करूं कष्टी मना । ह्मणसी मारीं स्वजना । तरी तें आईक बोलतों ॥ ३८ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

यालागि स्वबांधवांतें । मारावया अर्ह नव्हों ॥ ९२ ॥ हे कौरवादिक मारिलियां । कैसें सुखी होऊं यदुराया । हे स्वजातीचे ह्मणोनिया । निषेधु वधीं ॥ ९३ ॥ कृष्ण ह्मणे पंडुनंदना । त्यांसिहि बंधुवधीं पाप समान । ते न विचारिती पाप पुण्य । हें तूं कां विचारितोसी ॥ ९४ ॥ जैसें ते बंधुवधीं प्रवर्तले । तैसा तूंहि पाहिजेसि प्रवर्तला । हा विषाद तुज कैचा आला । ऐसें जरि ह्मणसी ॥ ९५ ॥

## निवृत्तिदेव

त्याकारणें जीव सर्व । धार्तराष्ट्र सबांधव । मारूं न येती माधव । सुखालागि ॥ ३७ ॥

## उद्धवचिद्घन

सवाईः—

या धृतराष्ट्रसुतांस न मारुन बंधु सखे सुहृदे अमुचे ।
सभ्य समर्थ सहाय्यच मानुनि स्वामि करूं अपुल्या चमुचे ॥
हे करुणाकर माधव स्वामति सांग तुला जि मनांत रुचे ।
काय असे सुख कौरव मारुनि राज्य मला न रुचे न रुचे ॥ ३७ ।

## माधव—( तंजावर प्रत )

यास्तव या धार्तराष्ट्रांसि । वधावया योग्य नव्हो स्वबांधवांसि । स्वजन कैसे गुणराशि । गोष्टी हे मनासि येत नाहीं ॥ ८२ ॥ स्वजनासहित भोगावें सुखातें । वधिलियां ऐसिया आप्तातें । मग सौख्य कायसें आम्तें । प्राप्त निश्चित माधवा होये ॥ ८३ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

म्हणोनियां हृषिकेशी । मी न मारीन बंधूंसी । यांचें वधाचें दुःख मजसी । निश्चयेंसि न सोसवे ॥५८॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

इंद्रवज्राः— यालागि देवा निजबांधवांना । मारों शकूं ना धृतराष्ट्रजांना ॥
या गोत्रजांना परलोक देऊं । आह्मी सुखी श्रीहरि कैंवि होऊं ॥ ३९ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी"

म्हणोनिया नारायणा । न मारी बंधूंतें जाणा । यांचिया वधूनि प्राणा । सुख कैंचें मज माधवा ॥३७॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः— यालागीं जगत्पती । यांसी मारावया चित्तीं । वाढविली उपपत्ती । ते उगीच सुनाट ॥
आह्मी पांडव लोकीं मान्य । कर्म नाचरों अमान्य । योग्य नहों हें पैशुन्य । अंगीं आंतलों ध्यावया ॥
होऊं स्वजनहत्येनें । सुखी माधवा कैसेन । तुका म्हणे श्रीकृपेनें । उणें आह्मां काय जी ॥३५॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्ः—यालागीं यांस माराया आह्मी योग्य नव्हों कधीं । होऊं स्वजनहत्येनें सुखीहि कैंवि माधवा ॥५१॥

## मोरोपंत

आर्याः— यास्तव न वधावे म्यां निजबंधू धार्तराष्ट्र हे आप्त ।
निजजनघातें कैसें होइल सुख माधवा मला प्राप्त ॥ ३७ ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
यालागिं यांस आह्मी मारायाला कधींहि योग्य नव्हों ।
स्वजनांच्या हत्येनें सुखीहि वद माधवा कसें होऊं ॥ ५५ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

यालागिं दुर्योधनादिकांतें । मारावे योग्य नव्हे स्वबंधूंतें । मारूनि आप्तजनांतें । कैसेनि सुखी होऊं माधवा ३७

यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥
कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

अर्थः–" लोभानें ज्यांची बुद्धि नष्ट झालेली आहे असे हे जरी कुलक्षयामुळें होणारा दोष आणि मित्रद्रोहामुळें होणारें पातक पहात नसले तरी, हे जनार्दना, कुलक्षयामुळें होणारे दोष आम्हांस स्पष्ट दिसत असतां आम्ही या पापापासून निवृत्त होण्याचें कां मनांत आणूं नये ?

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) "

हे अभिमानमदें भुलले । जरी पां संग्रामा आले । तऱ्ही आह्मी हित आपुलें । जाणावें लागे ॥ ३६ ॥ हें ऐसें कैसें करावें । जे आपुले आपण मारावे । जाणत जाणतांचि सेवावें । काळकूट ॥ ३७ ॥ हां जी मार्गी चालतां । पुढां सिंह जाहला[१] अवचिता । तो तंव चुकवितां । लाभु आथी ॥ ३८ ॥ असता प्रकाशु सांडावा । मग अंधकूप आश्रावा । तरी तेथ कवणु देवा । लाभु सांगें ॥३९॥ कां समोर अग्नि देखोनी । जरी न वंचिजे[२] वोसंडोनी[४] । तरी क्षणीं एका कवळूनी । जाळूं सके ॥ २४० ॥ तैसे दोष हे मूर्त । अंगीं वाजों[५] असती पहात । हें जाणताही कैंवी एथ । प्रवर्तावें ' ॥४१॥ ऐसें पार्थ तिये अवसरी । ह्मणे ' देवा अवधारीं । या कल्मषाची थोरी । सांगेन तुज ॥ ४२ ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

जरी ते मज वरवे न पाहाती । तयांचीं अंतःकरणें लोभें उपहत होतीं । परी कुळक्षय केलिया दोष बोलती । मित्रद्रोहाचें पातक ॥ ३८ ॥ त्या पापापासाव परतिजे । ऐसें कायि नेणिजे । कुळक्षय करितां दोष जाणिजे । ऐसें आहे जनार्दना ॥ ३९ ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

हे दुर्योधनादि लोभयुक्त । लोभेंकरूनि उपहतचित्त । चित्तनाशयोगें विभ्रंशित । विवेकविचार हृदयींचा ॥ ९१ ॥ विवेकविचार जेथें नाहीं । तेथें पापपुण्य न भासे कांहीं । अतेव हे विवेकांध पाही । जाले असती निरंतर ॥ ९२ ॥ कुलक्षयकृत दोषांते । आणि मित्रद्रोहजन्य पातकांतें । अविवेकांध होत्साते । यद्यपी जरी न देखती ॥९३॥ तरी आह्मी सर्वात्मना । येथें न प्रवर्तों जनार्दना । कां कुलक्षयकृतदोषा दारुणा । देखत असो विवेकें ॥ ९४ ॥ या पापापासाव निवृत्ति । कैसी नेणावी आह्मीं दोष दुखती ।

१ अहो. २ आला. ३ न जावे. ४ बाजूस सारून. ५ चिकटूं.

ज्यांच्या ठायीं असेल भ्रांती । ते सुखे आचरोत ऐसे ॥ ९५ ॥ जैसा अंध पडे गर्तेमाझारी । तैसा डोळस दादुन कैसा करी । तेणेंचि न्यायें जाण गा हरी । येथिचा पैं अभिप्राय ॥ ९६ ॥ हे कौरव अज्ञानवृत्ती । दोषाचरणीं प्रवर्तती । आह्मी कुळक्षयो दोष जाणती । तैसेंचि कैंवी करावे ॥ ९७ ॥ स्वकुळाचा करणे नाशु । हा दोषामाजि महादोषु । येणें प्राणिया अपभ्रंशु । ठेविला असे सर्वथा ॥९८॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

तरि लोभें उपहृत बुद्धि यांची । तेणें कुलक्षयादि दोष न देखतीची । ह्मणोनि प्रवृत्ति युद्धाची । करिती पापाची वृद्धि स्वयें ॥ ३१ ॥ भीष्मादिक जे की शिष्ट अति । तयांसिही सुहृदवधीं जाली प्रवृत्ति । तोचि शिष्टाचार इतर मानिती । ह्मणोनि प्रवर्तती सर्वही युद्धीं ॥ ३२ ॥ अहो लोभादिकारणींकरून । जऱ्ही प्रवृत्ति यांसि जाली जाण । परि तें वेदमूलक नव्हे प्रमाण । ऐसें वचन स्थापी पार्थु ॥ ३३ ॥ लोभें व्याकूळ बुद्धि यांची ह्मणोन । कुळक्षयकृत दोष न देखती दारुण । तैसेंचि मित्रद्रोहाचें पाप गहन । लोभपिहितनयन[1] न देखती यांचे ॥ ३४ ॥ तथापि आह्मीं कैसें हें न जाणावें । हें पुढिला श्लोकाचेनि अन्वयें । तेंहि सांगेन जी स्वभावें । परिसावें देवें कृपाकरूनी ॥ ३५ ॥ ना तूं ऐसें ह्मणसी त्रैलोक्यनाथा । जऱ्हि हे लोभें प्रवर्तले तुमचिया घाता । तथापि तुह्मांसि पाचारिलें येहीं युद्धार्था । आतां परततां कैसें येईल ॥ ३६ ॥ ॥ शास्त्र ॥ आहूतो न निवर्तेत द्यूतादपि रणादपि ॥६॥ ॥ द्यूतासि अथवा रणासी । पाचारिलें तरि क्षत्रियांसी । तरि तेथूनि न निवर्तावें सर्वस्वेंसी । धर्मूचि क्षत्रियांसी ऐसा असे ॥ ३७ ॥ युद्धें अर्जिलें तेंचि धन । ऐसें धर्मशास्त्रहि बोले आपण । तरि तुह्मांसि तेंहीं पाचारिलें जाण । युद्धालागून तुह्मीं करावें ॥ ३८ ॥ ऐसें ह्मणसी जरि मंगलमूर्ति । तरि इयेविषयीं आइक विनती । साङ्ग सांगेन मी तुजप्रति । एकाग्रचित्तीं परिसावे ॥ ३९ (३८) ॥ तरि या युद्धाचें फळ बंधुवध जाण । त्यापासाव कैसें निवर्तावें ना पूर्ण । एवढें पाप आह्मीं कैसें नेणोन । युद्धालागून प्रवर्तावें ॥ ६४० ॥ हे ह्मणा लोभाभिमानें भुलले । ह्मणोनि आह्मांसींच युद्धासि आले । परि आह्मीं तन्हि पाहिजे विचारिलें । देखतां आपुले वधावें कैंवी ॥ ४१ ॥ अहो जी असता धर्म हा टाकावा । आणि गोत्रवधु करावा । सुखतल्प सांडूनि शूळ आश्रावा । कुमार्ग धरावा सुमार्गत्यानें ॥ ४२ ॥ वडवाग्नि पुढां देखोनी । कैंवि जावें तयाचिवरूनि । किंवा अन्नामाजि विष आहे जाणोनी । सेवावें कैसेंनी सांग कृष्णा ॥ ४३ ॥ अहो श्रेय आणि श्रेयाचें साधन । ययाचेंहि सांगेन लक्षण । प्रवर्तावें जें जाणोन । हेंचि साधन जाणावें कीं ॥ ४४ ॥ आणि श्रेयाचेंहि ऐसें लक्षण । जें पापासि संबंध न पावे जाण । परि जितुकें बोलेल वेदु आपण । तें तें श्रेय पूर्ण न ह्मणावें कीं ॥ ४५ ॥ आपुलिया शत्रुमरणार्थ जाण । श्येनयाग करावा ह्मणे वेद आपण । परि तें पापसंबंधि असे ह्मणोन । श्रेयःसाधन तें नव्हे ॥ ४६ ॥ तैसें क्षत्रियांसि युद्ध तोचि धर्म । परि हिंसासंबंधें घडेचि अधर्म । अधर्मरहित केवळ प्रीत्यर्थ कीजे तोचि धर्म । शास्त्र परम ऐसेंचि बोले ॥ ४७ ॥ ॥ शास्त्रवाक्य ॥ फलतोऽपि च यत्कर्म नानर्थे नानुबध्यते । केवलं प्रीतिहेतुत्वात्तद्धर्म इति कथ्यते ॥ ॥ फळ अथवा क्रिया पापेंसि जाण । संबंध न पावोन जें कर्माचरण । केवळ कीजे जें प्रीतिलागून । धर्म पूर्ण त्यातें ह्मणे ॥ ४८ ॥ ज्योतिष्टोमादि स्वर्गसुखार्थ । करितां हिंसा जऱ्हि होय येथ । परि फळीं पापसंबंध नाहीं निश्चित येथ । धर्म ह्मणिजत

१ लोभानें ज्यांवर पडदा आलेला आहे असे डोळे.

यथालागीं तो ॥ ४९ ॥ हे तरि विजय आणि राज्यसुख । हें सर्व अधर्मरूपचि कृष्णा देख । ह्मणोनि मज इष्ट नाहीं सम्यक । न करीं पातक सर्वेश्वरा ॥ ६५० ॥ ह्मणोन मज येथ न प्रवर्तावें । हें अनर्थ-बाहुल्यें श्रेय जाणावें । हेंचि सांगेन मी मनोभावें । एकाग्र केशवें परिसिजे ॥ ५१ ( ३९ ) ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

यद्यपि हे राज्यलोभ धरून । भ्रमें न पाहती विचारून । मित्रद्रोहकुलक्षयेंकरून । पाप जोडतें किती तें ॥ ३१ ॥ कुलक्षय केलियाचें । पाप बोलतां नये वाचें । तैसें पातक मित्रद्रोहाचें । न वर्णवे कोणाही ॥ ३२ ॥ सन्मित्र तो मित्राकारणें । सर्वस्वचि वेंचि उदारपणें । समयीं पडल्या त्या करी हेळणे[1] । तो मित्रद्रोही ह्मणावा ॥ ३३ ॥ जो सन्मित्राचा गुण नेघे । अवगुणाचवरता वेंघे । अवगुणाचीच सें[2] घे । तो मित्रद्रोही ह्मणावा ॥ ३४ ॥ जो अर्थ[3] असूनि वंचनों[4] करी । मागता नास्ति शब्द धरी । स्त्रीवाक्ये द्वेष आदरी । तो मित्रद्रोही ह्मणावा ॥ ३५ ॥ मित्रद्रोहाचें पातक । त्यापुढें इतर तें मशक । मित्रद्रोह तो नरक । तैसेंचि पाप कुलक्षयाचें ॥ ३६ ॥ नरकांत पडेल जो त्वरा । बाहेर काढिजेल तो बरा । परी जो नरकचि जाहला । तो उद्धरला जाईना ॥ ३७ ॥ इतर पाप घडल्यावरी । सन्मित्र नाना उपायें करीं । स्वन्मित्रा काढी लौकरी । त्यांतून प्रेमेंकरूनियां ॥३८॥ द्वेषितां त्या सन्मित्रास । मग ठाव नाहीं कोठें त्यास । तैसेंचि कुलक्षयकर्त्यास । पातक थोर बोलिलें ॥ ३९ ॥ असो ऐशीं ही दोन्ही पातकें । मजही घडों पाहतीं तवकें[5] । कीं कृष्णा तूं सन्मित्र असकें । हित आमुचें करणारा ॥ ४० ॥ ऐसा तूं सन्मित्र होऊन । गोत्रज मारविसी मजकडून । ऐसा तुजविषयीं विकल्प द्रोह धरून । राहीन कीं मी जिवलगा ॥ ४१ ॥ उपरी काय जिणें माझें सख्या । सोयऱ्या सांगात्यां पाठिराख्या । अंतरीच्या तूं पारख्या । कासाविसी जाणे माझी ॥ ४२ ॥ मृदंगासी दों करी घाय । ऐसा मांडिला मज उपाय । यावरी आतां करणें काय । कासाविसी ही दूर करी ॥ ४३ ॥ जरीं लोभें धरूनि हांव । कौरव नेणती निज अपाव । तरी काय आह्मी भाव । जाणूनि न निवर्तावें ॥ ४४ ( ३८ ) ॥ कैसें न कळे गा आह्मांस । पाप नेईल कोण्या थरास । युद्धविचारें माझ्या मनास । त्रास बहु वाटत ॥४५॥ युद्ध करितां तव द्रोह घडे । कुलक्षयदोषही जडे । तो तूं पाहीनास कां पडे । जीव माझा भ्रमांत ॥४६॥ जन ह्मणजे जन्मा येणें । चुकतसे नामें जेणें । त्या तूं जनार्दना मानस देणें । कुलक्षयदोषासी ॥ ४७ ( ३९ ) ॥

## दासोपंत—" गीतार्णव "

[ एते लोभोपहतचेतसः ] कौरव हे स्वजन परि । अवधान देईं गा मुरारि । लोभु तो ययांचां शरीरीं । बहुसाल असे ॥ ६३ ॥ राज्यलोभु स्त्रीलोभु । द्रव्यलोभु पुत्रलोभु । पदलोभु पदार्थलोभु । बहुसाल असतां ॥६४॥ तेणें लोभें हालें । चित्त जयांचें नाशलें । हिताहितज्ञान आच्छादलें । उमटेचिना ॥६५॥ मी कवणु हें कायी । होतो कोठें जाईन कयीं । करावें कायी करीं कायी । हें कळेचिना ॥ ६६ ॥ ऐसे लोभें उपहत । नाशलें असतां चित्त । कौरव ते अतिभ्रांत । काये करिती ॥ ६७ ॥ [ कुलक्षयकृतं दोषम् ] कुळक्षयें केलें दुरित । तें पाप कुळक्षयकृत । मारितां आपलें गोत । दोषु जो कां ॥ ६८ ॥ [ मित्रद्रोहे च पातकम् ] आणि द्रोहो करितां मित्राचा । तेथें जो संग्रहो

---

१ हयगय. २ स्मरण. ३ द्रव्य. ४ कपट. ५ क्रोधावेशानें. ६ समग्र. ७ संवगड्या.

पापाचा । तेणें होये हिताचा । नाशकु जो ॥ ६९ ॥ एवं कुळक्षयें जालें । आणि मित्रद्रोहें घडलें । पाप अप्रमित चालिलें । ऐसिया ययांतें ॥ २५७० ॥ [ यद्यपि न पश्यन्ति ] न पाहे तिहीं जन्ही ते । कौरव लोभें राज्यस्वार्थें । मारूंचि ह्मणती आमुतें । ऐसें जन्ही ॥ ७१ ( ३८ ) ॥ [ हे जनार्दन ] तरि आह्मी तंव सावधान । जनार्दना आइकें वचन । आमुतें राज्य आणि तृण । सारिखेंचि ॥ ७२ ॥ शरीरचि जेथ नश्वर । तेथ राज्य कवणातें स्थिर । आणि प्राचीन तें बळवत्तर । भोगासि जें ॥ ७३ ॥ तें राज्य हें कवणाचें । प्राचीन सारावें पूर्वींचें । अनिवार आगम तयाचे । ते आपेंआप येती ॥ ७४ ॥ आणि ईश्वरें केली सृष्टिरचना । तो नेदी राज्य जें आपणा । तैं वृथा धरूनि वासना । पापचि करावें ॥ ७५ ॥ ईश्वरेंचि दिधलेयावरि । मग तें राज्य कवण हरी । येथ युद्धाची सामुग्री । ते लागोचिना ॥ ७६ ॥ आतां दिधलें हें ईशें घडे । परि भोगितां तें कुडें । ईश्वरेसीं अंतर पडे । तैं काये करावे ॥ ७७ ॥ [ कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिः ] इतुलें जाणों हृदयीं । तरि कुलक्षयकृत पाप ये समयीं । देखत असतांही आइकयी । वासुदेवा ॥७८॥ [ अस्मा-त्पापात् ] यया पापापासाव घोरा । अतिनाशका भयंकरा । अवधारीं सारंगधरा । पासूनियां ॥७९॥ [ निवर्तितुम् ] परतावयाकारणें साधन । विवेकु अथवा ज्ञान । जेणें हें पाप दारुण । नये आंगावरि ॥ २५८० ॥ [ अस्माभिः कथं न ज्ञेयम् ] तें कैसें पां आमुतें न कळे । आह्मी तंव न हों आंधळे । अविवेकी मदें मातले । आततायी ॥ ८१ ॥ व्याघ्र देखोनि पळावें । हें काये लागलें सिक-वावें । पश्वादिकांहीं बरवें । ठावेंचि असे ॥ ८२ ॥ परीक्षा न पाहिजे विषाची । माळा न लेइंजे भुजं-गाची । संगती तया चोराची । धरूंचि नये ॥८३॥ न कीजे वैरियेसीं येकांतु । न संगिजे खळा आत्म-स्वार्थु । पाहोनि येकु पुरुषार्थु । कर्म करावें ॥ ८४ ॥ न कीजे साधूंसीं मत्सरु । परबाधकाचा अंगी-कारु । सत्यासत्या वेगळा विचारु । करूंचि नये ॥ ८५ ॥ न विश्वासावें दुर्मित्रा । वाउगी न करावी यात्रा । आपलें वित्त तस्करा । सांगोंचि नये ॥ ८६ ॥ इष्ट देखोनि प्रवर्तावें । अरिष्ट देखोनि परतावें । गा हें तंव ठावें । बाळकांही ॥ ८७ ॥ आइकोनि जाणों देखोनि । विचारें मनामाजूनि । तरि कुळक्षया पापापासूनि । कैसें न परतावें ॥ ८८ ॥ प्रळयकाळींचा हा वणवा । परतें परतें वासुदेवा । गोत्रवधु हा पांडवां । ग्रासूं आला ॥ ८९ ॥ हें सिंहवदन पसरलें । आंग चुकवावें आपुलें । पाप दारुण पावलें । नीघ वेगीं ॥ २५९० ॥ विषाचा हा सागरु । प्रळयकाळींचा पूरु । कृष्णा तूं होसी तारूं । तरि नीघ वेगीं ॥ ९१ ॥ कल्पांतीं मेघ रचले । तैसें पाप येकवटलें । येणें आकाश रुंधलें । बाह्यांतरींचें ॥९२॥ आतां मग हें गर्जेल । बाणधारा वर्षतील । प्रलयो पाप करील । गोत्रवधाचें ॥ ९३ ॥ पळे तेणेंचि जिंकिलें । भिडे तेणें हारविलें । मारी तेणें मारिलें । आपणापयां ॥ ९४ ॥ कल्पांतींचेनि बा वधणें । उडालों मी पापें येणें । कृष्णा काये करिसी नेणें । ययावरि ॥ ९५ ॥ जंव हें आहे घडावें । तंवचि केशवें चुकवावें । घडल्याजोगें नव्हे । तुह्मां आह्मां ॥९६॥ दहाही दिशा सुनाटा । परि पळावें कवणा वाटा । आतां निर्गमाचा दारवंटा । हाचि येकु ॥ ९७ ॥ हातींचें शस्त्र सांडणें । उगेंचि मग पाठीं बैसणें । युद्ध कौरवांसीं न करणें । हेंचि मुख्य ’ ॥९८॥ ऐसें अर्जुनाचें बोलणें । परमार्थें कैसें वेणें । तें आतां वक्ष्यमाणें । जाणावें पैं ॥ ९९ ॥ अहंभाव दुर्योधनु । सकळां गुणां हा कामधेनु । गुणसमूह अधीनु । जया वर्ते ॥ २६०० ॥ आभिमानु राजा गुणांतें । गुण परिवारु ययातें । आतां अभिमानु-अंश ते । अनुज खरे ॥ १ ॥ अभिमानसहित गुण । आपुलालांविषयीं ययां ज्ञान । त्या त्या साधनीं प्रवीण । वर्तत असती ॥ २ ॥ ते स्वस्वविषयलोभें कैसे । नासले चेतना जयांची असे । हिताहित न

प्रकाशे । कांहीं केलिया ॥ ३ ॥ हिताहितविषयीं अज्ञ । विषयलोभें ते गुण । मग लुब्धत्वें तेणेकरून । पुढती केसे ॥ ४ ॥ कुळक्षय दोषु जाला । आणि मित्रद्रोहें घडला । पापसंग्रहो सांचला । ऐसियातें ॥ ५ ॥ नेणती आपुलेनि प्रकारीं । लोभकृताज्ञानदोषें । तऱ्ही परंतु अनारिसें । आपण न पाहवें ॥६॥ आत्मधर्मु नाशावाचि । हा स्वभाव तयां वर्तेचि । केली करणी आत्मयोगाची । साहेचिना ॥ ७ ॥ आत्मसद्भाव शुद्धाकारें । नांदती गुण त्याचेन वैरें । आपुलेनीचि परि अहंकारें । थोडे केले ॥ ८ ॥ स्वभावलया हेचि वैरी । उपरमा श्रीव्रती पदरीं । लयविक्षेप आंगावरि । घालिती तया ॥ ९ ॥ अन्वयें सावी अखंडता । नसधे ते गुणांकरितां । प्रवर्तले आत्महिता । परोपरी हे ॥ २६१० ॥ समाधी मुख ना दावावे । स्थितीनें उठोनि पळावे । दर्शनें येथें न यावें । नाशावे आह्मीं ॥ ११ ॥ विद्या जीतचि मारावी । स्वरति ते विटंबावी । एवं आमुची खूण नुरावी । ऐसें पाहताती ॥ १२ ॥ सत्संगु आमुचा मित्रु । ह्मणती तो मारावा शत्रु । असत्संगु अपवित्रु । त्याचेनि बोलें ॥ १३ ॥ आमुचे संबंधी अपार । ते ययांचेचि सन्मित्र । परंतु बहुसाल वैर । चालिती तयांसीं ॥ १४ ॥ ऐसें काये ययां पाहिजे । पारि विषयलोभाज्ञानमाजें । आह्मां स्वजनांसीचि झुंजे । उभे ठाले ॥ १५ ॥ कुळहत्या दोष अनेक । मित्रद्रोहाचें पातक । नेणेती ऐसेही मूर्ख । जऱ्ही जाले ॥ १६ ॥ तऱ्ही आइकें जनार्दना । आह्मी जाणों हे विवंचना । जळो ते विषयवासना । पुरे तें कर्म ॥ १७ ॥ कुळक्षयदोषु अपारु । मित्रद्रोहें पापसागरु । हा आत्मनाशु समग्रु । गुणांचेनि मारें ॥ १८ ॥ हा प्रत्यक्षु दिसतु असतां । अवधारीं अनंता । येणें बुडोनि सर्वथा । ऐसें जाणोनि ॥ १९ ॥ यया पापापासाव परतणे । योगसंग्रामु न करणें । निःशेष गुण न मारणें । ऐसिया वर्मा ॥ २६२० ॥ जाणतचि नेणों कैसें । दिसताचि काये न दिसे । ह्मणोन उचित नव्हे ऐसें । आह्मां तंव ॥ २१ ॥ आह्मी तंव ययां न मारूं । पापाचा संग्रहो न करूं । आतां करितां गुणसंहारु । पाप कैसें ॥ २२ ॥ तरि विहिता कर्माचें अनुष्ठान । गुणमारें त्याचें छेदन । तें विहिता करणें करून । कवण पाप नव्हे ॥ २३ ॥ गुणांतें होता अभाव । मोडला भक्तीचा ठाव । आतां अभक्तीचा भाव । अंगीं जया ॥ २४ ॥ तयाचें पापचि कर्म । पापचि तयाचें अकर्म । पाप देहरूपनाम । अभक्ताचे ॥ २५ ॥ नाना गुणांचिया नाशा– । –सरिसींचि हृषीकेशा । कर्म भक्ति लोकेशा । दोन्हीं नाशलीं ॥ २६ ॥ गुणांचा होतां ध्वंसु । मग कैंचा योगाभ्यासु । मनुष्य ना तो पशु । पाषाणु होय ॥ २७ ॥ कर्माचि दशा पावणें । ऐसिया प्रेत्नाकारणें । गुणांचेनि उपच्छेदनें । अंतरों न आह्मीं ॥ २८ ॥ कें सत्वशुद्धि कैंचा गुरु । विवेकु ना आत्मसाक्षात्कारु । प्रथमचि करितां मारु । गुणाचा ऐसें ॥ २९ ॥ ऐसें आह्मीं जाणतां । कैसें प्रवर्तावें अनर्था । यालागीं गुण हे आतां । न मारूं आह्मी ॥ २६३० ( ३९ ) ॥

## वामोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

धरूनि राज्याभिलाषातें । आणि लोभें येणें स्वार्थें अर्थें । नाशिलीं जयांचीं चित्तें । ते हे कौरव ॥२३०॥ कुलक्षयकृता दोषांतें । आणि मित्रद्रोहें जालिया पापातें । जऱ्ही ते यया अनर्थातें । जाणतीचि ना ॥ ३१ ( ३८ ) ॥ देवा गोविंदा जनार्दना । अच्युता हरी नारायणा । मातु अवधारी श्रीकृष्णा । गरुडध्वजा ॥३२॥ कुलक्षयापासाव जाला । कीं कुलक्षयेंचि जो केवला । कुलनाशें जोडिला । ऐसिया दोषांतें ॥ ३३ ॥ आह्मी देखिलें साक्षात्कारें । जाणितलें पातक खरें । ऐसें असतां निर्धारें । देवदेवा ॥३४॥ ययापासाव परतावया । आह्मी जाणतों कृष्णा राया । कैसें नेणावें ह्मणूनियां । नये हें करूं ॥३५॥ अरिष्ट देखोनि न परतावें । जाणतया ऐसें न करावे । नेणें तो करूं स्वभावें । विहितापरी ॥३६ ( ३९ )॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

आजि हेही हें जाणती । परी लोभें नाशिली त्यांची मती । ह्मणोनि हे न पाहती । या विचारासी ॥ ३९ ॥ सर्वांगसुंदर वरिष्ठ । आणि ललाटीं त्यांच्या कुष्ठ । सर्व सौंदर्यास अनिष्ट । तितकेंचि ॥३४०॥ तैसा राज्यलोभ यांला । दिसत असोनि ऐसें मला । मीही हा दोष आपणाला । दाटुनि कैंवि संपादूं ॥४१॥ लोभें होऊनि नष्टमति । जरी हे हें न पाहती । आह्मी जाणते स्वदुर्गती । कैसी न चुकवावी ॥ ४२ ॥ कुलक्षयें मित्रद्रोह । यांत जो पापसंदोह । तो यांला न कळे पडला मोह । राज्यलोभें ॥ ४३ ॥ परी करितां कुलक्षय । अत्यंत दोषाचा संचय । कळत कैसा न करावा निश्चय । या पापापासुनि परताया ॥ ४४ ॥ हें बोलतां कृष्णाप्रति । शंकली अर्जुनाची मति । कीं मारितां जाला यदुपति । कंस मामा आपला ॥ ४५ ॥ सभेंत मारिला शिशुपाळ । इत्यादि सुहृदांचा हा काळ । स्वजन मारी जो तो फटकाळ । ह्मणूनि ह्मणतो याप्रति ॥ ४६ ॥ या गोष्टीनें याची निंदा । मज घडते बुद्धिमंदा । ह्मणूनि ह्मणतो गोविंदा । जनार्दना ह्मणोनि ॥ ४७ ॥ कीं दुष्टजनाचें अर्दन । करितोसि तूं जनार्दन । तूं करावया असुरमर्दन । धरिसी अवतार ॥ ४८ ॥ तूं कर्मातीत सर्वेश्वर । आह्मी कर्मबद्ध जीव नर । या भावें ह्मणे धनुर्धर । जनार्दन ह्मणोनि ॥ ४९ ॥ आतां वधावें कुळ । तरी अनर्थ होती पुष्कळ । ह्मणोनि बोले विव्हळ । पांचां श्लोकेकरूनि ॥ ३५० ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

जरि हे न देखती दुर्वृत्त । लोभें नाशलें यांचें चित्त । आणि कुळक्षयकृतां दोषांतें । मित्रद्रोही जें पाप त्यांतें ॥९६॥ कैसें न जाणावें आह्मीं । पापापासाव निवर्तावया स्वामी । कुळक्षयकृत दोषांतें धर्मी । आह्मीं जे ॥९७॥ कुळक्षयकृतां दोषातें । जनार्दना आह्मी जे पाहातें । तेहि कैसें पां नेणिजे परतते । लक्षण पापाचें ॥९८॥

## निवृत्तिदेव

जरिही हे नेणती दुष्कृत । लोभें नासलें यांचें चित्त । परि आह्मी जाणावा कुळक्षयकृत । दोष कृष्णा ॥३८॥ आतां मी नेणें कांहीं । हें पाप कशानें निवर्ते पाहीं । पाप न प्रवर्ते लवलाही । तें सांगे जनार्दन ॥३९॥

## उद्धवचिद्घन

सवाई:-

मूढमति दृढ पाप न जाणति लोभ अहंमति चित्तिं जयांचे ।
घात कुळासि करीत कुळाधम मानित संत महर्षि तनाचें ॥
द्रोह करी निज मित्र सुखें जनिं शब्द कठोर वदे निज वाचे ।
पाप असंमत आचरणें हरि योग्य नसे परि सांगत साचे ॥ ३८ ॥
हें नकळे सहसाहि रमाधव पापगिरी पडला अडवा ।
यांतुनि निर्गम होय कसा तरि दाव उपाय मला बरवा ॥
हो कुळधर्म परंपर चालत तोचि कुरुक्षय अवघड बा ।
पाहत पाहत दोष जनार्दन या गिरिच्या शिखरीं चढवा ॥ ३९ ॥

---

१ आपली अधोगति. २ पापसंचय. ३ क्षुद्र; नीच.

## माधव—( तंजावर प्रत )

कुलक्षय केलिया जो दोष । आणि मित्रद्रोहाचें कल्मष । हे जाणत नाहींत काय विशेष । ऐसें मानस भावील तुझें ॥ ८४ ॥ तरि हे जाणत नाहींत विशुद्धी । लोभें हत जाली यांची बुद्धि । ह्मणोनि उभे ठाकले दुर्बुद्धि । महायुद्धीं प्रवर्तावया ॥ ८५ ॥ नेणत्यापासूनि अंतर । पडणें हा उचितचि प्रकार । परि जाणत्यापासाव साचार । चुकीचा विचार घडो न ये कीं ॥ ८६ ॥ पापापासाव आह्मी जाणा । केवि परति नेघों माजि मना । कुलहत्येचि जाणोनि विवंचना । जनार्दना सकळही ॥ ८७ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

हे मज उत्तम न पाहती नयनीं । कां जे राज्यलोभ संचरलासे मनीं । कुळक्षयाचा दोष चक्रपाणी । मित्रद्रोहाचें जाण पातकासीं ॥ ५९ ॥ त्या पापापासोनि जाण । सुटावें ते नेणिजे भगवान । कुळक्षय करितां दोष पूर्ण । मी आपण देखत आहे ॥ ६० ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

स्वागताः— ग्रासिलें सकळ हे धनलोभें । यांसि हा जरि विवेक न लाभे ॥
गोत्रजासि आणि मित्रजनासी । जोडिता निवटिता अघराशी ॥ ४० ॥

इंद्रवज्राः— आह्मां असें हें न कसें कळावें । अ'ह्मी मनातें न कसें वळावें ॥
कुलक्षयाचा गणिजे न दोष । मूर्खासि आह्म सिद्दि निर्विशेष ॥ ४१ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

जया वंशीं कुळक्षय झाला । तयाचा कुळाचार बुडाला । हा विचार त्यांहीं सोडिला । मित्रद्रोहेंच पातक ॥३८॥
पापापासाव परतिजे । ऐसें आह्मीं काय नेणिजे । कुळक्षय करितां दोष आणिजे । ऐसें आहे केशवा ॥३९॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः—
ते हे जरी न पाहती । सारासार न्यायनीती । दृष्टी अंध लोभें होती । वशवर्ती कामाच्या ॥
आशा लागली द्रव्याची । अथवा पुत्रसंततीची । तेथें सहज विवेकाची । मानमोड होतसे ॥
कुळहत्येंत जो दोष । मित्रद्रोहाचा विशेष । तुका ह्मणे हो हें विष । दुष्ट घाली हो अनंत ॥ ३६ ॥
ज्याच्या भेणें साधन करी । लंघन साधनें डोंगरीं । जाते पाहतां कंसारी । तूं हातींचा सुटसी ॥
तया पातकापासोनी । सुटों आह्मी कैसेनी । नित्यकर्म आचरोनी । वंद्य होऊं तों कैसे ॥
जनार्दना विष खातां । कैचें अमरत्व आतां । जाणत व्याघ्रजाळीं जातां । आतां भला कैसेनि ॥
तैसे कुळहत्येमाजी । दोषें पुण्य लोपे बा जी । तुका ह्मणे विनवा जी । हें देखतां प्रत्यक्ष ॥ ३७ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्ः— ते हें न पाहती जरी लोभेंकरूनि मूढश्री । कुलहत्येंत जो दोष मित्रद्रोहांत पाप जें ॥ ५२ ॥
पापापासूनि या आह्मी कैसें न परतों हरी । कुलहत्येंत जो दोष देखतांही जनार्दना ॥५३॥

## मोरोपंत

आर्या:-

जरि हें लोभावेशें पाहीनाती स्वकीयजनघाता ।
मित्रद्रोहाघाता तैसें दुस्तर कुलक्षयाघाता ॥ ३८ ॥
परि म्यां देवा कैसें पापापासोनि या न परतावें ।
स्वकुलक्षयदोषें ज कैसें म्यां सत्पथी न वर्तावें ॥ ३९ ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
जरिही हे न विलोकिति लोभानें मूढबुद्धि होऊनी ।
कुलहत्यादोषातें मित्रद्रोहांत पाप जे त्यातें ॥ ५६ ॥
या पापापासुनियां आह्मी परतों न ये कसें कृष्णा ।
कुलहत्यादोषातें देखत असतां जनार्दना स्वामी ॥ ५७ ॥

## वामन—( द्विजोत्तम )

[ या अध्यायांतील ३८ ते ४७ श्लोकावरील टीका उपलब्ध नाहीं. ]

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥**

**अर्थः-" कुलक्षय झाला असतां वंशपरंपरेनें चालत आलेले कुलधर्म नष्ट होतात. धर्माचा नाश झाला ह्मणजे सर्व कुलावर अधर्माचा पगडा बसतो.**

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी )"

जैसें काष्ठें काष्ठ मथिजे । तेथ वन्हि एक उपजे । तेणें काष्ठजात जाळिजे । प्रज्वळलेनि ॥ ४३ ॥ तैसा गोत्रींची परस्परें । जरी वधु घडे मत्सरें । तरी तेणें महादोषें घोरें । कुळचि नाशे ॥ ४४ ॥ ह्मणवूनि येणें पापें । वंशजधर्मु लोपे । मग अधर्मुचि आरोपे । कुळामाजी ॥ ४५ ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

जयाचे वंशीं कुळक्षयो जाला । तयाचा कुळधर्म बुडाला । अधर्म तेथें प्रवर्तला । तयाचे कुळीं ॥४० ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

कुलक्षयाचे ठायीं निभ्रांति । कुलधर्म शांतीतें पावती । पूर्वज परंपरा प्राप्त असती । तेचि बोलिजेति कुलधर्म ॥ ९९ ॥ पूर्वज-परंपरा-प्राप्ति । अतैव ते सनातन ह्मणिजेति । एवं ऐसे कुलधर्मीतें नासती । कुलक्षयो जालिया ॥ २०० ॥ कुलधर्म नाशिले असतां । नित्यधर्मी होय भ्रंशता । नित्यधर्मी ह्मणिजे शास्त्रता । वर्णाश्रमोक्त जें कर्म ॥ १ ॥ नित्यधर्माच्या विनाशी । अधर्म सकळ कुळाशी । अधर्मी कुल जालिया निश्चयेसी । आणिकही दूषण ॥ २ ॥

---

१ घांसावें. २ सर्वच लाकडं. ३ पेटला असता. ४ कुळधर्म. ५ शिरतो.

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

अहो कुळाचा क्षय जाला असतां । मग परंपरागत धर्म नाशती सर्वथा । कुळीचे धर्म सर्वहि नाशतां । कुळ तत्वता अधर्मे अभिभवे ॥ ५२ ॥ जेथ कुळाचाचि क्षय झाला आघवा । तेथ कुळधर्म कवणें आचरावा । उरला जो स्त्रीबाळमेळावा । तो धर्मगौरवा काय जाणे ॥ ५३ ॥ मग स्त्रीबाळादिकरूप हें कुळ । अधर्मे व्यापिजे गा हरि सकळ । मग अधर्माभिभवें नाशे केवळ । सांगों प्रांजळ तेंही कृष्णा ॥५४॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

नाश जाहल्या कुळाचा । परंपरागत कुळधर्माचा । नाश होतसे साचा । अधर्म वाढे कुळीं मग ॥४८॥ अधर्म वाढल्या पाहीं । वांचूनं कारणंचि नाहीं । अत्रीं परत्रीं दिशीं दाहीं । पापच सर्व पसरतें ॥४९॥

## दासोपंत—" गीतार्णव "

[ कुलक्षये ] कुलक्षयो जाला असतां । अवधारीं लक्ष्मीकांता । उरलां कुळीं सर्वथा । येक होईल ॥ ३१ ॥ [ सनातनाः कुलधर्माः ] परंपरागत चालिले । कुलधर्म जे कीं आपुले । मागां कधींचि लोपले । नाहींचि जे ते ॥३२॥ [ प्रणश्यन्ति ] नाशतील अवघे जाण । मग धर्मनष्टें कुळेंकरून । कुळांचां ठायीं आन । काये होईल ॥ ३३ ॥ [ धर्मे नष्टे ] धर्मु असतां नाशला । अवधारीं गा गोपाळा । कर्मेवांचूनि सकळां । आसिलें नवचे ॥ ३४ ॥ [ कुलं कृत्स्नम् ] मग धर्म नव्हे तें करिती । अवधारीं पां श्रीपति । तेणें अवघियांचि कुळांप्रति । काये होईल ॥ ३५ ॥ [ अधर्मोऽभिभवत्युत ] अधर्मुचि तो व्यापील । धर्म शेष नुरवील । अधर्मत्व आंगा येईल । तें येणेंचि अंगें ॥ ३६ ॥ सत्यचि ऐसें घडैल । कुळातें धर्मुचि मूल । आतां धर्मे सुटलें कुळ । कैसें शोभे ॥ ३७ ॥ धर्माधर्मविचारणा । कव्हणातेंचि नये मना । पाप पुण्य कळेना । ऐसें होईल ॥ ३८ ॥ हिताहित कार्याकार्य । बंधु मोक्ष भयाभय । पाप पुण्य अज्ञेय । तैं नियमुचि नाहीं ॥३९॥ इच्छा तें कर्म करावें । इच्छा तें सुखेंचि भोगावें । जावें यावें घ्यावें द्यावें । इच्छा आपुलिया ॥ २६४० ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

कुलक्षयो असतां जाला । तेणें पातकें गोपाला । सनातन कुलधर्म अवलीळा । गेले नाशोनियां ॥३७॥ कुळिचा आचारु परमु । नाशिला असतां तो कुलधर्मु । कवणा वर्णाचा कुळिं नियमु । वा आश्रमु पुसावा ॥ ३८ ॥ मग धर्मु मुक्ता जाणयीं । अवघियां कुलांतें तयीं । वर्णाश्रमाचांचि लयीं । काय होईल ॥३९॥ अधर्मुचि अवघा व्यापील । भलतया भलतयतेंचि करील । नियमु नाहीं होईल । वर्णावर्णाचा ॥२४०॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

देवा कुलाचिया क्षयें । कुळांचे धर्म लोपती स्वयें । जे आचरतां निश्चयें । ब्रह्म सनातन पाविजे ॥५१॥ सनातन म्हणिजे नित्य । धर्म कर्ममय हें तों अनित्य । ज्या धर्मी ब्रह्म सत्य । पाविजे ते सनातन

१ जगून. २ उपयोग. ३ इहपर लोकांत.

॥ ५२ ॥ तेव्हां हे भागवत–धर्म । ज्या धर्मी विश्वही ब्रह्म । हे नव्हती ते कुलधर्म । जे हीं क्षुद्रदैवतें पूजिती ॥५३॥ ते कुलधर्म बुडाले जरी । हानि होणार काय तरी । त्यांचा शोक न करी । अर्जुन एथें ॥५४॥ म्हणूनि म्हणतों जे धर्म । बुडालिया प्रबळे अधर्म । जो अधर्म करूनि कुकर्म । घात करी कुळांचा ॥५५॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

कुलक्षय जालया कृष्णा । कुळधर्म नाशती पुरातन । धर्म नाशले यां कुळांस पूर्ण । अधर्मु जिंते ॥९९॥

## निवृत्तिदेव

कुलक्षय जालिया श्रीकृष्णा । कुलधर्म नाशती सनातना । धर्म नासलिया कुळ संपूर्णा । अधर्मु जिंते ॥४०॥

## उद्धवचिद्घन

सवाई:–

हाचि कुळक्षय सर्व करी तरि जातिल ते कुळधर्महि वांया ।
कूळ बुडे कुळधर्म उडे मग येत अधर्म तयास मिळाया ॥
जो बचनागचि खात मुखें तरि गोडमिषें मग जात मराया ।
बांधुनि कंठिं शिळा दृढ त्यापरि जात असे जलसिंधु तराया ॥ ४० ॥

## माधव—( तंजावर प्रत )

जरि हा कुलक्षय घडे । तरि कुलधर्म नाशोनि बिघडे । परंपरा अवघा मार्ग बुडे । धर्म मोडे उचित जो ॥८८॥ धर्म नासलिया सकळ । अधर्मासि वश होय कुळ । कुळ पालटल्या सबळ । घडे केवळ विचार ऐसा ॥८९॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

ज्याचें वंशीं कुळक्षय जाला । त्याचा सर्व कुळधर्म बुडाला । अधर्म प्रवर्तला बधिला । ऐसें मला कळों येतें ॥ ६१ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

उपजातिः–

कुळनाशी कुळधर्म नासती । वडिलीं सेविति जे बरे रिती ॥
शिरती शत्रु अराजकीं जसे । अवघे दोषहि त्या कुळीं तसे ॥ ४२ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

ज्या वंशीं कुलक्षय झाला । त्याचा कुळधर्म बुडाला । धर्म गेलियावरी कुळा । पाप अवश्य होतसे ॥४०॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः–

कुलक्षयच बुडती । सत्य जाणतां श्रीपती । मग त्या वृद्धि होती । अधर्माच्या अनंता ॥
कुळधर्मपरंपरा । केला विधीनें संसारा । त्याचा सहज मातेरा । हातें आमुच्या होतसे ॥

धर्मनाशें सर्व कुळ । वश अधर्मा सकळ । देखत अन्यायाचें फळ । लांचिव न्याय होतसे ॥
तुका ह्मणे पार्थशब्दीं । देवा लागली समाधी । तेणें वचनें हीं कधीं । पैं गा नव्हतीं ऐकिलीं ॥ ३८ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्:— कुलक्षयांचि बुडती कुलधर्मधरंपरा । धर्मनाशें सर्व कुळ अधर्मा वश होतसे ॥ ५४ ॥

## मोरोपंत

आर्या:— बुडती कुळक्षयानें कुळिंचे प्राचीन धर्म हे सारे ।
धर्माच्या नाशानें न शिरे वंशीं अधर्म कैसा रे ॥ ४० ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
कुलहत्येनेंचि बुडे कुलधर्मपरंपरा समग्रा ही ।
धर्माच्या नाशानें होय अधर्मासि वश समस्त कुळ ॥ ५८ ॥

**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥**

**अर्थ:—"हे कृष्णा, अधर्माच्या व्याप्तीनें कुलीन स्त्रिया दुराचरणी होतात; स्त्रिया दूषित झाल्या असतां, हे वृष्णिकुलोत्पन्ना, वर्णसंकर होतो.**

## श्रीज्ञानेश्वर—"भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी )"

एथ सारासार विचारावें । कवणें काय आचरावें । आणि विधिनिषेध आघवे । पारुषती[1] ॥ ४६ ॥ असता दीपु दवडिजे । मग अंधकारीं राहाटिजे[2] । तरी उजूचि कां आडळिजे[3] । जयापरी ॥ ४७ ॥ तैसा कुळीं कुळक्षयो होय । तये वेळीं तो आद्यधर्मु जाय । मग आन कांहीं आहे । पापावांचूनी ॥ ४८ ॥ जैं यमनियमैं ठाकती[4] । तेथ इंद्रियें सैरा राहाटती । ह्मणऊनि व्यभिचार घडती । कुळस्त्रियांसी ॥ ४९ ॥ उत्तम अधमीं संचरती । ऐसे वर्णावर्ण मिसळती । तेथ समूळ उपडती[5] । जातिधर्म ॥ २५० ॥ जैसी चोहटांचिये[6] बळी । पाविजे सैरा कांउळीं[7] । तैसीं महापापें कुळीं । संचरती ॥ ५१ ॥

## सोपानदेव—"सोपानदेवी"

कृष्णा अनर्थ जालियावरी । नाश पावती कुळींचिया नारी । स्त्रीधर्म चळलियावरी । वर्णसंकर होईल ॥४१॥

१ नष्ट होतात. २ सपाट जाग्यांत. ३ मन व इंद्रिय यांचें आकलन. ४ बंद पडतात. ५ नाश पावतात. ६ चव्हाट्यावरचा बळी. ७ कावळ्यांना.

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

वृष्णिकुलाचें ठायीं होतया । आईक कृष्णा वार्ष्णेया । कुळीं अधर्म पावलिया । दूषण पावती कुलस्त्रिया ॥ ३ ॥ स्वधर्महीन पैं असतां । चित्तासि पावे समळता । अंतरीं चित्त समळ होता । तोचि प्रवाह बाहेर ये ॥ ४ ॥ तेणें बाह्य प्रवाहे उत्सकळ । होऊनि ठाती इंद्रियें सकळ । मग अनाचारांचि केवळ । अवघे कुल वर्तो लागे ॥ ५ ॥ स्त्रिया परपुरुषीं व्यभिचारती । त्या लौकिकी दुष्ट होती । स्त्रिया दुष्ट झालिया निश्चिती । वर्णसंकर होय पैं ॥६॥ स्त्री व्यभिचारदोष करी । तेथें वर्णसंकर काय असे दुरी । भ्रष्टत्व पावे निर्धारी । स्त्रियाचेनि व्यभिचारें ॥ ७ ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

मग अधर्मी अभिभवलिया कुळ । मग स्त्रिया कुळीं होती अति बरळ । व्यभिचारें वर्णसंकर प्रांजळ । होय प्रबळ अनर्थ ऐसा ॥५५ ॥ उत्तम स्त्रिया अधर्मीं प्रवर्तती । मग तयापासाव होय पुत्रोत्पत्ती । ऐसे वर्णावर्ण मिसळती । कैसिये रीती तें सांगों ॥ ५६ ॥ कुळस्त्रिया मग ऐसें ह्मणती । आमुचे भर्तारीं धर्म टाकूनि सर्वार्थी । कुळक्षय केला विक्रांतमती । तेथ आह्मांप्रती दोष काय ॥ ५७ ॥ आह्मींहि व्यभिचार केलिया । कोण दोष जडेल आपणिया । ऐसिया कुतर्कहता कुळस्त्रिया । सर्वा तिया दुष्टाचि होती ॥ ५८ ॥ अथवा कुळक्षयकर्ते पतित पती । तयांच्या संसर्गें स्त्रियाहि दुष्टा होती । तूं कृष्णनामें बुद्धिसाक्षी श्रीपती । वृष्णि ह्मणती अतिचातुर्यें ॥ ५९ ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

वाढलिया अधर्मखाणी । लोपते स्वधर्मशिराणी । कुलस्त्रिया निदानीं । होती परपुरुषीं रत ॥ ५० ॥ पापपुण्यातें नेणूनि । पतीतें स्वहस्तें मारूनि । वर्ताया जारकर्मी भरूनि । भय त्यांसी न वाटे ॥ ५१ ॥ उपरी वर्णसंकर होई । भलती भलत्यापें जाई । भलता भलतेंचि खाई । घडे पशुवत् आचरण ॥५२ ॥

## दासोपंत—" गीतार्णव "

[ हे कृष्ण ] अर्जुन बोले ' श्रीकृष्णा । पुढती अवधारीं सर्वेशा । आमुचया कळीं मना । ऐसें येत असे ॥ ४१ ॥ [ अधर्माभिभवात् ] अधर्मु जाला असतां कुळीं । वेदाज्ञा शास्त्राज्ञा गेली । मग लोकलज्जा उठिली । क्रमेंचि ते ॥ ४२ ॥ [ प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ] लोकलज्जेचें गेलें आवरण । तुटलें आचारबंधन । वरि स्त्रियांचें अधरपण । ऐसें असतां ॥ ४३ ॥ परपुरुषीं कां न रमती । बंधूंतेहि अभिलाषिती । गा गोत्रपुरुषां सोडिती । हें काये घडैल ॥ ४४ ॥ कवणा कवणें शंकावें । कवणाचें भलें सांगावें । अवधियांतेंचि न संभवे । कर्मी नियमु ॥ ४५ ॥ इच्छा तेथें विचरावें । इच्छा तें अन्न भक्षावें । इच्छा तें कर्म करावें । नाहीं आज्ञा ॥ ४६ ॥ यापरी कुळस्त्रियांकारणें । लागलीं सत्यचि दूषणें । त्या वेश्याचि वर्णावर्णें । मुक्ता जालिया ॥ ४७ ॥ [ हे वार्ष्णेय ] वृष्णीकुलसमुत्पन्ना । वासुदेवा नंदनंदना । अवधान देईं कृष्णा । पुढिले गोष्टी ॥ ४८ ॥ [ स्त्रीषु दुष्टासु ]

१ पराक्रमाच्या बुद्धीनें. २ शेवटीं.

दुष्टां स्त्रियांचां ठाईं । कैसें निर्धारें होये काई । तेंचि मी आइकयीं । सांगैन कृष्णा ॥ ४९ ॥ [ वर्णसंकरः जायते ] वर्णसंकर जया ह्मणती । तो होये गा गोपति । तया वर्णसंकराची गति । कैसी ते अवधारा ॥ २६५० ॥ चहूं वर्णांचे होती । ते पुत्र येके कुळीं मिळती । इतुलेनि ते याति । नाशोनि गेली ॥ ५१ ॥ चाऱ्ही वर्ण येकवटले । चाऱ्ही आश्रम मीनले । स्वपरगोत्रींचे जाले । येकीतें पुत्र ॥ ५२ ॥ मग तयांपासाव संतान । तयां कायिसे वर्णावर्ण । आश्रमधर्महीन । भलयतें करिती ॥ ५३ ॥ तोचि वर्णसंकरु जाणावा । कुळीं कुळघ्नां अधवा । मग कुळाचिया नांवा । सांडूनि वर्ते ॥ ५४ ॥ येक पितयाचे जाले । एक बंधूचे उपजले । स्वगोत्रें परगोत्रें जन्मले । येकीपासाव ॥ ५५ ॥ ते परस्परां काये होती । तंव आणिकां वर्णांचे किती । बंधु बंधु ह्मणविती । पुढें कैसे ॥ ५६ ॥ आपणाचिमाजी आपण । कन्यांचें न करितां वरण । विचरती मग तेथून । संतान जें ॥ ५७ ॥ तें आपुलियेचि परंपरे- । -सारिखें सर्वत्र विचरे । पशु जैसें नावरे । धर्माधर्में ॥५८॥ ऐसें कुळ नाशैल । सहस्र कुळें मिळतील । मग तैसेंच चालेल । चिरकाळवरि ॥ ५९ ॥ पुढती याति खरी होये । ऐसें ब्रह्मयाही परी नोहे । यातिसंकरु जो ह्मणों ये । तो तो कृष्णा ' ॥२६६०॥ ऐसें अर्जुनाचें बोलणें । परमार्थवर्ती कैसें जाणणें । तें साहित्यप्रकारें येणें । बोलिजैल ॥ ६१ ॥ अर्जुन ह्मणे ' गा मुरारि । गुरो सर्वज्ञा अवधारीं । गुण हें कुळचि आह्मां जारि । अभिमानेंसीं ॥ ६२ ॥ तरि केवळ क्षयो । आणि अहंवृत्तीचा विलयो । स्फूर्ति नाहीं श्रेयो । ऐसें जालें असतां ॥ ६३ ॥ जाणों तें कुळचि नाशलें । गुणसमूह लया गेले । ऐसें असतां प्रवर्तलें । पुढें कैसें ॥ ६४ ॥ अनादिसिद्ध गुणकर्म । तेचि नाशले स्वधर्म । गुणप्रवृत्तीचें नाम । बुडोनि गेलें ॥ ६५ ॥ अनादिसिद्धा होतिया । त्या गुण-वृत्ति मावळलिया । एवं गुणधर्म अस्त पावलिया । पुढें कैसें ॥६६॥ वर्णधर्म ते उडाले । आश्रमधर्म बुडाले । योगधर्म नाशले । सनातन जे ॥ ६७ ॥ भक्तिधर्मा नाहीं ठाव । ज्ञानधर्मांचा अभाव । मोक्षधर्मउपाय । समस्तु भंगला ॥ ६८ ॥ जेहीं धर्मांकरून । देव मानव ऋषिगण । मागां तरले मागु-तेन । तरती पुढें ॥ ६९ ॥ ब्रह्मा रुद्र श्रीहरि । हे वर्तती जये आचारीं । जे धर्म आधीं उपरि । सृष्टि जाली ॥ २६७० ॥ वेद शास्त्रें पुराणें । जयां धर्मांकारणें । ते अनादि धर्म येणें- । -योगें नाशलयावरि ॥ ७१ ॥ मग अवघाचि कुळीं अधर्मु । उपजोनि विस्तारैल परमु । सर्वत्र निष्ठा नियमु । तोचि नाशैल ॥ ७२ ॥ कर्मेंविण नसती गुण । मग कांहीं करिती वृत्तीलागून । तेथें मोक्षधर्माचें उच्छेदन । तेंचि होईल ॥ ७३ ॥ विहिताविहित जाणोनि सम । सारिखेंचि टाकिजे कर्म । तेथें कर्मेंवीण धर्म । गुणांतें नेसे ॥ ७४ ॥ आतां भय तें कांहीं करणें । न करूनि नाहीं असणें । तंव विहिताचीं साधनें । दुःख-रूपें सदा ॥ ७५ ॥ मग दुःखरूप तेंचि न करावे । सुखरूप विकर्म करवे । यापरी मोक्षधर्म अघवे । तेचि नाशती ॥ ७६ ॥ चहूं वर्णां समानता । जाणोनि अवघे सांडितां । वर्णेंवीण सर्वथा । न सरेसें जालें ॥ ७७ ॥ तैं दुःखरूपु ब्राह्मणु । तयांतें आश्रयी कवणु । तेथें केवळु नीच वर्णु । तोचि प्रतिष्ठे ॥ ७८ ॥ तैसा गुणधर्मु सांडितां । अकर्म कां विकर्म घडे न करितां । तेथें त्यागु तो सुकृता । वरूनि जाये ॥ ७९ ॥ न करितां अकर्मचि वाड । करितां विकर्म तेंचि गोड । विहिता धर्माची चाड । ते कासया मग ॥ २६८० ॥ विहितु नव्हे जो धर्मु । तो विकर्माकर्मरूपु अधर्मु । आतां तयाचा उपक्रमु । कुळीं जाला ॥ ८१ ॥ अवधारीं कृष्णा वनमाळी । अधर्मु जाला असतां कुळीं । केवळ स्वधर्माची होळी । करूनियां ॥ ८२ ॥ कुलस्त्रिया ज्या गुणप्रकृति । त्या अवघियाचि दुष्टा होती । परपुरुषीं रमती । धर्में सुटलिया ॥ ८३ ॥ शांति स्वधर्में सुटली । तेचि अशांति जाली । वादीं-विवादीं श्रोवि-

जली । परावया पुरुषा ॥ ८४ ॥ निवृती स्वधर्मु सांडिला । प्रवृत्तिवेधु तीतें लागला । मग प्रवृत्तीने गळां । धरावया झोंबे ॥ ८५ ॥ विरक्ति नाशली अधर्में । अविरक्ति जाली अन्य धर्में । ते परावां पुरुषीं रमे । विषयालागीं ॥ ८६ ॥ भक्ति अभक्ति धर्मावेगळी । ते दंभाची स्त्री जाली । तयाहीपासाव व्यवली । रमे नाना पदार्थी ॥ ८७ ॥ सहिष्णुता सुटली धर्में । असहिष्णुता जाली ते अधर्में । मग वाटे जातयांसींचि रमे । विषयो पोषी ॥ ८८ ॥ कीर्तीतें आले दूषण । तेचि अकीर्ति होऊन । परतली कुळ न विचारून । तेंचि भोगी ॥ ८९ ॥ स्मृती अधर्में मोहिलें । तेणें विस्मृती आंग दिधलें । मग विस्मृती आंगें आपुले । परावे भोगी ॥ २६९० ॥ मेधा वेधली अधर्में । दुर्मेधा जाली संभ्रमें । मग सर्वां वर्णा रमे । दिवारात्रौ ॥ ९१ ॥ धृती लागला अधर्मु । तिणें सांडिला स्वरामु । तेथें परपुरुषाचा आगमु । होंचि लागला ॥ ९२ ॥ दया अदया आतली । परावया झोंबो लागली । विहिते धर्में सुटलीं । कुळें कां जैं ॥ ९३ ॥ निर्विकल्पते हालें अधर्में । ते परावां पुरुषीं रमे । संकल्पना संभ्रमें । जाली सांती ॥ ९४ ॥ समाधी अधर्मु पाहिजे । तरि लयविक्षेपांतें भुंजे । मग केवळ सुटली लाजे । विश्व भोगी ॥ ९५ ॥ स्वरति धर्म साडवैल । तोचि परराति होईल । यापरी नाशतील । आझांकडिला ॥ ९६ ॥ आतां तयांची अशाति । स्वधर्मींचि आंवरिली होती । तो तुटतां तीची गति । काये होईल ॥ ९७ ॥ अनिवृत्तीचे लक्षण । पहिलेंचि खोटें चिन्ह । ते धर्मबळेंकरून । आंवरली असतां ॥ ९८ ॥ धर्मु अधर्में हाला । तीचां फासां सुटला । आतां तिया नाहीं भोगिला । ऐसा कवणु ॥ ९९ ॥ सरागता ते नागिवी । दाटूनि अवेव दावी । धर्मु नाहीं मार्दी दंडावी । कवणें ॥ २७०० ॥ अभक्ती स्वपुरुषु नावडे । अधर्में घेतली ते कडे । आतां भोगावया पुरुष थोडे । सृष्टीवरी ॥ १ ॥ असहिष्णुतेच्यां ठाईं । मर्यादा पहिलेंचि नाहीं । परी धर्में होती काही । तोचि उडाला ॥ २ ॥ मग हे आर्या गुरूतें । झोंबे बापाभावांतें । भीड भय जीतें । शंका नाहीं ॥ ३ ॥ अकीर्ति पहिलेचि खोटी । परी धर्में झांकिली दृष्टी । आतां अधर्में पाठि । राखिली असतां ॥ ४ ॥ कवणा केवळ भुंजेना । येकली पुरे या जना । यापरी कुलागना । नाशतील ॥ ५ ॥ विस्मृति आपपरावया । धरूनि बैसेल वरितया । अन्यथा स्मृति आंवरावया- । -जोगी नव्हे ॥ ६ ॥ दुर्मेधा दाटावी कवणें । अधृती मोकळीं बारा रानें । राहाटीं घर कल्पने । विक्षिप्तेचें ॥ ७ ॥ कामना न धाये पुरत्रयें । रोपकळा भर्तारां खाये । वासनें माहीं सोये । ते रमे स्वपरजनीं ॥ ८ ॥ ऐसिया कुळस्त्रिया नाशतील । परपुरुषीं रमतील । तेथें स्वभाव उमटतील । तेचि पुत्र ॥ ९ ॥ तयांचीयाही प्रती । आपपरावें नेणती । धर्मुचि नाहीं तैं रीति । कवण तयांची ॥ २७१० ॥ एवं नाशलिया कुळस्त्रिया । अवधारीं यादवराया । गोकुळपति वरि तयां । कैसें होईल ॥ ११ ॥ भर्तारनियमेंवाचून । आतां तें कुळ कवण । कवणें आपुलें म्हणौन । मानावें तें ॥ १२ ॥ चाऱ्ही वर्ण येकवटले । स्वपरगोत्रीं मीनले । आश्रम तेही विचरले । येकीचां ठाईं ॥ १३ ॥ जालया संताना यातिनिर्धार । नाहीं ऐसा जो प्रकार । तोचि वर्णसंकर । क्षयो वर्णाचा ॥ १४ ॥ भक्तु ज्ञानी ना तो कर्मी । साधकु ना सिद्धु असंयमी । संसारीं इंद्रियधर्मी । मोकळा जो ॥ १५ ॥ येणें पापें-करितां । मनुष्यदेहाची दुर्लभता । नाना योनी अनियता । पावे जीव ॥ १६ ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

"यादवकुळनिधाना । गोपिपति श्रीकृष्णा । परमात्मया नारायणा । देवदेवेशा ॥ ४१ ॥ कुळ अधर्में व्यापिलें । तेणें पुढें काये केलें । कुलस्त्रियांतें आणिलें । दूषण जें कीं ॥ ४२ ॥ अधर्माभिभवें तेणें ।

कुलस्त्रियां आली दूषणें । आतां तैसेनि पुढें तेणें । अनाचारें कैसें ॥ ४३ ॥ सदोषां स्त्रियांचां ठायीं । वर्णसंकरु होये संशयो नाहीं । नाना वर्ण तयांचां देहीं । विचरत असतां ॥ ४४ ॥ नाना वर्णाचिया प्रजा । अवधारीं गा गरुडध्वजा । कवणा वर्णा तये काजा । मग तो वर्णु ॥ ४५ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

अधर्में व्यापिलें जया । त्या कुळीच्या कुलस्त्रिया । भ्रष्टतां करिती जारक्रिया । त्या जारें वर्णसंकर ॥५६॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

मग अधर्में व्यापिलें कुळ । दुष्टा होती कुळस्त्रिया सकळ । स्त्रिया दुष्टा जालिया तत्काळ । वर्णसंकर होय ॥ १०० ॥

## निवृत्तिदेव

स्त्रियांसि कष्ट सबल । दुष्ट जालिया तात्काळ । उपरि अधर्में व्यापिलें कुळ । वर्णसंकर होय ॥ ४१ ॥

## उद्धवचिद्घन

सवाई:–

हाचि अधर्म जयीं मरती शुर या रणिं दोहिं दळीं दिसती ।
यांत कलत्रकुलास्त्रि घरोघरिं दोषिक होतिल कालगती ॥
वृष्णिकुळांत वसंत तुं कृष्ण किं होइल त्यांत अधर्म अती ।
हा वरुणा हरि संकर होतसे यास्तव कुंठित माझि मती ॥ ४१ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

अधर्माच्या बळें कृष्णनाथा । दुष्ट होती कुलस्त्रिया सर्वथा । स्त्रीदोषें वृष्णिवंद्या समर्था । घडे तत्वता वर्णसंकर ॥ ९० ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

अधर्म जाल्याने श्रीकृष्ण । कुळस्त्रियांसि विकार होती जाण । त्या व्यभिचार करिती आपण । तेणें होईल वर्णसंकर कीं ॥ ६२ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

इंद्रवंशा:– धर्मप्रकोपें कुळिच्या कुलांगना । निःशंक होती कुलटा जनार्दना ॥
मानें तयासीं रमती निरंतर । माजे कुळीं त्या मग वर्णसंकर ॥ ४३ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी"

कृष्णा अधर्म झालियावरी । दुष्ट होती कुळाच्या नारी । अधर्म चाललियावरी । वर्णसंकर होतसे ॥४१॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः— देव न बोलेचि कांहीं । तेणें भ्याला तो हृदयीं । काय महाराजा ठायीं । विचार जो येईल ॥
आह्मीं जरी न बोलावें । तरी वहावतों भेवें । कोणी न काढो स्वभावें । आह्मा टोंहो फोडणें ॥
मग विनवी फाल्गुन । अधर्माच्या बळें जाण । दुष्ट कुलस्त्रिया पूर्ण । होती याचा अनुभव ॥
त्याचा दोष यादवराजा । होती वर्णसंकर प्रजा । तुका ह्मणे बीजा— । —पासून ते अंकुर ॥१९॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्ः—अधर्माच्या बळें कृष्णा दुष्टा होती कुलस्त्रिया । त्यांच्या दोषें वृष्णिनाथा होतसे वर्णसंकर ॥५५॥

## मोरोपंत

आर्याः—
शिरुनी अधर्म कृष्णा वंशीच्या दूषित स्त्रिया करितो ।
वनिता दूषित होतां होतो उत्पन्न वर्णसंकर तो ॥ ४१ ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
कृष्णा होती दुष्टा कुलस्त्रिया मग बळें अधर्माच्या ।
त्यांच्या दोषें यदुकुलतिलका मग होय वर्णसंकरही ॥ ५९ ॥

**संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।**
**पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः ॥ ४२ ॥**

**अर्थः—" आणि वर्णसंकर झाला असतां कुलाचा घात करणाऱ्यांना व त्या कुलाला खचित नरकप्राप्ति होते; व श्राद्धतर्पणादि क्रिया लुप्त झाल्यामुळें त्यांचे पितरही नरकांत पतन पावतात.**

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी )"

मग कुळा तया अशेखा । आणि कुळघातकां । येरयेरां नरका । जाणें आथी ॥ ५२ ॥ देखे वंशवृद्धि समस्त । यापरी होय पतित । मग वोवांडिती स्वर्गस्थ । पूर्वपुरुष ॥ ५३ ॥ जेथ नित्यादि क्रिया ठाके । आणि नैमित्तिक क्रिया पारुखे । तेथ कवणा तिळोदकें । कवण अर्पी ॥ ५४ ॥ तरी पितर काय करिती । कैसेनि स्वर्गी वसती । ह्मणोनि तेही येती । कुळापासीं ॥ ५५ ॥ जैसा नखाग्रीं व्याळु लागे । तो शिखांत व्यापी वेगें । तेवीं आब्रह्म कुळ अवघें । आप्लविजे ॥ ५६ ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

जातिसंकर जालियावरी । पूर्वजांसहित कुळ बुडे अघोरीं । पिंडोदकक्रिया अवधारी । बुडती देखा ॥४२॥

१ संसारानें. २ आरोळा. ३ अर्जुन. ४ दोघांसही. ५ पडतात. ६ बंद होतें. ७ साप. ८ शेंडीपर्यंत. ९ बुडवितें.

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

( ह्या श्लोकावर आमच्याजवळ असलेल्या मूळ पोथींत टीका नाहीं. )

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

मग कुळामाजि संकर जालिया । तो नरक देतसे कुळघ्ना तया । 'एव' कारें निश्चय केला यादवराया । अहो केवळां तयां तोहि नव्हे ॥ ६६० ॥ तयांच्या पापेकरूनियां जाण । पितरही नरकीं पडती तयांसमान । 'हि' शब्दें निश्चयचि केला असे पूर्ण । उपचारण[1] सर्वथा नव्हे ॥ ६१ ॥ अगा वंशीं तर्पण श्राद्धादिक । कर्ते नाहींत पुत्रादि सकळिक । ह्मणोनि उदकपिंडादि क्रिया देख । लोपती सम्यक पितरांचिया ॥ ६२ ॥ तेणेकरूनि स्वर्गी राहावयाची । सामग्री सरत सर्व पितरांची । मग तेही पदवी पावती पुत्रांची । होय नरकाची प्राप्ति तयां ॥ ६३ ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

कुलघातक्यांते आणि कुलाते । वर्णसंकर नेईच नरकातें । पिंडदानादि न होतां पितरांतें । लाधे पाहे अधोगति ॥ ५३ ॥

## दासोपंत—" गीतार्णव "

[ संकरो नरकायैव ] ऐसा यातिसंकरु जो कृष्णा । तो नरकाचिकारणें नारायणा । नरकसाधन केवळ ह्मणा । यये संसारीं ॥ १७ ॥ [ कुलघ्नानां कुलस्यच ] कुळघ्नां आणि कुळांते । जोडलां कुळवधाचे निमित्तें । कुळघ्नु कुळ येणें पंथें । जाये नरकपुरा ॥ १८ ॥ पुढिला वंशा ऐसी गति । मागिलां पूर्वजां स्वर्गीं स्थिति । ते येणें काये पावति याति । येकार्णवें ॥ १९ ॥ [ एषां पितरः पतन्ति ] तरि स्वर्गवासी जे पितर । तेही पडती समग्र । नरकामाजी निरंतर । ययां कुळघ्नांचे ॥ २७२० ॥ होआवयां पितरां पतन । तें कैसें कवण कारण । ह्मणसील तरि वचन । आइकें कृष्णा ॥ २१ ॥ [ लुप्तपिंडोदकक्रियाः ] तरि स्वर्ग पावावे सुकृतें । वसावे सुकृत जंव तंवचि तेथें । मग सुकृतक्षये मागुतें । पतन होये ॥ २२ ॥ तयांचां वंशी सुपत्रु । कर्मी ज्ञानी भक्तु पवित्रु । तापसी धर्मिष्ट उदारु । महादाता ॥२३॥ ऐसा पुत्रु करि तर्पण । श्राद्धक्रिया पिंडदान । पितरोद्देशेकरून । तें अमोघ होये ॥२४॥ तेणें सुकृतें च्यवन । नव्हे यां पितरांलागून । यालागी पवित्र संतान । इच्छिती लोक ॥ २५ ॥ आतां गोत्रघ्नांचां कुळीं । शुभक्रिया ते राहिली । यातिसकरें याति नाशिली । ऐसें असतां ॥ २६ ॥ लोपलें श्राद्ध तर्पण । तयां पितरा पिंडदान । पितरोद्देश आचरण । कांहीं न घडेचि ॥ २७ ॥ ह्मणौनि ते पितर च्यवले । नरकसागरी पडोनि राहिले । सकरें ऐसें केले । नाशिलें कुळ ' ॥ २८ ॥ ऐसें बोलिला पार्थु । परमार्थे तयाचा अर्थु । सांगिजैल भावार्थु । भजावा श्रोतां ॥ २९ ॥ ' जेहीं मारिलें कुळातें । आपण आपलिया गुणांतें । केवळ गुणमारें धर्मातें । अंतरलें कुळ ॥ २७३० ॥ उरला गुणीं नाहीं विहीत । कर्म भक्ती ना ज्ञानमत । योगु साधन स्वहित । जालें गुणवशीं ॥३१॥ उरला जो अहिता-

१ औपचारिक; तोंडापुरते.

चारु । आत्मयातिलोपकरु । तोचि यातिसंकरु वर्ते कुळीं ॥ ३२ ॥ तया कुळघ्नांचिया कुळा ।.याति-संकरु हो गोपाळा । नरकासि कारण जाला । ऐसें साचार ॥ ३३ ॥ आत्मलोपकु अनाचारु । तोचि गुणीं यातिसंकरु । नरकाकारणें विस्तारु । पावला गुणघ्नां कुळीं ॥ ३४ ॥ आतां अनाचारें गुणसंताना । आणि गुणघ्नांचिया कृष्णा । नरकु तो कवणु मना । आणावा कीं ॥ ३५ ॥ तरि नरकाचें केवळ पुर । तें हें स्थूळ शरीर । कृमि कीट अपार । उदरीं जया ॥ ३६ ॥ कृमि कीट मूत्र मल । आम श्लेष्मा मेंदु केवळ । ऐसें अवघें कुश्चिळ । येकवटिलें ॥ ३७ ॥ मांसें मोट बांधली । वरि त्वचा तया बोली । अंतरीं मांसाजवळी । ओलावा रक्ताचा ॥ ३८ ॥ अस्थि लावूनि केलें नीट । पवनें चेष्टतें स्पष्ट । वरि रोमां लावूनि प्रकट । शृंगारिलें ॥ ३९ ॥ पारि ते मळांची मांदूस । धातुही मळ आवरण तयास । नवा द्वारीं परियस । वोसंडे मळीं ॥ २७४० ॥ नरकमय नरकपात्र । नरकाचि भोगी इतर । ऐसेंचि स्त्रीचें शरीर । तेथें रमे ॥ ४१ ॥ नरकें नरक भोगावें । तें सुख जेणें घ्यावें । तेणें नरकचि अघवे । सेविले कां नव्हे ॥ ४२ ॥ नारकी नरकीं रमे । तो नरकद्वारें संक्रमे । नरकस्थानीं संभ्रमें । वासु करी ॥ ४३ ॥ ते देहींचे वीर्यमळ । तयाचें धरी स्थूळ । तयाहीमाजी कुश्चिळ । मळमूत्रादिक ॥ ४४ ॥ ऐसे नरकीं प्रवेशला । नरकाचाचि आकारला । नवा मासां उपजला । नरकपिंड ॥ ४५ ॥ तें पैं नरकाचें गाठोडें । नरकवंतु घे मागें पुढें । पुत्र पुत्र येणें वाडें । ममत्वें कीं ॥ ४६ ॥ ऐसे मळाचे तरंग अपार । जाले भरलें मंदिर । यया नरकाचें निरंतर । सुख कां जया ॥ ४७ ॥ तया नरकाचिया संरक्षणा । नरका परावया कांटाळेना । सेवा करी दुर्जनां । सेव्य मापूनि ॥ ४८ ॥ तेही नरकमयचि लोक । काढी तयांचेही नरक । खाऊनि अन्न उदक । नरक करी ॥ ४९ ॥ स्वपरनरक-पाळणा । नरकपदा करी आचरणा । मृगपशुदेहीं श्रीकृष्णा । नरकचि खाये ॥ २७५० ॥ ह्मणौनि नरकु हा संसारु । प्रांतहीनु सागरु । येथें होऊनि जलचरु । वंशु गोत्रघ्नांचा ॥ ५१ ॥ विचरे जाण नारायणा । जो चुकला तत्वसाधना । एवं अनाचारें नरकुचि ना । संसारु हा ॥ ५२ ॥ गुणनाशकांची वंशावलि । संसारनरकीं पडली । आतां पूर्वजां गति जाली । तेचि कैसी ॥ ५३ ॥ स्वर्गस्थ पितर पडले । तेही संसारनरका आले । आतां ते कवण कल्पिले । तयांचे पूर्वज ॥ ५४ ॥ तरि कुळघ्न ते आह्मी जाण । आमुचें जें प्रवृत्तिसंतान । सुबुद्धि सुचित्तसुमन । एणें आकारें ॥ ५५ ॥ ययातें अधर्मु अनाचारु । संसारीं घाली यातिसंकरु । तेथें आपुला विचारु । तो पूर्वीचि गेला ॥ ५६ ॥ तें जें आमुचें संतान । तें तयाचे आह्मी पितरगण । आणि शुद्धस्वभावलक्षण । आमुचे पितर ॥ ५७ ॥ ते स्वर्गीहूनि च्यवति । स्वरूपस्थ संसारा येती । मागुतें निष्ठा न पवती । ऐसें होईल ॥५८॥ येहीं सांडिलीं साधनें । आह्मीं निष्ठा भोगिजे जेणें । तीचि पिंडउदकें क्रियमाणें । लोपलीं वंशीं ॥ ५९ ॥ देहद्वयीं नाहीं साधन । तें निष्ठेपासाव सकळां च्यवन । आह्मां आणि पूर्वजां पतन । तें हें ऐसें ॥ २७६० ॥ आत्मधर्मु च्यवला । तोचि अनात्मधर्मु जाला । स्थूळीं येऊनि बैसला । नरक भोगी ॥ ६१ ॥ आत्म-योगा जालें च्यवन । अनात्मयोगीं घ्येलें स्थान । देह नरकां देहाधीन । रूप तयाचें ॥ ६२ ॥ शुद्ध मी जालों शवळु । देहोचि आत्मा केवळु । चौऱ्यांयशीं लक्षांचा मेळु । येकला भोगी ॥ ६३ ॥ स्वभावल्यो स्वरूपस्थु । तो देहभाव जाला प्रकटितु । साधनांचा होतां घातु । ऐसें जालें ॥ ६४ ॥ अन्वयबोधु भेदा आला । तो ममत्वें नरकीं बांधला । आपपरां लागला । नरकां झोंबों ॥ ६५ ॥ स्वरति जाली देहरति । विद्या च्यवली कुंती । ते देहाबाहेरि आंतौती । नरकीं वसे ॥ ६६ ॥ यापरी देहद्वयीं साधनेवीण । आह्मी च्यवलों सद्गुण । आमुचें वृत्तिसंतान । तेंही नाशलें ॥ ६७ ॥ नाशोनि

जातां गुण । नासलें मोक्षाचें साधन । मोक्षसाधनेंवांचून । कैसें जालें ॥ ६८ ॥ सद्वृत्तींतें जालें पतन । तयांचें सद्गुण कवण । स्वरूपनिष्ठा स्फुरण । भाव जयांचें ॥ ६९ ॥ ते अवघेचि आले देहावरि । पडले भवनरकसागरीं । मोक्षपंथु तो दूरि । चिरकाळ पडला ॥ २७७० ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

कुळ मारिलिया कुळघ्नांतें । आणि कुळघ्नाचिया कुळातें । जातिसंकरु हा नरकांतें । कारण होये ॥४६॥ कुळघ्नाचें पितर । स्वर्गीहूनि पडती समग्र । आतां ते कैसे पितर । च्यवनाधिकारी ॥ ४७ ॥ पिंड उदक आणि क्रिया । वंशीं जयांचिया लोपलिया । च्यवन होय पितरां तयां । नाहीं संशयो ॥ ४८ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

परपुरुषापासूनि उपजे । तें संतान संकर ह्मणिजे । त्या कुळीं मरती जे जे । ते पडती नरकांत ॥ ५७ ॥ करिती कुळाचा संहार । त्याच्या कुळीं होय संकर । उत्तम गतीपासूनि पितर । च्यवती[1] त्यांचे ॥ ५८ ॥ कीं पिंडोदकक्रिया । त्यांची न होतां तयां । पतन होय यदुराया ' । अर्जुन ह्मणे ॥ ५९ ॥ ' आतां जे स्ववर्णविहित । त्या धर्मी भगवद्भक्ति निश्चित । भक्तींत धर्म भागवत । ते सद्वंशी कुलधर्म ॥३६०॥ तें परम धर्म कुळ । त्या कुळींचे पितर सकळ । पावती पदें अढळ । हा सिद्धांत ॥ ६१ ॥ तें कुळधर्म शाश्वत । त्यांसि साधन जातिधर्मविहित । हा दोहींचा उच्छेद निश्चित । करितां हत्या कुळाची ॥ ६२ ॥ हा भाव धरूनि पोटीं । आणि अनुतापाच्या कोटी कोटि । ह्मणतो कीं हे गोष्ट खोटी । कुलहत्येची माधवा ॥ ६३ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

तो वर्णसंकरु यदुराया । कुळघ्नांच्या कुळासि या । नरकिं घालि बोला या । संशयो नाहीं ॥ १ ॥ मग यांचे जे पितर । तयां अधोगति होय थोर । तें कैसें ह्मणसी श्रीधर । तें ऐसें ॥ २ ॥ लोपले पिंड जयांचे । तिळोदक नाहीं साचें । आणिकी समस्ता तयांचे । क्रिया लोपलिया ॥ ३ ॥

## निवृत्तिदेव

संकर नरकासि मूळ । कुलीन तो होये अकुळ । मग पितरां होय नरक केवळ । पिंडोदकेंवीण ॥४२॥

## उद्धवचिद्धन

सवाईः—

जो कुळघातकि यापरिचा करि संकर वर्णकुळा बुडवी ।
रौरव दारुण त्या सहपूर्वज नर्क महा पितरां घडवी ॥
आब्दिउनाब्दिक वार्षिक मासिक दशायुगादिक श्राद्धहनी ।
नेदिच पिंड कधीं पितरां जळ लोपत पिंडक्रिया अवघी ॥ ४२ ॥

---

१ पतन पावतात.

## माधव—( तंजावर प्रत )

संकरें होय नरकप्राप्ति । कुलघ्नाच्या कुळाप्रति । पितर तयाचे तळीं खचती । लोपोनि जाती पिंडोदकक्रिया ॥ ९१ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

जातिसंकर जालियावरी । पूर्वजासमवेत बुडिजे अघोरी । पिंडोदकक्रिया अवधारीं । निश्चये मुरारि नासतील ॥ ६३ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

उपजातिः— कुलघ्न जे त्यांस तयां कुळास । सांकर्यदोषें नरकीं निवास ॥
ना पिंड ना तर्पण पूर्वजाला । घडे अधःपात म्हणोनि त्याला ॥ ४४ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

वर्णसंकर झालियावरी । कुळ बुडे पैं अघोरीं । पिंडोदकक्रिया अवधारीं । नाहीं करावयासी ॥ ४२ ॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः— त्या संकरें नरक । प्रकारें अनेक । होती हा विवेक । सर्वां ठावा ॥
कुळघ्नांच्या कुळा । लागे दोष ज्वाळा । मग तो उन्हाळा । खडखडीत ॥
पिंडोदकक्रिया । लोपे देवराया । बोरुवरी वांया । जाय जैसी ॥
तुका म्हणे सर्व । पूर्वजांसी च्यव । जळीं भंगे नाव । कोण तारी ॥ ४० ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्:—संकरें होती नरक कुलघ्नांच्या कुळासही । पिंडोदकक्रियालोपें च्यवती सर्व पूर्वज ॥ ५६ ॥

## मोरोपंत

आर्याः— होतो कुलघ्नपुरुषां नरकप्रद शीघ्र वंशु संकर कीं ।
मग पिंडोदकलोपें पडती पितृगण समस्तही नरकीं ॥ ४२ ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
संकर होतां नरकाचि होय कुलघ्नांचिया कुलासि हरी ।
पिंडोदकक्रियांच्या लोपें च्यवती समस्त पूर्वजही ॥ ६० ॥

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥
उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥
अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

अर्थः—"कुलाचा घात करणाऱ्यांच्या या वर्णसंकरकारक दोषांनीं परंपरागत जातिधर्म व कुलधर्म नाश पावतात. ज्या मनुष्यांचे कुलधर्म नाश पावले आहेत त्यांना, हे जनार्दना, निश्चयेंकरून नरकवास प्राप्त होतो असें आम्ही ऐकत आलों आहों. काय पहा! राज्यसुखाच्या लोभानें आप्तेष्टांना मारण्यास तयार झालों; शिव! शिव! मोठें पाप करण्यास आम्ही सिद्ध झालों आहों.

## श्रीज्ञानेश्वर—"भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी )"

देवा अवधारीं आणीक एक । एथ घडे महापातक । जे संगदोषें हा लौकिक[1] । भ्रंशु पावे ॥५७॥ जैसा घरीं आपुला । वानिवसें[2] अग्नि लागला । तो आणिकांहीं प्रज्वळिला । जाळूनि घाली ॥ ५८ ॥ तैसिया तया कुळसंगती । जे जे लोक वर्तती । तेही बाधा पावती । निमित्तें येणें ॥ ५९ ॥ तैसें नाना दोषें सकळ '। अर्जुन ह्मणे ' तें कुळ । मग महाघोर केवळ । निरय[3] भोगी ॥२६०॥ पडिलिया तिये ठायीं । मग कल्पांतींही उकलु[4] नाहीं । येसणें[5] पतन कुळक्षयीं '। अर्जुन ह्मणे ॥ ६१ ॥ ' देवा हें विविध कानीं ऐकिजे । परी अझुनिवरी त्रासु नुपजे । हृदय वज्राचें हें काय कीजे । अवधारीं पां ॥ ६२ ॥ अपेक्षिजे राज्यसुख । जयालागी तें तंव क्षणिक । ऐसें जाणतांही दोख[6] । अव्हेरूं ना ॥ ६३ ॥ जे हे वडिल सकळ आपुले । वधावया दिठी[7] सुईले । सांग पां काय थेकुलें[8] । घडलें आह्मां ॥ ६४ ॥

## सोपानदेव—"सोपानदेवी"

ह्मणोनि कुळघ्नाचे दोष थोर । तेणें होय वर्णसंकर । बुडती कुळधर्म आचार । जातिधर्म तेही नाश पावती ॥ ४३ ॥ कुळधर्म नाशलियावरि । तया नरकीं वास अघोरी । हें मी ऐकतों जी श्रीहरि । स्वामिराया ॥ ४४ ॥ हे तंव आश्चर्य थोर । राज्य-सुख-लोभें दोषकर । आणि स्वजन मारूनि सुख अपार । इच्छितों आह्मी ॥ ४५ ॥

१ लोकाचार. २ दैववशात्; साहजिक. ३ नरक. ४ सुटका. ५ एवढें. ६ दोष. ७ दृष्टीपुढें. ८ घातकें.

## माधव नारायणदास—“ नारायणकीर्ति ”

वर्णसंकरातें करिती । ऐसे कुलक्षयकर्त्यांचे दोष अंतीं । ईहीकरोनि उच्छेदिती । जातिधर्म कुलधर्म ॥ ८ ॥ जे कुळधर्म बहुता दिवसाचे । परंपरागत प्राप्त साचे । उच्छेदन होय तयांचें । वर्णसंकरकारक दोषी ॥ ९ (४३) ॥ मनुष्यातें जालिया कुलधर्मनाशु । नेमेसी नरकीं घडे वासु । अगा जनार्दना वेदपुरुषु । बोले श्रुति यथार्थी ॥ २१० ॥ एवं जो करी कुळक्षयासी । तो नरका जाय कुळेसी । हें वेदशास्त्र साक्षीसी । सत्य सत्य श्रीकृष्णा ' ॥११ (४४)॥ अत्यंत खेद पावोन । काय वदतसे अर्जुन । ' अहो आह्मी महत्पापाचरण । करावया पावलों ॥ १२ ॥ राज्यसुखलोभें लोभित । आणि स्वजन वधावया ठेलों उदित । जळो जळो आमुचें जीवित । याहून मरिजे ते भले ॥ १३ (४५) ॥

## रंगनाथ मोगरेकर—“ चित्सदानंदलहरी ”

जेंहीकरूनियां वर्णसंकर होत । ऐसे जे व्यभिचारादि दोष समस्त । तेंहींकरूनि कुळघातकांचे निश्चित । सर्व नाशत धर्म जाण ॥ ६४ ॥ क्षत्रियजातिचे जे धर्म असती । आणि कुळधर्म जे परंपरा आचरती । ते सर्वहि उच्छेदातें पावती । वृक्षनाशें पळती विहंगम जैसे ॥ ६५ ॥ जैसा एका गृहा तृणासि अग्नि लागतां । जाळी माडियादि धवळारादि[१] गृहां समस्तां । तैसा एकें जणें कुळक्षय करितां । कुळासि सर्वथा नाश करी ॥ ६६ ॥ मग कुळींचे धर्म जालिया उत्सन्न । पितरांसि प्रेतत्वनिवृत्ति नव्हे जाण । मग निश्चयें नरकीं वासु तयांलागून । होय निर्वाण जगद्बंधो ॥ ६७ ॥ जैसें वावडीचें सूत्र तुटलिया । उफराटी पडे कोल्हाट खावूनियां । तैसें धर्माचें सूत्र तुटलिया । पितरां तयां तैसी गति ॥ ६८ ॥ ऐसियांसि नरकीं नियत वास असे । हें आचार्यमुखें आह्मीं परिसिलें असे । पारि स्वकपोलकल्पित बोलत नसे । जाण विश्वासें जनार्दना ॥ ६९ ॥ कृष्णा बंधुवध करावयाकारणें । संकल्पुनि धरिजे अंतःकरणें । तो अत्यंत पापी सर्वथा जाणणें । तेथ युद्ध करणें तें पाप किती ॥ ६७० ॥ ऐसें असोनि आह्मीं प्रवर्तलों जाण । तें दुःख मी काय सांगों तुजलागून । ह्मणोनि बोले आपणातें शोचून । उचंबळोन दुःखेंकरूनी ॥ ७१ ( ४३–४४ ) ॥ अहो हें थोर दुःख पाप परियेसीं । अति थोर होतसे जी हृषीकेशी । थोर पाप करावया युद्धासी । माराया स्वजनासि उद्यत जालों ॥ ७२ ॥ अहो जयांतें जीवें गोमटें करावें । तयांसिचि शस्त्रावरि विदारावें । हें मनेंकरूनिहि केंवि चिंतावें । जळो आघवें आमचें कर्म ॥ ७३ ॥ अहो राज्यसुखलोभेंकरून । निर्दळावे आपुले बंधुजन । याहूनि पाप नाहीं अतिदारुण । हें नेघे मन माझें कृष्णा ॥ ७४ ॥ ना तूं ऐसें ह्मणसी विश्वमूर्ति । ऐसि जरि तुझी अतिशुद्ध मति । तरि प्रथम का आलासि युद्धाप्रति । तेंही श्रीपती सांगेन ॥७५॥ तरि प्रथम अविचारें औद्धत्येकरून । आलों परि न प्रवृत्त आतां मन । असो तुज जालें ह्मणा वैराग्य पूर्ण । परि भीमसेन तो युद्ध करील ॥७६॥ तेव्हां कौरव यांतें जिंतोनि तुज मारिती । तेव्हां कैसी तुंवा विचारिली युक्ती । ऐसें जरी ह्मणसी लक्ष्मीपती । तरी इष्टप्राप्ति जाली आह्मां ॥ ७७ ( ४५ ) ॥

## रमावल्लभदास—“ चमत्कारी ” टीका

ऐसें दोष कुलघ्न करी । वर्णसंकरकारक हारि । होय जातिधर्मउच्छेद उपरी । नासे कुलधर्मही शाश्वत

१ मंदिर.

॥ ५४ ( ४३ ) ॥ कुलधर्मापासूनि चेवेली । नव्हेति मनुष्यें तीं भलीं । नरकीं पचतीं नेमलीं । कोण काढील तेथूनि त्यां ॥ ५५ ॥ कोण करील सावधावा । जन्ममरणाचा उठावा । तामस योनींचा गा यावो । निवारेल कैसेंनि ॥ ५६ (४४) ॥ नवल कैसें महत्पाप । करावया मांडिला हा व्याप । राज्य-लोभें धरूनि संताप । स्वजन मारावया झालों उदित ॥ ५७ ॥ कटकटा हा कोण विचार । आरंभिला कीं हा दुराचार । यापरीस मरण सार । परी उचित हें नव्हे ॥ ५८ (४५) ॥

## दासोपंत—" गीतार्णव "

[ वर्णसंकरकारकैः ] आतां वर्णसंकरातें करिते । विनाशक यातीतें । वर्णावर्ण आच्छादिते । मनुष्यदेहीं ॥७१॥ [ दोषैरेतैः ] दोष जे कां असाधारण । काये होये येहींकरून । पुनरपि सांगैन '। अर्जुन ह्मणे ॥ ७२ ॥ [ कुलघ्नानाम् ] ' कुलघातकी जे नर । तयांतें हे दोष समग्र । लागोनि तदनंतर । काये करिती ॥ ७३ ॥ [ जातिधर्माः ] जाति ह्मणजे वर्णु । शूद्रु वैश्यु क्षत्री ब्राह्मणु । ययांचा आचारधर्मु जो कवणु । तो यातिधर्मु जाणावा ॥ ७४ ॥ [ कुलधर्माश्च ] जाणोनि यातिधर्मु करितां । आपुलां आचारीं वर्ततां । तेथें कुलधर्मु मागुता । तो येकु आहे ॥ ७५ ॥ वडिलां-पासाव वडिलां । जो धर्मु कळों आला । तो वृद्धाचारुविधि आपुला । कुलधर्मु जो ॥ ७६ ॥ [ शाश्वताः ] ऐसे यातिधर्म पुरातन । आणि कुलधर्म सनातन । बहुतां काळांचे जाण । वंशीं होते ॥ ७७ ॥ [ उत्साद्यन्ते ] ते उत्सादिजतील येहीं । दोषीं कृष्णा जाणयीं । यालागीं वंशाचां ठाईं । वोखटें हें ॥ ७८ ॥ दोषीं धर्म उत्सेदिले । तयां दोषां जेहीं केलें । तेहींचि धर्मु आपुले । नाशिले कीं ना ॥ ७९ ॥ घरींचा माल्हविला दीपु । अंतरीं घालूनि महासर्पु । तैं बालकवधु वंशलोपु । तेणेंचि केला ॥ २७८० ॥ आश्रमा लाविला अग्नि । प्रेत्नें अति प्रेत्न करूनि । तया घातकिया देखोनि । दूरि ठावें ॥ ८१ ॥ माजलेपणें अन्य याती । परणी तेथें होये संतति । तितुलेंही कुळ श्रीपति । येकें नाशिलें ॥८२॥ जैसें येकगोत्री विवाही । पाप करूनि येके देहीं । वोसरले परि नाहीं । पापा खंडण ॥ ८३ ॥ तेथें जालें जें कुळ । तें पतीत सर्व चांडाळ । तिये परंपरे मूळ । तें पूर्व जैसें ॥ ८४ ॥ संताना क्षयो नाथी । आगळीचि वाढे संतति । तें तें पाप तयाप्रति । जडोंचि लागे ॥ ८५ ॥ संतान नित्य नवें नवें । आतां तेणें कैं पां सुटावें । परि तें पाप तैसें नव्हे । जें जाये सरोनि ॥ ८६ ॥ तैसें येक कुळ मारिलें । उरलें तें पतीत केलें । यातिसंकरीं घातलें । ऐसें असतां ॥ ८७ ॥ जैसी ते चाले परंपरा । तैसें पाप विस्तारे श्रीधरा । तें गोत्रघ्ना शरीरा । जडोंचि लागे ॥ ८८ ॥ अधिकाधिक राशी । क्षयो नाहीं पापासि । यापरी नाशूनि वंशासि । नाशती जे ॥ ८९ ॥ तयां कवण गति गोत्रघ्नां । आणि पुढिला संताना । तें मी सांगैन कृष्णा । चित्त देईं ॥ २७९० ( ४३ ) ॥ [ हे जनार्दन ] तूं जनार्दनु जनव्यापकु । जनमायानिवर्तकु । जनभानप्रकाशकु । आदिपुरुषा ॥ ९१ ॥ तुजप्रति काय सांगणें । शद्वाचाचि वास पाहणें । परंतु घेतलें मनें । तें निवेदीन ॥ ९२ ॥ [ उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणाम् ] यातिधर्मु क्रीरु बुडाला । कुलधर्मु जयांचा उत्सेदला । वर्णसंकरु प्रवर्तला । कुळीं जयां या ॥ ९३ ॥ विधिनिषेध पडले विसरीं । जया जे इच्छा तो तें करी । वर्णावर्णाची पाइरी । गेली मोडोनियां ॥ ९४ ॥ बहुभर्तृका सोवासिणी । विधवा नसती नियमेंकरूनि । भक्ष्याभक्ष्य काये

१ च्युत झालीं. २ सहाय्यार्थ धांवणें. ३ आगमन; ओघ.

ह्मणौनि । जाणतीचिना ॥ ९५ ॥ विटाळु कवणाचा मानावा । अमुकाचि आचारु करावा । ऐसा वेवु चालवावा । हें उरलें नाहीं ॥ ९६ ॥ जयांचां कुळीं ऐसें जालें । सर्वही आचारु बुडाले । तयां मनुष्यां घडलें । पुढें काई ॥ ९७ ॥ [ नरके नियतं वासो भवति ] तरि नियमें जाण श्रीधरा । नरकी वासु तयां सर्वेश्वरा । खरा खरा खरा । भर्वसेनि होये ॥ ९८ ॥ पूर्वजु जो कुलघातकी । तो आर्धी वसें नरकीं । पाहे मग स्वपितर कीं । पाठवी पहिलें ॥ ९९ ॥ स्वर्गस्थ आपुलीं पितरें । तीं नरका पाठवूनि समग्रें । मग देहपातानंतरें । आपणुही जाये ॥ २८०० ॥ पितरसहितु नरकीं राहिला । तेथें वंशु पाचारी आपुला । कुळीं धर्मु नाशिला । तो ययाचि हेतू ॥ १ ॥ तेणें कां पाचारावें । लागे तें घडे स्वभावें । यातिसंकरें काये नव्हे । येकलेनि ॥ २ ॥ ह्मणौनि तये कुळीं उपजला । तो नरकाचिप्रति जाता जाला । भला मागु लागला । संतानासि ॥ ३ ॥ इष्ट मित्रु शेजारी । तयांची देखी जो जो धरी । तो तो तयांचिबराबरि । लागे वाटा ॥ ४ ॥ मग येथिंचा शेजारी तो तेथें । यापरी इष्टां मित्रां सुहृदांतें । नरका यावया आइतें । द्वार केलें ॥ ५ ॥ काये पां नरका जाण्हारु । तोचि तेथें जन्मे नरु । सोइरा होये करी शेजारु । देखी अपेक्ष ॥ ६ ॥ महापंथीं आडवाट । नरका जावया प्रकट । केली आपुले इष्ट । पापिष्टे पोषिलें ॥ ७ ॥ ह्मणौनि उत्सन्नकुलधर्मा । मनुष्यातें मेघश्यामा । नरकीं वासु हे आह्मां । कैसेनि ठावें ॥ ८ ॥ [ इति ] तरि ऐसें येणेंचि प्रकारें । धर्माधर्मनिर्णय शास्त्रें । वडिलांचेनि मुखांतरें । हा काळुवरि ॥ ९ ॥ [ अनुशुश्रुम ] आइकिलें असें आह्मीं । विचारु करितां धर्माधर्मी । आणि सर्वज्ञा देवा तुह्मी । कैसें नेणा ॥ २८१० ॥ वेदीं शास्त्रीं पुराणीं । ऐसीचि साधूंची वाणी । हा काळुवरि श्रवणीं । आह्मीं आइकिली ' ॥ ११ ॥ ऐसें अर्जुनाचें वचन । घेतां परमार्थेकरून । कैसें दिसे विवरण । साहित्यमार्गे ॥ १२ ॥ ' गुणीं असतां धर्मलोपु । तोचि वर्णसंकरु पापरूपु । स्वरूपयातीचा संकल्पु । सुटला जेणें ॥ १३ ॥ गुणकारक शुद्ध गुण । तयां स्वरूपस्थां होये च्यवन । यातिसंकरें कृष्णा जाण । ऐसें होईल ॥ १४ ॥ पुनरपि येक आहे । तें भविष्य सांगों काये । श्रीकृष्णा तुझे पाये । सिवोनि सांगें ॥ १५ ॥ वर्णसंकरातें करिते । गुणीं सन्मार्ग जो तया छेदिते । ज्ञानयोगातें नाशिते । ऐसे दोष ॥ १६ ॥ जेहीं दोषीं अकर्म । परिपुष्ट होय विकर्म । ऐसे दोष परम । हिंसारूप ॥ १७ ॥ गुणत्रयां केवळ क्षयो । अभिमानादिकांचा लयो । केलिया अकर्मरूप अव्ययो । महादोषु ॥ १८ ॥ सत्संगु जेणें बरवा । तो समुदाव मारावा । व्यापारु उत्सेदावा । इंद्रियांचा ॥ १९ ॥ ऐसाही येकु दोषु । रजाचा होतां ह्रासु । जडत्वाचा दोष विशेषु । आंगीं जडे ॥ २८२० ॥ अभिमानु मारिला स्वजनु । तो दोषु असाधारणु । आतां प्रवृत्तिनाशु तो आनु । तेणेंचिकरितां ॥ २१ ॥ कर्म भक्ति आणि ज्ञान । धर्म बुडाले प्रवृत्तीवीण । ऐसे दोष दारुण । मीनले असतां ॥ २२ ॥ येहीं काये कीजैल । तेंचि देवा सांगिजैल । वर्णसंकरा जें मूळ । स्वरूपलोपा ॥ २३ ॥ हे कुळघातकी पां लागतील । मग याति धर्म कुल । धर्म सकळ अनादिसिद्ध समूळ । जे कुळीं वर्तते ॥ २४ ॥ तयांचा करितील उत्सेदु । वंशु अवधारीं धर्मांधु । करितील विहितवधु । करूनियां हे ॥ २५ ॥ आतां यातिधर्म ते कवण । कुळधर्म कैसे सनातन । तयांचें सर्व लक्षण । सांगिजैल ॥ २६ ॥ यातिधर्मु तो स्वरूपधर्मु । ऐसा जाणावा नियमु । आतां तत्साधन गुणधर्मु । कुळधर्मु तो तो ॥ २७ ॥ यातिधर्मांचें लक्षणं । संक्षेपेंचि तें सांगैन । चित्त करूनि सावधान । आइकावें श्रोतां ॥ २८ ॥ निर्विकल्पता निर्विकारता । ।नित्य निष्कर्मरूपता । व्योमाचेनि तत्वता । स्वभावें असणें ॥ २९ ॥ अभावाहूनि पातळपण । आंगाचें करावें गगन । ऐसें येक लक्षण । स्वरूप धर्माचें

॥ २८३० ॥ सर्वत्र सर्वदा असंगपण । कासया नलगे जैसें गगन । तैसें देहअवस्थागुणभान । यया न लगणें ॥ ३१ ॥ असंगपणाचेनि अंगें । आपण आपणपणा नलगे । ऐसा यातिधर्मु प्रसंगें । दुजा जाणावा ॥ ३२ ॥ मळातें न धरी जीवन । पावकु आणि जैसें गगन । तैसें आपुलें सोज्वळपण । मळों नेदावें ॥ ३३ ॥ दर्पणाहूनि सोज्वळता । कां झळफळीतु बाळसविता । तोचि अस्तमाना जातां । जैसा निर्मळ ॥ ३४ ॥ शुद्धा स्फटिकाचें अंतर । असे तंव अछिद्र । परि निर्मळपणें सांतर । पोकळ दिसे ॥ ३५ ॥ स्वभावेंचि स्वरूप निर्मळ । आणि गगनाहूनि पूर्ण विशाळ । तैसेंचि निर्मळ निश्चळ । नित्य असणें ॥ ३६ ॥ हा येकु यातिधर्मु । आतां ययाहूनि परमु । तोचि कैसा अति उत्तमु । सांगिजैल ॥ ३७ ॥ मंडळा दीपा रत्नातें । सर्वांगीं ज्योति जैसी वर्ते । तैसेंचि चिद्रूपभान निरुतें । स्थिती असणें ॥ ३८ ॥ जेसणी जैसी संपूर्णता । तेसणी तैसी चिन्मयता । चेतनापूर्णत्वें पूर्णता । तो येक धर्मु ॥ ३९ ॥ जागृतीचेनि संहारें । निद्रा जे व्हेळीं संचरे । तैं सर्वांग सुखें भरे । प्रेत्नेवीण ॥ २८४० ॥ मौळिया पावे अन्न । तैं धरिता न धरे दाटून । देह पडे कारणगण । विरोनि जाती ॥ ४१ ॥ तैं जें सुख सर्वांगीं । संचरे तयालागीं । तैसें प्रेत्नेवीण स्वसंयोगीं । आहे सुख ॥ ४२ ॥ रतीचें मान वोहोटे । बींदु तोही सुटे । मग उगाचि असतां वाटे । जैसें सुख ॥ ४३ ॥ तैसें सहज निर्विकारपणें । विरालेन मनें अभिमानें । सर्वत्र सुखमय पूर्णपणें । असिजे स्थिति ॥ ४४ ॥ ऐशी जे सुखावस्था । ते असावें न सोडितां । आत्मधर्मु तत्वता । हाही एक ॥ ४५ ॥ आतां देहद्वयत्वें नुरणें । मीपणें विरोनि असणें । नाम रूप स्फुरणें । हारपावें स्वरूपीं ॥ ४६ ॥ सागरीं विरे लवण । तें सांडी आंगाचें कठिणपण । मग पाणियामाजी हारपोन । पाणी होये ॥ ४७ ॥ तैसें स्वशक्ति सांडणें । विरोनि मीपणें जाणें । आपणामाजी हारपणें । हा येकु धर्मु ॥ ४८ ॥ नित्य निर्मळ पूर्णपण । माजी गगना नाहीं स्थान । आत्मत्वेंचि सद्रूपभान । स्वरूप जें ॥४९॥ द्वैतबुद्धी पाहतां । व्योमाआड जयाची सत्ता । त्रिपुटीतें तत्वता । विषयो नव्हे ॥२८५०॥ ज्ञेय सर्व अभावे । ज्ञाता ज्ञान अस्तवे । ज्ञातेपण माळवे । ठाइंचे ठाईं ॥५१ ॥ दृश्य हारपण भान । द्रष्टा देखणें लीन । तें विरालिया द्रष्टेपण । आंगेंआंग जें ॥ ५२ ॥ आंगेंचि अभावा खाये । आंगें आंग स्वयंचि आहे । आपण भजिजे तें नोहे । परि आपण खरें ॥ ५३ ॥ ऐसी जे आत्मभावना । तो यातिधर्मु येकु माना । आतां निष्ठारूपु आपणा । तो धर्मु शेवटील ॥५४॥ तेथें सकळां धर्मां सांवरून । असावें निष्ठा करून । तयांचें संक्षेपें लक्षण । सांगिजैल ॥ ५५ ॥ आत्मसद्भावें असणें । आंगाचेनि निबिडपणें । परंतु गगनाचीं विरळपणें । त्याहूनि विरळ ॥ ५६ ॥ येतां संपूर्ण आत्मसत्ता । तेवढी चिन्मयाचि तत्वता । पूर्ण आनंदमयता । तिणेंसीं सहित ॥ ५७ ॥ विरणेंचि पूर्णत्वें उरणें । उरणें तें विरालेपणें । ऐसें उरणें विरस्फुरणें । येकुदांचि असावें ॥ ५८ ॥ असिजे तेंचि निर्मळपण । तेंचि असंगतेचें लक्षण । निर्विकल्प निर्विकारपण । गगना ऐसें ॥५९॥ अवघियां स्वधर्मांचें होणें । ते येकदांचि स्थिति जाणणें । अनुभवी तो येणें । वचनें संतोषैल ॥ २८६० ॥ स्वधर्म जाले उत्पन्न । मग पाठीं स्थितीचें भान । ऐसें इतुलें व्यवधान । तेथ कैंचें ॥ ६१ ॥ जें त्यां स्वधर्मांचें होणें । तेंचि स्थिति तेंचि असणें । तेंचि दशा अनुभवणें । अखंडता तेंचि ॥ ६२ ॥ ऐसियाचें जें नित्यपण । ते निष्ठा जाणती सज्ञान । यातिधर्मांचें लक्षण । इतुलें सांगितलें ॥ ६३ ॥ आतां यये अर्थीं साधन । जयातें आचरती गुण । तया कुलधर्मांचें लक्षण । ऐसें जाणावें ॥ ६४ ॥ विहिता कर्मांचें अनुष्ठान । पाहिजे सत्वशुद्धीलागून । यालागीं आचरण । तें येक कुलधर्मांचें ॥ ६५ ॥ सत्वशुद्धी क्षेत्र शोधलें । परि ज्ञानबीज पाहिजे पेरिलें । तरि ते अर्थी पाउलें । देखावीं सद्गुरूचीं ॥ ६६ ॥ तरि गुरु-

प्रातीलागून । करावें ईश्वराराधन । मग तयाचें प्रसन्नपण । जालें असतां ॥ ६७ ॥ ईश्वरु कृपासागरु । तोचि आदिगुरु होये गुरु । निजभक्ता साक्षात्कारु । आपुला दावी ॥ ६८ ॥ ह्मणोनि ईश्वराराधन । तो येकु कुलधर्म जाणोन । साधक भजती ते सर्वज्ञ । होती तत्प्रसादें ॥ ६९ ॥ भेटलयावरि सद्गुरु । तयाचा जो भजनप्रकारु । तो कुलधर्मु थोरु । साधकांतें ॥ २८७० ॥ भक्तियोगें आराधिला । सद्गुरु प्रसन्नु जाला । तेणें उपदेशु केला । आत्मविद्येचा ॥ ७१ ॥ तीचा ठाईं प्रेम गहन । करावी तीची जतन । यये अर्थी साधन । उपाय जे जे ॥ ७२ ॥ ते कुलधर्मांचे अघवे । जाणतीं साच मानावे । तयांचे भाव कळावे । ऐसें जरि ॥ ७३ ॥ तरि सद्गुरुनाथें निरोपिलें । ज्ञेयतत्व जें प्रकाशिलें । आपण आपणा दाविलें । निर्वाळूनि ॥ ७४ ॥ तद्विरुद्ध जे पदार्थ । आणि तद्विरुद्ध ज्ञान समस्त । तद्विरुद्ध निश्चित । कर्म जें जें ॥ ७५ ॥ ययां तिहींचा त्यागु करणें । तो कुलधर्मु येकु मानणें । आतां त्रिविधें त्यागें तेणें । धर्मु दुसरा ॥ ७६ ॥ तदुनुकूळ जे पदार्थ । तदनुकूळ ज्ञान निश्चित । तदुनुकूळ समस्त । कर्तव्य कर्म ॥ ७७ ॥ तिहींचा अपरित्यागु । प्रेत्नें करावा योगु । कुलधर्मु सांगु । ऐसा दुसरा ॥७८॥ त्याग योग सांगितले । भावभेदें वेगळाले । आतां प्रांजळ जेणें कळे । तेंचि बोलैन ॥ ७९ ॥ शब्दादि विषय जाण । आणि स्थूळ तयांचें अधिष्ठान । एवं आत्मइतर भान । बाह्यांतरीं जें ॥ २८८० ॥ तें प्रतिकूळ ज्ञेय सांडावें । अनुक्रमेंचि निरसावें । आतां हें भान जेणें जाणवे । तें इंद्रियज्ञान ॥ ८१ ॥ आत्मइतरज्ञान इंद्रियांचें । आत्मइतरज्ञान मनाचें । आत्मइतरज्ञान बुद्धीचें । सांडावें तेंही ॥ ८२ ॥ आत्मइतरअर्थसाधन । बाहेरि अंतरीं क्रियास्फुरण । तें तद्विरुद्ध मानून । सर्व सांडावें ॥ ८३ ॥ आतां शब्दादि पांचही विषय । आणि स्थूळ देह हें स्वकीय । अंतरीं अवलंबन ध्येय । भान जें जें ॥८४॥ तें आत्मइतरही केवळ । परंतु घेइजे तदनुकूल । योगाभ्यासातें बळ । जेणें होये ॥ ८५ ॥ बाह्यांतरीं ज्ञेयभान । ययाचें केलें अवलंबन । तया अनुकूळाचें ज्ञान । तें प्रतिकूळ नव्हे ॥ ८६ ॥ अनुकूळ ज्ञेय जें जें । तें जेणें ज्ञानें गमिजे । तें ज्ञान न सांडिजे । साधनरूप ॥ ८७ ॥ बाह्यांतरीं क्रियावृत्ति । प्रवर्तली जे ते अर्थी । ते अनुकूल संतीं । नये सांडूं ॥ ८८ ॥ प्रतिकूल शब्द व्यवहारिक । ते सांडूनियां सकळैक । अध्यात्मश्रवण आवश्यक । आदरें करावें ॥ ८९ ॥ अनुकूळ तरि घ्यावी । प्रतिकूळ स्त्री सांडावी । चहूं आश्रमीं विचारावी । टाकि आपुली ॥ २८९० ॥ वस्त्र तें जें देहरक्षण । शीतवातलज्जावारण । येर प्रतिकूळ मानून । सर्व सांडणें ॥९१॥ शीतोष्ण मृदु कठीण । येथें प्रतिकूलाप्रतिकूळ पाहोन । त्यागात्यागीं प्रवर्तन । सुखें करावें ॥ ९२ ॥ जें घेतां योगु नाशे । तें नेघावें आयासें । नेघतां जें योगु भ्रंशे । तें घ्यावें सुखेंचि ॥ ९३ ॥ याप शब्द स्पर्श दोनी । योगीं दृष्टि घालूनि । अनुकूळ प्रतिकूळ पाहोनि । घ्यावे सांडावे ॥ ९४ ॥ बाह्यरूपाचें अवलंबन । प्रतिकूळ तें सांडून । साधू गुरु देव दर्शन । तयाचें घ्यावें ॥ ९५ ॥ षड्रसा अन्नाची परवडी । सांडावी जिव्हेची आवडि । तेथें देहरक्षणमात्र पुडी । तेचि करावी ॥ ९६ ॥ लघु अन्न लघु आहारु । कालनियमु तोचि साचारु । योगातें साहे प्रकारु । तोचि योजावा ॥ ९७ ॥ प्रहरा येका अन्न । पावे आपुलें स्वस्थान । दुसरेन पाहारें पचन । होतें होये ॥ ९८ ॥ तिसरेन तृषा निवारती । धातुसत्वें निवडती । चौथेन विभागती । मळ मूत्र दोन्ही ॥ ९९ ॥ पांचवेन मूत्र झडे । मळ होती कोरडे । सावेन मळभागु पडे । स्थाना येऊनि ॥ २९०० ॥ वातें मळ ऊर्ध्व जाले । ते सातवेन प्रहरें पडले । वायोनें अधोमुख केलें । ऐसें असतां ॥ १ ॥ आठवेन शेष मळ झडती । क्षुधेची होये उत्पत्ति । ह्मणोनि काळ चुकों नेदिती । योगी अन्नाचा ॥ २ ॥ अन्नाचिपाडें उदक केवळ । निरामय अन्न तें निर्मळ । आतां योगियां परिमळ ।

ग्राह्याग्राह्य ॥ ३ ॥ जया दुर्गंधाकरितां । अथवा सुगंधु हो तत्वतां । योगु भंगे तो सर्वथा । गंधु नेघावा ॥ ४ ॥ जेणें गंधेवीण । योगीं न राहे आसन । तोचि गंधु दाट्न । प्रेत्नें साधावा ॥ ५ ॥ जेणें परिग्रहें परिवारें । योगाचा योगु मरे । तो परिग्रहो चतुरें । तेव्हांचि सांडावा ॥ ६ ॥ जेणें परिग्रहेवीण । योगावरि न ये मन । तया परिग्रहाची जतन । करावीचि कीं ॥ ७ ॥ देह स्थूळ हें उपेक्षावें । उपेक्षूनि योगार्थ ठेवावें । जाणों पहिलें नव्हे नवें । ऐसें करूनि ॥८॥ देहभाव देहासक्ति । देहचेष्टा ज्ञानवृत्ति । साधक बाधक चित्तीं । पाहोनियां ॥ ९ ॥ घेणें सांडणें देहभावां । जाणें येणें यादवा । अवस्थाबोधु विचारावा । वर्तावें तैसें ॥ २९१० ॥ आली निद्रा हारावी । नाहीं निद्रा न प्रार्थावी । पावली तेचि मानावी । क्षुधा तृषा ॥११॥ टाके तेंचि आसन । टाके तेंचि व्यवधान । हें आपुलें साधन । आपणचि जाणावें ॥१२॥ बाह्यविषयांचेनि अध्यासें । अंतरीं भान मना भासे । तें तद्विरुद्ध ऐसें । जाणोनियां॥१३॥ आत्मइतर सांडावें । आत्मविक्षेपक अघवें । तयामाजी ध्यावें । अनुकूळ जें ॥ १४ ॥ मनोजयालागून । जें ध्येय कीजे अवलंबन । देवाचें रूप सगुण । आदिकरूनी ॥ १५ ॥ अवलंबनचि परी । तें घेइंजे योगावारीं । येणें मन अंतरीं । स्थिर राहे ॥ १६ ॥ आत्मइतर ज्ञेयभान । दृश्याचें जें अवलंबन । तयाचा त्यागु आदान । प्रकारें येणें ॥ १७ ॥ आतां बाह्यांतरीं स्फुरे ज्ञान । तेथें त्याज्यात्याज्य कवण । तया ज्ञानाचें लक्षण । सांगिजैल ॥ १८ ॥ सद्गुरुनाथें उपपादिलें । ज्ञेयस्वरूप प्रगट केलें । तन्निष्ठ ज्ञान तें भलें । निर्मळ ज्ञान ॥ १९ ॥ तदर्थ साधनभूत । बाह्यज्ञान जें समस्त । तें न संडावें निश्चित । भर्वसेन ॥ २९२० ॥ प्रत्यक्षबोधु दृष्टांतें । अनुमानें जाणिजे ज्ञेय तें । विचारावीं समस्तें । उपमानें तीं ॥ २१ ॥ अध्यात्मकथाश्रवण । ना कर्म उपासना पक्षीं ज्ञान । तेंहीं अवघें साधन । ह्मणोनि न सांडावें ॥२२॥ श्रवण मनन निदिध्यासु । येथें उपेगी ज्ञान विशेषु । आत्मा अजु अविनाशु । कळे जेणें ॥२३॥ मनबुद्धिकरणद्वारा । ज्ञानप्रकाशु आंतु बाहिरा । उपयोगी आत्मसाक्षात्कारा । न सांडावा तो ॥ २४ ॥ आत्मविक्षेपक जें ज्ञान । आत्मलोपाचें कारण । आत्मज्ञानें उत्पन्न । तें ज्ञान सांडावें ॥ २५ ॥ नाना विद्या नाना कळा । उदरार्थेंचि ज्या सकळा । अभिमाना दंभा प्रबळा । सदा प्रसवती ॥ २६ ॥ तें सांडावें सकळ ज्ञान । मना बुद्धी इंद्रियांपासून । जया ज्ञानाचें विस्मरण । सानुकूळ योगा ॥ २७ ॥ विषयज्ञानही परी । आत्मज्ञाना पुष्टि करी । तें अनुकूळ सर्वोपरी । घेइंजे ज्ञान ॥ २८ ॥ ब्रह्मज्ञानाचिया गोष्टी । त्याविषयवासनेतें पुष्टि । करिती उदरासाठीं । तें ज्ञान सांडावें ॥ २९ ॥ अधिष्ठानज्ञानाची जतन । आपण विचारावी अवजतन । येथें काये सांगावें दुजेन । यये अर्थी ॥ २९३० ॥ करणद्वारा तेंचि कीजे । आत्मयोगा उपयोगी जें । येर स[illegible] सांडिजे । विषयसाधन ॥ ३१ ॥ कर्मयोगु भक्तियोगु । येकांतसेवन अभ्यासयोगु । जयो अंतरंगु बहिरंगु । नित्य करावा ॥ ३२ ॥ क्षुधा तृषा आसन निद्रा । प्राणपिंडु दृष्टीची मुद्रा । जयो करावा यां समग्रा । मंदु मंदु ॥३३॥ ययावेगळें व्यापारादिक । निषिद्ध अथवा कामिक । अकर्मही परि आणिक । करूं नये ॥ ३४ ॥ मनें मन तें जिंकावें । ध्यान मनन नित्य करावें । येर संकल्प सांडावें । सार्वकाळ ॥ ३५ ॥ बाह्य निश्चळता करणदमु । अंतर्निश्चळता मनें तो शमु । ऐसा हा योगागमु । जेणें कर्में ॥ ३६ ॥ साधे तेंचि करावें । बुडे जेणें तें न करावें । हें आपुलें आपणा जाणवें । परि नेणवे इतरा ॥ ३७ ॥ व्यतिरेकें निवडणें गुणीं । अन्वयें ते गुण ग्रासूनि । स्वस्थ असणें करणी । हेचि बुद्धिची ॥ ३८ ॥ सारासारविचारें । ऐसी क्रियाबुद्धि स्फुरे । तेचि करावी चतुरें । निष्ठेलागीं ॥ ३९ ॥ ययावेगळी विचारणा । ते ग्राह्य नव्हे आपणा । सांडावी वासना । तिये जाणिवेची ॥ २९४० ॥ पदार्थु कर्म आणि ज्ञान । अनुकूळ प्रति-

कूळ जाणोन । घेणें सांडणें आपण । आपुलें करावें ॥ ४१ ॥ ऐसें कुलधर्म सांगितले । ते संक्षेपेंचिमात्र इतुले । ययांचा अंतु न कळे । ऐसे असती ॥ ४२ ॥ ऐसे यातिधर्म समूळ । आणि कुलधर्म हे सकळ । गुणचि ययांचें स्थळ । पारि गुणातित नव्हे ॥ ४३ ॥ गुणातीता शुद्धातें । दोहीं धर्मी संगु न वर्ते । हें अनादिसिद्ध गुणातें । शाश्वत कार्य ॥ ४४ ॥ गुणीं धर्म हे सनातन । बहुत काळ वर्तमान । जेंहीकरूनि संतान । पवित्र गुणांचें ॥ ४५ ॥ आतां तेही दोषीं कृष्णा । लागोनि तया कुळघ्ना गुणां । यया धर्मा सनातना । नाशिजैल ॥ ४६ ॥ योगधर्माचेनि ह्रासें । स्वरूपधर्मही न प्रकाशे । मग देहात्मभावउल्हासें । वर्तती गुण ॥ ४७ ॥ दोषीं धर्म लोपले । गा इतुलेनि काये जालें । ऐसें जनार्दनें गोपाळें । ह्मणिजैल जरी ॥ ४८ ॥ तरि अवधारीं गा श्रीरमणा । वासुदेवा जनार्दना । यये अर्थी संभावना । कैसी भासे ॥ ४९ ॥ जया गुणांचां ठाईं ।ययां मनुष्यांचां देहीं । स्वरूपधर्मु योगधर्मु नाहीं । अणुमात्रुही ॥ २९५० ॥ कर्म भक्ति ना योगनिष्ठा । विवेकुचि वैरी उपराठा । मार्गु सांडूनि अव्हांटा । घाली मनातें ॥ ५१ ॥ करी तें दुष्कृत क्रियमाण । भक्षी तें भलयतें अन्न । वर्णा आश्रमाची जतन । सांडिली जेहीं ॥ ५२ ॥ मोकाट वनचरापरी । मनुष्य जे कामचारी । जयांचां गुणव्यापारीं । सांडिली सोये ॥ ५३ ॥ तयां नरकीं वासु निरंतरु । नरकु तोचि जो संसारु । तयां मोक्षाचा पदरु । सांपडेचिना ॥ ५४ ॥ नाना योनि भ्रमती । मनुष्यदेहाची नव्हे प्राप्ति । मा स्वर्गु मोक्षु हे उक्ति । काय बोलावी ॥ ५५ ॥ योगमुक्त जो नरु । तयातें नित्य संसारु । ऐसा आह्मीं विचारु । बहुसालु आइकिला ॥ ५६ ॥ साधुकारी होये साधू । पापकारी पापी बद्धु । ऐसें बोले यजुर्वेदु । बृहदारण्यीं ॥ ५७ ॥ अयोगयुक्त जो नरु । तया नरकयुक्त संसारु । नाहीं ऐसा आधारु । कवणा शास्त्राचा ॥ ५८ ॥ यालागीं श्रुति स्मृति पुराणें । आर्ये आचार्यवचनें । महर्षींचें बोलणें । हेंचि आइकिलें ॥ ५९ ॥ तें सर्वथा नव्हे अप्रमाण । तरि उत्सन्नयोगधर्म जे गुण । नरकु संसारु तयांलागून । नियमलाचि असे ' ॥ २९६० ( ४४ ) ॥ [ अहो ] इतुलें बोलोनि अर्जुनु । आपणपयां जाला सावधानु । तो अहो येणें आश्चर्येंकरूनि । काये बोले ॥ ६१ ॥ [ बत ] ' कटकटा मातें काये जालें । धिग् धिग् माझें जालें ' । अति कष्टी होऊनि बोले । दीर्घें श्वासें ॥ ६२ ॥ दांतीं चावूनि तर्जनी । नयनांतें आणूनि पाणी । पदरु लावूनि वदनीं । हातु ठेवी ॥ ६३ ॥ [ महत्पापम् ] ' गुरुहत्या गोत्रहत्या । पुत्रहत्या पौत्रहत्या । इष्टहत्या मित्रहत्या । हत्या सुहृदांची ॥ ६४ ॥ ब्रह्महत्या वीरहत्या । येणेंचि योगें मातृहत्या । पितृहत्या स्त्रीहत्या । आत्महत्याही घडती ॥ ६५ ॥ ऐसें पाप असाधारण । गणावया शके कवण । ब्रह्मांडीं नाहीं स्थान । जें ठेवावया ॥ ६६ ॥ दुस्तरा दुर्धरा दुर्गमातें । दुष्टा दुर्निमित्या दुःखदातें । असाधारण पापातें । यये काळीं ॥ ६७ ॥ [ कर्तुं व्यवसिता वयम् ] आह्मीं प्रवर्तलों करावया । अनर्थु अनर्थु ह्मणौनियां । विस्मयो करी आपुलिया । मनामाझारी ॥ ६८ ॥ गिळितां विष परतलें । तैसें लागत आंगा चुकलें । तें पाप येणें काळें । कैसें कवण ॥ ६९ ॥ [ यत्स्वजनं हन्तुमुद्यताः ] तरि स्वजन जे आपुले । यया संग्रामाप्रति आले । ते मारावया जे केले । आह्मीं प्रेत्न ॥ २९७० ॥ तेंचि पाप भयंकर । आमुचें कर्म थोर । ऐसें घडावया साचार । हेतु कवण ॥ ७१ ॥ [ राज्यसुखलोभेन ] तरि लोभें राज्यसुखाचेनि । आठवलें हे आह्मांलागूनि । देवदेवा चक्रपाणी । कैसें घडलें ॥ ७२॥ पोटाचिया काकूळती । पोटींचीं बाळें खाती । तेचि दशा आह्मांप्रति । पावली कीं ॥ ७३ ॥ सर्प व्याघ्र कीं मार्जार । आह्मीं तव न हों नर । येवढें दुरित अपार । करूं प्रवर्तलों ॥ ७४ ॥ जळो हें राज्य जळो सुख । जळो तो लोभु जळो मुख । सर्व

मिथ्या क्षणिक । स्वप्नापरी ॥ ७५ ॥ ययासाठीं येसणें । दुरित कासया करणें । आतां दृढु विचारु मनें । करूं येकु ॥ ७६ ( ४५ ) ॥

## दासोपंत—" गीतार्थबोधचंद्रिका "

वर्णसंकराचे कर्ते । ऐसे दोष जे हे निरुते । येहीं काय केलें कैसें तें । अवधारा पां ॥४९॥ जातिधर्म आणि कुलधर्म । कुलघ्नांचे आचार नियम । ते अवघेचि निःसीम । सनातन जे ॥ २५० ॥ बहुत काळ कुळीं चालिले । ते एकदाचि अवघे उत्सेदिले । पापें येणें नाशिलें । विहिताचार ॥ ५१ (४३)॥ जयजयाजी श्रीपती । नमो तूतें गोपीपती । जनार्दना कृष्णा विनती । अवधारीं पां ॥ ५२ ॥ जेहीं निजकुळ बुडविलें । कुलधर्म जेहीं उत्सेदिले । तया मनुष्या काये जालें । तयाचें फळ ॥ ५३ ॥ नरकपदीं वासु होये । ऐसा नियमु सत्य आहे । तो अनारिसा नोहे । ह्मणौनिया ॥५४॥ ह्मणौनि कुलधर्मविनाशकां । महा पापियां लोकां । नरकीं वासु नाहीं शंका । होये स्वभावें ॥ ५५ ॥ वेदीं शास्त्रीं पुराणीं । आणि धर्मज्ञाचा वचनीं । आह्मी आपुलां श्रवणीं । आइकिलें होतें ॥ ५६ (४४) ॥ कृष्णा आश्चर्य परि हें केसणें । अपूर्व ऐसें दुसरें नेणें । हित ह्मणौन अहित साधणें । नाना आयासीं ॥५७॥ ना हें धिग् धिग् जिणें । कटकटा दुरित केसणें । मोलें विनाशु आराधणें । तैसें जालें ॥ ५८ ॥ महत्पातक दारुण । आह्मी तें करावयालागून । कैसे विचारूनि प्रयत्न । साधनीं प्रवर्तलों ' ॥५९॥ आतां ते पाप कवण । ऐसा आक्षेपु सूचि मन । तंव परिहाराचें वचन । अर्जुनु बोले ॥ २६० ॥ ' जें राज्यसुखलोभेंकरून । मारावया उदुजलों स्वजन । यया पापासमान । पाप नसे दुजें ॥ ६१ ॥ अनर्थु चुकला हा घडतां । विस्मयो वाटे चित्ता । अपराधु क्षमा करी अनंता । देवाधिदेवा ॥ ६२ (४५) ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

स्वजातीस उचित कर्म । त्या जोडें शाश्वत धर्म । ज्या धर्में शाश्वत ब्रह्म । मानवदेहीं पाविजे ॥ ६४ ॥ ऐसे परंपरागत । जातिधर्म आणि धर्म शाश्वत । त्यांचा उच्छेद होतो निश्चित । दोषीं ऐशा कुलघ्नांच्या ॥ ६५ ॥ कुलांची हत्या करणार । ज्यांच्या दोषें वर्णसंकर । सकळां अनर्थास ऐसे नर । हेतु होती ॥ ६६ ॥ परम धर्माची हानी । या कुलहत्येनें ह्मणोनी । ऐसा अनुतप्त होउनी । पूर्वीं बोलिला ॥६७॥ ऐशा सद्धर्माचा लोप । करूनि हें कुलहत्येचें पाप । शेवटीं दे परम संताप ' । ऐसें अर्जुन बोलतो ॥ ६८ (४३) ॥ ' ज्या धर्मीं जोडे ब्रह्म । ते विछिन्न होतां कुलधर्म । मोक्षप्रद मनुष्यजन्म । नरका साधन होतसे ॥ ६९ ॥ शाश्वत सनातन जे कुलधर्म । ते विछिन्न होतां कैचें ब्रह्म । उफराटा उपजोनि भ्रम । नियतें नरक मनुष्यास ॥३७०॥ ऐसें आह्मीं आइकिलें । आणि हें काय आरंभिलें ' । ह्मणोनि अर्जुनाचें मन क्षोभलें । त्या क्षोभें आतां बोलतो ॥ ७१ (४४) ॥ ' अहाहा नवल अद्भुत । कीं आह्मी कळत कळत । प्रवर्तलों निश्चित । हें महत्पाप करावया ॥ ७२ ॥ जें राज्यलोभेंकरूनि । कवचें घालूनि शस्त्रें धरूनि । सिद्ध जालों कीं स्वजन मारूनि । राज्य करूं ' ॥ ७३ ॥ अनुतप्त अंतःकरणें । आतां आपण जें काय करणें । तें बोलतो परम करुणें । कुंतीसुत ॥ ७४ (४५) ॥

१ थंद. २ खचित. ३ पश्चाताप झालेल्या.

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

कुलघ्नासि जाले दोष । वर्णसंकरकर्ते अशेष । तेहीं नाशती विशेष । जातिधर्म आणि कुळधर्म ॥ ४ ॥ ते धर्म ह्मणाल कैसे । जे परंपरा प्राप्त ऐसे । ते येही दोषीं आपैसे । नाशतीच ॥ ५ ॥ नाशले ज्यांचे कुळधर्म । जनार्दना ते मनुष्य अधर्म । त्यांसि नरक होती महाभीम । ऐसें ऐकों श्रुतिस्मृतीसीं ॥ ६ ॥ पाप तरि सदा करिती । पापा प्रायश्चित्ता नाचरती । पश्चात्तापु नाहीं ज्यांचां चित्तीं । ते सर्व नरकीं ॥ ७ ॥ ऐसें स्मृतींचें वचन । बोलिला तापलयान मनें । पुढें बोलेल जें अर्जुन । तें परिसावें ॥ ८ ॥ अहो कां आह्मी महापातक । करावया उदेलो सम्यक । जें राज्यलोभें मानून सुख । स्वजनातें ॥ ९ ॥ मारावया प्रवर्तलो आह्मी । या कौरवांसी रणभूमी । ऐसिये अन्यायी अधर्मी । आतां ॥ ११० ॥

## निवृत्तिदेव

दोष होती कुळघातें । वर्णसंकरातें पावती समस्तें । उच्छेदलया जाती धर्मातें । नाशु पाविजे ॥ ४३ ॥ उच्छेदिलिया कुळधर्मु । मनुष्याचें जनार्दन नामु । तया नरक होती अधर्मु । तेथें उसंत नाहीं ॥४४॥ अहो महापातक करणें । राज्यलोभाकारणें । हतावें बंधुवर्गाचीं प्राणें । हे श्रुति वर्जियेलें ॥ ४५ ॥

## उद्धवचिद्घन

सवाई:—

दोष विशेष तया कुळघातकियास अशास कुलघ्न ह्मणावा ।
कारण जो वरुणा शिवशंकर तो नर पापपुरूष गणावा ॥
जातिच स्वार्थहि बुडविला आणि तो कुळधर्महि नाहिंच ठावा ।
शाश्वत धर्म उलंघुनि सर्वहि फार अधर्म करीत उठावा ॥ ४३ ॥
सांडुनि लौकिक धर्म अणी कुळधर्महि सोडुनि दे अनयासें ।
जातिस्वधर्महि सांडुनियां भलतेच अधर्म करीत प्रयासें ॥
तो करि वास महानरकीं श्रम दुर्घट पावत पापप्रकाशें ।
हे मुरुमर्दन कृष्ण जनार्दन सांग सविस्तर संशय नासे ॥ ४४ ॥
पाप महत् करणार असे आह्मि जातिकुळाधम नष्ट अधर्मी ।
राजसुखादिक लोभचि मानुनि झालों प्रवर्तक संगरकर्मी ॥
स्वोजन मारुनि आठवणें कुळ निर्मुळवंश कसा परधर्मी ।
भ्रष्ट कुलस्त्रिया होतिल यावरि कोण प्रसिद्धिहि क्षत्रियधर्मी ॥ ४५ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

कुळासि नासिती जे पुरुष । त्यांतें संकरकर्ते लाभती दोष । ते उच्छेदिती जातिधर्म विशेष । कुलधर्म शाश्वत निर्दोष जे ॥ ९२ ॥ उत्सन्न जालिया कुलधर्म । मनुष्याचे जनार्दना उत्तम । नरकीं वास घडे त्यासि निभ्रम । आह्मी अनुक्रमें ऐकतों ऐसें ॥ ९३ ॥ अहो हें महत्पातक । कराया उदित आह्मी निःशंक । या राज्यलोभें स्वजनलोक । वधावया सम्यक् प्रवर्तलों ॥ ९४ ॥ कटकटा हें महा अनुचित । कैंवि स्वआप्तांचा कीजे घात । याहूनि निष्ठुरता अत्यंत । नाहीं, हात नुचली आतां ॥ ९५ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

ऐसे कुळघ्नाचे दोष थोर । तेणें होईल वर्णसंकर । बुडेल कुळधर्माचा आचार । होईल संहार जातिधर्माचा ॥ ६४ ॥ ज्याच्या कुळधर्माचा जाला नाश । त्याचा अघोरीं होईल वास । ऐसें म्यां ऐकिलें जगन्निवास । ह्मणोनि युद्धास न करींच मी ॥ ६५ ॥ हेंचि आश्चर्य आहे चक्रपाणि । राज्यसुखाच्या लोभेंकरूनि । स्वसुख इच्छितों स्वजनातें मारूनि । हेंचि मजलागोनि पाप जालें ॥ ६६ ॥

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

स्वागताः— जे कुळघ्न बहु दोष तयासी । वर्णसंकर घडे कुळनासी ॥
जातिधर्म कुळधर्म समस्त । पावती यदुपती तरि अस्त ॥ ४५ ॥
उपजातिः— निर्मूळ केलें कुळधर्म पाही । जनार्दना ज्या कुळनाशकांहीं ॥
उघोन दे दुर्गति पै तयांसी । शिक्षा भल्याची मज साच ऐसी ॥ ४६ ॥
टाका महादोष करावया हा । उद्योग आह्मी रचिला अहाहा ॥
धरूनियां राज्यसुखस्पृहेतें । वधावया सिद्ध असे कुळातें ॥ ४७ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी"

ह्मणोनी कुलघ्नाचे दोष थोर । तेणें होय वर्णसंकर । बुडे कुळधर्म आचार । जातिधर्म तेही ॥ ४३ ॥ अधर्म झालियावरी । नरकी वास अघोरीं । हें आयकें श्रीहरी । स्वामी जनार्दना ॥ ४४ ॥ हें तंव आश्चर्य थोर । राज्यलोभें दोषकर । स्वजन मारूनि सुखकर । इच्छितों जी श्रीकृष्णा ॥ ४५ ॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः— त्या दोषें त्यां मग । कुलघ्नांचे खग । उडवितां अंग । टिकों नेदी ॥
सर्व संकरसे । अनंता होतसे । माजी कां न दिसे । सार्थक जी ॥
बुडे जातिधर्म । कुळ वर्णआश्रम । नुरे जेथें नाम । आचाराचें ॥
कुळधर्म खरे । सांगों मी किती रे । तुका ह्मणे सारे । खरें बुडती ॥ ४१ ॥
गेले ज्याचे धर्म । अधर्म हे शेष । काय त्या विशेष । धर्म सांगूं ॥
मनुष्याचें हित । जनार्दना स्थित । होतें विस्कळीत । पापयोगें ॥
नरकीं निश्चय । वास त्याचा होय । उद्धार न जाय । जयापासीं ॥
तया गति ऐसी । ऐकतों प्रवासी । नको दशा तैसी । तुका ह्मणे ॥ ४२ ॥
महापापी पुरे । आचरण खरें । त्रिभुवन विसरे । जयालागीं ॥
कटकटा वोखटी । बुद्धि हे नकटी । आह्मी निश्चया पाठीं । जिव्हा बैसों ॥
कीं या राज्यलोभा । टाळूं पुण्यस्तंभा । स्वजन वधारंभा । प्रवर्तलों ॥
तुका ह्मणे क्रोध । आलिया शिरच्छेद । कीजे परी वेळ । नको ऐसी ॥ ४३ ॥

मजला । पुढें आहे ॥८२॥ येकुदा न चुके मरावें । मृत्तिके शरीर द्यावें । मी वडिलां न समर्पावें । हें काये ह्मणिजे ॥ ८३ ॥ जीतां विष्ठा मेलिया कीट । भक्षिती वायस पापिष्ट । श्वानां जंबुकां इष्ट । मांस करावें ॥ ८४ ॥ तें माझेनि एके वधें । माझें गोत्र सुखें नांदे । ऐसें झालें तैं येणें संबंधें । उपकारु केसणा ॥ ८५ ॥ अवलोकितां गुरुचरण । याचेन हातें मरण । तरि आतां स्वर्गभुवन । सर्व माझें ॥ ८६ ॥ देह समर्पीन वडिलांतें । इतुलेन भजन खरें निरुतें । मरतां तयांचेन हातें । द्विगुणा जालें ॥ ८७ ॥ नाशवंत शरीर वेंचीन । अविनाश स्वर्ग पावैन । येणें लोभु तरि मरण । तैंचि पाहिजे ॥ ८८ ॥ याचेनि हातें मी मेला । तरि माझा अपवादु चुकला । अर्जुनु ह्मणती भला । लोकत्रयीं ॥ ८९ ॥ इहलोकीं कीर्ति विस्तारून । परलोकु रोकडा पावैन । तरि यये रणीं मरण । तेंचि साधावें ॥ २९९० ॥ इहपरलोकविरोधी । मेलिया मी नव्हे कधीं । तरि मरणालागीं बुद्धि । विचारावी ॥९१॥ घालूनि बैसावें सिद्धासन । लावावे दोन्ही नयन । हातींचे धनुष्यबाण । दूरि टाकावे ॥ ९२ ॥ अंतरीं ध्यान ईश्वराचें । सखया सारथिया कृष्णाचें । बाहेरि देह कौरवांचें । करूनि सोडावें ॥ ९३ ॥ मरतां न यावें काकुळती । आल्हादु असावा चित्तीं । मरणापुढें उत्तम गति । तेचि लक्षावी ॥ ९४ ॥ पाप होतां चुकलें । येणेंचि आनंदें चित्त भरले । असतां शिरकमळ उडालें । ऐसें होआवें ' ॥ ९५ ॥ ऐसें विचारूनि मानसीं । आदरिली क्रिया तैसी । अर्जुनु प्रार्थी मरणासि । कौरवांचेनि हातें ॥ ९६ ॥ ऐसें अर्जुनाचें करणें । परमार्थवंतीं कैसें जाणणें । तेंचि साहित्याचीं वचनें । बोलिजतील ॥ ९७ ॥ शुद्ध ' त्वं ' पदार्थु अर्जुनु । वर्तमाना स्थिती सावधानु । गुणप्रधानु आपणु । काये करिता जाला ॥९८॥ 'अहो' ह्मणौनि आश्चर्यें । मनींचि विचारिता होये । आपणपयांचि गुजाये । दुजेनवीण ॥ ९९ ॥ ' अहो पहा हो कटकटा । अनर्थु चुकला हा मोठा । धिग् धिग् अदृष्टा । कैसें वोडवलेंसि ॥ ३००० ॥ कर्माकरण महापाप । जडत्व केवळ दुःखरूप । सकळां वृत्तींचे लोप । ऐसिया ताटस्थ्यांतें ॥ १ ॥ केवळ करावयाकारणें । देहें इंद्रियें बुद्धी मनें । आह्मीं प्रवर्तलो कीं काळें येणें । परम अन्यायीं ' ॥ २ ॥ आतां तें प्रवर्तणें कैसें । अर्जुनचि बोलतु असे । ' पापीं प्रवर्तन तें ऐसें ' । अवधारा ह्मणे ॥३॥ ' राज्यसुखलोभेंकरून । मारावया उदैजलों स्वजन । ऐसें दुष्ट आचरण । तें महापाप ॥ ४ ॥ करूनि गुणांची सर्व शांति । आह्मीं अनुभवून स्वस्थिति । आनंदमयी पूर्णशक्ति । पदवी साम्राज्याची ॥ ५ ॥ राज्यसुखाचेनि लोभें । निष्ठासुखाचेनि लाभें । स्वजन मारावया उभे । स्वगुणध्वंसा ॥ ६ ॥ स्वगुणभावें कें प्रवृत्ति । प्रवृत्यभावें क्रियावृत्ति । क्रिया नाशतांचि नाथी । साधननिष्ठा ॥ ७ ॥ साधनें सत्त्वशुद्धि घटे । साधनेंचि सद्गुरु भेटे । साधनेंचि कृपा प्रगटे । गुरू ईश्वराची ॥ ८ ॥ साधनेवीण उपदेशु । तयाचा नव्हे प्रकाशु । ह्मणोनि उपायेंचि ज्ञानांशु । प्रकाशे देहीं ॥ ९ ॥ उपायें योगु उपायें ज्ञान । उपायेंचि आंवरिजे मन । उपायें निश्चळपण । तयातें होय ॥ ३०१० ॥ समाधिस्थितिदशा । उपायेंचि फळे पुरुषा । उपाव तोचि आशा । पुरवी स्वराज्याची ॥ ११ ॥ उपायेवीण पदप्राप्ति । तैं पाषाण ते कां न तरती । निद्रेचिमाजी स्वस्थिति । लागतीना ॥ १२ ॥ उपायेविण खुण । अनुभवाची ते अप्रमाण । उपायें चित्तीची जतन । नित्यता राखावी ॥ १३ ॥ अकर्म जयातें बोलिजे । उपायेंचि तेंही पाविजे । अकर्मीचि नित्य असिजे । उपायाधारें ॥ १४ ॥ उपायेंचि उपाव करावा । उपायेंचि उपाव सांडावा । निर्विकल्पु बोधु ह्मणावा । तोही उपायें ॥ १५ ॥ उपायेवीण कांहीं नाहीं । संसारीं अथवा मोक्षविषयीं । तो उपाव आपुलां ठायीं । नित्य असावा कीं ॥ १६ ॥ तया उपायाचें उत्सेदन । येणें स्वगुणनिरासेकरून । आह्मी करावयालागून । प्रवृत्ति करूं ॥ १७ ॥ उपायशून्या कैंचा मोक्ष । उपाय-

शून्यु अदक्षु । कर्माकरणाचा पक्षु । पाप भारी ॥ १८ ॥ कर्माकरणें न सवे । वरि विहितीं आदरु न संभवे । सांडिजे कर्तव्यचि जैं अघवें । तुच्छ करूनि ॥ १९ ॥ तैं न टाकतेन स्वकर्मे । न चलतेन अकर्मे । विकर्मे पापें दुर्गमें । तींचि करावीं कीं ॥ ३०२० ॥ ह्मणौनि हें पापारंभण । आह्मीं आदरिलें दाट्न । आतां असो तें येथून । येक करणें ॥ २१ ॥ स्वगुणनाशाचे जे प्रेत्न । सांडावे आतांपासून । गुणीं वृत्तींचें दमन । करूंचि नये ॥ २२ ॥ जेणें योगें गुण छेदती । नेघावें तें शस्त्र हातीं । हट धनुष तें कीं आती । दूरि सांडावें ॥ २३ ॥ प्रवृत्ति सांग बाण । तयांचें करावें चूर्ण । निग्रहो वेगु संधान । पाप सांडावें ॥ २४ ॥ मौनमुद्रेचीं मांडणीं । ययातें घालूनि पाणी । अनादरु गुणांचा अमरणीं । कैसा ठेवावा ॥२५॥ शरीरें विहित वैदिक । कर्म नित्य नैमित्तिक । करावेंचि प्रीतिपूर्वक । वर्णे आश्रमें ॥२६॥ इंद्रियस्थानीं देवभजन । कर्माविरुद्ध संपादून । गुरूचें नित्य सेवन । योगाचा अभ्यासु ॥ २७ ॥ मनें करावें मनन । मनोजयो मूर्तिध्यान । व्यापार करूनि क्षीण । रमावें स्थिती ॥ २८ ॥ बुद्धी नित्यानित्य विचारणा । अनित्या निरसूनि अनात्मभाना । नित्या अनात्मया निर्गुणा । जाणावें तद्व्यतिरेकें ॥२९॥ अन्वयें सर्वत्र अभेदु । जाणोनि वाढवावा अद्वयबोधु । गुणेंसीसहितु निर्गुणवादु । संपादावा ॥३०३०॥ यया उपायांतें लक्षून । उपायकारण जे गुण । तयांचा लयो उत्सेदु मरण । न पाहे श्रेष्ठ ॥ ३१ ॥ अकर्मकरणीं नेत्र लावणें । कर्मकरणीं सावधान असणें । वृत्तिच्छेदीं न प्रवर्तणे । प्रवर्तणें तद्वर्जनीं ॥३२॥ स्वभावाचा न करणें छेदु । ऐसा असे ह्या मतवादु । ययाचेनि अंगें बोधु । साधनांचा ॥ ३३ ॥ ऐसा मी असतां येणें वेषें । स्वभावगुण पूर्वाध्यासें । लयविक्षेपु हें असे । शस्त्र जयां हातीं ॥ ३४ ॥ देहधर्मांचीं खड्गें । बहिर्मुखतेचेनि आगें । विषयवृत्ती बाण वेगें । घालीत येतील ॥ ३५ ॥ ते मज यये क्षेत्ररणीं । पाडिती देहावरि ह्मणोनि । तरि तेणें मरणेंकरूनि । क्षेमचि मातें ॥ ३६ ॥ क्षुधा लागली जिव्हारीं । पडलों येऊनि देहावरी । तरि हिंडैन दारोदारीं । तें विक्षेपु मरण ॥ ३७ ॥ तेणें क्षुधानिवृत्ति होईल । देह स्वस्थ योगीं राहील । इतुकेन माझें कार्य सुफळ । सत्य जालें कीं ॥३८॥ तृषेचां फडकारीं उलंडला । देहावरि लयस्थु पडिला । तऱ्ही हितांशुचि आपुला । देहरक्षणें तेणें ॥ ३९ ॥ भयाचा तोमरु वाजेल । तेणें स्थितिस्थ प्राण जातील । देहावरी गळतील । अवेव माझे ॥ ३०४० ॥ तरी अभय पावैन स्थान । तेंचि हिताचें कारण । पतनाचेंचि निवारण । तेणें होईल ॥ ४१ ॥ निद्राखड्गें निवटला । क्षेत्रीं रणीं मूर्धा पडिला । तेणें निष्ठायोगु खरा जाला । क्षणा एका ॥४२॥ स्त्रीकामाचे पंचबाण । माझे घेतील गुणप्राण । तरि तें काये मरण । नित्य आहे ॥४३॥ तया मरणापासाव सुटला । तेणें मन्मथुचि म्यां मारिला । होतो तैसा आपुला । स्वस्थु असैन ॥ ४४ ॥ ऐसे स्वभावगुण अध्यासें । मारितील मातें ऐसें । मी तयांचेनि नाशें । प्रवर्ततु असतां ॥ ४७ ॥ तरि तेणेंही मरणेंकरून । क्षेमचि माझें पूर्ण । तरि आतां ययालागून । गुण मी न मरीं ' ॥ ४६ ॥ ऐसा निश्चयो करूनि । अर्जुनु ठेला मौनी । ते कथा रायालागूनि । सांगे संजयो ॥ ४७ ॥

## दासोपंत—“ गीतार्थबोधचंद्रिका ”

आतां असो ह्या अनुवादु । पुढिला कार्याचा संबंधु । तो सर्वथा अनुबंधु । लागो नेदावा ॥ ६३ ॥ राया धृतराष्ट्राचे नंदन । माझे सखे बंधुजन । हातीं शस्त्रें घेऊन । चालिले जे ते ॥ ६४ ॥ धनुष्यें घेऊनि स्थितातें । अशस्त्रियां अयत्नवंतातें । रथीं बैसलिया मातें । निमीलित नेत्र ॥ ६५ ॥ जरि

मारितील ययें रणीं । सर्वांग फोडितील बाणीं । प्रत्यक्ष अथवा मागूनि । गोपीपति ॥ ६६ ॥ तरि मज बरवेंचि होईल । पापजनक न होईल । आतां ऐसेंचि हें केवळ । उचित करणें ॥ ६७ ॥

## वामनपंडित—" यथार्थदीपिका "

आतां शस्त्रें टाकितों । निःशस्त्र होऊनि बैसतो । युद्ध करीन हें तों । कधींच न घडे ॥ ७५ ॥ ऐसें देखूनि मज । हे धृतराष्ट्राचे आत्मज । सहरथपदातिसादिगज[1] । लोटूनि येती मजवरी ॥ ७६ ॥ तरी प्रतिक्रिया[2] कांहीं । मी त्यासी करणार नाहीं । शस्त्रें घेऊनि मारावें तिहीं । मज निःशस्त्रासी ॥ ७७ ॥ जरी हे ऐसियास मज । मारिती धृतराष्ट्राचे आत्मज । तें माझें कल्याण चरणांबुज । शिवतों तुझें ' ॥७८॥ करूनि ऐसा निश्चय । मग काय करिता जाला धनंजय । हे धृतराष्ट्रास संजय । सांगतसे ॥७९ ॥

## अच्युताश्रम—" बालबोधिनी "

प्रेत्न न करितया मातें । शस्त्र हातीं न घेतयातें । जरि शस्त्रधारी कौरव ते । मारिती तैं उत्तम ॥११॥ सर्वथा मज होईल ' । ऐसें अर्जुन बोलिला । तें रायाप्रति सांगेल । संजयो ॥ १२ ॥

## निवृत्तिदेव

प्रयत्न करितया मातें । आणि शस्त्र हातिं न धरितें । जरि शस्त्रपाणि कौरव ते । मारिती तरी उत्तम ॥४६॥

## उद्धवचिद्घन

सवाईः–

मी जंव या रथिं आहे अशस्त्रचि तोंवरि त्या धृतराष्ट्रसुतानें ।
घेउनि शस्त्र करें शिर छेदुनि घेउन कां न वजाय सुखानें ॥
हा उपकार किमर्थ करी नच होइल क्षेम मि जाइन प्राणे ।
त्रासभरें अति श्वासहि टाकित व्याकुळता शरिराप्रति बाणे ॥ ४६ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

मी शस्त्रावीण राहेन निवांत । त्या मातें देखोनि हे शस्त्रघात । धार्तराष्ट्र रणीं करितील हत । क्षेम निश्चित तेणेंचि मज ॥ ९६ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

मी प्रतिज्ञापूर्वक मुरारी । शस्त्र न धरिंच आपुलें करीं । आणि कौरव मज मारितें जरी । तरी मी अंतरीं सुखी होईन ॥ ६७ ॥

---

१ रथ, पायदळ, घोडेस्वार, हत्ती यांच्यासह. २ प्रतिकाराचा प्रयत्न.

## हरिपंडित—" गीतार्थप्रकाश "

स्वागता:– यत्न युद्धविषयीं न करीं पां । मी कदापि न लवी शरचापा ॥
मारितील जरि हूड मला हे । क्षेम तेचि मज होइल पाहे ॥ ४८ ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी "

जरी निःशस्त्र मी उगला । रणीं मारो कोणी मला । मी न मारीं धार्तराष्ट्रांला । हो कां मज हें क्षेम ॥४६॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः– जरी मी निःशस्त्र । उगा माझे गात्र । फाडिती हे अस्त्र । घालुनियां ॥
अवघे बरवाळे । छेदो माझे गळे । परी मी नातळें । विकल्पासी ॥
कल्याण हें मज । माझें दिसे आज । तुका ह्मणे काज । हेंचि बोले ॥ ४४ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्:– जरी निःशस्त्र उगला त्या मातें शस्त्रहस्त हे । मारिती या रणीं सर्व माझें कल्याण त्यामधें ॥६०॥

## मोरोपंत

आर्या:– मी प्रतिकार कराया यांवरि न धरीन शस्त्र हा नेम ।
हे धार्तराष्ट्र मातें वधितां शस्त्रें दिसे महा क्षेम ॥ ४६ ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
जरि शस्त्ररहित उगला त्या मातें शस्त्रपाणि हे वधिती ।
धृतराष्ट्रसुत रणीं या माझें कल्याण त्यामधें सार ॥ ६४ ॥

**संजय उवाचः–एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।**
**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥४७॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥

**अर्थः–असें बोलून शोकामुळें ज्याचें मन व्यथित झालें आहे असा अर्जुन रणभूमीवर बाणांसुद्धां धनुष्य टाकून रथांत आपल्या जागीं बसला.**

## श्रीज्ञानेश्वर—" भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) "

ऐसें तिये अवसरीं । अर्जुन बोलिला समरीं । संजयो ह्मणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ॥ ६८ ॥ मग अत्यंत उद्वेगला । न धरत गहिवरु आला । तेथ उडी घातली खालां । रथौनियां ॥ ६९ ॥ जैसा राजकुमरु

पदच्युतु । सर्वथा होय उपहतु । कां रवि राहुग्रस्तु । प्रभाहितु ॥ २७० ॥ नातरी महासिद्धिसंभ्रमें । जिंतला तापसु भ्रमें । मग आकळूनि कामें । दीनु कीजे ॥ ७१ ॥ तैसा तो धनुर्धरु । अत्यंत दुःखें जर्जरु । दिसे जेथ रहंवरु । त्यजिला तेणें ॥७२॥ मग धनुष्य बाण सांडिले । न धरत अश्रुपात आले । ऐसें ऐक राया वर्तलें । संजयो ह्मणे ॥ ७३ ॥ आतां यावरी तो वैकुंठनाथु । देखोनि सखेद पार्थु । कवणेपरी परमार्थु । निरूपिल ॥७४॥ ते सविस्तर पुढोरी कथा । अति सकौतुक ऐकतां । ज्ञानदेव ह्मणे आतां । निवृत्तिदासु ॥ २७५ ॥

॥ इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां प्रथमोऽध्यायः ॥

## सोपानदेव—" सोपानदेवी "

संजय ह्मणे गा राया । ऐसें अर्जुन कृष्णाप्रति बोलोनियां । धनुष्यबाण टाकुनियां । रथाखालीं शोक करीत बैसला ॥ ४७ ॥

## माधव नारायणदास—" नारायणकीर्ति "

धृतराष्ट्रातें हस्तिनापुरीं । संजय ह्मणे गा अवधारीं । तेणें रणभूमीचें ठायीं यापरी । ऐसें बोलोनि अर्जुन ॥ १७ ॥ टाकोनि धनुष्य शरेसहित । शोकें अति उद्विग्नचित्त । रथावरी बैसला विषयादयुक्त । ध्वजस्तंभेसी टेंकुनी ॥ १८ ॥ नेत्रीं वाहे अश्रूजीवन । कंठ दाटला न बोले वचन । सर्वांग जालें कंपायमान । ऐसा उगाचि राहिला ॥ १९ ॥ यावरी कीजेल जें चेष्टित । तें आईक राया सावचित्त । अर्जुना संबोधिला भगवंत । मग परमार्थ निरोपील ॥ २२० ॥ ऐसिया अंबिकेयाप्रति । द्रोणभगिनीसुताची उत्पत्ति । यावरी संतसज्जना विज्ञप्ति । टीकाकर्ता करितसे ॥२१॥ निरोपिला अर्जुनविषाद । हा प्रथमाध्याय पैं विशद । येथिचा अर्थ ओंवीबद्ध । यथाशक्ती बोलिला ॥२२॥ नाना मार्गें हृदय साचार । तुमचे कृपेचें आहे बिढार । ते कृपेचें शब्दोद्धार । याचा विचार तुह्मीच जाणा ॥ २३ ॥ आतां यावरी श्रीरंग । अर्जुना सांगेल सांख्ययोग । पहिला अध्याय चांग । अवधारावा सटीक ॥२४॥ ऐसी करूनी संतप्रार्थना । वंदूनियां त्या कृष्णचरणा । पुढें बोले निरूपणरचना । नारायणांकित माधवदास ॥२२५॥

सत्कारणाय शुद्धाय चिन्मयाय सुखाय च । बोधाय बोधगम्याय गुरूणां गुरवे नमः ॥

ॐ तत्सत् श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे माधवदासविरचितायां नारायणकीर्ति नाम्नि टीकायां अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## रंगनाथ मोगरेकर—" चित्सदानंदलहरी "

ऐसें बोलोनियां तो अर्जुन । तया संग्रामाचे ठायीं जाण । मग अत्यंत होऊनियां उद्विग्न । शोक दारुण करितां जाला ॥ ८५ ॥ शोकाचें चिन्ह तें ऐसें जाण । आंगीं स्वेद रोमांच कोरडें वदन । शरीरकंपें पडलें धनुष्यबाण । अथवा व्याख्यान ऐसें असे ॥ ८६ ॥ धनुष्यासि स्वयें बाण लावूनी । अवलोकीत होता सैन्यें दोन्ही । तंव शोक उपजला अंतःकरणीं । तेणें सशर टाकूनि धनुष्य हातींचें ॥८७॥ नेत्रीं

१ भानरहित. २ पुढील.

शोकाश्रुपूर लोटले । मन आधिकरूनि उद्विग्न जालें । मग रथावरी आंग टाकिलें । बैसे तिये वेळे चिंताग्रस्त ॥ ८८ ॥ पहिलें रथावरी उभा राहोन । परसैन्य अवलोकीत होता अर्जुन । मग शोकें हातींचें धनुष्य टाकून । बैसे उद्विग्न रथावरी ॥ ८९ ॥ जैसा इंद्र जालिया पदच्युत । किंवा श्रीसूर्य हा राहुग्रस्त । किंवा दिवसा चंद्र हा उपहत । तैसा पाण्डुसुत दिसे राया ॥ ६९० ॥ तैसा शोकसंतापें ग्रसिला । अत्यंत प्रभाहीन दिसे त्या वेळां । संजय ह्मणे आइक भूपाळा । ऐसा जाला वृत्तांतु तेथें ॥९१॥ आतां ययावरी तो त्रैलोक्यनाथु । ज्ञानोपदेशें प्रबोधील पार्थु । तो उत्तराध्यायीं सांगिजैल वृत्तांतु । ह्मणे रंगनाथु सद्गुरूचा ॥ ९२ ॥ आतां यया अध्यायाचें महिमान । सांग श्रोतयांप्रति सांगेन । जें पद्मपुराणीं बोलिजे जाण । तेंचि निरूपण परियेसा ॥ ९३ ॥ कैलासशिखरीं सुखासनीं । बैसला देखोनि शूलपाणी । गुह्य गुज पुसती जाली भवानी । "मुक्ति निर्वाणीं कैसी होय" ॥९४॥ तंव हांसोनि बोलिले पशुपति । "एकु थोर उपाय आहे वो महामति । माझें वास्तव स्वरूप जाणतांचि मुक्ति । होय सर्वार्थी जाण तूं ॥ ९५ ॥ ऐसेंचि क्षीराब्धीं शेषशयनाउपरी । सुखें बैसला देखोनियां मुरारी । लक्ष्मी प्रार्थूनियां प्रश्न करी । 'निद्रा श्रीहरी किमर्थ तुह्मां ॥९६ ॥ विश्वस्थितीचे ठायीं उदासीन । होऊनि किमर्थ करिजेतें शयन '। ऐसें परिसोनि लक्ष्मीचें वचन । विष्णु हांसोनि काय बोले ॥९७॥ ह्मणे 'वो लक्ष्मि तूं परियेसीं । कदापि निद्रा नाहीं वो आह्मांसी । आह्मी सूक्ष्म दृष्टि करूनि स्वस्वरूपासी । पाहों अहर्निशीं जाण तूं ॥ ९८ ॥ जयातें योगीश्वर हृदयीं ध्याती । जें कीं अज अव्यय स्वयंज्योती । आत्मा अनामय एक सर्वार्थी । नाहीं स्फूर्ती द्वैताची जेथ ॥ ९९ ॥ अखंडानंदसंदोहपरिपूर्ण । जयाव्यतिरिक्त नाहींच विश्व जाण । तेचि स्वरूपीं असों आह्मीं निमग्न । निद्राशून्य असों सर्वदा ॥ ७०० ॥ बाह्य निद्रालूचे परि जाण । तुह्मांसि दिसतसों नेणोन '। ऐसें तें लक्ष्मी परिसोन । उत्फुल्ललोचन होऊनि बोले ॥ १ ॥ ह्मणे 'जी सर्वोत्तमा मंगलमूर्ती । सर्व योगिजन सर्वथा तूंतें ध्याती । तुह्मांहूनि थोर कोण जी श्रीपती । जे ध्यान चित्तीं करा तुह्मीं ॥ २ ॥ चराचरविश्वाचा कर्ता हर्ता । तूंचि सर्वजगाचा पाळिता । ऐसे तुह्मी कोणासि ध्यातां । सांगा अनंता कृपाकरूनी ' ॥ ३ ॥ तंव सर्वात्मा ह्मणे 'वो कमलनयने । हें तरि मायामय शरीर जाणणें । विश्वोत्पत्ति स्थिति लय करणें । हेंही जाणणें मायिक सर्व ॥ ४ ॥ वास्तव तरि ययाहूनि व्यतिरिक्त । आत्मस्वरूप द्वैताद्वैतविवर्जित । भावाभावविनिर्मुक्त नित्य । आद्यंतरहित जाण तूं ॥ ५ ॥ जें कीं शुद्ध संवित्ति परमानंद । तें हें गीतेचे ठायीं बोलिलें विशद '। ऐसें परिसोनि विस्मय अगाध । पावली शुद्ध सिंधुतनया ॥ ६ ॥ ह्मणे 'जी परमानंदा ब्रह्ममूर्ति । स्वयें तूं मना वाचेसि अगोचर अति । आणि गीता हे कैशी तूंतें असे गाती । विरोध अति भासे मज ' ॥ ७ ॥ तंव विष्णु ह्मणती 'वो परियेसीं । तें गीतास्वरूप सांगों तुजपासीं । मी आत्मा एकु परापर स्वरूपेंसीं । द्विधा सर्वांशीं रूप माझें ॥ ८ ॥ एक तें साक्षिस्वरूप परतर निर्गुण । निष्कल शिवरूप नित्यानंदघन । अपर तें पंचवक्त्र स्वरूप सगुण । शब्देंचि भिन्न परि एकुचि दोन्ही ॥ ९ ॥ ईश्वर मी सर्वत्र एकुचि सर्वांशीं । तयासि भेदु कल्पिती नेणोनि पिशीं । यालागीं शिष्ट प्रवर्तले गीताभ्यासीं । कळावयासी दोन्ही स्वरूपें ॥ ७१० ॥ तेंचि गीतेचें माहात्म्य इतिहास । तुजप्रति सांगेन सावकाश । तरि गीता तेचि महेश । सावकाश रूप माझें ॥ ११ ॥ तरि अध्याय प्रथम आणि दुसरा जाण । हे पादांबुज तयाचे दोन्ही चरण । शरीररचना चरणांवरून । ह्मणोनि चरण बोलिले ॥ १२ ॥ त्यावरी दश अध्याय ते दश

१ लक्ष्मी. २ खुळीं.

भुजा । तेरावा अध्याय तो उदर सहजा । त्यावरी पांच अध्याय ते पंचमुखाम्भोजा । गुह्य गुंजा प्रकाशक ॥ १३ ॥ ऐशी अष्टादशाध्यायी वाङ्मयी मूर्ती । ईश्वराची जाण पां सर्वार्थी । तियेच्या ज्ञानमात्रेंचि संसारशांती । तियेतें जपती ते अति धन्य ॥ १४ ॥ इये गीतेचा एक अध्याय जपती । का अध्यायार्थ कां एक श्लोक ह्मणती । अथवा श्लोकाचे अर्धेहि पढती । मुक्त होती सुशर्म्या ऐसे ' ॥१५॥ तंव लक्ष्मी ह्मणे ' जी श्रीपती । सुशर्मा कोठील कोण जाती । कोणें कारणें तया जाली मुक्ति । सर्व मजप्रति सांगावें ' ॥ १६ ॥ तंव भगवंत ह्मणती ' वो सांगेन । परियेसीं कान्ते चित्त देऊन । सुशर्मा नामें एक ब्राह्मण । पापी पूर्ण दुष्टबुद्धि ॥ १७ ॥ वेदाध्ययन नेणती जे ब्राह्मण । कुकर्मी अति निष्ठुर पूर्ण । त्यांचे वंशीं तो जन्म पावोन । कर्माचरण न करी कांहीं ॥ १८ ॥ स्नान संध्या ना अध्ययन । जप होम ना आतिथिपूजन । केवळ तो शिश्नोदरपरायण । करी जीवन कृषीकरूनी ॥ १९ ॥ हलेंकरूनि भूमि नांगरित । सुरामांसादिक असे भक्षित । काळें कृषीमाजि होता हिंडत । अकस्मात सर्पे खादला ॥ ७२० ॥ मृत्यु पावोनि गेला नरकासी । ऐसे निरय भोगिले बहुतां क्लेशीं । मग बैल होऊनि मृत्युलोकासी । उपजला कुशी गाईचिये ॥ २१ ॥ मग स्वामीचे घरीं कृषी वाहत । वाहत वाहतां कृश जाला बहुत । भूमीवरी पडला अकस्मात । व्याकुळित बहुत जाला ॥ २२ ॥ हात पाय खोडी तोंडीं फेन । जीवन न पवे ना पवे मरण । पहावयासि मिळाला सर्वहि जन । पाप स्मरोन चरफडी ॥ २३ ॥ येथें कोणी एकी वेश्या येऊन । कृपेनें दिधलें आपुलें पुण्य । तेणें तात्काळ पावोनि मरण । गेला जाण यमपुरासी ॥ २४ ॥ गणिकेनें दिधलें जें पुण्य । तेणेंचि पुण्यवंत ऐसें मानून । यमें दिधला तात्काळ सोडून । पावला जन्म पुनरपि तो ॥२५॥ कुळशीळवंताचे गृहीं । ब्राह्मणजन्म पावला पाहीं । तेथ जन्मांतरस्मृति सर्वही । जिज्ञासाहि काळें जाली ॥ २६ ॥ मग तिये गणिकेप्रति तो येऊन । काय पुण्य दिधलें पुसे तियेलागून । ते ह्मणे माझा पुंसा जपतो प्रतिदिन । तें मी श्रवणीं परिसतु असें ॥ २७ ॥ परि तें काय पुण्य हें मज न कळे । मग पांजरां रावां होता तेथें आले । तयासि पुसतां तेणें सांगितलें । ह्मणे सकळ परियेसा ॥ २८ ॥ पुंसा ह्मणे त्या ब्राह्मणापासीं । पूर्वी मी विद्वांस होतों परियेसीं । गर्वें न मानीं मी विद्वांसासी । गुणवंतासीहि मी न मनीं कदा ॥ २९ ॥ काळें मृत्यु पावोनि गेलों नरकासी । भोग भोगूनि आलों जन्मासी । पुंसा होऊनि क्लेशें वनवासीं । तंव तेथें ऋषी अकस्मात आले ॥ ७३० ॥ तंव पितरें मज सांडूनि वनीं । चुकोनि गेलीं क्लेशी होऊनी । मी एकला लोळत होतों मेदिनीं । पितरांवांचूनि तळमळितु ॥३१॥ तें देखोनियां तेहीं ऋषीश्वरीं । माझी कृपा उपजली त्यांचे अंतरीं । मज सोंपिते जाले आपुले घरीं । घालूनि पांजरीं अतियत्नें ॥ ३२ ॥ तेथें ऋषिकुमार गीताध्ययन । करितां प्रथमाध्यायाचें पठन । म्यांही तो स्वयें पाठ करून । जपें अनुदिन त्यांचे गृहीं ॥ ३३ ॥ तवं कोणी एकें चोरें मज चोरून । विकिलें इये गणिकेलागून । तेथहि प्रथमाध्यायाचें करीं पठन । तेंचि श्रवण इयेसि जालें ॥ ३४ ॥ तेंचि पुण्य इणें दिधलें बैलासी । तेणें पावलासि तूं द्विजत्वासी । हें आइकोनियां आश्चर्य मानसीं । जालें द्विजासि अतिशयेंसीं ॥ ३५ ॥ मग तोहि प्रथमाध्याय शिकला । नित्यनियमेंसीं जप करूं लागला । तेणेंचि तो जाण मुक्त जाला । नयेचि गर्भाला मागुतेनी ॥ ३६ ॥ यालागीं प्रथमाध्यायाचें महिमान । सांगितलें तुजलागून । ह्मणोनि जप हा प्रीतीकरून । मोक्ष पूर्ण पावावया' ॥३७॥ ह्मणोनि गीता जपतां पाविजे मुक्तीसी " । श्रीशंकर ह्मणे

१ पोपट.

भवानीशी । " ऐसें विष्णु बोलिले वी लक्ष्मीपासीं । स्वरूप सर्वस्वेंशीं गीता हे जाण " ॥ १८ ॥ यालागीं आरांणुके करूनि संतीं । गीता जपावी ही स्वार्थी । ऐसी महिमा अध्यायांप्रती । तेहि बोलती[2] सांगों तुज ॥ ७३९ ॥ इति श्रीमन्महाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां श्रीभीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीता-सूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रीमद्रंगनाथविरचितायां चित्सदानंदलहरीनाम्न्यां टीकायां प्रथमोऽध्यायः ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीगुरुमूर्तयेनमः ॥

## रमावल्लभदास—" चमत्कारी " टीका

धृतराष्ट्र सूचित करीं । संजयो ह्मणे मनीं विवरीं । ऐसें अर्जुन बोलिला उत्तरीं । जो परात्पर कृष्णसखा ॥ ६२ ॥ तो रथावरी अंग घाली । ह्मणे युद्धाची सीमा झाली । हातींची टाकी धनुष्यभाली । शोकें मानस व्यापिलें ॥ ६३ ॥ न बोलवे वचन झाला अचेत । क्षात्रधर्माचा बुडाला हेत । उपरी परम मित्र बोलिजेत । श्यामसुंदर गोपाळ जे ॥ ६४ ॥ तें त्याचे प्रेरकपणें । टीका ' चमत्कारी ' सांगणें । रमावल्लभदास ह्मणे । संतीं घेणें भावार्थ ॥ ६५ ॥ इति श्रीगीता प्रथम अध्यावो । चमत्कारी टीका भावो । वदविता श्रीकृष्णरावो । अर्जुनविषादवर्णन नाम द्वितिय प्रकारः ॥ ६६ ॥ २ ॥ हरिः ॐ तत्सदिति श्रीमन्महाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासु-पनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रीरमावल्लभदासविरचितायां चमत्कारी नाम्न्यां टीकायां अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ धर्माभिवृद्धिरस्तु ॥

## हंसराज(?)—" गीतार्णव "

[ संजय उवाच ] संजयो ह्मणे वीरा । आइकें कुरुकुलप्रवरा । राया धृतराष्ट्रा पवित्रा । काये जालें ॥ ४८ ॥ [ अर्जुनः ] राया पंडूचा नंदनु । अरिकुलगर्वहुताशनु । कुंतीसुतु अर्जुनु । वासुदेवेसीं ॥ ४९ ॥ [ एवमुक्त्वा ] ऐसे बोलोनि निर्धारें । कौरवमोहें अपारें । मग पुढती यया पुढारें । काये करिता जाला ॥ २०५० ॥ [ संख्ये ] तये संग्रामसंकटीं । दोहीं सैन्यांमाजिवटीं । घाया उगारिलिया तळवटीं । कौरवांचिया ॥ ५१ ॥ [ सशरं चापं विसृज्य ] गांडीव धनुष्य सांडिलें । सरसाहित दूरि ठेविलें । भाते तेही परि सोडिले । तेणें काळें ॥ ५२ ॥ एवं सांडूनि धनुष्यबाण[3] । आणि युद्धाचे सकळ प्रेत्न । प्रौढी प्रतापाचें वचन । आंगवण टाकूनि ॥ ५३ ॥ [ शोकसंविग्नमानस: ] शोकयुक्त होऊनि । मनीं विषादातें पावोनि । करितु चिंता सोसणी । विसरोनि निमिषोन्मेष ॥ ५४ ॥ [ रथोपस्थ उपाविशत् ] उगाचि रथावरि बैसला । मातें कैसा गमों आला । अर्जुनु अवघा उतरला । बोलवेना ॥ ५५ ॥ मुखचंद्राचिया कळा । चिंते अमावास्येचिया काळा । लोपोनि मुखींचि सकळा । गुप्त जालिया ॥ ५६ ॥ कीं विषादराहो असुरु । तेणें अच्छादिला मुखचंद्रु । उमटेनाचि धनुर्धरु । काहीं केलिया ॥ ५७ ॥ मोहजलधर अंबरीं । अर्जुनीं दाटले अंतरीं । तेचि या मुखचंद्रा वैरी । जाले काये ॥ ५८ ॥ शूरत्व उगेंचि गळालें । तेज आंगूनि पळालें । कृपाशैत्य प्रवर्तलें । नाडि न संपडे ॥ ५९ ॥ धैर्य आणि दक्षता । येहीं सुटला असतां । अर्जुनु पहिला होता । तो नव्हे जाला ॥ ३०६० ॥ ध्यानस्थु वैसे योगी । नव्हे तो शरीरसंगी । शब्दु सामावोनि बाह्यभागीं । मौन राहे ॥ ६१ ॥ तैसें अर्जुनातें जालें । नेणों लक्ष कोठें लागलें । निमिषोन्मेषण वारलें । भासेचिना ॥ ६२ ॥ संडिली

१ प्रीति. २ प्रसंगोपात. ३ धनुष्य व बाण.

आपुली अहंता । अर्जुनदेहाची ममता । प्राणरक्षणीं चिंता । ते आथीचीना ॥ ६३ ॥ सर्वांगा आला स्वेदु । बाहेरि न फुटे शब्दु । अधर करिती स्पंदु । द्रवती नेत्र ॥ ६४ ॥ कवळूं पाहे दुर्योधना । ऐसी उपजली करुणा । परंतु देखोनियां श्रीकृष्णा । शंकला तो ॥ ६५ ॥ मोहाची उकळी न संवरे । चळचळां कांपती गात्रें । तो वेगु नाना प्रकारें । सांवरितां होये ॥ ६६ ॥ कीं पाहोनि जिव्हार रसना । मोहे पतंगु तो अर्जुना । लागला तेणें आंगवणा । विकळु गेला ॥ ६७ ॥ ऐसें संजयो अनुवादला । तो परमार्थे भाव घेतला । कैसा तो प्रकाशिला । पाहिजे कीं ॥ ६८ ॥ आतां संजयो तोचि कवणु । तरि भविष्यभाव जो सर्वज्ञु । राया अंधाप्रति आपणु । वृत्तांतु सांगे ॥ ६९ ॥ भविष्यभाव ह्मणे राया । अन्यथाबोधा अनात्मया । धनंजयो तो वरि इतुलया । काये करिता जाला ॥ ३०७० ॥ शब्दु ' त्वं ' पदार्थु आत्मारामु । आश्रयूनि शुद्धु प्रकृतिगुणधर्मु । तुरियेचां ठाईं आगमु । केला जेणें ॥७१॥ प्रतीति यावया गुण । केलें सगुणप्रकृतीचें आवरण । तथापि जो तेणंकरून । आपणाचि शोभे ॥ ७२ ॥ आलाही जो जीवदशे । आंगीचें शुद्धत्व न नसे । मग गुणद्वाराचि प्रकाशे । तैसा होऊनि ॥ ७३ ॥ गुणद्वारा आत्मप्रकाशु । तोचि इच्छूनि अभ्यासु । इतरांलागीं अविनाशु । योगु प्रतिष्ठी ॥ ७४ ॥ योगाची केवळ वासना । ती न सैये अयोगा अयत्ना । ह्मणौनि त्या कर्माकरणा । पाप ह्मणे ॥ ७५ ॥ प्रेत्नु करणें तेंचि कर्म । प्रेत्नु करणें तेंचि अकर्म । प्रेत्नु न करणें तें अधर्मे । पापरूप ॥७६॥ ह्मणौनि सुप्रेत्नालागूनि । आस्थाभूतु होऊनि । स्वगुण न मरीं ह्मणौनि । येणें प्रकारें ॥ ७७ ॥ सद्गुरु कृष्णेसीं ऐसें वचन । बोलिला होत्साता जाण । राया पुढें आचरण । काये करिता जाला ॥ ७८ ॥ आत्माज्ञानें योगागमु । तो हटयोगु संग्रामु । बळेंचि छेदणें गुणधर्मु । अकर्म करणें ॥ ७९ ॥ ऐसा संग्रामीं संकटें । स्वसैन्य राहिलें कोठें । आणि गुणाचें बिरडें मोठें । यामाजी असतां ॥ ३०८० ॥ अरिषड्वर्गाची मांडणी । अभिमानाची तळपणी । रजतमाची दावणी । समीप जेथें ॥ ८१ ॥ ऐसें प्रकृतिक्षेत्रस्थान । तेथें स्वसैन्य मार्गे सांडून । गुणांचा हातु लोटून । उभें असतां ॥ ८२ ॥ धनुष्य बाण विसर्जिले । जयाचे प्रेत्न सांडिले । अर्जुन काय केलें । येणें आत्मेन ॥ ८३ ॥ स्वगुणीं धरूनि आसक्ति । प्रेत्नाची भारी आर्ति । ह्मणौनि शोकयुक्त चित्तीं । बैसला रथावरि ॥ ८४ ॥ स्वगुण नाहींचि मारणें । अकृत्य अकर्म न करणें । पुरे जडत्वें येणें । ह्मणौनिया ॥ ८५ ॥ अयत्नावरूनि उदासीनु । राहिला पदार्थु होऊनु । गुणमाराचा प्रेत्नु । सकळु सांडिला ॥ ८६ ॥ आतां तो नव्हे पहिला । धारणेचिपासाव सुटला । बोधचंद्रु हरपला । यत्नायत्नीं ॥ ८७ ॥ शुद्धता होती आंगीं । ते न दिसे योगसंगीं । प्रेत्नु कंप सर्वांगीं । उपजते जाले ॥ ८८ ॥ आपुलेपणें अभिमानातें । झोंबों करी गळांचि तें । तंव सद्गुरु गोपीनाथें । शंकला तो ॥ ८९ ॥ आत्मशुद्धता पौर्णिमा । ते गुणकडवसां जाली आमा । स्वबोधु लोपला चंद्रमा । गुणाचां दाटपणीं ॥ ३०९० ॥ न लगते लागले भाव । गळाले अकर्म अवयव । असद्वृत्ति तिया सर्व । रूप आच्छादिलें ॥ ९१ ॥ जहदजहल्लक्षणारथीं । प्रेत्नवंतु गुणासक्ती । अर्जुनु बैसला गुरु सारथी । पासीं कृष्णु ॥ ९२ ॥ ईश्वरानुग्रहो पाठीसीं । शुद्धगुणवेगां वारुवांसी । अर्जुनु शंडूनि यत्नमारासि । यत्नीं प्रवर्तला ॥ ९३ ॥ कांहीं आसक्ति गुणांची । कांहीं अपेक्षा योगाची । अर्जुनु तो गुणमाराची । सांडणी पाहे ॥ ९४ ॥ आसक्ति गुणीं केवळ । गुणसंगाचेंचि हें फळ । आणि शुद्ध स्वरूप निर्मळ । ज्ञान तेणें ॥ ९५ ॥ शुद्धा गुणसंगु फळला । अर्जुनु तो ऐसा जाला । गुणयुक्त स्वभावो आपुला । आणि शुद्धता न संडी ॥ ९६ ॥ गुणयुक्तत्वें गुणासक्ति । आत्मशुद्धत्वें योगीं रति । कांहीं तम कांहीं ज्योति । सांजवले जैसी ॥ ९७ ॥ उंबरेयावरि बैसला । तो आंतु बाहेरि देखता

जाला । तुरीयस्थु गुणीं मिळाला । तैसें पाहे ॥ ९८ ॥ प्रपंचज्ञान स्वरूपज्ञान । दोहीं ठाईं आसक्त मन । शुद्धा गुणाचें सन्निधान । ऐसें फळें ॥ ९९ ॥ इंद्रजाळ महेंद्रजाळ पाहिजे । तें माया हें काये नेणिजे । परि पाहतां सुख उपजे । आणि सांडवेना ॥ ३१०० ॥ बहुरूपियें ध्येला स्त्रीवेषु । तो काये न कळे पुरुषु । परंतु पाहतां उल्लासु । न पाहवेना ॥ १ ॥ तैसेंचि मायिक लाघव । हें मिथ्या नामरूपभान सर्व । हें समस्तां कळे अपूर्व । काये येथें ॥ २ ॥ वेदें शास्त्रें गुरुउक्ती । आपणाही कळे प्रतीति । सत्या असत्याची संगती । कायिसी हे ॥३॥ असंता नाहीं संतपण । आत्मसत्तयाचि त्याचें भान । जैसी छाया तैसें स्वप्न । आपुलें न सत्य ॥ ४ ॥ ऐसें असोनियांही परि । संगाची प्रीति भारी । जाणत जाणतां मिथ्या अंतरीं । सांडि नुपजे ॥ ५ ॥ गंधर्वनगर कां पहावें । चित्र देखोनि रंजावें । विट नट सत्य नव्हे । परि विषयो होये ॥६॥ तैसी हे माया ऐश्वरी । मिथ्या मिथ्या मिथ्या परी । प्रतीतिसुख खरें करी । तेणें न सोडवे ॥ ७ ॥ तैसें शुद्धा जीवरूप अर्जुना । संगु जाला मायागुणा । आतां मिथ्या परि वासना । सोडूं न शके ॥ ८ ॥ ईश्वरें येक करावें । गुण हे आंगा न यावे । भान हें दृष्टी न पडावें । गुणाचें कार्य ॥ ९ ॥ प्रकृति लागली आपणासि । गुण न जडले आंगेसीं । भान गुणकार्य दृष्टीसि । भासों आलें ॥ ३११० ॥ मग परस्परां अन्वयें । तिहींचें येक होये । मग सोडितां नाना उपायें । आंगींचें न सुटे ॥ ११ ॥ तें बळाचें अंग नव्हे । तदधीन उगेंचि वर्तावें । ज्ञानें योगें दूरि करावें । क्रमेंक्रमेंचि ॥ १२ ॥ कुपथ्य करितां गोड वाटे । खलयां सहसा न सुटे । मग उपायें उपायेंचि घटे । तयाचा निरासु ॥ १३ ॥ शुद्धा अशा अर्जुनातें । ऐसें जालें येणें मतें । आतां बळाचें येथें । नचले कांहीं ॥ १४ ॥ सद्गुरु कृष्णु सारथी । ह्मणौनि योगार्थ गुणासक्ती । भूतला आपुली याति । विसरला नाहीं ॥१५॥ येणेवीण हा असतां । तैं बद्धु पशु होता । योगु तो नापेक्षिता । कदाकाळें ॥ १६ ॥ विषयांचेनि संभ्रमें । करितां अकर्मे विकर्में । मग संसारचक्रीं भ्रमे । हेंचि होतें कीं ॥ १७ ॥ आतां तें ययाचें चुकलें । सारथिया गुरूचेनि बळें । ईश्वरानुग्रहें केवळें । पाठी कडिले ॥१८॥ नेणों महिमा रथाची । नेणों महिमा वारुवांची । नेणों महिमा यातीची । अर्जुनाचिये ॥ १९ ॥ दिगंबरानुचर ह्मणे । हे गुरुमहिमा श्रीकृष्णें । आतां ऐसिया अर्जुनाकारणें । सारथी सद्गुरु ॥३१२०॥ उतरूनि मोहाची भावना । पोषूनि योगाची वासना । ज्ञानें आणील आधिष्ठाना । क्रमेंक्रमेंचि ॥ २१ ॥ अकर्मनिष्ठा नावडे । ते केवळ करील कडे । आणि प्रथमावस्थे न घडे । सहज ऐसें ॥ २२ ॥ कर्मेंचि अकर्म दावील । योगुचि ज्ञानमयु स्थापील । गुणचि ब्रह्म करील । अर्जुनाचें ॥ २३ ॥ प्रपंचु तोचि परमार्थु । करावया गुरु समर्थु । आतां पुरैल मनोरथु । अर्जुनाचा ॥२४॥ अर्जुनु मुक्त प्रकृतीसीं । आंगीं असतियां गुणांसी । टाके तितुलया प्रपंचासि । धरीना सुखें ॥ २५ ॥ कांहीं सांडणें ना घेणें । जैसें तैसेंचि मुक्त होणें । सद्गुरुप्रसादाचें येसणें । महीमान आहे ॥ २६ ॥ कर्मेंचि करितां संन्यासु । संन्यासा लावितां कर्मदोषु । गुरूतें कायिसा आयासु । तो सर्वांचा कर्ता ॥ २७ ॥ गुणसहित गुणातीतता । कर्मसहित निष्कर्मता । अवलंबसहित मुक्तता । निरंतर ॥ २८ ॥ प्रपंचेसीं ब्रह्मस्फुरण । प्रेत्नचि करील अप्रेत्न । अप्रेत्ना देईल दूषण । कृष्णु सद्गुरु ॥ २९ ॥ अर्जुनाची वासना जैसी । तैसाचि योगु सांगैल तयासि । परमात्मा निश्चयेसीं । पुढिला अध्यायीं ॥ ३१३० ॥ दिगंबरानुचरु ह्मणे । गीतावर्म हेंचि जाणणें । पुढिलें अपूर्वें निरोपणें । कळों येईल ॥ ३१३१ ॥

ॐ तत्सत्परब्रह्मणे नमः ॥ ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दिगंबरानुचरकृतगीतार्णवनाम्नि टीकायां अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥

## मुक्तेश्वर — "गीतार्थबोधचंद्रिका"

तेजयो म्हणे राया । अवधारीं गा प्रतापिया । ऐसी अवस्था धनंजया । उपजती जाली ॥ ६८ ॥ शोकपंकीं बुडालें । मन जयाचें मोहिलें । तो अर्जुनु तेणें काळें । काये करिता जाला ॥ ६९ ॥ दोहीं सैन्यांच्या मध्यभागीं । युद्धकर्मांच्या प्रसंगीं । संग्रामसंकट दुर्गीं । ऐसें बोलोनि ॥ २७० ॥ शरसहित तेणें काळें । हातिचें धनुष्य ठेविलें । मग ठेवूनि काये केलें । कर्तव्य पां ॥ ७१ ॥ उगाचि बैसला रथावरी । मौनी ध्यानस्थु जयापरी । शोकु व्यापिला शरीरीं । पांडवाचें ॥७२॥ बोलिला तैसेंचि केलें । हातिचें शस्त्र सांडिलें । युद्धाचें प्रयत्न जितुलें । तितुलेंही न करी ॥ ७३ ॥ कौरवांचिया तळीं घाया । अशस्त्रु अयत्नवंतु तो राया । मरणचि श्रेष्ठ मानुनियां । संप्रार्थित ॥ ७४ ॥ लावूनि दोन्ही नयनें । विचारीं घालूनियां मन । युद्ध न करीं म्हणौन । बैसला झाला ॥ २७५ ॥

ॐ तत्सदिति श्रीमदादिगुरुदत्तात्रेयदिगंबरानुचरमुक्तेश्वरविरचितायां गीतार्थबोधचंद्रिकायां अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ श्रीदिगंबरार्पणमस्तु ॥

## वामनपंडित — "यथार्थदीपिका"

ऐसें बोलोनि अर्जुन । शरांसहित शरासन । टाकूनि शोकविव्हळमन । रथीं उगा तो बैसला ॥ २८० ॥ हा अध्याय पहिला । जेथें अर्जुनविषाद लिहिला । युद्ध न करीं म्हणून राहिला । अर्जुन उगा ॥ ८१ ॥ पुढें अध्याय दुसरा । उपदेश आरंभेल एकसेरा । जेणें देहात्मवादी निजवैरा । जाय्या होय तात्काळ ॥ ८२ ॥ ऐसी टीका मराठी । जी संस्कृताचीच धाटी । अर्थभावार्थरहाटी । समजती अनुभवी ग्राम्यहि ॥ ८३ ॥ संस्कृती नसे हरिज्ञान । तरी पदपदार्थानुसंधान । समजोनि वक्ते श्रोते जन । सुख पावती ॥ ८४ ॥ गीताकार चिद्घन । मेघश्याम कृपाघन । तोचि हें टीकाजीवन । वर्षती ॥ ८५ ॥ जैसे तुम्ही श्रोते वक्ते जन । तैसाच जाणावा वामन । टीकाकार जगज्जीवन । गीताकार श्रीकृष्ण ॥ ८६ ॥ हे भगवत्तत्त्वाची सुधा । सज्जनांची बुद्धि वसुधा । आर्द्र करील बहुधा । वामन म्हणे ॥ ८७ ॥ गीतार्थ विमळ मर्मीं । तेचि टीका झाली वामनी । जे पाहती दिनयामिनी । भगवत्कृपापात्र ते होती ॥२८८॥

कमलभवभवाद्याः सर्वदा यन्निदेशे । विजयरथमजोऽसौ सेनयोर्मध्यदेशे ॥
तदुदितवचनेन स्थापयामास देवः । करुण इति सदास्तु श्रीमुकुंदो मुदे वः ॥
इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां प्रथमोऽध्यायः ॥

## अच्युताश्रम — "बालबोधिनी"

संजय म्हणे कुरुनंदना । संग्रामीं ऐसें बोलोन । अर्जुन रथावरी आपण । बैसता जाला ॥१३॥ तयाचें अंतःकरण । तें जालें शोकसंविग्न । हातींचें धनुर्बाण । सांडून ॥ १४ ॥ मग मौन अंगिकारिलें । मुख खालुतें घातुलें । सर्वेही निवसलें । चित्त त्याचें ॥ १५ ॥ ये प्रथमाध्यायीं अर्जुन । बोलिला भेद-शास्त्रवचन । द्वितीयाध्यायीं श्रीकृष्ण । ज्ञान उपदेशितील ॥ १६ ॥ ऐसा प्रथमाध्याय वर्णिला । तो प्रभु श्रीसमर्थीं अर्पिला । तेणें अभिप्राव बरवा जाला । पुढिलां कारणें ॥ ११७ ॥

ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीताटीकायां महाराष्ट्रबालबोधिन्यां अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥

---

१ धनुष्य. २ एकदम. ३ निजलेला. ४ दिवसरात्र.

## निवृत्तिदेव

संजयो ह्मण कुरुनंदन । संग्रामीं बोलोनियां अर्जुन । रथावरि बैसला शरचाप टाकुन । शोकयुक्तमनें॥४७॥

## उद्धवचिद्धन

सवाईः- संजय सांगत यापरि अर्जुन बोलुनियां रथिं तेच घडी ।
टाकुनियां शरचाप सगद्गद नेत्रिंच वाहत नीरझडी ॥
मौन्य वसे भ्रमे भान नसे मन शोकसमुद्रिंचे ऐल थडी ।
विव्हळ होत धनंजय ते दळिं बोधिल यावरि कृष्णगडी ॥ ४७ ॥

## माधव—( तंजावर प्रत )

संजय ह्मणे ऐक नरपति । अर्जुने वदोनियां येणें रीति । विसर्जिलें चाप शरासहिति । बैसला रथीं न तिष्ठूनि ॥ ९७ ॥ शोकार्णवीं मानस जालें मग्न । चिंता हृदयीं घडली संलग्न । पुढिलिये अध्यायीं मोहे भवघ्न । दराया सर्वज्ञ उपदेशील ॥ ९८ ॥ हा गीतेचा अध्याय प्रथम । अर्जुनविषादयोग याचें नाम । परिसा पुढील अनुक्रम । पुरुषोत्तम सांगेल तो ॥९९॥ श्रीकृष्ण उपदेशील पार्थासी । ह्मणोनि संजय सांगे रायासी । सूत शौनकादि ऋषीसी । भारतासि वैशंपायन ॥ १०० ॥ माधव विनवी श्रोतयांप्रति । न घेतां पाल्हाळाची स्थिति । निरोपिजेल कथा पुढती । सावध चित्तीं असा सर्व ॥ १०१ ॥

## रत्नाकर—" रत्नाकरी "

ऐसे अर्जुन श्रीकृष्णासि बोलोन । रथातळीं उतरला आपण । करिचें टाकून धनुष्यबाण । व्याकुळ मन जालें त्याचें ॥ ६८ ॥

## हरिपंडित " गीतार्थप्रकाश "

उपजातिः- बोलोनि ऐसें समरीं हरीतें । त्यजूनियां बाण शरासनातें ॥
तो बैसला पार्थ रथीं निवांतें । विरामला शोकभरें मनातें॥ ४९ ॥
इति श्रीहरिपंडितविरचिते गीतार्थप्रकाशे अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥

## मुक्तेश्वर—" मुक्तेश्वरी"

संजय ह्मणे राया । ऐसें अर्जुन बोलोनियां । धनुष्यबाण टाकोनियां । दुःखें बैसला असे ॥ ४७ ॥

## तुकाराम—( पांडुरंगदास )

अभंगः- कुरूपतीलागीं । संजय प्रसंगीं । वदे कीं अवघी । वार्ता ऐसी ॥
बोलोनी साकल्य । पार्थिवा वैकल्य । द्यावया वैकल्य । वांछीं शांती ॥
बाणेसी कमान । हातींची सोडून । उगा तो आपण । स्वस्थ बैसे ॥
शोकें जाजावला । विव्हळ चित्ताला । मोहें कवळिला । तुका ह्मणे ॥ ४५ ॥

## वामन—( शांडिल्य )

अनुष्टुप्ः—बोलोनि अर्जुन असा रथीं तो बैसला उगा। बाणेसीं धनु टाकूनी शोकें विव्हळमानस ॥६१॥
इति टीका समश्लोकी अध्याया प्रथमावरी। श्रीपार्थसारथी कर्ता जो वामनमनोरथी ॥६२॥

शार्दूलविक्रीडितः— श्रीमद्वामनपादपद्मयुगुळीं अर्पू मना षट्पदा।
स्वात्मा तो जगिं सत्पदें स्फुरतसे दावी स्वयें चित्पदा ॥
आनंदात्मक तोचि श्रीहरि गुरू आत्मा नसे वेगळा।
ऐसा श्रीभगवान् तया नमिन मी प्रेमें जगन्मंगला ॥ ६३ ॥

उपजातिः— तो श्रीहरी सारथि अर्जुनाचा। होऊनियां प्रेरक या मनाचा ॥
अध्यायअंतीं कथि एक श्लोका। ह्मणोनि दावी स्वकृपावलोका ॥ ६४ ॥

शार्दूलविक्रीडितः— अध्याया प्रथमांत पार्थ स्वजना देखोनियां मोहला।
कीं हे गोत्रज सोयिरे कुलगुरू मारींच ना मी मला ॥
लागे दोष ह्मणोनि युद्ध न करीं कृष्णा असें बोलिला।
बाणेंसीं धनु टाकुनी मग रथीं तो ऊगला बैसला ॥ ६५ ॥

## मोरोपंत

आर्याः— बोलुनि ऐसें युद्धीं टाकुनि तत्काळ पार्थ शरचाप।
बैसे उगला स्वरथीं पावुनि चित्तांत शोक संताप ॥ ४७ ॥
: ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० : ० :
बोलोनि अर्जुन असा टाकुनियां बाणसहित गांडीवा।
बसला रथीं उगा तो शोकानें फार विकळ मन ज्याचें ॥ ६५ ॥
श्रीभगवद्गीतेची आर्याटीका मयूररचिता हे।
पहिल्या अध्यायाची लाहे सुख आर्य जो बरें पाहे ॥ ६६ ॥

## ॥ अध्याय पहिला समाप्त ॥

### ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



# परिशिष्टें.



# परिशिष्ट

## कवींची व श्लोकांची सूचि.

| क्रमांक. | कविनाम. | मंगलाचरण. पृ. २-२० | उपोद्घात. पृ. २१-३४ | श्लोक १ ला. धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे — पृ. ३५-४० | श्लोक २-३ दृष्ट्वा तु पांडवानीकं — पश्यैतां पांडुपुत्राणां — पृ. ४०-४८ | श्लोक ४-६ अत्र शूरा महेष्वासा — धृष्टकेतुश्चेकितानः — युधामन्युश्च विक्रांतः — पृ. ४८-५७ |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्रीज्ञानेश्वर. | २ | २१ | ३५ | ४० | ४८ |
| २ | सोपानदेव. | × | × | ३५ | ४१ | ४९ |
| ३ | माधव नारायणदास. | ३ | २३ | ३५ | ४१ | ४९ |
| ४ | रंगनाथ मोगरेकर. | ५ | २४ | ३५ | ४१ | ४९ |
| ५ | रमावल्लभदास. | ७ | × | ३६ | ४२ | ५० |
| ६ | दासोपंत ( गीतार्णव ). | ८ | ३१ | ३७ | ४३ | ५० |
| ७ | दासोपंत ( गीतार्थबोधचंद्रिका). | १४ | × | ३८ | ४५ | ५४ |
| ८ | वामनपंडित. | १५ | ३१ | ३८ | ४५ | ५५ |
| ९ | अच्युताश्रम. | २० | ३२ | ३८ | ४६ | ५५ |
| १० | निवृत्तिदेव. | × | × | ३८ | ४६ | ५५ |
| ११ | उद्धवचिद्धन. | × | × | ३९ | ४६ | ५५ |
| १२ | माधव ( तंजावर प्रत ). | × | ३२ | ३९ | ४६ | ५६ |
| १३ | रत्नाकर. | २० | ३२ | ३९ | ४७ | ५६ |
| १४ | हरिपंडित. | २० | ३३ | ३९ | ४७ | ५६ |
| १५ | मुक्तेश्वर. | × | × | ३९ | ४७ | ५६ |
| १६ | तुकाराम पांडुरंगदास. | × | × | ३९ | ४७ | ५६ |
| १७ | वामन–शांडिल्य. | २० | ३३ | ३९ | ४७ | ५७ |
| १८ | मोरोपंत ( सयमक ). | + | + | ४० | ४७ | ५७ |
| १९ | मोरोपंत ( निर्यमक ). | २० | ३४ | ४० | ४८ | ५७ |
| २० | वामन–द्विजोत्तम. | × | × | ४० | ४८ | ५७ |

# पहिलें.

## मंगलाचरण, उपोद्घात, श्लोक १ ते २३.

| श्लोक ७–९ | श्लोक १०वा. | श्लोक ११वा. | श्लोक १२वा. | श्लोक १३वा. | श्लोक १४–१६ | श्लोक १७–१९ | श्लोक २०–२३ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पृ. ५८–६६ अस्माकं तु विशिष्टा ये – भवान्भीष्मश्च कर्णश्च – अन्ये च बहवः शूरा – | पृ. ६७–७४ अपर्याप्तं तदस्माकं – | पृ. ७४–८० अयनेषु च सर्वेषु – | पृ. ८०–८४ तस्य संजनयन्हर्षं – | पृ. ८४–८८ ततः शंखाश्च भेर्यश्च – | पृ. ८८–१०५ ततः श्वेतैर्हयैर्युक्ते – पाञ्चजन्यं हृषीकेशो – अनंतविजयं राजा – | पृ. १०५–११७ काश्यश्च परमेष्वासः – द्रुपदो द्रौपदेयाश्च – स घोषो धार्तराष्ट्राणां – | पृ. ११७–१३१ अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा – हृषीकेशं तदा वाक्यं – यावदेतान्निरीक्षेऽहं – योत्स्यमानानवेक्षेऽहं – |
| ५८ | ६७ | ७५ | ८१ | ८५ | ८९ | १०६ | ११७ |
| ५९ | ६७ | ७५ | ८१ | ८५ | ८९ | १०६ | ११८ |
| ५९ | ६७ | ७५ | ८१ | ८५ | ८९ | १०६ | ११८ |
| ५९ | ६७ | ७५ | ८१ | ८५ | ९० | १०७ | ११९ |
| ६० | ६९ | ७६ | ८२ | ८५ | ९१ | १०८ | १२० |
| ६० | ७० | ७६ | ८२ | ८६ | ९१ | १०८ | १२१ |
| ६३ | ७२ | ७८ | ८३ | ८६ | १०१ | ११३ | १२६ |
| ६३ | ७३ | ७८ | ८३ | ८६ | १०२ | ११४ | १२६ |
| ६३ | ७३ | ७९ | ८३ | ८७ | १०२ | ११४ | १२८ |
| ६४ | ७३ | ७९ | ८३ | ८७ | १०३ | ११४ | १२८ |
| ६४ | ७३ | ७९ | ८३ | ८७ | १०३ | ११४ | १२८ |
| ६४ | ७३ | ७९ | ८३ | ८७ | १०३ | ११५ | १२९ |
| ६५ | ७३ | ७९ | ८३ | ८७ | १०३ | ११५ | १२९ |
| ६५ | ७४ | ८० | ८४ | ८७ | १०४ | ११५ | १३० |
| ६५ | ७४ | ८० | ८४ | ८७ | १०४ | ११५ | १३० |
| ६५ | ७४ | ८० | ८४ | ८७ | १०४ | ११६ | १३० |
| ६६ | ७४ | ८० | ८४ | ८८ | १०४ | ११६ | १३१ |
| ६६ | ७४ | ८० | ८४ | ८८ | १०५ | ११६ | १३१ |
| ६६ | ७४ | ८० | ८४ | ८८ | १०५ | ११६ | १३१ |
| ६६ | ७४ | ८० | ८४ | ८८ | १०५ | ११७ | १३१ |

# परिशिष्ट

## कवींची व श्लोकांची सूचि.

| क्रमांक. | कविनाम. | श्लोक २४–२८<br>पृ. १३२–१४५ एवमुक्तो हृषीकेशो –<br>भीष्मद्रोणप्रमुखतः –<br>तत्रापश्यत्स्थितान्पार्थः –<br>श्वशुरान्सुहृदश्चैव –<br>कृपया परयाऽविष्टो – | श्लोक २८–३२<br>पृ. १४६–१६४ दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण –<br>सीदन्ति मम गात्राणि –<br>गांडीवं स्रंसते हस्तात् –<br>निमित्तानि च पश्यामि –<br>न कांक्षे विजयं कृष्ण – | श्लोक ३३–३६<br>पृ. १६५–१९२ येषामर्थे कांक्षितं नो –<br>आचार्याः पितरः पुत्राः –<br>एतान्न हंतुमिच्छामि –<br>निहत्य धार्तराष्ट्रान्नः – |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीज्ञानेश्वर. | १३२ | १४६ | १६५ |
| २ | सोपानदेव. | १३३ | १४७ | १६६ |
| ३ | माधव नारायणदास. | १३३ | १४७ | १६६ |
| ४ | रंगनाथ मोगरेकर. | १३४ | १४८ | १६७ |
| ५ | रमावल्लभदास. | १३५ | १५० | १६९ |
| ६ | दासोपंत ( गीतार्णव ). | १३६ | १५० | १६९ |
| ७ | दासोपंत ( गीतार्थबोधचंद्रिका ). | १४० | १६० | १८६ |
| ८ | वामनपंडित. | १४० | १६१ | १८७ |
| ९ | अच्युताश्रम. | १४१ | १६१ | १८९ |
| १० | निवृत्तिदेव. | १४२ | १६१ | १८९ |
| ११ | उद्धवचिद्घन. | १४२ | १६१ | १८९ |
| १२ | माधव ( तंजावर प्रत ). | १४३ | १६२ | १९० |
| १३ | रत्नाकर. | १४३ | १६२ | १९० |
| १४ | हरिपंडित. | १४३ | १६३ | १९० |
| १५ | मुक्तेश्वर. | १४४ | १६३ | १९० |
| १६ | तुकाराम पांडुरंगदास. | १४४ | १६३ | १९१ |
| १७ | वामन-शांडिल्य. | १४४ | १६४ | १९१ |
| १८ | मोरोपंत ( सयमक ). | १४५ | १६४ | १९१ |
| १९ | मोरोपंत ( निर्यमक ). | १४५ | १६४ | १९२ |
| २० | वामन–द्विजोत्तम. | १४५ | १६४ | १९२ |

## पहिलें. ( पुढें चालूं )

### श्लोक २४ ते ४७.

| श्लोक ३७ वा. पृ. १९२–१९६ तस्मान्नार्हा वयं हंतुं – | श्लोक ३८–३९ पृ. १९७–२०४ यद्यप्येते न पश्यन्ति – कथं न ज्ञेयमस्माभिः– | श्लोक ४० वा. पृ. २०४–२०७ कुलक्षये प्रणश्यन्ति – | श्लोक ४१ वा. पृ. २०७–२१२ अधर्माभिभवात्कृष्ण – | श्लोक ४२ वा. पृ. २१२–२१६ संकरो नरकायैव – | श्लोक ४३–४५ पृ. २१७–२२८ दोषैरेतैः कुलघ्नानां – उत्सन्नकुलधर्माणां – अहो बत महत्पापं – | श्लोक ४६ वा. पृ. २२८–२३३ यदि मामप्रतीकारं – | श्लोक ४७ वा. पृ. २३३–२४२ एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये – |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १९२ | १९७ | २०४ | २०७ | २१२ | २१७ | २२८ | २३३ |
| १९२ | १९७ | २०४ | २०७ | २१२ | २१७ | २२८ | २३४ |
| १९२ | १९७ | २०४ | २०८ | २१३ | २१८ | २२९ | २३४ |
| १९३ | १९८ | २०५ | २०८ | २१३ | २१८ | २२९ | २३४ |
| १९३ | १९९ | २०५ | २०८ | २१३ | २१८ | २२९ | २३७ |
| १९३ | १९९ | २०५ | २०८ | २१३ | २१९ | २२९ | २३७ |
| १९५ | २०१ | २०५ | २१० | २१५ | २२५ | २३१ | २४० |
| १९५ | २०२ | २०५ | २११ | २१५ | २२५ | २३२ | २४० |
| १९५ | २०२ | २०६ | २११ | २१५ | २२६ | २३२ | २४० |
| १९५ | २०२ | २०६ | २११ | २१५ | २२६ | २३२ | २४१ |
| १९५ | २०२ | २०६ | २११ | २१५ | २२६ | २३२ | २४१ |
| १९६ | २०३ | २०६ | २११ | २१६ | २२६ | २३२ | २४१ |
| १९६ | २०३ | २०६ | २११ | २१६ | २२७ | २३२ | २४१ |
| १९६ | २०३ | २०६ | २११ | २१६ | २२७ | २३३ | २४१ |
| १९६ | २०३ | २०६ | २११ | २१६ | २२७ | २३३ | २४१ |
| १९६ | २०३ | २०६ | २१२ | २१६ | २२७ | २३३ | २४१ |
| १९६ | २०३ | २०७ | २१२ | २१६ | २२८ | २३३ | २४२ |
| १९६ | २०४ | २०७ | २१२ | २१६ | २२८ | २३३ | २४२ |
| १९६ | २०४ | २०७ | २१२ | २१६ | २२८ | २३३ | २४२ |
| १९६ | × | × | × | × | × | × | × |

# परिशिष्ट तिसरें.

## कवींचा कालानुक्रम.

| अनुक्रमांक | कविनाम. | टीकेचें नांव. | काल. शके. | प्रसिद्ध कीं अप्रसिद्ध. | १ ल्या अध्यायाची श्लोकसंख्या. |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्रीज्ञानेश्वर | भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) | १२१२ | प्रसिद्ध | २७५ |
| २ | सोपानदेव | सोपानदेवी | १२१८ | प्रसिद्ध | ४७ |
| ३ | माधव नारायणदास | नारायणकीर्ति | १५१४ | अप्रसिद्ध | २२६ |
| ४ | रंगनाथ मोगरेकर | नित्यदानंदलहरी | १५३० | प्रसिद्ध | ७३९ |
| ५ | रमावल्लभदास | चमत्कारी | १५३१ | प्रसिद्ध | १६१ |
| ६ | दासोपंत | गीतार्णव | १५५१ | अप्रसिद्ध | ३१३१ |
| ७ | दासोपंत | गीतार्थबोधचंद्रिका | १५५१ | अप्रसिद्ध | २७५ |
| ८ | वामनपंडित | यथार्थदीपिका | १५९५ | प्रसिद्ध | ३८९ |
| ९ | अच्युताश्रम | बालबोधिनी | १६१४ | अप्रसिद्ध | ११७ |
| १० | निवृत्तिदेव | | १६१४ | अप्रसिद्ध | ४७ |
| ११ | उद्धवचिद्धन | | १६०२ | प्रसिद्ध | ४७ |
| १२ | माधव ( तंजावर प्रत ) | | १६२६ | प्रसिद्ध | १०१ |
| १३ | रत्नाकर | रत्नाकरी | १६४१ | अप्रसिद्ध | ६८ |
| १४ | हरिपंडित | गीतार्थप्रकाश | १६४४ | अप्रसिद्ध | ४९ |
| १५ | मुक्तेश्वर | मुक्तेश्वरी | १५४८ | प्रसिद्ध | ४७ |
| १६ | तुकाराम पांडुरंगदास | | १६५० | प्रसिद्ध | ४५ |
| १७ | वामन शांडिल्य | | १६८० | प्रसिद्ध | ६५ |
| १८ | मोरोपंत ( सयमक ) | | १६८५ | प्रसिद्ध | ४७ |
| १९ | मोरोपंत ( निर्यमक ) | | १६८५ | प्रसिद्ध | ६६ |
| २० | वामन द्विजोत्तम | | | अप्रसिद्ध | ३६ |
| | | | | एकूण | ५९७८ |

टीप:—वर दिलेला कालानुक्रम अगदीं बरोबर आहे असें नाहीं. मुक्तेश्वराचें स्थान वास्तविक पाहतां रमावल्लभदास व दासोपंत यांच्यामध्यें आहे. वामन द्विजोत्तम यांचा काल समजत नाहीं. श्रीज्ञानेश्वर, रंगनाथ मोगरेकर, रमावल्लभदास, निवृत्तिदेव, रत्नाकर, हरिपंडित यांचे काल टीकालेखाचे आहेत. माधव नारायणदास, दासोपंत, अच्युताश्रम, उद्धवचिद्धन, माधव ( तंजावर प्रत ), तुकाराम पांडुरंगदास, वामनपंडित, वामन शांडिल्य व मोरोपंत हे कवी कोणत्या शतकांत होते हे दाखविणारे काल त्यांच्या नामनिर्देशापुढें आहेत. सोपानदेव व मुक्तेश्वर या कवींच्या टीकांबद्दल संशय असल्याकारणानें त्यांचाही काल ते कोणत्या शतकांत होते एवढें दाखविण्यापुरताच आहे.

दासोपंत–गीतार्णव–अध्याय १, २, १२, १३ हे महाराष्ट्रकवी या मासिकाचे संपादक, सुप्रसिद्ध संशोधक, कै० विनायक लक्ष्मण भावे, बी. एस्. सी. यांनीं १९०४-५ च्या सुमारास छापले. पण अद्याप या गीतार्णव ग्रंथाचा बराचसा भाग छापून व्हावयाचा असल्यानें तो अप्रसिद्ध ह्मणून गणला आहे.

# परिशिष्ट चौथें.

## कठिण शब्दांचा अर्थ.

( मूळ ग्रंथांत ज्या शब्दांवर तळटिपा दिलेल्या आहेत त्या व्यतिरिक्त जे शब्द कठिण वाटले त्यांचा अर्थ येथें दिलेला आहे. )

| पृष्ठ | ओळ | शब्द | अर्थ |
|---|---|---|---|
| ३ | २६ | तरणी | सूर्य |
| ३ | ३५ | आतुडे | सांपडतें |
| ४ | ३१ | मुदली | घातली |
| ६ | २० | वाहीं | हातानें |
| १० | १६ | उदंडीं | प्रखर; घोर |
| ११ | २ | लोकेषणा | स्वर्गलोकाची अगर लोकप्रियतेची इच्छा |
| १२ | २३ | आरुपवाणे | वेडेवाकडे |
| १७ | ३३ | जघन्य | नीच; अधम |
| १९ | २१ | उबग | कंटाळा; वीट |
| २३ | १७ | सुषुप्तिपरी | झोपेसारखा |
| २३ | २३ | वास्तव | खरोखर |
| २४ | ३२ | भरोवरी | सामुग्री |
| २९ | ३५ | आरंबळे | ओरडे |
| २९ | ३५ | कुररी | मेढी |
| ३३ | ११ | अंतराय | अडचण; विघ्न |
| ३३ | २१ | धोसरा | चिंता; धक्का; भीति |
| ३४ | ६ | तुळा | साम्य; बरोबरी |
| ३४ | १९ | स्वइच्छ्यासें | स्वेच्छेनें |
| ३५ | २१ | व्याजें | निमित्तानें |
| ३६ | ६ | निष्टंक | निःशंकपणें; स्पष्ट |
| ३६ | २७ | तुष्णीभूत | शांत |
| ३९ | १५ | वोजें | योग्य रीतीनें |
| ४१ | १६ | कडोविकडी | कडेकोट बंदोबस्तानें |
| ४२ | २१ | पढिये | आवडता |
| ४४ | ३१ | थोंगीं थोंगीं | ठिकठिकाणीं |
| ४४ | ३३ | खोळेंसिचि | संकटांतच |
| ४५ | ११ | असमसास | असंख्य |
| ४७ | ६ | मंजूत | व्यवस्थित |
| ४९ | ७ | तीक्ष्ण | प्रखर; भयंकर |
| ५० | १४ | विन्यासें | प्रतिपादनानें; व्यवस्थेनें |
| ५१ | ७ | गव्हाळे | सर्पविशिष्ट |
| ५१ | ७ | शंखपाळ | सर्पविशिष्ट |
| ५२ | २ | वेंगडी वळती | घाबरगुडी उडते |
| ५२ | ३ | आगवणेचिया लाठिवा | आंगानें दिलेले धक्के किंवा ठोसे |
| ५२ | २७ | हारासा | नाशाला |
| ५३ | १६ | वेगाडा | घाबरगुंडी उडविणारा |
| ५३ | १६ | निजगडा | मेरुसारखा दृढ अशा |
| ५३ | १६ | फुडा | पुढारीपणानें असणारा |
| ५३ | २४ | पोष्ये | कुटुंब; मुलेंबाळें |
| ५३ | २४ | पालवीं | स्वाधीन; पदरांत |
| ५३ | ३५ | फुडे | खरें |
| ५४ | ६ | वोप | तेज |
| ५४ | ११ | मोहालीं | घोड्यांचे लगाम |
| ५४ | ११ | पांखरां | झूली |
| ५४ | ११ | झाटा | आयाळ |
| ५४ | १६ | नागरी | शहाणे; विद्वान् |
| ५४ | २२ | आलुकेपण | इच्छा; क्षुधा; आसक्ति |
| ५४ | २३ | गवादी | अन्नछत्र |
| ५५ | २५ | सुरवाडे | सुखानें |
| ५६ | १६ | वोजा | चांगल्या रीतीनें; सहज |
| ५७ | ५ | पुरुषर्षभ | नरश्रेष्ठ |
| ५९ | २८ | करी सम्मुखपण | साजरी अथवा गोड करी |
| ६० | १० | अतिक्रांत | सगळयांना मागें टाकून पुढें गेलेला |
| ६२ | १४ | निदान | वेध; नेम |

| पृष्ठ | ओळ | शब्द | अर्थ |
|---|---|---|---|
| ६२ | २१ | उले | विदीर्ण होतें |
| ६६ | ६ | दादुले | सामर्थ |
| ७० | १७ | गोमेद | रत्नविशिष्ट |
| ७० | १७ | वैडुर्य | रत्नविशिष्ट |
| ७१ | १ | गजबु | हलकल्लोळ |
| ७२ | १ | साउमे | समोर |
| ७२ | २ | पालवें | पदरानें |
| ७२ | ८ | पालवीन | खूण करीन |
| ७२ | ९ | मयोरकुंचा | मोरपिसाचें निशाण |
| ७२ | १९ | आराणूक | चैन |
| ७२ | ३१ | धारां निरपतीं | तरवार उपसतात |
| ७३ | ५ | टोणपा | मूर्ख; विद्याहीन; जंगली |
| ७७ | १ | खोळे | संकटात |
| ७८ | ५ | परिस्तरण | कुंपण |
| ७८ | २३ | रणवट्ट | रणटिळा |
| ८२ | ६ | वाडु | श्रेष्ठ |
| ८२ | २४ | धिंवसा | धैर्य |
| ८३ | २१ | कर्कश | भीषण; भयप्रद |
| ९० | ९ | दुर्धर्ष | अजिंक्य |
| ९१ | १९ | अविद्ध | कधींहि पराजय न पावलेला |
| ९५ | १५ | विसांचि | नाशी |
| ९५ | १५ | करणांतें | इंद्रियांते |
| ९६ | ३० | आदावळींसी | मूळच्या गुणांची |
| ९७ | २१ | खोंकरे | क्षय पावतो |
| ९७ | २९ | भतवी | भडकवी; भ्रमवी |
| ९९ | १५ | वसैठा | आश्रय; वसतिस्थान |
| १०० | ४ | रुंजि | गुंजारव |
| १०० | ५ | वेधोनि | लक्ष्यपूर्वक ऐकून |
| १०० | २६ | योग विरुधांत कावटी। साधे कां | योगाच्या औदाला कवटाळणे साधेल काय ? |
| ११० | २३ | सांचळ | चाहूल |
| ११२ | १० | आपन | प्राप्ति |
| ११५ | २ | सयानक | वाहनासहित |
| ११६ | १९ | पृवदराज | गंधर्वश्रेष्ठ |
| ११८ | १७ | अवंगूनि | जवळ करून |
| ११८ | १७ | वाटिव | पराक्रम |
| १२१ | १२ | प्रकार येणें | या रीतीनें |
| १२३ | १ | साचोकारें | खरोखर |
| १२४ | ११ | मुखच्चिवरी | तोंडावर |
| १२५ | १५ | वोज | रीत |
| १२८ | १४ | समके | सर्वांना |
| १३१ | ११ | रिपुग्राम | शत्रूंचा समुदाय |
| १४५ | २६ | करि मिणतु | खेद करी |
| १५१ | २७ | साई | प्रेम |
| १५१ | २७ | पातजैनी | विश्वासून |
| १५२ | २९ | सवे | लगेंच; तत्काल |
| १५२ | ३४ | खान | व्रण; घाय |
| १५२ | ३५ | धृति धृति सावडली | धैर्य एकवटून |
| १५३ | २६ | आंगणा | जातीने |
| १५४ | १५ | दीपन | तेज |
| १५५ | २१ | वरपडी | मिठी |
| १५६ | १ | गोवळा | गौळींना |
| १५७ | २५ | राणीव | राज्यपद |
| १५९ | १९ | सुडका | चिंधी |
| १५९ | २० | पाळा | वेढा |
| १५९ | २८ | चहोटा . | चवाठा; चौक |
| १६० | १३ | तिवाना | पानाला |
| १६१ | २३ | सोखळें | वाळलें |
| १६२ | ७ | वसकें | खुंटते |
| १६३ | ३२ | वोपा भातें | पोटगी दिली जाते |
| १७० | ११ | सादु | खुणेचा आवाज अगर हांक |
| १७० | १२ | पैसु | जागा |
| १७० | १५ | स्तेय | चोरी |
| १७५ | ३० | आंगोळी | बोट |
| १७६ | १५ | गुपोनि | रक्षण करून |
| १७६ | १६ | कव | झडप |

| पृष्ठ | ओळ | शब्द | अर्थ |
|---|---|---|---|
| १७६ | २१ | आचि | भाकरी |
| १७६ | २१ | भाणाचें | ताटांतील |
| १७७ | १८ | बोबाती | हांक मारती |
| १७७ | २० | रळी | विनोद |
| १७७ | ३० | बोवाई | निंदा करणारे |
| १७८ | २१ | दंदी | द्वेषी |
| १७९ | २३ | सादु देई | हांक मारी |
| १८१ | ७ | सरोबरी | चढाओढ |
| १८१ | १२ | अरस्य | रसहीन |
| १८१ | २२ | उपेगाचें | उपयोगाचें |
| १८१ | ३५ | उपरमु | पराजय |
| १८२ | १२ | सांडवलयाचे | सांडलेल्याचे |
| १८३ | १५ | आगोठी | पावसाळ्याच्या प्रारंभीं |
| १८३ | १७ | गोंदळीं | जमावांत; समुदायांत |
| १८५ | ८ | विळें | टोचणी |
| १८६ | ३ | आपजे | चिकटे |
| १९१ | १२ | नमर्ना वोळें | लोटांगण घालतों |
| १९३ | २ | कटकटा | हायहाय !; अरेरे ! |
| १९६ | १३ | सुनाट | स्वैरपणानें; व्यर्थ |
| १९९ | ८ | वेघे | लेंबकळतो |
| १९९ | २० | अपाव | नाश |
| २०० | २५ | रुंधलें | व्यापिलें; भरलें |
| २०० | ३० | दारवंटा . | उंबरठा |
| २०१ | ७ | सावी | सहावी |
| २०७ | १ | लांचिव | लांच दिलेला |
| २०८ | २५ | अधरपण | चंचलपणा |
| २०९ | ९ | वरण | ग्रहण |

| पृष्ठ | ओळ | शब्द | अर्थ |
|---|---|---|---|
| २१० | १० | सांती | शेवटीं |
| २१४ | ६ | कुश्चिळ | घाणेरडें |
| २१४ | ७ | मांदूस | पेटी |
| २१४ | १० | नारकी | नरकांत उपजलेला किडा |
| २१६ | १५ | वोरुवरी | खटपट |
| २१९ | १९ | परणी | विवाहानें |
| २२० | ३० | विहितवधू | लग्नाच्या बायका |
| २२१ | ११ | मौळिया | साधूला |
| २२२ | २२ | अनुकूळ स्त्री | चांगल्या कुळांतील स्त्री |
| २२२ | २२ | प्रतिकूळ स्त्री | हीन कुळांतील स्त्री |
| २२२ | २३ | टाकि | कृति; आवड |
| २२२ | २६ | याप | तुच्छ |
| २२३ | २५ | अवजतन | अडचण |
| २२४ | ११ | अव्हांटा | आडमार्गी |
| २२५ | १ | दुरित | पाप |
| २२७ | ११ | टाका | साधा |
| २३० | १७ | गुजाये | गुजगुजतो |
| २३१ | ६ | आती | तळमळणाऱ्यांनं |
| २३२ | १६ | न वजाय | न जावें |
| २३७ | २० | घाया | घाव घालण्यास |
| २३७ | २१ | तळवटीं | सैन्यांत |
| २३८ | १८ | बिरडें | गांठ |
| २३८ | २७ | गुणकडवसां | गुणांची छाया |
| २४१ | २६ | साकल्य | विस्तार |
| २४१ | २६ | वैकल्य | असमर्थता |
| २४१ | २६ | कैवल्य | मोक्ष; मुक्ति |
| २४१ | २८ | जाजावला | त्रासला |



# शुद्धिपत्र.



| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | ४ | शद्बब्रह्म | शब्दब्रह्म |
| ६ | ७ | शद्बरचनेची | शब्दरचनेची |
| ७ | १९ | वत्स | वत्सः |
| १० | १६ | कदंडी | उदंडी |
| १४ | २५ | प्रळयपण | प्रळपण |
| १७ | २९ | याकलियुगामाजि | या कलियुगामाजि |
| २४ | २ | परिसया | परियसा |
| २५ | २३ | द्वाभ्यामधः | द्वाभ्यामन्धः |
| २७ | ३० | चाकांक्षँलैकिक० | चाकांक्षँलौकिक० |
| ५४ | ११ | पांखगंवरी | पांखरां वरी |
| ६० | २६ | शारी | भारी |
| ६२ | २७ | तारीचि | तरीन्नि |
| ६२ | ३० | मा | गा |
| ६३ | १२ ते २१ | ओव्यांचे आकडे चुकलेले आहेत ते ५४ ते ६३ च्या ठिकाणीं | ५५ ते ६४ असे पाहिजेत |
| ६४ | २४ ते ३१ | ९ ते १५ | १० ते १६ |
| ६५ | १ ते १० | १६ ते २३ | १७ ते २४ |
| ६५ | २९ | ७ | ५ |
| ६६ | ३ | ८ | ६ |
| ६६ | ७ | ९ | ७ |
| ७१ | ३४ | हांकोचिसवे | हांकेचिसर्वे |
| ७२ | १६ ते ३३ | ६४ ते ८२ | ६५ ते ८३ |
| ७३ | २४ ते २७ | २४ ते २७ | २५ ते २८ |
| ७४ | ११ | १० | ८ |
| ९१ | ५ | ५२० | ४२० |
| ९५ | २२ | अन्यथा वोधें | अन्यथाबोधें |
| १०७ | १३:१४ | अतिरंथी | अतिरथी |
| ११२ | २९ | बाह्यकाशीं | बाह्याकाशीं |
| ११७ | २५ | मी पाहतां | मी पाहतों ” |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १२५ | १३ | बाधे | बधे |
| १२९ | ३१ | पिष्ट | इष्ट |
| १३९ | ३ | संन्निधानें | सन्निधानें |
| १४१ | ६ | हेंाच | हेंचि |
| १४१ | १९ | ७४ | ८४ |
| १४४ | २८ | रथात्तम | रथोत्तम |
| १४८ | ९ | ठेलां | ठेला |
| १४८ | २२ | तव्द्युत्पत्तेः | तद्व्युत्पत्तेः |
| १५६ | ३४ | ऐक | एक |
| १५८ | १० ते ३५ | १८५० ते ७६ | ४८ ते ७४ |
| १५९ | १ ते ३५ | ७७ ते ९ | ७५ ते ७ |
| १६० | १ ते ६ | १९१० ते १४ | ८ ते १२ |
| १६८ | २४ | षड्विष | षड्विष |
| १७२ | २९ | आशका | आशंका |
| १८० | १० | आत्माच | आत्माचि |
| १८२ | २७ | विषदे | विष दे |
| २०१ | १२ | झुंज | झुंजे |
| २३३ | १८ | एवमुक्त्वार्जुनः | एवमुक्त्वाऽर्जुनः |
| २३७ | २७ | विशादराहो | विषादराहो |
| २४१ | २ | ह्मण | ह्मणे |
| २४१ | २६ | द्यावया वैकल्य | द्यावया कैवल्य |

